


# श्रीसमर्थ हृदय

शंकर श्रीकृष्ण देव

महाराष्ट्र-ग्रन्थ-प्रदीपावलि — प्रदीप चौथा

सत्कार्योत्तेजक सभा — धुळें

श्री:

# रामदास आणि रामदासी

भाग १२१ वा

सर ११ वा ) **श्रीसमर्थचरित्र** ( मणि ११ वा

द्वितीय खंड

# श्रीसमर्थहृदय

श्रीगुरुचरणांतें स्मरोनी।
वाङ्मयमूर्ति हृदयीं धरोनी।
जें जें स्फुरलें माझिये मनीं।
तें तें लिहिलें स्वानंदें ॥




मू… …डेआठ रुपये

केशव भिकाजी ढवळे, मुंबई-४

॥ श्रीरामसमर्थ ॥

# अ नु क्र म णि का

## चित्रें



---

॥ श्रीरामसमर्थ ॥



# ग्रन्थारंभ

[ ग्रन्थाचें नांव — विषय — आधार — प्रार्थना — फलश्रुति ]

*** । *** । *** । *** । *** ॥

**श्रोते पुसती कोण ग्रंथ । काय बोलिलें जी येथ ॥**
**श्रवण केलियानें प्राप्त । काय आहे ॥**

**श्रीसमर्थस्वरूप ग्रन्थराज दासबोधाच्या** या पहिल्या ओवीनें या ग्रन्थाचें प्रकट मंगलाचरण करून त्या ओवींतील तिन्ही प्रश्नांचीं उत्तरें देतों.

श्रीसमर्थचरित्र लिहावें, हा माझा मूळचा हेतु नव्हता. श्रीसमर्थांना पहावें, त्यांचें अंतरंग जाणावें, त्यांची कृपा संपादन करावी, त्यांची कृपादृष्टि पुनरपि महाराष्ट्राकडे वळेल असें करावें, ही एक च इच्छा केली. ती कशी पूर्ण व्हावी, त्यांना कोठें शोधावें, ते कोठें दृष्टीस पडतील, असा मनाला प्रश्न पडला. कोठें तरी मठांत आढळतील, निर्जन अशा एकाद्या अवघड स्थळीं घळींत भेटतील, किंवा कल्याण, भीम, इत्यादिकांवर विहिरीच्या पाण्यांत जसा मंत्रानुग्रह झाला, तद्वत् त्यांच्या कवितासमुद्राच्या तळाशीं आपणांस जाऊन बसतां आल्यास त्यांचा साक्षात्कार होईल, असें वाटून मठ आणि घळी धुंडाळूं लागलों व हस्तलिखित ग्रन्थ मिळवूं लागलों. कांहीं तरी सेवा करावी म्हणजे ते कृपा करतील असें मनांत आणून श्रीक्षेत्र जांब येथें त्यांच्या जन्मस्थानीं भव्य श्रीसमर्थमंदिर व्हावें, चाफळास नदीला प्रशस्त घाट बांधला जावा, गडावर भक्तजनांच्या सोयीसाठीं टोलेजंग धर्मशाळा उभारावी, समाधिमंदिराचें शिखर सोन्यानें मढविलें जावें, सर्व मारुतिस्थानांचा आणि मठांचा जीर्णोद्धार व्हावा, त्यांच्या आवडत्या घळी शोधून काढाव्या आणि झाडून साफसूफ कराव्या, ते सहजगत्या जेथें जेथें बसले होते असें निश्चित कळेल, त्या त्या ठिकाणीं स्मारकें उभारलीं जावीं, अशा एक ना दोन, अनंत कल्पना करूं लागलों. पैकीं फार थोड्या साधल्या. त्यांत विशेष म्हणजे, जांबेस ज्या जागीं त्यांचा देह धरणीस प्रथम लागला, जेथें वयाच्या अकराव्या वर्षीं विश्वाच्या कल्याणाची

चिंता करीत त्यांनीं बसावें आणि छत्तिसाव्या वर्षीं जन्मदात्या मातेला दिव्यदृष्टि देऊन तिचा उद्धार केला, त्या त्रिभुवनपवित्रतम स्थळीं **श्रीसमर्थमंदिर** उभारलें जाऊन त्यांत शक १८५४ च्या चैत्र शु. ९ स अपूर्व समारंभ होऊन श्रीसमर्थ पुनरपि येऊन उभे ठाकले आहेत! बाकीच्या कल्पना लय पावल्या नाहींत, पण मनांतल्या मनांत च राहिल्या. हस्तलिखित ग्रन्थांचा संग्रह वाढत चालला तशी काळजी वाटूं लागली कीं, आपल्या मागें या विपुल, बहुमोल, चिरंतन उपयुक्त संग्रहाचें रक्षण कसें व्हावें? ही चिंता महाराष्ट्राच्या कानांवर घातली आणि महाराष्ट्रानें अल्पावधींत धुळें येथें **श्रीसमर्थवाग्देवतामंदिर** उभारून त्याचें १८५७ च्या ज्येष्ठ शु. १३ स उद्घाटन केलें. श्रीसमर्थांचें विस्मरण म्हणजे महाराष्ट्राचें मरण होय, हा माझा सिद्धान्त असल्यामुळें त्यांचें अखंड स्मरण रहावें व निरंतर सेवा घडावी म्हणून १८६१ च्या ज्येष्ठ शु. १४ स **श्रीसमर्थसंघ** निर्माण झाला आणि गांवोगांवीं त्याच्या शाखा निघूं लागल्या. हळूहळू सत्कार्योत्तेजक सभेच्या द्वारें १८२७ पासून ग्रन्थप्रकाशन होत च होतें. अकरा अकरा मण्यांचा एक एक सर अशा अकरा सरांची सुंदर **श्रीरामदास आणि रामदासी ग्रन्थमाला** श्रीसमर्थांच्या कंठीं घातली जावी, असें ठरविण्यांत आलें होतें. या सर्व योजना पार पडाव्या म्हणून काशीपासून रामेश्वरापर्यंत आणि क्वेट्यापासून कलकत्यापर्यंत श्रीसमर्थांचें नांव घेत भिक्षा मागत हिंडलों. श्रीसमर्थांच्या नांवांत जादु भरलेली आहे हा प्रत्यय आला. सर्वत्र श्रीसमर्थांच्या भक्तिप्रेमानें महाराष्ट्रीयांचें आणि इतरांचें हि अपेक्षेहून जास्त साहाय्य मिळत गेलें.

त्यांची कृपा व्हावी म्हणून हे व इतर उपाय योजीत होतों, तरी पण त्यांचें चरित्र लिहावें असें माझ्या मनांत येऊं नये. मला वाटे, मी काय त्यांच्या वेळीं होतों आणि असलों तरी मला काय आज त्याचें स्मरण राहिलें आहे? मग मी निराळें काय सांगणार? त्यांचे जे पांचपन्नास प्रकाशित आणि अप्रकाशित चरित्रग्रन्थ व इतर कागदपत्रें उपलब्ध आहेत, त्यांतलें च, सारासार विचार करून कांहीं घेऊन कांहीं टाकून व कांहीं बदलून मी त्यांचें चरित्र सजविणार ना? त्यांत मी जास्त तें काय करणार? मला वाटे, त्यांनीं कृपा करावी आणि आपण बोलावें! त्यांनीं स्वमुखें सांगावें आणि आपण तें

ऐकून कागदावर टिपावें ! फार काय, पण मला असें हि वाटावें कीं, आपण भानावर नसावें च मुळीं, त्यांनीं च आपला हात धरून लिहावें आणि मग आपण शुद्धीवर येऊन तें लिहिलें गेलेलें वाचावें ! अशीं अनेक मनोराज्यें करीत असावें. तो छंद अजिबात सुटला आहे असें म्हणतां येत नाहीं व कधीं काळीं सुटेल असें हि वाटत नाहीं. मला तसें वाटत नाहीं, पण माझी ही कल्पना असेल हि कदाचित् मृगजलवत्, पण तिच्या नादांत जाणारा काळ आनंदांत जातो एवढें खरें. माझे विचार या दिशेनें वाहवत चालले आणि माझ्या वयाकडे पाहून माझ्या मित्रांचा व मजवर अकारण प्रेम करणाऱ्या इतरांचा आग्रह वाढत चालला कीं, मीं श्रीसमर्थचरित्र लिहिल्याशिवाय जाऊं नये. माझ्या मनांत येऊं लागलें, चरित्रलेखनास आपण आरंभ करावा, फार तर तें प्रकाशित करण्याची घाई करूं नये. विचारास लागलों. या हि बाबतींत एका मागून एक अशा अनेक योजना कराव्या व त्या प्रकट हि कराव्या. मनांत कांहीं च ठेवूं नये.

अखेरीस शेवटची निश्चित योजना ठरली ती अशी : तीन खंडांत **श्रीसमर्थचरित्र** लिहावें, प्रथम खंड – **श्रीसमर्थावतार,** द्वितीय खंड **श्रीसमर्थहृदय** आणि तृतीय खंड – **श्रीसमर्थसंप्रदाय.** तिन्ही खंडांची साधन-सामुग्री गोळा झाली, रूपरेखा आंखली गेली, टिपणें टांचणें करण्यांत आलीं. तिन्ही खंड तयार होत आले. पहिला खंड प्रकाशित होण्याची वेळ कांहीं कारणानें अजून आली नाहीं. तोंवर दुसरा खंड – **श्रीसमर्थहृदय** – मागें कां ठेवा, असें वाटून तो च वाचकांच्या हातीं आधीं देण्याच्या तयारीला लागलों. पहिल्याच्या पाठोपाठ तिसरा खंड हि प्रकाशित होईल.

हें त्रिखंडात्मक **श्रीसमर्थचरित्र,** अकराव्या सराचा अकरावा मणि, म्हणजे **श्रीरामदास** आणि **रामदासी** ग्रन्थमालेंतील १२१ वा भाग समजला जावा ! सांप्रत माला ओवण्याचें काम ४३ व्या मण्यापर्यंत च आलें आहे. सबंध माला पुरी झाल्याचें पाहण्याचें भाग्य मला जरी लाभलें नाहीं, तरी माला पूर्ण होऊन ती श्रीसमर्थांच्या कंठीं विराजमान झाल्यावांचून राहणार नाहीं, अशी मला खात्री आहे.

**श्रीसमर्थहृदय** ग्रन्थाचा विषय त्याच्या नांवावरून च व्यक्त होत आहे. श्रीसमर्थांचा अवतार कोणत्या काळांत झाला, कोणत्या कार्यासाठीं झाला, त्या वेळीं देशाची राजकीय, धार्मिक, सामाजिक स्थिति कशी हलाखीची झाली होती, कर्म, उपासना आणि ज्ञान हीं जीं आपल्या धर्माचीं तीन अंगें तीं कशीं विगलित झालीं होतीं, धर्म टिकतो का बुडतो अशी वेळ कशी येऊन ठेपली होती, देवालयें आणि त्यांतील देव यांची कशी धडगत नव्हती, वारंवार धाडी येऊन व दुष्टांच्या तावडींत सांपडून स्त्रियांचे कसे धिंडवडे निघत, आपल्या आयाबहिणींच्या अब्रूचें रक्षण करण्याचें हि सामर्थ्य लोकांत कसें उरलें नव्हतें, ती हीन दीन स्थिति पालटण्यासाठीं त्यांनीं कोणते व्याप केले, इत्यादि इत्यादि इत्थंभूत वर्णन पहिल्या खंडांत लिहून झालें च आहे. प्रलयकाळ च प्राप्त झाला कीं काय, असें सर्वांस वाटूं लागलें होतें! अशा त्या काळीं श्रीसमर्थांची कशी **तगमग** होई, त्यांच्या मनांत कोणते **विचार** उद्भवत, त्या तशा स्थितीचा शेवट व्हावा म्हणून ते कोणत्या **कल्पना** करीत, कोणते **उपाय** योजीत, लोकांना कसा **धीर** देत, **उपदेश** कोणता करीत, ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाचा अनुभवसिद्ध **मार्ग** कोणता दाखवीत, त्यांचें **तत्त्वज्ञान** कसें होतें, त्यांची **उपासना** कोणती होती, ती तगमग, ते विचार, त्या कल्पना, ते उपाय, तो धीर, तो उपदेश, तो मार्ग, तें तत्त्वज्ञान, ती उपासना, हा या ग्रन्थाचा मुख्य विषय होय. पहिल्या खंडांत आपण श्रीसमर्थांचें बाह्यचरित्र दुरून पाहिलें, आतां या खंडांत आपणांस जवळ जाऊन त्यांचें अंतश्चरित्र पहावयाचें आहे. मजसारख्या मतिमंदाला हें कितपत साधेल हा प्रश्न वेगळा! निद्रा आणि समाधि या दोन अवस्था खेरीज करून त्यांच्या आयुष्यांतील जागृतावस्थेचा जो महत्त्वाचा काळ, त्या काळांतील प्रत्येक क्षणीं विचारांचे जे कोट्यवधि तरंग त्या ईश्वरी पुरुषाच्या मनांत उमटले असतील, ते आपणांस कळावयास नकोत काय? त्यांच्या आयुष्यांतील प्रसंग आठवून बोलावयाचें तर, लग्नसमारंभांतून निसटण्यासाटीं त्यांनीं पहिलें पाऊल टाकलें, त्यापूर्वीं श्रीराणादेवीच्या त्या बारा वर्षांच्या बाळाच्या मनांत जे विचार उद्भवले असतील, पुरश्चरणाचा बाह्य क्रम आपणांस समजला पण त्या काळांत त्यांच्या अंतःकरणांत काय चाललें होतें, तसें च तीर्थाटण करीत असतां, श्रीशिवरायादिकांना भेटतांना, किंबहुना प्रत्येक दृश्य कार्य

घडण्यापूर्वी, त्यांच्या मनांत जे जे विचार चालले असतील, ते ते सर्व आपणांस कळणें, त्यांचें संपूर्ण चरित्र जाणण्याच्या दृष्टीनें आवश्यक नाहीं काय? मला तर असें वाटतें, श्रीसमर्थांच्या हृदयांत प्रवेश करून तेथील जेवढें कळणें शक्य असेल तेवढें सर्व हार्द आपणांस कळावें व तें या ग्रन्थाच्या द्वारें आपण प्रकट करावें! श्रीसमर्थांच्या अंतरंगांत शिरून त्यांचें स्वरूप जाणण्याचा या ग्रन्थांत आपणांस प्रयत्न करावयाचा आहे.

कोणाचें हि नुसतें बाह्य चरित्र कळलें, पण अंतरंग कळलें नाहीं, तर आपण त्यांचें संपूर्ण चरित्र जाणलें असें म्हणतां येईल काय? " बुडाला औरंग्या पापी। " हे श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेले उद्गार आपण ऐकले, पण ते उद्गार बाहेर पडण्यापूर्वीं त्यांच्या अंतःकरणांत जी खळबळ झाली असेल, ती आपणांस न कळली तरी चालेल का? " उदंड जाहालें पाणी। स्नान संध्या करावया॥ " या उद्गारांत दडून बसलेल्या त्यांच्या अंतःकरणांतील अत्यानंदाचा आपणांस साक्षात्कार व्हावयास नको काय? एका अष्टाक्षरी श्लोकाचें उदाहरण घेऊन च मी माझ्या बोलण्याचा आशय जास्त स्पष्ट करतों.

**अंतरीं कल्पना केली। येकांतीं बोलिलों बहु।**
**रक्षिता देव देवांचा। त्याचा उछाव इच्छिला॥**

खूप विचार करून व एकान्तांत स्वतःच्या च मनाशीं किंवा सहकाऱ्यांशीं पुष्कळ बोलून श्रीसमर्थांनीं मनांत आणलें कीं, रावणाच्या बंदीशाळेंत पडलेल्या तेतीस कोटि देवांना ज्यानें मुक्त केलें, असा जो देवांचा हि देव श्रीराम, त्याचा उत्सव सुरू करून त्याच्या चरित्राकडे जनतेचीं मनें आपणांस वेधून घेतां येतील तर, न जाणों, अशा हताश, लाचार, अवनतीच्या काळांत हि लोकांत चैतन्य उत्पन्न होईल. येथें आतां आपणांस, चाफळास श्रीरामाची स्थापना करून श्रीसमर्थांनीं श्रीरामजन्मोत्सव संघटित रीतीनें व विशिष्ट पद्धतीनें सुरू केला, हें त्यांचें बाह्य चरित्र दिसतें आणि कळतें, पण त्यांनीं अंतरीं ज्या अनंत कल्पना केल्या असतील व एकान्तांत जें आत्महृदया-विष्करण केलें असेल, तें कळल्यावांचून त्यांचें संपूर्ण अंतर्बाह्य चरित्र आपणांस कळलें असें मानतां येईल काय? हा अष्टाक्षरी श्लोक मला फार

आवडतो. ‘ अंतरीं कल्पना केली । ’ हे श्रीसमर्थांचे उद्गार म्हणजे त्यांच्या हृदयांतरीं प्रवेश करण्याचें द्वार च होय, असें मला वाटतें ! सध्यां मला येथें इतकें च म्हणावयाचें आहे कीं, पहिल्या खंडांत आपण जसें त्यांचें बाह्य चरित्र पाहिलें, तसें आतां या खंडांत त्यांचें अंतश्चरित्र आपणांस पहावयाचें आहे.

काम कठीण आहे. तें कसें साधावें ? तें कोणास साधेल ? ज्यावर श्रीसमर्थ अनुग्रह करतील, त्यास तें साधेल. जो स्वतःस विसरून श्रीसमर्थ-स्वरूपांत लीन होऊन जाईल, विरघळून जाईल, तद्रूप होईल, त्यास तें साधेल. श्रीसमर्थांवांचून ज्यास दुसरें कांहीं सुचणार नाहीं, दिसणार नाहीं, भासणार नाहीं, त्यास तें साधेल. ते ह्याच्या हृदयांत व त्यांच्या हृदयांत हा, असें ज्याला श्रीसमर्थांशीं नातें जोडतां येईल त्यानें हा उद्योग करावा. जो श्रीसमर्थांपासून कालत्रयीं विभक्त होणार नाहीं, जो त्यांचा यथार्थ अनन्य भक्त असेल, तो च त्यांचें अंतरंग जाणूं शकेल !

मी तर यांत कोठें च येत नाहीं ! मग मीं हा उद्योग कां, कोणाच्या बळावर आरंभिला आहे ? श्रीसमर्थांची वाङ्मयमूर्ति, त्यांचे दिव्य चरण, त्यांच्या कृपेचा आभास आणि माझें मन, हे माझे चार आधार होत. या चतुर्विध आधारस्तंभांवर **श्रीसमर्थहृदयमंदिराची** उभारणी करण्याचें मी धाडस करीत आहें. माझ्या मनाचा साक्षी मी.

**मला वाटतें मी हृदयीं तुझ्या रे ।**
**प्रवेशोनि हारद्र तेथील सारें ।**
**बुझावोनि घ्यावें प्रकटीकरावें ।**
**स्वरूपीं तुझ्या लीन होऊनि जावें ।**

अशी त्यांची नित्य प्रार्थना करून हातीं लेखणी धरीत जाणार. ते कृपा करतील असा भरंवसा वाटतो.

**माझा स्वामी कृपेसहित । हृदयीं वसे ॥**

अशी भावना आहे, अनुभव नाहीं. त्या भावनेच्या बळावर, आतां फारसा विचार न करतां, एकवार त्यांच्या पादुकांवर मस्तक ठेवून आणि त्यांच्यावर

सर्वस्वीं भार टाकून त्यांच्या अफाट कवितासमुद्रांत झेंप घेण्याचा मी संकल्प करीत आहें. त्यांचें एक एक प्रकरण हातीं घेणार, त्यांत काय काय आहे तें पहात आणि उतरीत जाणार, त्यांच्या अंतरंगाच्या खुणा आढळल्या म्हणजे तेथें थोडा वेळ जास्त थांबून व रमून मग पुढें जाणार, केव्हां हि दमलों, थकलों, मतिगुंग झालों म्हणजे त्यांच्या चरणीं मस्तक ठेवून स्तब्ध बसणार, मग ते जी काय बुद्धि देतील, ज्या कांहीं कल्पना सुचवितील, जे प्रसंग सांगतील, जो युक्तिवाद करतील, तें सर्व ऐकून घेऊन, तेवढ्या-पुरतें मस्तक उचलून, तें कागदावर टिपीत जाणार! मला विश्वास आहे कीं, ते मला वाचकांसह परतीरास सुखरूप नेऊन पोंचवितील.

त्या कवितासमुद्रांत स्वतःला झोंकून देण्यापूर्वीं, कांठावर थोडा वेळ बसून, समुद्राची खोली आणि विस्तार हीं विचारांत घेतलीं पाहिजेत.

## [ १ ] अभंगात्मक प्रकरणें

| | | |
|---|---|---|
| ( १ ) चौदा ओवीशतें, | ग्रन्थसंख्या | १४०० |
| ( २ ) स्फुट ओव्या—३२८ | ,, | २४७० |
| | एकूण | ३८७० |

## [ २ ] अष्टाक्षरी पांच लघु काव्यें

| | | |
|---|---|---|
| ( १ ) षड्रिपु | अष्टाक्षरी ग्रं. सं. | ९६ |
| ( २ ) पंचीकरणयोग | ,, ,, ,, | १०० |
| ( ३ ) चतुर्थमान | ,, ,, ,, | १०० |
| ( ४ ) मानपंचक | ,, ,, ,, | १२५ |
| ( ५ ) पंचमान | ,, ,, ,, | १३४ |
| | एकूण अष्टाक्षरी ग्रं. सं. | ५५५ |

## [ ३ ] अष्टाक्षरी प्रकरणें

| | | |
|---|---|---|
| ( १ ) स्फुट प्रकरणें ६९ | ग्रं. सं. | ९९० |
| ( २ ) स्फुट श्लोक ६१ | ग्रं. सं. | ६८० |
| | एकूण ग्रं. सं. | १६७० |

## [४] श्लोकबद्ध प्रकरणें

| | | |
|---|---|---|
| (१) रामायण | श्लो. सं. | १४६२ |
| (२) करुणाष्टकें वगैरे २५९ | ,, ,, | १५९५ |
| (३) श्री श्लोक मनाचे | ,, ,, | २०५ |
| | एकूण श्लो. सं. | ३२६२ |

## [५] ओवीबद्ध अकरा लघु काव्यें

| | | |
|---|---|---|
| (१) पूर्वारंभ | ग्रन्थसंख्या | ६० |
| (२) जुनाट पुरुष | ,, | ५७ |
| (३) अंतर्भाव | ,, | १२० |
| (४) आत्माराम | ,, | १७८ |
| (५) पंचसमासी | ,, | १५१ |
| (६) सप्तसमासी | ,, | २११ |
| (७) सगुणध्यान | ,, | ११९ |
| (८) निर्गुणध्यान | ,, | १७७ |
| (९) मानसपूजा | ,, | १४५ |
| (१०) एकवीससमासी | ,, | १३४० |
| ,, ,, परिशिष्ट | ,, | ११३ |
| (११) जनस्वभाव | ,, | ७० |
| | एकूण ग्रं. सं. | २७४१ |

## [६] श्रीमत् ग्रन्थराज दासबोध

| | | |
|---|---|---|
| पूर्वार्ध – दशक १ ते ८ | ओवीसंख्या | ३८६६ |
| उत्तरार्ध – दशक ९ ते २० | ,, ,, | ३८८५ |
| | एकूण ,, | ७७५१ |

[७] **पदपदांतरें** ९०३ ग्रं. सं. सुमारें ३५००

[८] **अवांतर** आणि **प्रासंगिक प्रकरणें** अनंत – पण तूर्त अदमासें ३०००

[९] **श्रीसमर्थांचें एकमेव गद्य पत्र** – ५२ ओळींचें

विस्तारानें असें हें वाङ्मय अफाट आहे. त्याची खोली पाहूं गेल्यास ‘ प्रपंच सुखें करावा ’ येथपासून तों ‘ निर्गुण ब्रह्म तें निश्चळ। अंतरीं बिंबलें ॥ ’ येथपर्यंत ती आहे. रामराज्याच्या अत्यंत श्रेष्ठ ऐहिक ध्येयापासून तों अहं ब्रह्मास्मि या साक्षात्कारापर्यंत तें खोल असून पसरलेलें आहे. त्यांतील सारीं रत्नें धुंडाळून काढण्याचें माझें सामर्थ्य नाहीं. श्रीरामदासी संशोधन आणि प्रकाशन करण्याला सुमारें चाळीस वर्षांपूर्वीं आरंभ केला तेव्हां जो माझा हेतु होता, तोच आज हि आहे. दुसरें कांहीं करूं नये, श्रीसमर्थांना त्यांच्या वाङ्मयांत पहावें, ते चालून गेलेल्या वाटेवर त्यांचीं उमटलेलीं दिव्य पाउलें पहावीं, तीं पहात च रहावें, तीं नुसतीं भासलीं तरी तेथें तेथें मस्तक ठेवावें, ही च माझी पहिल्यापासून दृष्टि होती. माझ्या साऱ्या प्रयत्नांचें एक च सूत्र होतें. शक १८२७ त श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाची प्रस्तावना लिहिली तेव्हां जें धोरण होतें, तें च परवां १८६१ च्या चैत्रांत जांबेस राहून अकरा लघु काव्यांना प्रस्तावना लिहिली तेव्हां हि होतें. गेल्या छत्तीस वर्षांचा अनुभव पाहतां श्रीसमर्थवाङ्मयाकडे पाहण्याची माझी दृष्टि चुकलेली होती, असें माझ्यापुरतें तरी मला वाटत नाहीं. साहजिक आहे. श्रीसमर्थांच्या वाङ्मयाला म्हणजे त्यांच्या तत्त्वज्ञानाला, उपासनेला, कर्माचरणाला, त्यांच्या राजकारणाला आणि समाजकारणाला, व्यवहाराला आणि परमार्थाला, त्यांच्या यच्चयावत् सिद्धान्तांना आधारभूत जे अनेक ग्रन्थ, त्या सर्व ग्रन्थांपेक्षां हि मुख्य आधार आत्मप्रचीतीचा असल्यामुळें त्यांच्या वाङ्मयांत त्यांना शोधण्याचा आपला प्रयत्न वायां जाणार नाहीं, असा मला पहिल्यापासून विश्वास होता. राष्ट्रानें गुरुस्थानीं मानलेले जे महापुरुष स्वत: आचरून मग दुसऱ्यास सांगतात, स्वत: प्रचीति घेऊन जे नंतर बोलतात, त्यांच्या शब्दांत त्यांच्या अंतरंगांतील तरंग प्रतिबिंबित झालेले असले च पाहिजेत. श्रीसमर्थहृदयांतील त्या तरंगांत आपण अखंड तरंगत रहावें, हा च एक माझ्या मनानें ध्यास घेतला होता. मला वेदान्त समजत नाहीं, अद्यापि हि समजला नाहीं. तो समजून घेण्याचा मी प्रयत्न करीत असतों, कां, तर तो त्यांच्या मुखांतून निघालेला आहे म्हणून. पण माझी खरी आवड त्यांच्या पोटांत शिरून त्यांचें अंतरंग जाणण्याची. तें जाणण्याचें मुख्य ठिकाण एकच – त्यांचे ग्रन्थ.

जो ज्या मानानें श्रीसमर्थचरणांचा आश्रय करील, त्या मानानें त्यास श्रीसमर्थ आपल्या पोटाशीं धरतील. ध्यास तसें फळ. जो तद्रूप होईल तो च त्यांचें हृदय पूर्ण जाणूं शकेल. हा न्याय पतिपत्नीला लागतो, बंधुबंधूंना लागतो, स्वामिसेवकाला लागतो, तसा तो सद्गुरु आणि सच्छिष्य यांना हि लागतो. या चार हि संबंधांचीं उत्कृष्ट उदाहरणें आपणांस श्रीरामचरित्रांत पहावयास मिळतात.

**हृदयं ह्येव जानाति प्रीतियोगं परस्परम् ॥**

असें वचन श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील 'रामेण रामदासेन लिखितं' वाल्मीकि-रामायणाच्या आदिकांडांतील ७८ व्या सर्गांतील १५ व्या श्लोकांत आहे.

माझ्या हृदयांत श्रीसमर्थांना व त्यांच्या हृदयांत मला कितपत स्थान मिळालें आहे, हें ते किंवा मी यांच्याशिवाय कोण सांगूं शकेल? माझ्या-पुरती मी कबुली देतों कीं, माझी इच्छा पुष्कळ असली, तरी माझी पात्रता फार थोडी आहे. थोर पात्रतेचे पुरुष मीं पाहिले आहेत. त्यांचे श्रमसायास आणि निष्ठानेम, त्यांच्या तीव्र भावना आणि त्यांचे निर्धार पाहून च मी माझ्या ठिकाणीं थिजून जात असतों आणि त्यांच्या मानानें आपणांकडून कांहीं च सेवा घडली नाहीं किंवा साधनें झालीं नाहींत, म्हणून मी मनांतल्या मनांत कित्येकदां तरी

**परस्तावतों कावतों तप्त होतों।**

आणि गेला, जन्म वाया गेला, म्हणून कष्टी होत असतों.

अशा उद्विग्नावस्थेंत हि धीर वाटण्याला एक च कारण होत असतें. माझी योग्यता काय श्रीसमर्थांना दिसत नव्हती? मग माझ्या वांट्याला त्यांनीं हें काम दिलें च कां? यांतून मला निभावून नेणें त्यांना आतां प्राप्त आहे!

**माझी मिरासी केवळ अज्ञान।**

हें तुम्हांस ठाऊक होतें ना? मग आतां

**तुमचें तुम्ही च करा हृदयाविष्करण ।**
**आपुलें उच्छिष्ट हें चि माझें भोजन ।**
**जाणतसां दयाळा ॥**

मी काय सांगूं ! आपल्या उच्छिष्टावर मी जगत आहें. आपलें उच्छिष्ट सेवन करून आजवर मीं तर स्वतःचें पोषण केलें च, पण आतां तें च आपलें उच्छिष्ट वाचकांच्या हि ताटांत नेऊन वाढावें, असा उद्योग मीं आरंभिला आहे. आपला आशीर्वाद असावा.

वाचकांची हि इतकी च प्रार्थना करावयाची कीं, माझ्या अधिकाराबाहेरचें हें काम मला करावें लागत आहे, त्या मजकडे आपण दयार्द्र दृष्टीनें पाहिलें पाहिजे. श्रीसमर्थहृदयाचा ठाव घेण्याच्या हेतूनें मी त्यांच्या काव्योदधींत बुडी मारण्यास प्रवृत्त होत असतां माझ्या हातून अनेक प्रमाद घडतील, त्यांच्या अंतरंगांतील कित्येक खुणा माझ्या नजरेंतून निसटतील, त्याबद्दल आपण मला क्षमा करा. माझ्या चुका तुम्ही दुरुस्त करा, निसटलेल्या खुणा प्रकट करा आणि श्रीसमर्थहृदयाचें संपूर्ण दर्शन महाराष्ट्रास केव्हां तरी घडवा. तोंवर माझी आपणांस विनंति कीं, हें **श्रीसमर्थहृदय** आपल्या हृदयाशीं धरा, त्यांत माझें असें फार थोडें असणार आहे, तीन चतुर्थांश, न जाणों जास्तच, मी श्रीसमर्थांच्या च मुखानें बोलणार आहें. म्हणून म्हणतों, याला दूर लोटूं नका, याची उपेक्षा करूं नका.

या ग्रन्थाची फलश्रुति काय सांगावी ? जी वाचकांच्या प्रत्ययास येईल ती खरी. तथापि मला वाटतें, या ग्रन्थाच्या अवलोकनानें

(१) श्रीसमर्थचरणीं भक्तिप्रेम जडेल,
(२) त्यांचें अंतरंग प्रत्ययास येऊन त्यांच्या स्वरूपाचा साक्षात्कार होईल,
(३) त्यांचें संपूर्ण वाङ्मय अवलोकिल्याचें श्रेय लाभेल,
(४) तें वाङ्मय आपण स्वतः वाचावें अशी इच्छा उत्पन्न होईल,
(५) तें वाचीत असतां त्यांच्या अंतरंगाच्या नवीन नवीन खुणा दृग्गोचर होतील,

(६) जन्माची सार्थकता कशांत आहे याची यथार्थ कल्पना होऊन साधन मार्गावर पाऊल पडेल,

(७) आचार आणि उपासना आवडूं लागून ज्ञानप्राप्तीचा मार्ग खुला होईल,

(८) स्वराज्य आणि स्वाराज्य प्राप्त करून घेण्याची दिशा दिसूं लागेल,

(९) जगदंतरीं सख्य होऊन परोपकार करीत च देह झिजवावा असें वाटूं लागेल,

(१०) कशा हि सुखदुःखाच्या प्रसंगीं चित्ताची प्रसन्नता कायम च राहील,

(११) आणि अखेरीस, तुम्ही आम्ही, सर्व जण श्रीसमर्थांच्या कृपेला पात्र होऊं.

**इति श्रीसमर्थहृदयग्रंथ। जेथ अनुवादिला सद्गुरुपंथ।**
**अनुसरितां पुरती मनोरथ। येकनिष्ठ गुरुभक्ताचे॥**

---

## हृदयाची तळमळ



**माझे जीवींचा सांगात। भेटी घडो अकस्मात॥ ध्रु०॥**
**पावन तो रे आठवतो रे। गळत ढळत अश्रुपात॥ १॥**
**कोण तयाला भेटवि त्याला। विकल मनें प्रणिपात॥ २॥**
**दास उदासिन करीत चिंतन। पावन ते गुण गात॥ ३॥**

# (१) ओवीशतें

ओवीशतें चवदा आहेत. त्यांची व स्फुट ओव्यांची रचना अभंगात्मक आहे. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक २४०, ११८३ इत्यादि कांहीं बाडांत त्यांना अभंग च म्हटलेलें आढळतें; पण रचनेला आरंभ करतांना गणेशशारदास्तवनांत व मधूनमधून हि स्वतः श्रीसमर्थ त्यांना ओव्या म्हणत आहेत.

आपल्या कोणत्या हि प्रकरणाचा रचनाकाळ म्हणून श्रीसमर्थांनीं कोठें च दिलेला नाहीं. रचनेच्या सौकर्याचा विचार करतां मला असें वाटतें कीं, क्वचित् एकादी श्लोकबद्ध, ओवीबद्ध, अभंगात्मक स्फुट रचना कोणी केव्हां हि करील, पण एकादें मोठें काव्य रचावयाचें झाल्यास, त्यास अभंग सोपा वाटेल, त्याहून ओवी किंचित् जड जाईल आणि ओवीहून हि श्लोकबद्ध रचना कठीण वाटेल. केवळ हें च कारण मनांत आणून मी म्हणत नाहीं, पण मला असें वाटतें, ओव्याशतकें आधीं, मग पूर्वारंभादि ओवीबद्ध प्रकरणें, मग एकवीससमासी दासबोध, मग सप्तदशकी दासबोध, नंतर रामायण, मनाचे श्लोक आणि शेवटीं साद्यन्त वीसदशकी श्रीमत् ग्रन्थराज दासबोध, असा रचनेचा स्थूलमानानें कालानुक्रम असावा. स्फुट ओव्या, पदपदांतरें, करुणाष्टकें इत्यादि स्फुट रचना मधूनमधून, प्रसंगानुसार, वेळोवेळीं होत गेली असावी. खरें खोटें श्रीसमर्थांना माहीत.

या ओवीशतकांतील बहुतेक विषय पुढें ग्रन्थराज दासबोधांत हि आले आहेत. श्रीसमर्थांच्या अवताराचा आविर्भाव होत होत, श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाच्या रूपानें त्यांचा पूर्णावतार प्रकट झाला, असें मला म्हणावेंसें वाटतें. हीं शतकें अवलोकावीं, लघु काव्यें वाचावीं आणि श्रीमत् दासबोधाचें आलोडन करावें, म्हणजे श्रीसमर्थांच्या एकंदर तत्त्वज्ञानाचा कसा सारखा पायाशुद्ध विकास होत गेला आहे, तो वाचकांच्या लक्षांत येईल.

श्रीसमर्थांनीं या शतांना नांवें दिलेलीं नव्हतीं. कल्याणलिखित ५१ व्या बाडांत त्यांचीं नांवें नाहींत, पण इतर कांहीं बाडांत, विशेषतः उद्धवलिखित बाडांक ४४९ त यांपैकीं कांहीं शतांचीं नांवें आढळतात. तीं विषयानुरोधानें उद्धवांनीं ठेवलेलीं असावींत. तीं आतां आपण पूर्ण करूं.

## शत पहिलें – गर्भवास

पण यांत केवळ च गर्भवासाचें वर्णन नाहीं. त्यांत सत्तर ऐशीं वर्षांचा एकादा म्हातारा मागें वळून पाहून, पश्चात्तापानें व्याकुळ होऊन आपलें सारें चरित्र आठवीत आहे, असें दाखविलें आहे. अपवादात्मक चरित्रें सोडून द्या, पण आपल्या बहुतेकांच्या चरित्रांचें चित्र या शतांत आढळेल. हें शत, आपल्यापैकीं पुष्कळांच्या चरित्रांचा आरसा आहे. त्यांत थोड्याफार फरकानें बहुतेकांना आपलें चरित्र प्रतिबिंबित झालेलें दिसेल. वृद्धांनीं आतां या आरशांत पाहून त्यांना काय लाभ व्हावयाचा आहे ! जे आज पंचविशींत किंवा तिशींत असतील त्यांनीं पश्चात्तापानें देवाला आळविणाऱ्या या वृद्धाच्या चित्राकडे पाहून वेळीं च बोध घेतला, तर ८० व्या वर्षीं त्याच्यासारखा पश्चात्ताप करण्याचा प्रसंग त्यांच्यावर येणार नाहीं. भाग्यवान असतात तेंच वेळेवर सावध होतात. बहुतेक जण वेळ निघून गेल्यावर च दुःख करीत बसतात ! गर्भवास, बाळपण, तारुण्य, वृद्धपण या अवस्थांचें हें वर्णन श्रीसमर्थांनीं तरुणांच्यासाठीं च केलेलें आहे. तें तरुणांनीं वाचून वेळेवर सावध होऊन आपल्या चरित्राला योग्य दिशा लावली तर वयाच्या ८० व्या वर्षी, ‘तुझ्या मनांत येईल तेव्हां ये, माझी तयारी आहे’ असा मृत्यूला त्यांना निरोप पाठवितां येईल व तो येईल तेव्हां त्याचें मोठ्या आनंदानें स्वागत करतां येईल.

**सोडवीना कोण्ही श्रीरामावांचूनि ।**
**संकटीं धांवणी राम करी ॥ ९९ ॥**
**राम करीतसे दासांचा सांभाळ ।**
**भक्तांचा स्नेहाळ राम येक ॥ १०० ॥**

## शत दुसरें – संसारकथा

तो च कथाभाग, लग्न झाल्यानंतरचा, या हि शतकांत पुढें चालविला आहे. या दोन्ही शतकांतील विषयाचा विस्तार ग्रन्थराजाच्या तिसऱ्या दशकांत करण्यांत आला आहे. दारिद्र्यानें पीडलेल्या माणसाची कल्पना करून त्याच्या क्लेशाचें वर्णन मुद्दाम श्रीसमर्थांनीं केलें असावें, असें मला वाटत नाहीं. तर भोवतालच्या बहुतेकांचा संसार तसा च चाललेला त्यांना दिसत असावा.

मोहांत गुरफटून जाऊन संसाराचा असला भंडवडा सहन करण्यापेक्षां संतांच्या संगतींत देव ठायीं पाडावा आणि जन्माचें सार्थक करावें, असा शहाण्या लोकांना श्रीसमर्थांचा इषारा आहे :

**बरें पाहा मनीं जाणते लोक हो । वायांवीण मोहो धरीतसा ॥ ५६ ॥**
**धरीतसा मोहो देवेवीण वायां । अंतीं आया बाया चावळता ॥ ५७ ॥**
**चावळता कां रे देव वोळखाना । धुंडूनि काढाना कोठें तऱ्हीं ॥ ५८ ॥**
**कोठें तऱ्ह देव पावेल निर्वाणीं । नित्य निरूपणीं संतसंगें ॥ ५९ ॥**
**संतसंगें दोष नासती विशेष । आणि जगदीश ठाई पडे ॥ ६० ॥**
**ठाईं पडे तेव्हां जीणें धन्य जालें । सार्थक चि केलें संसाराचें ॥ ६१ ॥**

असा अत्यन्त कळवळ्यानें जणूं संदेश देऊन

**नित्यानित्य जाणे तो साधु जाणावा ॥ ७० ॥**

अशी साधु ओळखण्याची त्यांनीं एक खूण सांगून ठेवली आहे. असे नित्यानित्यविवेक जाणणारे साधु दुर्मिळ होत, बाकी

**ठाईं ठाईं बंडें मांडलीं पाषांडें । सांगती उदंडें पोटासाठीं ॥ ६५ ॥**

असे, बाह्याकार करून साधु म्हणून मिरविणारे, पोटभरू च फार. यासाठीं जपावें, सावध असावें, भलत्यांच्या नादीं लागूं नये, फसूं नये, साधु आधीं ओळखावा, मग त्याची संगति धरावी, मीपण सांडावें, परब्रह्म जोडावें, तर च संसाराची म्हणजे जन्माची सार्थकता आहे, असें निक्षून सांगून श्रीसमर्थ स्वत:चें समाधान कशानें झालें तें निवेदन करितात :

**भजन रामाचें त्रैलोक्यपावन । करितो चिंतन शूळपाणी ॥ ९३ ॥**
**शूळपाणी चिंती तें करा चिंतन । माझें तन मन दाशरथी ॥ ९४ ॥**
**दाशरथी देव देवांचा कैपक्षी । सर्व काळ रक्षी भक्तजना ॥ ९५ ॥**
**भक्तजन लीन जाले रामपदीं । सज्जनसंवादीं विवरतां ॥ ९६ ॥**
**विवरतां जड चंचळ निश्चळ । तुटे खळखळ मीपणाची ॥ ९७ ॥**
**मीपण हें रामपदीं निवेदीलें । समाधान जालें रामदासीं ॥ ९८ ॥**

आपण आपलें असें कांहीं च निराळें न ठेवतां, सर्व रामपदीं अर्पण करून समाधान प्राप्त करून घेतलें आहे, अशी श्रीसमर्थांच्या अंतरंगाची पहिली लहानशी खूण येथें आपल्या निदर्शनास येत आहे.

## शत तिसरें – संतसंग

संतांच्या संगतीपासून कोणता लाभ होतो ? ज्याहून जगांत थोरला लाभ नाहीं, असा लाभ होतो. सत्संगतींत गर्भवास टळतो, भवसिंधु आटतो, पापबुद्धि झडते, असाध्य वस्तु साध्य होते, आयासावांचून ज्ञानप्राप्ति होते, विवेक स्फुरतो, मीपण मावळतें, थोरल्या देवाची ओळख होते, ब्रह्मज्ञान होतें. सत्संगतींत मन इतकें निर्मळ आणि प्रसन्न होतें, त्यांतील जड विकार नष्ट होऊन तें इतकें हळुवार होतें, कीं तें जणूं अंतराळीं च तरंगत आहेसें भासतें, तें मुळीं पृथ्वीवर वावरत च नाहीं !

**संतसंगें ब्रह्मपद वोळखावें । विवेकें पावावें निरंजना ॥ २४ ॥**
**निरंजना जातां नाहीं जन वन । अंत्राळीं गमन येकायेकीं ॥ २५ ॥**
**येकायेकीं देव निर्मळ निश्चळ । आतुडे प्रांजळ दुजेंवीण ॥ २६ ॥**
**दुजेवीण देव येकला येकट । उभा घनदाट मागें पुढें ॥ २७ ॥**
**मागें पुढें सर्व देवांचा नायक । सांपडे विवेक जालीयानें ॥ २८ ॥**
**जालीयानें कृपा संतसज्जनाची । मग विवेकाची वाट फुटे ॥ २९ ॥**

माझ्या असें लक्षांत आलें आहे कीं, सत्संग आणि विवेक या दोन साधनांची महती या चवदा शतांत आणि पुढच्या स्फुट ओव्यांत श्रीसमर्थांनीं परोपरीनें वर्णिली आहे. सत्संग आधीं आणि नंतर किंबहुना त्यापासूनच पुढें विवेक ! जन्मसफलता ही या दोहोंची फलप्राप्ति होय.

एवढी ज्या सत्समागमाची महती, तो सत्समागम आम्हांस कसा लाभावा ? आम्हीं कोणाच्या तोंडाकडे पहावें ? साधु कसा ओळखावा ? तेव्हां काय, आतां काय आणि केव्हां हि काय, साधु विरळा च असणार, तिरळे भोंदू च फार असणार ! खरा साधु सर्वांसारखा च दिसतो, किंबहुना, आपण इतरांहून निराळे आहोंत, असें कोणाच्या लक्षांत येऊं नये म्हणून त्याचा उलटा प्रयत्न असतो, तेव्हां त्यास ओळखावें तरी कसें ?

**साधु धूर्तपणें सारिखा चि ॥ ५५ ॥**
**सारिखा चि दिसे जनाचियेपरी । परी तो अंतरीं वेगळा चि ॥ ५६ ॥**
**वेगळा चि ज्ञानें पूर्ण समाधानें । सस्वरूपीं मनें वस्ती केली ॥ ५७ ॥**
**वस्ती केली मनें निर्गुणीं सर्वदा । मीपणें आपदा तया नाहीं ॥ ५८ ॥**
**तया नाहीं काम तया नाहीं क्रोध । जया नाहीं खेद स्वार्थबुधी ॥ ५९ ॥**

**बुद्धि निश्चयाची स्वरूपीं जयाची । कल्पना ठाईंची निर्विकल्प ॥ ६० ॥**
**निर्विकल्प मद मत्सर सारिला । आणि संव्हारिला लोभ दंभ ॥ ६१ ॥**
**दंभ हा लोकिकीं विवेकें सारिला । दुरी वोसंडीला अहंकार ॥ ६२ ॥**
**अहंकार नाहीं दुराशा अंतरीं । ममता हे दुरी मोकलीली ॥ ६३ ॥**
**मोकलीली भ्रांती शरीर संपती । वैभव संतती लोलंगता ॥ ६४ ॥**
**लोलंगता नसे ज्ञानें धालेपणें । ऐसीं हें लक्षणें सज्जनाचीं ॥ ६५ ॥**

एवढ्यानें लक्षणें संपलीं असें कोणीं मानूं नये. श्रीसमर्थ म्हणतात, सज्जनांचीं लक्षणें सांगतांना आपली वृत्ति अति लांचावते, म्हणून त्यांच्या असंख्य लक्षणांपैकीं आणखी कांहीं सांगतों, अशी पुन्हा प्रस्तावना करून ते आणखी अनेक लक्षणें सांगण्यास प्रवृत्त झाले आहेत. त्या सर्वांचें सार त्यांनीं असें काढलें आहे कीं, साधु हा क्रियावंत असावा, त्यानें लोकाचार सांभाळावे, अनाचार करूं नये. तो क्रियाभ्रष्ट नसावा. क्रियाभ्रष्टानें लोकांत येऊं नये, त्यानें अरण्यांत जाऊन पडावें. तेथें आपल्या एकट्याचा काय सोक्षमोक्ष साधावयाचा असेल तो त्यानें करून घ्यावा.

**क्रियाभ्रष्ट तेणें लोकिकां सोडावें । आणि वसवावें ब्रह्मारण्य ॥ ८७ ॥**
**ब्रह्मारण्य सेवी तो साधु येकला । जना नाहीं आला उपेगासी ॥ ८८ ॥**

जो मुमुक्षु असेल त्यानें असला क्रियाभ्रष्ट गुरु कधीं करूं नये.

**मुमुक्षानें गुरु क्रियाभ्रष्ट केला । तरी अंतरला दोहीं पक्षीं ॥ ९१ ॥**
**दोहीं पक्षीं शुद्ध तया ज्ञानबोध । येर ते अबद्ध अनाचारी ॥ ९२ ॥**

श्रीसमर्थ खरें तें च बोलून गेले ! शब्दज्ञानी पण क्रियाहीन अनाचारी त्या हि काळीं होते, आज हि गांवोगांवीं आहेत व नेहमीं च असणार ! पण अशांचा हि कळवळा येऊन श्रीसमर्थांच्या मुखांतून त्यांना हि उद्देशून चार उपदेशाचे शब्द बाहेर पडले आहेत. स्वतःस ज्ञानी समजणाऱ्या अनाचारी पुरुषांना पाहून श्रीसमर्थांना वाईट वाटत नसे असें नाहीं. कोणत्या हि विषयाचें विवेचन करावयाचें म्हटलें, तर तें पूर्ण आणि सत्य असें च झालें पाहिजे, असा त्यांचा नेहमीं कटाक्ष असल्यामुळें त्यांच्या वाङ्मयांत त्यांनीं पाखांडी लोकांचा अनेक ठिकाणीं समाचार घेतला असला, तरी त्यांच्या अंतरींचा हेतु अशांच्या कल्याणाचा च असे. या शतांत तर त्यांनीं त्यांची क्षमा मागून त्यांना स्वहिताचा मार्ग दाखविला

आहे. अनाचार करणारे अनाचार करोत बापडे, आम्हांस सत्य तें सत्य च सांगितलें पाहिजे, असें म्हणून श्रीसमर्थ त्यांना उपदेश करितात :

**पाहे पाहे बापा सत्य तें शोधूनि । ठाकेना म्हणोनि निंदूं नको ॥ ९६ ॥**
**निंदूं नको शास्त्र निंदूं नको वेद । तरी च स्वानंद पावसील ॥ ९७ ॥**
**पावसील राम जीवाचा विश्राम । अहंतेचा श्रम सांडितां चि ॥ ९८ ॥**
**सांडितां विवेकें मिथ्या अभिमान । तरी समाधान पावसील ॥ ९९ ॥**
**पावसील गती शुद्ध निरूपणें । रामदास म्हणे क्षमा करी ॥ १०० ॥**

वरील ओव्यांचा अर्थ लावण्यांत व तदनुरोधानें श्रीसमर्थहृदयाचा ठाव घेण्यांत मी चुकलों असेन, तर श्रीसमर्थांनीं मला क्षमा केली पाहिजे. मनांत किंचित् शंका आली म्हणून क्षमेची याचना केली, शंकेचें निवारण तत्काळ झालें, तरी याचना केली ती तशी च राहूं देत आहें. हृदयग्रन्थाचा शेवट गांठीपर्यंत ही माझी याचना क्षणोक्षणीं, पदोपदीं कायमची च पण अलिखित आहे, असें कृपा करून समजावें. चुकेन तेव्हां तेव्हां सांवरीत जावें, अशी प्रार्थना आहे.

## शत चवथें – उपदेशपद्धति

या शतकांत श्रीसमर्थ शिष्यास आपल्या पुढें बसवून घेऊन प्रत्यक्ष ज्ञानोपदेश करीत आहेत. आपण च प्रश्न विचारीत आहेत व त्यांचीं उत्तरें आपण च देऊन हळू हळू तीं शिष्यास पटवीत आहेत. श्रीसमर्थांच्या मुखानें हा उपदेश ऐकावा अशी ज्यास इच्छा असेल, त्यानें हें शतक एकाग्र चित्तानें मननपूर्वक अवलोकावें. त्यांतील प्रत्येक शब्द तोलून घ्यावा, समजून घ्यावा, पाळावा आणि कृतार्थ व्हावें. स्फुट ओव्यांपैकीं १४८ ते १५० या ओव्यांत ही च उपदेशपद्धति थोडक्यांत अनुसरलेली आहे.

शिष्य पुढें बसला आणि त्यास श्रीसमर्थ म्हणतात, "बैस, शांत हो, सर्व उपाधि विसरून जा, मी विचारतों किंवा सांगतों तिकडे च केवळ लक्ष दे. मला सांग, तूं कोण आहेस? तूं देहाचा अभिमान धरून बसला आहेस, तर मला सांग, कोणत्या अवयवाचा तुला अभिमान वाटतो? कोणते अवयव म्हणजे आपण असें तुला वाटतें? तुझ्या स्थूल देहांतील अस्थि, मांस, त्वचा, नाडी, रोम, हे पांच पृथ्वीचे अंश; शुक्रीत, श्रोणीत,

लाळ, मूत्र, स्वेद हे पांच आपाचे अंश; क्षुधा, तृषा, आलस्य, निद्रा आणि मैथुन हे तेजाचे अंश; चळण, वळण, प्रसारण, निरोध आणि आकुंचन हे पांच वायूचे अंश; आणि काम, क्रोध, शोक, मोह, भय हे पांच आकाशाचे अंश; अशीं जीं पांच गुणिले पांच एकूण पंचवीस तत्त्वें तुझ्या स्थूल देहाचीं, यांपैकीं तूं कोणता? यांपैकीं तूं कोणता च नसून या सर्वांचा तूं साक्षी आहेस, त्यांचा तूं जाणणारा आहेस, म्हणजे स्थूळ देहाहून तूं कोणी निराळा आहेस, हें खरें ना? देह तो च मी, असें वाटणें ही तुझी जीवदशा. ती जीवदशा जाऊन देहाचा मी साक्षी आहें असें वाटणें ही शिवदशा, ईश्वरदशा. देहाला नांव आणि रूप आहेत, तो दृश्य आहे. त्याचा साक्षी जो तूं, त्या तुला देह नाहीं, तूं विदेही आहेस. तेव्हां तुझा स्थूळ देह म्हणजे तूं नव्हेस, हें तुला पटलें ना? आतां शंका उरली सूक्ष्म देहाची.

अंतःकरण, मन, बुद्धि चित्त, अहंकार, मिळून अंतःकरणपंचक होतें; व्यान, समान, उदान, अपान, प्राण, मिळून प्राणपंचक; शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, मिळून विषयपंचक; श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा, नासिक, हें ज्ञानेंद्रियपंचक व वाचा, पाणी, पाद, शिस्न आणि गुद, हें कर्मेंद्रियपंचक; मिळून जीं तुझ्या सूक्ष्म देहाचीं पंचवीस तत्त्वें, यांपैकीं कोणतें तत्त्व म्हणजे तूं, कोणतें तत्त्व म्हणजे आपण असें तूं समजतोस? कोणतें च नाहीं, तर तूं या हि सर्वांचा साक्षी च आहेस. खरें ना? मग आतां तुला, तूं तुझ्या स्थूळ आणि सूक्ष्म देहांचा साक्षी आहेस, त्यांच्याहून तूं निराळा आहेस, हा अनुभव आला. तर आतां सांग, या सर्वांचा साक्षी म्हणजे जाणता जो तूं, तो तूं कोण आहेस?"

शिष्य म्हणतो, "मला कळत नाहीं, स्वामींनीं च कृपा करून सांगावें."

स्वामी विचारतात, "तुला कळत नाहीं, हें तुला कळतें ना? मग तुला कळत नाहीं, हें जें तुझें अज्ञान, तो च तुझा कारणदेह आणि त्या कारणदेहाहून हि तूं कोणी निराळा च आहेस, एवढें तर खरें ना?

येथवर तुझ्या तीन देहांचा निरास झाला. स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिन्ही देहांचा तूं साक्षी आहेस, त्यांच्याहून तूं निराळा आहेस, हें तुला पटलें. मग आतां सांग, तूं कोण तें?

कळत नाहीं हें कळणें, हें अंतःकरणाचें काम आहे. आत्मस्वरूपीं हें जाणपण हि संभवत नाहीं. कळत नाहीं हें कळणें, हें जें तुझें जाणपण, तो च तुझा महाकारण देह. महाकारण म्हणजे ज्ञान. अज्ञान देह जसा तूं नव्हेस, तसा ज्ञान देह म्हणजे हि तूं नव्हेस.

तेव्हां तूं जो कोणी आहेस, त्या तुझें स्वरूप मनबुद्धिअगोचर आहे, तेथें विसर नांहीं आणि आठव हि नाहीं, नेणणें नाहीं तसें जाणणें हि नाहीं, कोणती च वृत्ति नाहीं.

**वृत्तिरूप आत्मा हें कई घडावें । तेव्हां विघडावें निवृत्तीसी ॥ २४ ॥**
**निवृत्ती उन्मनी निःशब्द विज्ञान । ऐसें समाधान अनुर्वाच्य ॥ २५ ॥**
**अनुर्वाच्य तेथें नाहीं जाणपण । आपुलें आपण पुरातन ॥ २६ ॥**

तेथें मनाचा प्रवेश होऊं शकत नाहीं. तें निर्विकल्प आहे, त्याची कल्पना मनास होणार नाहीं. याप्रमाणें विचारानें आपल्या चार हि देहांचें निरसन करावें, तेव्हां कोठें

**मग होये ठावें समाधान ॥ ३७ ॥**
**समाधान तें तूं वाक्य तत्त्वमसि । सोहं हंसा ऐसी मात आहे ॥ ३८ ॥**
**पाहे अहं ब्रह्म ऐसें चि वचन । ब्रह्म सनातन तूं चि बापा ॥ ३९ ॥**
**तूं चि येक ब्रह्म येर सर्व भ्रम । दृढ धरी वर्म अंतरींचें ॥ ४० ॥**

हें जें मीं तुला सांगितलें व जें तुला समजलें असें वाटतें, तें दृढतर होण्यासाठीं विचार, श्रवण, मनन, विवरण, वैराग्य, संगत्याग, भक्ति, इत्यादि साधनांची अत्यन्त आवश्यकता आहे. नुसत्या शब्दज्ञानानें काम भागणार नाहीं, पदरीं फळ पडणार नाहीं."

**शाश्वताची प्रीति विषयीं विरक्ति ॥ ४५ ॥**
आणि **स्वरूपीं आसक्ति याचें नांव भक्ति ॥ ४८ ॥**

या दृष्टीनें भक्ति, ज्ञान, वैराग्य हीं एकरूप असलीं तरी श्रीसमर्थ शिष्याला बजावितात :

**नाहीं भक्ति भाव सगुणाचा ठाई । शब्दज्ञान काई बोलोनियां ॥५८॥**
**बोलोनियां मुख तैसी क्रिया करी । धन्य तो संसारीं ब्रह्मज्ञानी ॥५९॥**
**ब्रह्मज्ञानी भला वर्तुणुकेपासीं । कोरड्या शब्दासी कोण पुसे ॥६०॥**
**कोण पुसे बापा ज्ञान हें शाब्दिक । क्रिया अलोलीक सत्य जाण ॥६१॥**

**सत्य जाण भक्ति शरीरें करावी । आवडी धरावी सगुणाची ॥६२॥**
**सगुणीं आदरें देह झिजवावें । भजन करावें नवविधा ॥ ६३ ॥**
**नवविधा भक्ति हा देहे चालतां । करावी सर्वथा सर्व भावें ॥ ६९ ॥**
**सर्व भाव सदा सगुणीं भजावें । कोरडें त्यागावें शब्दज्ञान ॥ ७० ॥**

श्रीसमर्थांचे हे आत्मप्रचीतीनें निघालेले कळकळीचे बोल अवमानून कोणाचें हित होणार आहे. एकीकडे नुसतें शब्दज्ञान बोलावें आणि दुसरीकडे विषयांत खुशाल रमावें, कुलाचार बुडवावे, भ्रष्टाकार माजवावा, एकंकार करावा आणि पाषांडमत थावरावें, यासारखें दुसरें पातक नाहीं ! यासाठीं, श्रीसमर्थ शिष्याला आज्ञा करितात, पाखांडी जनांच्या नादीं लागूं नये, मुक्त क्रिया करूं नये, परंपरा तोडूं नये, साधनें सोडूं नयेत. सिद्ध झाला तरी त्यानें साधनें केलीं पाहिजेत, असा जेथें सिद्धान्त आहे, तेथें इतरांची कथा काय ? महान् योगी, तापसी, वीतरागी हे हि साधनीं तत्पर असतात, ब्रह्माविष्णुहर हे हि आपणांस साधक च म्हणवितात, मग त्यांच्याहून हि कोरडे शब्दज्ञानी पाखांडी हे थोर झालेत काय ? लाडक्या, भक्ति उपासना जप ध्यान हीं सोडूं नकोस, भोगीं उदासीन असावें, यथाशक्ति स्वधर्मरक्षण करावें, तीर्थक्षेत्रांच्या ठायीं आवड असावी,

**आवडावें सदा स्वयें निरूपण । श्रवण मनन निजध्यास ॥ ९६ ॥**
**निजध्यासें होये अंतरींचा त्याग । बाह्य वीतराग उदासीन ॥ ९७ ॥**
**उदासीन वृत्ति कोठें गुंडाळेना । उपाधी जडेना बाह्याकारीं ॥ ९८ ॥**
**बाह्यअभ्यांतरीं त्याग निरंतरीं । वैराग्य यापरीं आचरावें ॥ ९९ ॥**
**आचरावें कर्म ज्याचा जो स्वधर्म । आणि नित्यनेम साधनाचा ॥ १०० ॥**
**साधनाची वाट वोस पाडूं नये । बोलावी हे सोये निरूपणीं ॥ १०१ ॥**

... ... ... ...

**भक्तिपंथें जातां होये सायोज्यता । निश्चयो तत्त्वता दास म्हणे ॥ १०५ ॥**

असें श्रीसमर्थांचें सर्वांना निश्चयपूर्वक सांगणें आहे.

कांहीं साधनें न करतां ज्ञान झाल्याचा भ्रम होऊन आचार आणि उपासना सोडणाऱ्या पाखांडी लोकांविषयीं श्रीसमर्थांना अत्यंत तिटकारा असे, हें त्यांच्या वाङ्मयांत अनेक ठिकाणीं आलेल्या उल्लेखांवरून स्पष्ट दिसतें.

# शत पांचवें – नवविधा भक्ति

या चवदा शतकांत माझ्या अत्यंत आवडीचें हें शतक आहे. तें नवविधा भक्तीचें आहे, पण त्या भक्तीची उभारणी पहिल्या नऊ कडव्यांच्या स्वतंत्र अभंगात्मक पायावर कशी केलेली आहे, हें पाहणें अति कौतुकाचें आहे. पहिल्या नऊ कडव्यांचा मला एक स्वतंत्र च अभंग वाटतो. नवव्या कडव्याचा शेवट हि 'दास म्हणे' असा झालेला आहे. या नऊ कडव्यांच्या अभंगांत श्रीसमर्थांनीं सारें ब्रह्मांड पायाशुद्ध सांठविलें आहे. त्यांत काय आलें नाहीं? ब्रह्मांडाची उभारणी आणि संहारणी, प्रत्यक्ष प्रळय आणि विवेक प्रळय, नित्यानित्यविवेक, सुखाचें मूळ, परब्रह्माचें स्वरूप, सत्संगाचा महिमा, शाश्वत वस्तूचा निर्धार, मुक्तीचें निःसंदेह साधन आणि तें साधन साधण्याची युक्ति, अशा नऊ गोष्टी या नऊ कडव्यांत बीजरूपानें आलेल्या आहेत. हीं ९ कडवीं हा पाया व त्यापुढचीं ९२ कडवीं ही त्यावरील इमारत होय. इमारत सर्वांना दिसते, पायाकडे सहसा कोणाचें लक्ष जात नाहीं, म्हणून तीं नऊ कडवीं कायमचीं मुखोद्गत करून ठेवलीं पाहिजेत. त्यांतील एक हि शब्द इकडचा तिकडे करण्याची सोय नाहीं.

**पृथ्वी आप तेज वायु तें आकाश । ऐसें सर्व दृश्य नासिवंत ॥ १ ॥**
**नासिवंत सृष्टि पाहे ज्ञानदृष्टि । सांगतों मी गोष्टी शास्त्रमतें ॥ २ ॥**
**शास्त्रमतीं सृष्टिप्रळय बोलिला । विचारें पाहिला संतजनीं ॥ ३ ॥**
**संतजनीं नित्यानित्य विचारूनि । सत्य वोळखोनि सुखी जाले ॥ ४ ॥**
**सुखी जाले संत शोधितां अनंत । कल्पनेचा प्रांत परब्रह्म ॥ ५ ॥**
**परब्रह्म संतसंगें वोळखावें । बोधें विवरावें सस्वरूपीं ॥ ६ ॥**
**सस्वरूपीं पंच भूतें नासिवंत । देव तो शाश्वत सत्य जाण ॥ ७ ॥**
**सत्य मिथ्या ऐसा करावा विचार । सत्याचा निधार निसंदेहे ॥ ८ ॥**
**निसंदेहे भक्ति केल्या होये मुक्ति । दास म्हणे युक्ति सावधान ॥ ९ ॥**

या अभंगाचें अनुसंधान ठेवून पुढील ९२ ओव्यांतील निरूपण वाचकांनीं प्रेमभरें अवश्य अवलोकावें, अशी प्रार्थना करतों. त्यांत नवविधा भक्तीचीं आणि चत्वार मुक्तीचीं लक्षणें प्रेमळ भाषेंत सांगून शेवटीं प्रळयाचें वर्णन केलें आहे. श्रीसमर्थांचें प्रेम आणि कळवळा पाहून आपण प्रेममय व्हावयाचें नाहीं आणि त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागावयाचें नाहीं, त्यांच्या

शिकवणीचा अनुभव घ्यावयाचा नाहीं, तर मग स्वतः नुसतें वारंवार वाचावयाचें व दुसऱ्यास वाचावयाचा आग्रह करावयाचा, तो कशासाठीं? ध्यास लागावा म्हणून, असें या प्रश्नाचें उत्तर देतां येईल.

श्रवणं— विचारणा करी श्रवण मनन ।
ध्यासें समाधान पाविजेतें ॥ १३ ॥

कीर्तनं— उद्धरले श्रोते वक्ते नेणों किती ।
दृढ धरा चित्तीं हरीकथा ॥ १९ ॥

विष्णोःस्मरणं— रामनाम वाणी त्या नाहीं जाचणी ।
नामें बहु प्राणी उद्धरले ॥ २७ ॥

पादसेवनं— भक्ति सज्जनाची हे वाट मुक्तीची ।
येथें संदेहाची उरी नाहीं ॥ २९ ॥

अर्चनं— विधियुक्त पूजा देवांब्राह्मणांची ।
संतसज्जनांची सर्व काळ ॥ ३३ ॥

वंदनं— भक्ति जाण सार सर्वां नमस्कार ।
घाली अधिकार पाहोनियां ॥ ३७ ॥

दास्यं— दास्य करूनियां देवासी पावले ।
ऐसे उद्धरले नेणों किती ॥ ४० ॥

सख्यं— सख्यत्व देवाचें भाग्येंवीण कैचें ।
सांगावें जीवीचें देवापासीं ॥ ४४ ॥

देवापासीं सुखदुःख तें सांगावें ।
कैवारी करावें ईश्वरासी ॥ ४५ ॥

ईश्वरीं टाकितां संसारींचा भार ।
मग हा संसार सुखरूप ॥ ४६ ॥

आत्मनिवेदनम्— मावळे अज्ञान होये शुद्ध ज्ञान ।
आत्मनिवेदन भक्ति सार ॥ ५१ ॥

तदाकार होणें आत्मनिवेदनें ।
मग येणें जाणें निरसलें ॥ ५९ ॥

नंतर सलोकता, समीपता, स्वरूपता आणि सायोज्यता, या चत्वार मुक्तींचें स्वरूप सांगून " चळेना कल्पांतीं सायोज्यता " असें म्हणून सुद्धां, या चार हि मुक्ति नाशिवंत आहेत, असें प्रतिपादण्यांत आलें आहे. प्रळयकाळीं पृथ्वी पाण्यांत बुडेल, अग्नि पाण्याला शोषून घेईल, वायु अग्नीला झडपील, आकाशांत वायु वितळून जाईल, तमोगुण त्या आकाशाचा नाश करील, रजोगुण तमोगुणाला ग्रासील, रजोगुणाला सत्त्वगुण गिळंकृत करील, त्या सत्त्वगुणाचा शेवट माया करील, त्या मायेला मूळमाया निर्दाळील, मूळमायेचें कांडात गुणसाम्य काढील आणि तें गुणसाम्य अखेरीस निर्गुणांत लीन होऊन जाईल ! मग तेथें मुक्ति कोठून राहणार ? मग राहणार तरी कोण ?

**राहतील ज्ञानी आत्मनिवेदनी । पूर्ण समाधानी सस्वरूपीं ॥ ९९ ॥**

हें कळावें कसें ? अनुभव घ्यावा. अनुभव येण्याला प्रळयकाळापर्यंत थांबावयास नको. मनांत आणावें आणि सर्व दृश्याचा विवेकप्रळय करून सस्वरूपीं ऐक्यरूपानें चिरंजीव होऊन रहावें.

**सस्वरूपीं ऐक्यरूप चिरंजीवी । जाणे अनुभवी अनुभवें ॥ १०० ॥**
**अनुभवी ज्ञानी ते चि समाधानी । आत्मनिवेदनी रामदास ॥१०१॥**

म्हणून तर मी राष्ट्रगुरु श्रीसमर्थ रामदासस्वामी चिरंजीव आहेत असें मानून चाललों आहें.

## शत सहावें – देव आणि देऊळ

**देवासी सांडूनि देऊळ पुजीती ।**
**लोकीकाची रीति काये सांगों ॥ १ ॥**

देव राहतो एकीकडे आणि यांचीं तीर्थें, व्रतें, तपें, दानें इत्यादि कर्में आणि पूजा हीं चाललीं असतात भलतीचकडे ! देह हें देऊळ आणि अंतरात्मा हा देव, हें न ओळखतां देवाला विसरून, त्याच्याकडे न पाहतां, किंबहुना त्याच्याकडे पाठ फिरवून देवालयाच्या च पूजेंत लोक गर्क झालेले असतात ! याचा परिणाम असा होतो

**पाविजेतें दुःख विचार नसतां । कर्म करूं जातां कासावीस ॥ ८ ॥**
**कासावीस कर्में होईजे भ्रमिष्ट । देव सर्वश्रेष्ठ अंतरला ॥ ९ ॥**

लौकिक कर्मे वेगळीं आणि पारलौकिक वेगळीं. लौकिक कर्माचें फळ लौकिक च असणार. त्यानें लोकसंग्रह होईल. तो करावयाचा असेल तर जरूर करावा, पण हें सर्व जाणून करावा, त्यापासून पारलौकिक फळाची अपेक्षा करतां कामा नये. काय हवें आहे तें आधीं ठरवावें व तदनुरोधानें वागावें.

**साधुसंगें साधा सद्वस्तु विवेकें ।**
**तुम्हांसी लोकीकें काय काज ॥ १६ ॥**
**काय काज आहे परलोका जातां ।**
**लोकीक तत्त्वता येहीं लोकीं ॥ १७ ॥**
**येहीं लोकीं करा लोकसंपादणी ।**

परंतु त्रैलोक्याच्या धन्याची ओळख व्हावी, ब्रह्मज्ञान व्हावें, अशी इच्छा असेल तर,

**संतां शरण जाई आलया रे ॥ २० ॥**

एरव्हीं

**जन्मलासी वाया जननी कष्टली ।**
**नाहीं उद्धरीली कुळवल्ली ॥ २६ ॥**
**कुळाचें मंडण ब्रह्मज्ञानी जन ।**
**जया सनातन प्रगटला ॥ २७ ॥**
**प्रगटला देव जयाचे अंतरीं ।**
**धन्य सृष्टीवरी तो चि येक ॥ २८ ॥**

सत्संग म्हणजे सद्गुरुचरणसेवा. ती चरणसेवा आणि विवेक, यापरतें साधन, नाहीं. तो सत्संग कसा लाभावा, साधूस ओळखावें तरी कसें, तो इतरांसारखा च असतो, लौकिकांत लोकांप्रमाणें च वागतो, तेव्हां त्याची ओळख पटावी तरी कशी, हे च प्रश्न वारंवार येऊन पडतात. त्यांचें उत्तर एक च : आपण स्वतः साधु व्हावें.

**साधु वोळखिले साधुजनीं ॥ ३७ ॥**

अखंड श्रवण, मनन करावें. विचार करावा. मनोभास गळून पडावा. दृश्य ओलांडून पलीकडे जावें.

**मग जगदीश वोळखावा ॥ ६६ ॥**

त्याची ओळख करून न घेणाराला श्रीसमर्थांनीं आपल्या आवडत्या शब्दानें संबोधिलें आहे.

**निर्गुण चि नव्हे जो कोण्ही चाण्डाळ ।**
**त्यासी सर्वकाळ जन्ममृत्य ॥ ७० ॥**

काय असेल तें असो, श्रीसमर्थांच्या मुखांतला हा चांडाळ शब्द मला फार आवडतो. तो त्यांच्या हृदयाची ओळख पटवीत असतो. तो शब्द मी त्यांच्या कोपाचें तसेंच लोभाचें, शापाचें तसेंच प्रेमाचें, बाह्य चिन्ह मानीत असतों. तो शब्द आपणांस पुढें हि निरनिराळ्या स्वरूपांत आढळेल च. संतांना शरण जावें, विवेक करावा आणि ज्ञान प्राप्त करून घ्यावें, हें पटवून देण्यापुरता च या ठिकाणीं त्या शब्दाचा उपयोग केलेला दिसतो.

**उपकार जाला थोर या शब्दांचा । मार्ग निर्गुणाचा सांपडला ॥ ८५ ॥**
**सांपडला मार्ग धन्य सांख्ययोग । फळासी विहग पावे जैसा ॥ ८६ ॥**
**पावे जैसा पक्षी फळीं अकस्मात । तैसा अकल्पीत ज्ञानमार्ग ॥ ८७ ॥**
**ज्ञानमार्ग सर्व मार्गांमध्यें श्रेष्ठ । बोलिले वरिष्ठ ठांईं ठांईं ॥ ८८ ॥**

या वेळीं श्रीसमर्थांच्या मनश्चक्षूंपुढें भगवद्गीतेंतील अनेक वचनें होतीं, हें उघड आहे.

सर्व मार्गांत ज्ञानमार्ग श्रेष्ठ हें खरें पण तो कळण्याला गुरुमुख पाहिजे च.

**चोजवेना गती गुरुमुखेंवीण । रामदास खूण सांगतसे ॥ १०० ॥**

अशा त्यांनीं सांगितलेल्या शंभर खुणा आपणांस आढळतील. त्या सर्व आपण आपल्या हृदयांत सांठविल्या पाहिजेत.

## शत सातवें – जन्मसफलता

ज्ञानावांचून संसारींच्या यातना चुकणार नाहींत. संसारांत पुष्कळ माणसें जवळ केलीं, तरी अंतकाळ आला असतां त्यांपैकीं कोणी सोडविणार नाहींत. आपले व परके सर्व स्मशानभूमीपर्यंत च येणार व तेथें आपणांस सोडून देऊन माघारे फिरणार. जीवापाड मेहनत करून व दगदग सोसून आयुष्यांत जेवढें कांहीं मिळविलें असेल तेवढें सर्व घरीं च टाकून जावें लागणार.

**सर्व कांहीं होतें संचिलें वैभव । रात्रंदीस जीव लाऊनीयां ॥ ८ ॥**
**लाऊनीयां जीव जीवें मेळविलें । तें घरीं राहिलें सर्व कांहीं ॥ ९ ॥**

माझें तसें च तुमचें. तो प्रचंड संग्रह, तीं हजारों मौल्यवान् बाडें, तें श्रीसमर्थांनीं स्वहस्ताक्षरें लिहिलेलें मोडी लिपींतील एकमेव गद्य पत्र, तें रामेण रामदासेन लिखितं वाल्मीकिरामायणम, त्या ग्रन्थराज दासबोधाच्या अनेक सुंदर सुंदर लहान मोठ्या प्रती, तीं श्रीशिवछत्रपतींचीं पत्रें, अनेक ऐतिहासिक प्रख्यात पुरुषांच्या हस्ताक्षरांचीं तीं शेंकडों पत्रें, श्रीकल्याणांचें तें प्रचंड बाड, उद्धवदिवाकरदिनकरकेशवगिरिधर वगैरे पांच पन्नास शिष्यप्रशिष्यांच्या हातचीं बाडें, वगैरे पृथ्वीच्या मोलाचा संग्रह, तो किती आठवत बसशील, त्या सर्व पवित्र वस्तु, ठिकठिकाणच्या पवित्र स्थळांतील मातीच्या आणि विभूतीच्या पुड्या, अनेक पवित्र नद्यांतील दगड, श्रीसमर्थ-मंदिराच्या गाभाऱ्याच्या पायांतील अगदीं तळापासचे दगड, त्यांच्या घरट्याच्या पायांत सांपडलेल्या गोट्या आणि पंचपात्री, रायगड, तोरणा, सज्जनगड वगैरे किल्ल्यांतील चिजा, मूर्तिमूर्तींचें गंध आणि निर्माल्य, श्रीसमर्थ आणि श्रीकल्याण यांच्याकडून यदृच्छेनें लाभलेला प्रसाद, ती लोखंडाची कडी आणि तो चिऱ्याचा दगड, इत्यादि इत्यादि तुझ्या डोळ्यांपुढें सतत उभ्या राहणाऱ्या वस्तु, तुला किती हि प्रिय असल्या आणि जीवांत जीव आहे तोंवर तूं त्यांना किती हि प्रेमानें, कौतुकानें, आदरानें हृदयाशीं कवटाळून धरून बसलास, तरी एक क्षण असा येईल कीं, या सर्वांचा मोह सोडून तुला जावें लागेल ! हें जर खरें आहे, तर तो क्षण दूर आहे तों च या सर्वांची माया सोडणें इष्ट होणार नाहीं काय ?

**सर्व कांहीं न ये तुज समागमें। म्हणोनियां भ्रमें भुलों नको ॥ १० ॥**
**भुलों नको भ्रमें संसारीं आलया। कैसी आहे माया वोळखावी ॥ ११ ॥**
**वोळखावी माया आणि परब्रह्म। तेणें तुझा भ्रम नासईल ॥ १२ ॥**

विचार कर, सारासार काय आहे तें पहा, शाश्वताची सोय धर, निश्चय कर, अनुमानानें कांहीं करूं नकोस, सज्जनांची संगति जोड, सद्गुरूला शरण जा, नित्यानित्यविवेक पहा, निरंतर श्रवण मनन कर, ध्यास घे, साक्षात्कार झाल्यावांचून राहणार नाहीं, हा विश्वास असूं दे.

कोणत्या हि कारणानें, केव्हां हि जीव कासावीस झाला, तर लागली च ग्रन्थराज दासबोध, करुणाष्टकें, मनाचे श्लोक, हीं चौदा शतें, तीं लघुकाव्यें

हातीं घे आणि मननपूर्वक वाचूं लाग, म्हणजे गेलेली समाधानवृत्ति परत येईल.

**कासावीस होतें समाधान जातें । तें जोडे मागुतें विवरतां ॥ ३० ॥**
**विवरतां ब्रह्म जीव माया भ्रम । देव भक्त वर्म वोळखावें ॥ ३१ ॥**
**वोळखावें वर्म हें मीतूंपणाचें । नित्य निर्गुणाचें निरूपण ॥ ३२ ॥**

तेणेंकरून सर्व कांहीं मिथ्या आहे याचा प्रत्यय येऊन तुझें समाधान होईल, आणि एकदां तें समाधान झालें म्हणजे मग तूं किती हि उठाठेवी केल्यास तरी तें तुझें समाधान जाणार नाहीं.

**पालटेना ब्रह्मस्थिती हे आपुली । जऱ्ही कांहीं केली उठाठेवी ॥ ४३ ॥**
**उठाठेवी गेली शरीराच्या माथा । आपण तत्त्वता वस्तुरूप ॥ ४४ ॥**

मग मायेच्या बहुरूपी खेळाची तुला केव्हां हि बाधा होणार नाहीं, तुला कर्तृत्वाचा डाग लागणार नाहीं. एकदां तुझी देहबुद्धि नष्ट झाली म्हणजे मग तुला करतां येईल तर खुशाल ब्रह्मांडाचा व्याप कर, कर्तेपणाचा अहंकार तुला स्पर्श करूं शकणार नाहीं.

**माझें मज नाहीं पाहातां मीपण । तेथें कर्तेपण वाव जालें ॥ ८७ ॥**

असें हें श्रीरामोपासनेचें फळ आहे.

**जेथें तेथें राम आत्मा पूर्णकाम । योगीयांचें धाम निरंतर ॥ ९५ ॥**
**निरंतर देव अंतरेना कदा । तुटली आपदा मीपणाची ॥ ९६ ॥**
**मीपणाची बुंथी बोधें उगवली । जन्माची जाहाली सार्थकता ॥ ९७ ॥**

## शत आठवें – सगुणनिर्गुणवाद

हें शत धरून पुढच्या पांच शतांत पांच महत्त्वाच्या विषयांवर वाद आहेत. ते वाद नव्हत, संवाद आहेत. ते बोधप्रद असून अति आकर्षक आहेत. प्रस्तुतच्या शतांत सगुणवादी आणि निर्गुणवादी यांचा संवाद आहे. दोघे हि आपआपल्या भूमिकेवरून आपल्या बाजूचें समर्थन करीत आहेत. दोघांचें हि म्हणणें बरोबर आहे, त्यांत चुकला कोणी च नाहीं. दोघांच्या भूमिका च मुळीं भिन्न भिन्न आहेत. एका च भूमिकेवरून एका च वस्तू-विषयीं दोघे परस्परांना विरोध करीत असते, तर एकास बरोबर आणि दुसऱ्यास चूक म्हणतां आलें असतें. सगुण आणि निर्गुण, या दोन निरनिराळ्या पायऱ्या आहेत. सगुणाच्या पायरीवरून वाद करणारास सगुणाचा

अनिर्वचनीय आनंद सोडावासा वाटत नाहीं. निर्गुणाच्या पायरीवर तो आनंद नसेल या कल्पनेनें वरच्या निर्गुणाच्या पायरीवर चढण्यास तो तयार च होत नाहीं. निर्गुणाचा साक्षात्कार झालेला निर्गुणवादी आश्चर्य करतो कीं, हा खालच्या पायरीवरील सगुणवादी त्या च पायरीला इतका चिकटून कां बरें पहात आहे! सगुणाचा आनंद विलक्षण असतो, हें एक त्याचें कारण व दुसरें, निर्गुणाच्या पायरीवर चढून जाणें फार दुर्घट कर्म आहे. निर्गुणाच्या नुसत्या शब्दज्ञानाच्या गोष्टी कोणीं हि बोलाव्या, निर्गुणाचा साक्षात्कार परम दुर्लभ होय.

असा हा गोड संवाद आहे. त्यांत सगुणवाद्याचा प्रेमळपणा व निर्गुण-वाद्याचा कठोरपणा चांगला प्रत्ययास येत आहे. श्रीसमर्थांना दोन्ही हि भूमिका सारख्या च प्रिय असल्या, तरी या प्रकरणांत त्यांचा ओढा अधिकारपरत्वें सगुणवाद्याकडे असल्याचें दिसून येत आहे. ज्यांना संपूर्ण वाद जाणावयाचा असेल, त्यांनीं मुळावरून तो वाचला पाहिजे. आपण कांहीं मुद्दे पाहूं.

**सगुणवादी**— करीं च्यापबाण माहेश्वरी ठाण ।
रूप हें सगुण राघवाचें ॥ १ ॥

**निर्गुणवादी**—राघवाचें रूप निर्गुण जाणावें ।
सगुण स्वभावें नासीवंत ॥ २ ॥

**सगुणवादी**— नवविधा भक्ति करितां तरले ।
जीव उद्धरले नेणों किती ॥ ९ ॥

**निर्गुणवादी**—नेणोनियां देव माईक भजतां ।
मुक्ति सायोज्यता अंतरली ॥ १० ॥

**सगुणवादी**— उरी या रामाची जन्मोजन्मीं असो ।
मन हें विश्वासो रामपाईं ॥ २७ ॥

**निर्गुणवादी**—रामपाईं मन होतसे उन्मन ।
तेथें भिन्नाभिन्न ऐक्यरूप ॥ २८ ॥

**सगुणवादी**— ऐक्यरूप ज्ञान तें मज नावडे ।
गाईन पवाडे राघवाचे ॥ २९ ॥

निर्गुणवादी—राघवासी गुण नाहीं तो निर्गुण ।
ठाई पडे खूण संतसंगें ॥ ३० ॥

सगुणवादी— सार तें आकार भक्तीचा निर्धार ।
भक्ति पूर्वापर सगुणाची ॥ ६९ ॥

निर्गुणवादी—सगुणाची भक्ति अज्ञानें करावी ।
सज्ञानें करावी निर्गुणाची ॥ ७० ॥

सगुणवादी— विश्वासेना मन सगुणासी जरी ।
तयासी कैवारी देव कैचा ॥ ८३ ॥

निर्गुणवादी—कैचा देव भक्त कल्पना आपुली ।
ते सर्व नाथिली ज्ञानियासी ॥ ८४ ॥

सगुणवादी— मिथ्या शब्दज्ञानें माया वोसरेना ।
अभक्त तरेना मायापूरीं ॥ ८७ ॥

निर्गुणवादी—मायामोहोपूर दुस्तर संसार ।
अद्वैतविचार जंव नाहीं ॥ ८८ ॥

सगुणवादी— संतसंगें धरी सगुणभजन ।
स्वधर्म साधन क्रिया कर्म ॥ ९७ ॥

निर्गुणवादी—क्रिया कर्म कैचें ज्ञानियाचे आंगीं ।
मुक्त ज्ञानी जगीं विचारितां ॥ ९८ ॥

याप्रमाणें उभय वाद्यांचा वाद ऐकून श्रीसमर्थ निकाल सांगतात :

श्रीरामदास—विचारितां देही तो किजे सर्व हि
क्रिया कर्म कांहीं सांडूं नये ॥ ९९ ॥

सांडूं नये भक्ति स्वधर्म विरक्ती ।
ब्रह्मज्ञानप्राप्ती रामदासीं ॥ १०० ॥

असा निकाल सांगून सर्व रामोपासकांना शेवटचा हुकूम सोडतात :

रामदास म्हणे रामउपासकां ।
भक्ति सांडूं नका राघवाची ॥ १०१ ॥

श्रीसमर्थांची आज्ञा कोण अवमानील ?

## शत नववें – सर्वब्रह्मविमळब्रह्मवाद

या शतांत सर्वब्रह्मवादी आणि विमळब्रह्मवादी यांचा संवाद आहे. आरंभींच्या कांहीं ओव्या पाहिल्या म्हणजे वादाचें स्वरूप लक्षांत येतें.

विमळब्रह्मवादी— जें जें कांहीं दिसे तें तें सर्व नासे ।
सर्वातीत असे परब्रह्म ॥ १ ॥

सर्वब्रह्मवादी— परब्रह्म आहे सर्व विस्तारलें ।
आकारासी आलें तें चि येक ॥ २ ॥

वि. ब्र. वादी— तें चि येक कैसें आकारा येईल ।
कल्पांतीं नासेल सर्व कांहीं ॥ ३ ॥

स. ब्र. वादी— सर्व कांहीं जीव आणि किडा मुंगी ।
ब्रह्म राजयोगी बोलताती ॥ ४ ॥

वि. ब्र. वादी— बोलताती ब्रह्म कल्पनेवेगळें ।
श्रुतीसी नाकळे पार ज्याचा ॥ ५ ॥

स. ब्र. वादी— पार ज्याचा कळे सज्जनसंगती ।
सर्व ब्रह्म श्रुती बोलतसे ॥ ६ ॥

वि. ब्र. वादी— बोलतसे श्रुति दृश्य नासीवंत ।
स्वरूप तें संत सर्वकाळ ॥ ७ ॥

[illegible] सारखा संवाद अखेरपर्यंत चालला आहे. प्रत्येक जण आपआपल्या [illegible]चें समर्थन करीत आहे. सर्वब्रह्मवाद्याची मति मधून मधून कुंठित [illegible] तरी त्यानें एकदम कबुली दिलेली नाहीं. तथापि त्याची बाजू [illegible] ढांसळत अखेरीस विमळब्रह्म मान्य करण्यांत च विराम पावलेली [illegible]ते. या दृष्टीनें शेवटच्या ९७ ते १०४ ओव्या पाहण्यासारख्या आहेत. [illegible] ऐक्यांत झाला आहे. विमळब्रह्मवादी समारोपांत म्हणतो :

विमळब्रह्मवादी—पहाणें खुंटलें बोलणें तुटलें ।
सस्वरूपीं जालें ऐक्यरूप ॥ १०५ ॥

या समारोपावर श्रीसमर्थ ‘ मोर्तब सूद ’ चा शिक्का करतात. ‘ मोर्तब सूद ’ म्हणजे बोलणें संपल्याचा शिक्का.

**रामदास—ऐक्यरूपें रामीं रामदासीं जालें ।**
**बोलणें खुंटलें तेथुनीयां ॥ १०६ ॥**

या वादावरून असें दिसतें, विचाराच्या उपान्त्य पायरीवर च सर्वब्रह्मवादी थबकून राहतो, त्यामुळें त्यास जें जें दिसतें तें तें सर्व ब्रह्म च वाटतें, तें नाशिवंत आहे, हें तो लक्षांत च घेत नाहीं. त्यामुळें विमळब्रह्मापर्यंत त्याची दृष्टि पोंचूं शकत नाहीं. सर्वब्रह्मवाद्याचा पक्ष तो च बहुतेकांचा असल्यामुळें समतेच्या भ्रामक कल्पनेनें व्यवहारांत हि ते एकंकार करून घोटाळे माजवीत असतात.

## शत दहावें – संतमुमुक्षुवाद

हें शत संवादात्मक आहे. मुमुक्षु प्रश्न विचारीत आहे व सत्पुरुष त्या प्रश्नांचीं उत्तरें देत आहेत, अशी या शतकाची रचना आहे.

**प्रश्न— पृथ्वी आप तेज वायु तें आकाश ।**
**ऐसें सर्व दृश्य कोणें केलें ॥ १ ॥**

**उत्तर— केलें हें देवानें सर्व चराचर**
**आपण ईश्वर वेगळा चि ॥ २ ॥**

असा प्रश्नोत्तराला आरंभ हि झाला आहे, पण मध्यें च सत्पुरुषांनीं उत्तरें देण्याला आढेवेढे घेतले आहेत. त्यांचें म्हणणें, लोक सद्भावानें विचारीत नसतात, कुडभावें म्हणजे कपटानें पुसत असतात, तेव्हां अशांच्या तोंडीं आम्हीं लागावें च कां ?

**संतजनीं काये कोणासी सांगावें ।**
**लोक कुडभावें पुसताती ॥ ८ ॥**

तशा भावानें आपण विचारीत नसून आपणांस गुरुरूप मानून विचारीत आहों, असें भक्तानें सांगितल्यानंतर प्रश्नोत्तरांचा प्रवाह, न अडखळतां, सारखा चालू होऊन, भक्ताच्या ठिकाणचें मीपण मावळून व त्यास ‘ अहं ब्रह्मास्मि ’ चा बोध होऊन त्याचें पूर्ण समाधान होण्यांत प्रवाहाची समाप्ति झाली आहे.

**भक्त**—समाधान माझें मीपण सांडीतां ।
हें तों मज आतां कळों आलें ॥ ९० ॥

**संत**— कळों आलें तुज तत्त्वविवरण ।
महावाक्यश्रवण पावसील ॥ ९१ ॥

**भक्त** पावसील मज देवा दीनानाथा ।
संसाराची वेथा दुरी केली ॥ ९२ ॥

**संत** दुरी केली वेथा ब्रह्मनिरूपणें ।
आतां विवरणें सर्वकाळ ॥ ९३ ॥

**भक्त**—सर्वकाळ आतां सार्थक जाहाला ।
भला कळों आला नरदेह ॥ ९४ ॥

**संत**— नरदेहीं ज्ञान पाहातां सुटीजे ।
येर सर्व कीजे निरार्थक ॥ ९५ ॥

**भक्त** निरार्थक काया कारणीं लागली ।
विवेकें भंगली देहबुद्धी ॥ ९६ ॥

**संत** देहबुद्धी गेली आत्मबुद्धी होतां ।
कर्त्यासी धुंडितां कार्य नाहीं ॥ ९७ ॥

सत्पुरुष मुमुक्षूला विचारतात, या सर्व दृश्याचा कर्ता कोण, असा जो तूं मला पहिल्या च प्रश्न विचारला होतास, त्याचें आतां प्रयोजन उरलें नाहीं, हें तुला पटलें ना ?

**भक्त** कार्य नाहीं खरें कारणीं पाहातां ।
तद्रूप हें आतां समाधान ॥ ९८ ॥

“ कारणीं पाहातां ” म्हणजे “ आत्मबुद्धी होतां ”. “ मीपण सांडितां ”, “ अहं ब्रह्मास्मि ” असा बोध होतां, असा अर्थ मी करतों.

भक्ताच्या तोंडून निघालेले हे समाधानाचे उद्गार ऐकून, परमार्थांत नुसत्या विचारानें केवढें कार्य होतें, तें दर्शवून श्रीसमर्थ संवादाची समाप्ति करितात :

**रामदास—समाधान रामीं रामदासीं जालें ।**
**विचारानें केलें संगातीत ॥ ९९ ॥**

## शत अकरावें – गृहस्थविरक्तांचा वाद

एक प्रपंची आणि दुसरा विरक्त यांच्यांत बरोबरीच्या नात्यानें या शतांत संवाद झालेला आहे. प्रत्येक जण आपआपल्या आयुष्यक्रमाचें समर्थन करीत आहे. यांत विरक्ताची बाजू ती श्रीसमर्थांची बाजू होय, असें मी समजतों. त्यामुळें विरक्ताच्या समर्थनांत मला श्रीसमर्थ दिसतात. मनांत येतें, हा सर्व संवाद गद्यांत द्यावा. पण तसें करीत नाहीं. तो मुळावरून वाचण्याचें वाचकांवर च सोंपवितों. श्रीसमर्थांचें हृद्गत ज्यांत विशेष आहे, तेवढा च भाग येथें देतों.

**वैराग्य हें भाग्य आमुच्या समर्थस्वामीचें ॥**

असें श्रीसमर्थप्रतापकार गिरिधर यांनीं श्रीसमर्थस्तवनपर एका पदांत म्हटलें आहे,

**वैराग्याचा राजा रामदास स्वामी माझा ॥**

असें स्तवन श्रीकल्याणशिष्य आपचंदमठपति शिवराम यांनीं केलें आहे, आणि प्रस्तुतच्या संवादाला आरंभ

**वैराग्यापरतें आनु नाहीं भाग्य ॥**
**धन्य तें वैराग्य ज्ञानीयासी ॥ १ ॥**

असा विरक्तानें करून श्रीसमर्थांची च बाजू पुढें मांडली आहे.

गृहस्थानें श्रीसमर्थांच्या उघडे बोडकें वनांत हिंडण्यावर कोरडा ओढला-

**पद ये मुक्तीचें तत्त्वज्ञानें जोडे ।**
**बोडके उघडे कासयासी ॥ ८ ॥**
**कासया करावे वैराग्याचे डंभ ।**
**सुखाचें स्वयंभ मोक्षपद ॥ ९ ॥**
**मोक्षपदीं काये सांडावें मांडावें ।**
**वेर्थ चि हिंडावें वनांतरीं ॥ १० ॥**

त्याचा प्रतिकार

वनांतरीं हिंडे तो चि येक भला ।
येक तो बांधला मायाजाळीं ॥ ११ ॥

असें म्हणून विरक्तानें केला आहे. भोग भोगीत असून हि राजयोगी ज्ञानी अभोक्ता च असतो, असें गृहस्थानें प्रतिपादितां च

ज्ञानीयासी भोग तो चि भवरोग ।
नव्हे राजयोग विटंबना ॥ १५ ॥

असा तडाखा विरक्तानें मारला आहे.

त्यागितां चि भोग भोगितां चि त्याग ।
ऐसा ज्ञानयोग जाण बापा ॥ १८ ॥

अशी गृहस्थानें ज्ञानयोगाची व्याख्या करितां च

सांग बापा कोण विषईं तरला ।
कोण उद्धरला भोगितां चि ॥ २३ ॥

असा विरक्तानें सवाल टाकून त्यागी कोणास म्हणावें, याविषयीं आपलें मत सादर केलें.

आलया रे त्यागी तयासी म्हणावें ।
जेणें हें जिणावें सिस्नोदर ॥ २७ ॥

करूनियां त्याग देहाचें दंडण ।
होतसे खंडण माहां दोषा ॥ ३१ ॥

त्यागी म्हणून श्रीसमर्थांनीं आणि त्यांच्या शिष्यांचें दारोदार हिंडणें डोळ्यावर [illegible] गृहस्थानें आपल्या समर्थांनीं तेवढें च छिद्र बाहेर काढतां च श्रीसमर्थांच्या [illegible] विरक्तानें पूर्वापार [illegible] देऊन भिक्षाटणाचें समर्थन केलें आहे.

दारोदार थोर थोर पूर्वापार ।
योगी कपेश्वर भिक्षाटणें ॥ ३७ ॥

[illegible] श्रीसमर्थांच्या तीर्थाटणाची हि विरक्तानें तरफदारी केली आहे :

उदासीन ज्ञाता नाहीं पराधेन ।
विचारें स्वाधेन तीर्थाटण ॥ ४५ ॥

तेथें होत आहे पापाची बोहरी ।
केलीं थोरथोरीं तीर्थाटणें ॥ ४७ ॥

तात्पर्य, या संवादांतला विरक्त म्हणजे स्वत: श्रीसमर्थ च होत. त्यांनीं च आत्मप्रचीतीनें पुढील उपदेश करावा :

नाहीं जया आला संसाराचा वीट ।
तया मोक्षवाट सांपडेना ॥ ७७ ॥

करी बापा आतां संसाराची सोडी ।
धरूं नको गोडी आश्रमाची ॥ ७९ ॥

केलीयानें होतें केलें चि पाहिजे ।
जें मनीं धरीजे तें चि होतें ॥ ८७ ॥

इतका वेळ विरक्ताच्या आड उभे राहून श्रीसमर्थांनीं आत्मचरित्राचें समर्थन केलें, परंतु शेवटीं प्रकटपणें हृदयाविष्करण करून सांगतात :

भक्ति भाव क्रिया मोक्षाचें साधन ।
वीतरागी मन सर्व काळ ॥ १०१ ॥

सर्व काळ जेथें कथा निरूपण ।
श्रवण मनन निजध्यास ॥ १०२ ॥

निजध्यास मन वृत्ती उदासीन ।
नावडे कांचन आणि कांता ॥ १०३ ॥

कांता पुत्र धन वैभव स्वजन ।
रामेंवीण आन आवडेना ॥ १०४ ॥

आवडेना भार नाथीला संसार ।
रामदासीं सार रामदास्य ॥ १०५ ॥

असें हें श्रीसमर्थांचें जीवनाचें सार आहे.

## शत बारावें – प्रेत्नप्रारब्धवाद

मागील शतांत च शेवटीं शेवटीं हा महत्त्वाचा वाद उद्भवला होता. याचा संपूर्ण परामर्प या शतांत घेण्यांत आला आहे.

**प्रयत्नवादी— प्रेत्न आहे थोर पाहावा विचार ।**
**येणें पैलपार पाविजेतो ॥ १ ॥**

असें एकाचें म्हणणें, तर त्यावर लागली च दुसऱ्याचें, त्याच्या अगदीं उलट म्हणणें

**प्रारब्धवादी— पाविजेतो पार प्रारब्धेंकरूनी ।**
**येत्न केल्यां जनीं होत नाहीं ॥ २ ॥**

असें या वादाला तोंड लागलें आहे. हट्टाला पेटून दोघे हि उच्च स्वरांत प्रतिपादितात

**प्रयत्नवादी— होत नाहीं प्रेत्नें ऐसें काये आहे ।**
**विचारूनी पाहे आलया रे ॥ ३ ॥**

**प्रारब्धवादी— आलया रे प्रेत्न करितां फळेना ।**
**होणार टळेना कांहीं केलया ॥ ४ ॥**

जरा हलका स्वर करून दोघे हि म्हणतात

**प्रयत्नवदी— कांहीं तरी केलें पाहिजे संसारीं ।**
**कांहीं च न करी ऐसा कोण ॥ ५ ॥**

**प्रारब्धवादी— ऐसा कोण आहे प्रारब्धावेगळा ।**
**होणाराची कळा वेगळी ते ॥ ६ ॥**

असा हा मनोरंजक वाद चालला आहे. मध्यंतरीं असा प्रश्न निघाला, आपण अदृष्ट, प्रारब्ध, पूर्वरेखा म्हणत असतों, त्यांचा अर्थ तरी काय? जन्माच्या वेळीं विधी कपाळीं लिहून जातो, तें प्रारब्ध होय, असें प्रारब्धवादी म्हणतां च त्याला विनोद करून च प्रयत्नवाद्यानें तें बाष्कळ म्हणणें उडवून दिलें आहे. प्रयत्नवादी विचारतो,

**तेव्हां विधी कोणे स्थळीं उभा होता ।**
**काशानें लिहिता होये तेथें ॥ ३५ ॥**

अशा प्रकारें कांहींसा विनोदानें वाद चालला असतां दोघांना एक तोड सुचली – या प्रारब्धप्रयत्नांत – या दोहोंत – जें आधीं निर्माण झालें असेल, तें थोर म्हटलें पाहिजे व तें दोघांनीं मान्य केलें पाहिजे. तेव्हां आधीं प्रारब्ध निर्माण झालें, कां प्रयत्न ?

प्रश्न महत्त्वाचा आहे, तेव्हां त्याची जी उपपत्ति श्रीसमर्थांनीं लावली आहे, ती एकवार आपण, विस्तार होत असला तरी, पाहून ठेवली पाहिजे. प्रयत्नाला श्रीसमर्थांनीं देवपदापर्यंत नेऊन ठेवल्याचें सर्वविश्रुत आहे च.

आधीं प्रारब्ध कां प्रयत्न ? श्रीसमर्थ सांगतात :

**थोर मूळमाया निराकारीं जाली । प्रारब्धीची बोली तेथें नाहीं ॥ ७७ ॥**
**नाहीं क्रियमाण तै शब्दस्फुरण । जें माहांकारण ब्रह्मांडीचें ॥ ७८ ॥**
**ब्रह्मांडीचें माहांकारण शरीर । मूळ निराकार परब्रह्म ॥ ७९ ॥**
**परब्रह्मीं जाली मुळीं मूळमाया । पुढें गुणमाया गुण करी ॥ ८० ॥**
**गुण सत्त्व रज तम हें जाणावें । तेथुनी स्वभावें पंचभूत ॥ ८१ ॥**
**आकाशीं पवन पवनीं तो अग्न । आपोनारायण तेथूनियां ॥ ८२ ॥**
**तेथूनियां पुढें अवनी जाहाली । पुढें नाना वल्ली भूमिपोटीं ॥ ८३ ॥**
**भूमिपोटीं जाल्या औषधी निर्माण । तेथूनियां अन्न प्रगटलें ॥ ८४ ॥**
**प्रगटलें अन्न प्रगटलें रेत । तेथुनी जीवित्व पुरुषाचें ॥ ८५ ॥**
**पुरुषापासुनी उत्पत्ती वाढली । वेदशास्त्री बोली ऐसी आहे ॥ ८६ ॥**
**ऐसी बोली सत्य वेदशास्त्र वाणी । पुढें च्यारी खाणी प्रगटल्या ॥ ८७ ॥**
**प्रगटल्या वाणी तयांची प्रारब्धें । पुढें नाना भेदें जीवसृष्टी ॥ ८८ ॥**
**जीवसृष्टी जाली उत्पत्ती संव्हार । प्रारब्ध वेव्हार ऐलीकडे ॥ ८९ ॥**
**ऐलीकडे कर्म मुळीचा तो प्रेत्न । श्रोतीं सावधान विवरावें ॥ ९० ॥**
**विवरावें आधीं प्रेत्न कीं प्रारब्ध । शास्त्रांतरीं भेद ऐसा आहे ॥ ९१ ॥**
**आहे निराकार निर्मळ निश्चळ । तेथुनी चंचळ प्रेत्न जाला ॥ ९२ ॥**
**प्रेत्न जाला आधीं म्हणोनियां थोर । प्रारब्धविचार ऐलीकडे ॥ ९३ ॥**
**ऐलीकडे कर्म पाहातां भूतळीं । प्रेत्न अंतराळीं मूळारंभ ॥ ९४ ॥**

( ४ ) रावणाचा वध करून विभीषणास सिंहासनावर बसवून सीतेसह सर्व वानर अयोध्येस गेले असतां तेथून परततांना वानरांची काय अवस्था झाली ती श्रीसमर्थांनीं वर्णिली आहे.

**वानरांसी रामवियोग साहेना । उभड धरेना कंठ दाटे ॥ ८५ ॥**
**कंठ दाटे तेणें आक्रंदती थोर । नयनीं पाझर पाझरती ॥ ८६ ॥**
**पाझरती सर्व दीनरूप जाले । पोटेंसीं धरीले मायेबापें ॥ ८७ ॥**
**मायेबापें रामें सर्व सुखी केले । मग बोळवीले निजदास ॥ ८८ ॥**

( ५ ) रामराज्य म्हणजे काय, त्याचें किंचित् स्वरूप

**निजसुख जनीं नाहीं वृद्धपण । कोणासी मरण तें हि नाहीं ॥ ९१ ॥**
**नाहीं नाहीं जनीं बंधनाचें पाप । सुखी सुखरूप रामराज्य ॥ ९२ ॥**
**रामराज्यीं नाहीं जनासी ताडण । धर्मसंरक्षण राम येक ॥ ९३ ॥**
**राम येकबाण येक चि वचन । साधूचें पाळण राम येक ॥ ९४ ॥**
**राम येक राजा पुण्यपरायेण । गोपिकाब्राह्मण भक्ती करी ॥ ९५ ॥**
**भक्ती करी राम गाईब्राह्मणाची । सीमा मर्यादेची उलंघीना ॥ ९६ ॥**

त्या रामराज्याची भरतखंडांत पुनरपि स्थापना व्हावी, म्हणून श्रीशिवसमर्थांचे अवतार ईश्वरी संकेतानें महाराष्ट्रांत झाले.

( ६ ) संकटकाळीं भक्तांचें रक्षण करण्यासाठीं मागें हनुमंतास ठेवून राम वैकुंठास गेले. राम आणि हनुमंत एक च, असें निश्चयपूर्वक श्रीसमर्थ सांगत आहेत आणि तितक्या च निश्चयानें आपण हि म्हणूं कीं, हनुमंत आणि रामदास एक च.

**निजदास रामें मारुती ठेविला । चिरंजीव केला कल्प कोडी ॥ १०१ ॥**
**कल्प कोडी ऐसा देउनियां वर । निघाले सत्वर वैकुंठासी ॥ १०२ ॥**
**कल्प कोटी रामें केला निजरूप । माझें चि स्वरूप तूं चि येक ॥ १०३ ॥**
**वैकुंठासी राम गेले विश्रांतीये । जनासी उपाये हनुमंत ॥ १०४ ॥**
**हनुमंता राम आहे निश्चयेसीं । रामीं रामदासीं ऐक्यभाव ॥ १०५ ॥**

## शेवटचें शत चौदावें – कृष्णचरित्र

राम आणि कृष्ण यांच्यांत भेद कोठून असणार? मागील शतांत श्रीसमर्थांनीं जसें रामचरित्र वर्णिलें, तसें या शेवटच्या शतांत श्रीकृष्णचरित्र वर्णिलें आहे.

**राहो सर्वकाळ गोविंदाचें नाम। कीर्तन उत्तम यादवांचें ॥ २॥**
**यादवांचे कुळीं गोकुळीं गोविंद। आनंदाचा कंद अवतरला॥ ३॥**
**अवतरला पूर्ण अच्युत अनंत। आयुधें मंडित चतुर्भुज ॥ ४॥**

याप्रमाणें आयुधें मंडित चतुर्भुज श्रीकृष्णांचा पूर्णावतार दुष्टांच्या संहारार्थ आणि सज्जनांच्या रक्षणार्थ झाला. मामळभटपीडेदान व पूतनामावशीचें कृष्णमुखें प्राणास मुकणें, यांचीं वर्णनें विनोदपूर्ण आहेत. रिठासुर, सगटासुर, कगा, बगा, धेनुका इत्यादि असुरांचा निःपात, चाणूर, कंस, उग्रसेन, चैद्य, शिशुपाल, जरासंध, काळयवन इत्यादिकांचा संहार इत्यादि पराक्रम करून श्रीकृष्णानें

**थोर ख्याती केली अर्जुना रक्षीलें।**
**सर्व सांहे केलें पांडवांचें ॥ ८४॥**

**पांडवांचा सखा सर्वसाहाकारी।**
**संकटीं कैवारी द्रपदीचा ॥ ८५॥**

**द्रपदीचा सखा द्वारकेभीतरीं।**
**सोळा सहस्र नारी गोपांगना ॥ ८६॥**

**गोपांगना राधा रुक्मिणी सुंदरी।**
**सुखें राज्य करी यादवेंसीं ॥ ८७॥**

# (२) स्फुट ओव्या

(१) चिरंजीव श्रीसमर्थ, (२) समर्थांचें सामर्थ्य, (३) त्या सामर्थ्याची गुरुकिल्ली, (४) त्या रामाचें रूप, (५) तें ब्रह्मज्ञान, (६) त्याच्या प्राप्तीचीं साधनें, (७) स्वतः श्रीसमर्थांचा साधनमार्ग, (८) साराचें हि सार – गुरुमुख, (९) धांवा, पावा, प्रेमपान्हा द्यावा.

त्यांना ओव्या म्हटलें आहे, पण आपण त्यांना अभंग समजत असतों. स्फुट म्हणजे अलग अलग व त्याप्रमाणें हे अभंग बहुतांशीं स्वतंत्र आहेत. ते मुद्दाम कोणत्या हि एका सूत्रांत गोवलेले नाहींत. ते एका च वेळीं लिहिले गेले नसावेत, हें उघड आहे. प्रसंगानुसार ते निरनिराळ्या वेळीं स्फुरलेले असावेत. पण व्यक्तीचा उद्धार, राष्ट्राचा उद्धार, जगाचा उद्धार ही एक च एक भावना श्रीसमर्थांच्या हृदयांत अखंड वावरत असल्यामुळें, निरनिराळ्या प्रसंगीं जरी या अभंगांची रचना झाली असली तरी **अहं ब्रह्मास्मि** म्हणजे मी ब्रह्म आहें व **तत्त्वमसि** म्हणजे तूं हि तें च आहेस, हा विचाराचा एक च एक धागा एकसारखा या अभंगांत आढळतो. हें आत्मनिवेदन घडावें, म्हणून या अभंगांत कोठें करुणा भाकली आहे, कोठें त्याच्या नुसत्या खुणा सांगितल्या आहेत तर कोठें त्याचें स्वरूप स्पष्ट करून दाखविलें आहे, कोठें त्याच्या साक्षात्काराचीं साधनें सांगण्यांत आलीं आहेत तर कोठें श्रीसमर्थांनीं आपली निर्भय वृत्ति प्रकट करून स्वसामर्थ्याचा प्रत्यक्ष प्रत्यय वाचकांस आणून दिला आहे.

या त्यांच्या सर्व उद्गारांत आपणांस त्यांच्या हृदयाचा ठाव घ्यावयाचा आहे. प्रयत्न आपला, कृपा त्यांची. आपण लडिवाळपणा करूं तो त्यांना पटला पाहिजे. आपल्या जीवाची तळमळ त्यांना जाणवली पाहिजे. श्रीसमर्थांचा स्वभाव असा होता, म्हणतात, कीं ते तिऱ्हाइतासीं फार थोडें आणि जपून बोलत, पण एकदां दुसऱ्याच्या अंतःकरणाची त्यांना परीक्षा झाली व त्याचें निस्सीम भक्तिप्रेम त्यांच्या निदर्शनास आलें म्हणजे आपलें हृदय खुलें करून ते त्याच्याशीं मनमोकळेपणानें बोलत. तेव्हां त्यांच्या हृदयाचा आपणांस ठाव लागणें किंवा न लागणें, हें सर्वस्वीं आपणांवरच अवलंबून आहे. या, स्फुट अभंगांत त्यांना शोधूं या.

## ( एक ) चिरंजीव श्रीसमर्थ

श्रीसमर्थांच्या चरित्राला दोन अंगें आहेत. एक, त्यांचें अनादि अनंत चिरंजीव स्वरूप आणि दुसरें, जें आपण पहिल्या खंडांत पाहिलें, जें शक १५३० च्या चैत्र शुद्ध ९ स जांबेस प्रकट झालें आणि शक १६०३ च्या माघ वद्य ९ स सज्जनगडावर आपल्या पहिल्या आत्मस्वरूपांत विलीन झालें तें. हीं दोन्ही स्वरूपें जाणण्याची आपणांस सारखी च उत्कंठा लागली पाहिजे.

श्रीसमर्थ आणि परब्रह्म एक च. हें केवळ माझें म्हणणें नव्हे, त्यांनीं च स्वमुखें आपल्या या स्वरूपाचें वर्णन एका अभंगांत केलें आहे. त्यांनीं स्वत: सांगितलेलें इतकें उत्तान आत्मचरित्र त्यांच्या वाङ्मयांत मला अन्यत्र आढळलें नाहीं. तें त्यांचें चरित्र सावंत अवलोकिलें पाहिजे.

**माझें थोरपण वेद वाखाणीती। ऐसी हे प्रचीती सिद्ध आतां ॥ १ ॥**

वेदानें जी ब्रह्माची स्तुति गायिली आहे, ती दुसऱ्या कोणाची नसून आपली च आहे, असें श्रीसमर्थ सांगत आहेत — सांगत आहेत इतकें च नव्हे, तर तुमच्या आमच्या प्रत्ययास आणून देत आहेत.

**सिद्ध आतां बोध देखत देखतां। होते सार्थकता सीघ्र काळें ॥ २ ॥**
**सीघ्र काळें काळ सर्व संव्हारला। अनुभव आला रोकडा चि ॥ ३ ॥**
**रोकडा चि आतां तुम्ही तऱ्हीं पाहा। विवेकानें आहा काये नेणों ॥४॥**
**नेणों महिमान विवेकी जनाचें। होय सज्जनाचें मूळ स्थान ॥ ५ ॥**

विवेक कराल तर, आपणांस अनुभव आला तो तुम्हांस हि येईल, असें श्रीसमर्थ सांगत आहेत. अनुभव हें सज्जनांचें मूळ पीठ होय. विवेकापुढें असाध्य असें जगांत कांहीं नाहीं ! असा कोण चांडाळ आहे कीं जो उगीच कांहीं तरी बोलेल !

**मूळ स्थान मूळ होईजे केवळ। कोण रे चांडाळ मिथ्या बोले ॥ ६ ॥**

श्रीसमर्थांच्य शिकवणीचा हा च तर वडिवार आहे. ज्ञान सांगावें साचार, मिथ्या बोलतां उत्तर प्रभूस लागे !

**मिथ्या बोलवेना पाहा विवंचना। सिद्ध अनुमाना कैसें येतें ॥ ७ ॥**

ती विवंचना ते पुढें सांगत आहेत आणि आपणांस आपलें स्वरूप पटवून देत आहेत.

**कैसें येतें आत्मप्रचीती आपण । मी तूं ऐसे कोण सांग बापा ॥ ८ ॥**
**सांग बापा मनीं बरें विचारूनी । तत्त्वाची झाडणी करूनीयां ॥ ९ ॥**
**करूनीयां पंचीकर्णविवरण । पुढें मीतूंपण कोठें आहे ॥ १० ॥**
**आहे तैसें आहे प्रत्ययें जाणावें । कोणासी म्हणावें काये आतां ॥ ११ ॥**

इतका हा विचार तर्कशुद्ध असतां, लोक मानूं न लागले तर त्यास काय म्हणावें ! तेव्हां

**काये आतां होतें बहु बोलोनीयां । घेतलेसें जायां सर्व कांहीं ॥ १२ ॥**
**सर्व कांहीं आहे दृश्य जाईजणें । माझें मी च जाणें कोणा सांगों ॥ १३ ॥**

हे असे निराशेचे उद्गार त्यांना काढावे लागावेत, याचें नवल वाटतें. त्या काळीं किंवा केव्हां हि अभिमानानें कोणी न ऐकोत, न विश्वास ठेवोत, न विचार करोत ! पण सर्व काळीं श्रीसमर्थचरणीं अनन्य भावानें लोटांगण घालणारे कोट्यवधि जीव असणार, हें तितकें च निश्चित होय.

असें श्रीसमर्थांचें चिरंतन स्वरूप आहे. आपण चिरंजीव आहोंत, आपणांस जन्ममृत्यु नाहीं, असें त्यांनीं अनेकदां म्हटलें आहे.

**सर्व काळ देही असतां विदेही । रामदासीं नाहीं जन्म मृत्य ॥ ४/० ॥**

ते चिरंजीव हनुमंताचे च अवतार होते. जें मारुतीचें स्वरूप तें च श्रीसमर्थांचें.

**मारुतीचें बळ वर्णितां सबळ । वाचा हे विबळ होत आहे ॥ १०-२३ ॥**
**होत आहे साना होत आहे थोर । कोण जाणे पार स्वरूपाचा ॥ २४ ॥**
**रूप वज्रदेही पुच्छ वज्र तें हि । रामदासी नाहीं जन्म मृत्य ॥ २५ ॥**

रामदासीं नाहीं जन्ममृत्य ! खरें च आहे, अष्ट देहाचें ज्यांनीं निरसन केलें त्यांना जन्ममृत्यु कोठून असणार ?

**जन्म अष्टदेही साक्षी तो विदेही । रामदासीं नाहीं जन्म मृत्य ॥ १०७/६ ॥**

आणि हा च त्यांच्या भक्तांना मोठा आधार वाटतो कीं, कोणत्या हि काळीं आपण त्यांना अनन्य शरण गेल्यास आपणांस त्यांचा साक्षात्कार झाल्यावांचून राहणार नाहीं.

**समर्थांची भेटी जाल्या नाहीं तुटी।**
**मग कल्पकोटी चिरंजीव ॥ १५-९ ॥**

## ( दोन ) समर्थांचें सामर्थ्य

एका अभंगांत श्रीसमर्थांनीं स्वसामर्थ्याविषयीं जो आत्मविश्वास प्रकट केला आहे, तितका त्यांच्या एकंदर वाङ्मयांत मला कोठें आढळला नाहीं. असल्यास तो माझ्या डोळ्यांत इतका भरला नाहीं. बारा वर्षें पुरश्चरण आणि बारा वर्षें तीर्थाटण करून आणि श्रीरामचंद्राची कृपा संपादन करून श्रीसमर्थांची वृत्ति इतकी बेगुमान झाली होती कीं, ते म्हणतात, आतां आम्हांस कोणाची पर्वा उरली नाहीं, आतां आपण मनांत आणूं तें सहज लीलेनें घडवून आणूं.

**आम्हा नाहीं चाड ते कोणी येकाची। दृढ राघवाची कास धरूं ॥ ८-६ ॥**
**कास धरूं जेणें पावन चि केलें । तेथें माझें जालें समाधान ॥ ७ ॥**
**समाधान जालें प्रत्ययासी आलें । धन्य ते पाउलें राघवाचीं ॥ ८ ॥**
**राघवाचीं पदें मानसीं धरीन । विश्व उद्धरीन हेळामात्रें ॥ ९ ॥**
**हेळामात्रें मुक्त करीन या जना। तरी च पावना राघवाचा ॥ १० ॥**
**राघवाचा दास मी जालों पावन । पतीत तो कोण उरों शके ॥ ११ ॥**

मी पावन झालों, आतां मी कोणाला पतित राहूं देणार नाहीं. पण जो कोणी आपणाकडे येणार च नाहीं, आपणांस विचारणार च नाहीं, आपण सांगितलेलें ऐकणार च नाहीं, त्याला कोण काय करणार !

**उरों शके ऐसें कल्पांतीं घडेना । जो कोण्ही पुसेना त्यासी उणें ॥ १२ ॥**

आणि आज हि श्रीसमर्थ कोठें गेले आहेत, असें मानण्याचें कारण नाहीं. आज हि ते आपल्या भक्ताला कृतार्थ करण्यासाठीं वाङ्मयाच्या स्वरूपांत सिद्ध आहेत. पण जो कोणी त्यांचें वाङ्मय पाहीचना, वाचीचना, ग्रन्थराजाला हृदयाशीं धरीना, श्रवण-मनन करीना, ध्यास घेईना, त्याला श्रीसमर्थांनीं काय करावें !

**उणें न संगतां माझ्या सूर्यवंशा। कोण्हाची निराशा नाहीं आम्हा ॥१३॥**
**आम्हा नाहीं उणें राघवाच्या गुणें । ब्रीद चि राखणें पावनाचें ॥ १४ ॥**

**पावनाचें ब्रीद आम्हा प्राप्त जालें । प्रचीतीस आलें कितीयेक ॥ १५ ॥**
**कितीयेक जन ज्ञानें उद्धरीलें । कृत्याकृत्य जालें तत्काळ चि ॥ १६ ॥**
**तत्काळ चि मोक्ष हें ब्रीद रामाचें । होत आहे साचें येणें काळें ॥ १७ ॥**

आपल्या भक्ताला तत्काळ मोक्ष देणें हें जें रामाचें ब्रीद तें या क्षणीं आम्हांस प्राप्त झालें आहे, आम्हांकडे आलें आहे, आणि म्हणून

**येणें काळें मोक्ष जरी मी देईना । दास म्हणवीना राघवाचा ॥ १८ ॥**

या क्षणीं, जो कोणी आपणांस शरण येईल त्यास मोक्ष देऊं न शकूं, तर आपण नांव बदलून देऊं, आपण स्वतःस राघवाचा दास म्हणवून घेऊन रामदास हें नांव मिरवितों, तें यापुढें मिरविणार नाहीं! कोण हें सामर्थ्य, केवढा हा प्रबळ आत्मविश्वास! असा पुरुष ज्या देशाला ज्या काळीं लाभला, तो देश आणि तो काळ धन्य होत! हेळामात्रें म्हणजे सहज लीलेनें मी या लोकांना मुक्त करीन, तर च मी पतितपावन रामाचा खरा दास होय! या ठिकाणीं श्रीमत् दासबोधांतील पुढील ओवी कोणाला हि सहज आठवेल.

**पतितपावनाचे दास । ते हि पावन करिती जगास ।**

आणि विशेष म्हणजे त्या काळीं

**ऐसी हे प्रचीत मनास । बहुतांच्या आली ॥**

कशाच्या बळावर श्रीसमर्थ इतकें प्रतिज्ञापूर्वक बोलत आहेत, असें एकाद्याच्या मनांत येईल. श्रीसमर्थ म्हणतात, रागावूं नका, ही कांहीं माझी शक्ति नव्हे, ही प्रभु रामचंद्राची कृपा होय! त्यांचा तसा मला वर प्राप्त झाला आहे.

**राघवाचा वर पावलों सत्वर । जनाचा उद्धार करावया ॥ १९ ॥**

जगदुद्धारार्थ श्रीसमर्थांचा अवतार झाला, असें जें आपण म्हणत असतों, तें दुसऱ्या कोणाच्या सांगण्यावरून नव्हे !

**कराया समर्थ राम सूर्यवंसीं । मज कासयासी रागेजता ॥ २० ॥**

मजवर रागावाल तर त्याचा राग रामाला येईल, असें ते म्हणत आहेत, इतके राम आणि रामदास, देव आणि भक्त एकरूप झाले होते.

**रागेजता राग येईल समर्था । हे तों कांहीं सत्ता माझी नव्हे ॥ २१ ॥**

## ( तीन ) त्या सामर्थ्याची गुरुकिल्ली

पुढच्या च ओवींत आली आहे.

**माझी सर्व चिंता जानकीजीवना ।**
**आतां मी लेखीना ब्रह्मादिकां ।। २२ ।।**

माझा सर्व पत्कर रामानें घेतल्यावर मीं आतां कोणाची पर्वा करावी, कोणाला भ्यावें ! इतके राम श्रीसमर्थांनीं आपलेसे करून घेतले होते. याचे दाखले त्यांच्या एकंदर वाङ्मयांतून शेंकडोंसे देतां येतील, तथापि प्रस्तुत आपणांस या अभंगापुरता च विचार करावयाचा आहे.

**जाणे सुखदुख राम माझा येक । येर ते माईक वैभवाचीं ।। ६१–१ ।।**
**वैभवाचीं सखीं वोरंगोनि जाती । आतमाराम अंतीं जिवलग ।। २ ।।**
**जिवलग नाहीं श्रीरामावांचुनी । हा चि माझे मनीं दृढभाव ।। ३ ।।**

ही ओवी वाचतांना वाचकांस, श्रीसमर्थांनीं रघुनाथभटास स्वहस्ताक्षरें लिहिलेल्या त्या पत्रांतील पुढील वाक्याचें स्मरण होईल–" मज रघुनाथजीवेगळें कोण्ही जिवलग नाहीं. "

**भाव अन्यत्रांचा आहे वरपंगाचा । रामेंवीण कैचा अंतरंग ।। ४ ।।**
**अंतरींची वेथा श्रीरामा समर्था । जाणवल्या चिंता दुरी करी ।। ५ ।।**

हा आपला अनुभव आहे व जो जो कोणी अनन्य भावानें रामाची कांस धरील त्याला त्याला याप्रमाणें अनुभव आल्यावांचून राहणार नाहीं, असें श्रीसमर्थ आश्वासन देत आहेत.

**करी प्रतिपाळ शरण आलियांचा । राम त्रैलोक्याचा मायबाप ।। ६ ।।**
**मायबाप धन सज्जन सोयरा । येका रघुवीरावीण नाहीं ।। ७ ।।**
**नाहीं मज चिंता श्रीराम असतां । संकटीं बोहातां उडी घाली ।। ८ ।।**
**उडी घाली मज अनाथा कारणें । राम सर्व जाणे अंतरींचें ।। ९ ।।**
**अंतरींचें गुज राम सर्व बीज । रामदासीं निज प्रगटलें ।। १० ।।**

याप्रमाणें श्रीसमर्थ आपला अनुभव सांगत आहेत व आपणांस विचारीत आहेत कीं, तुम्हांस वारंवार किती सांगावें व आणखी किती वेळां सांगितलें म्हणजे तुमचा विश्वास बसेल !

**ब्रीद साच केलें भक्तां उद्धरीलें । प्रचीतीस आलें मनाचीये ॥ ७४-१ ॥**
**मनाची प्रचीती जाली निर्वासना । लेश ही असेना विषयांचा ॥ २ ॥**
**विषयांचा लेश संसारदायेक । जानकीनायेक चुकवीतो ॥ ३ ॥**
**चुकवीतो जन्म मृत्य सेवकांचा । विचार हा काचा कदा नव्हे ॥ ४ ॥**
**कदा नव्हे कांहीं वाक्य अप्रमाण । धरावे चरण राघवाचे ॥ ५ ॥**
**राघवाचे दास सर्वस्वें उदास । तोडी आशापाश देवराणा ॥ ६ ॥**
**देवराणा भाग्यें जालीयां कैपक्षी । नानापरी रक्षी सेवकांसी ॥ ७ ॥**
**सेवकांसी कांहीं नलगे साधन । कारतो पावन ब्रीदासाठीं ॥ ८ ॥**

इतके राम आपल्या ब्रीदाला जपतात. आपल्याकडे फक्त त्यांची अनन्य सेवा करावयाची, एवढें च उरतें. पुढची सर्व काळजी त्यांची त्यांना लागते. श्रीसमर्थ म्हणतात, तुम्हांस हें वारंवार कितीदां सांगावें ?

**ब्रीदासाठीं भक्त तारिले अपार । आतां वारंवार किती सांगों ॥**
**किती सांगों देव पतितपावन । करावें भजन दास म्हणे ॥ १० ॥**

पण तेवढें हि आपल्याच्यानें होईना !

**थोर भाग्य ज्याचें राम त्याचें कुळीं । संकटीं सांभाळी भावबळें ॥ ८४–५ ॥**
**भावबळें जेहीं धरिला अंतरीं । तया क्षणभरी विसंभेना ॥ ६ ॥**

मला असें सुचवावेंसें वाटतें, भावबळें जेहीं धरिला अंतरीं । तया क्षणभरी विसंभेना ॥ हीं दोन च चरणें एकांतांत दहा वीस वेळां एकाग्रचित्तानें मनाशीं म्हणून पहा बरें काय परिणाम होतो तो ! क्षणभर सुद्धां आपल्याला सोडून ते दूर जात नाहींत, केवढें भाग्य म्हणावयाचें ! जाल तेथें ते आहेत च ! पण, केव्हां ? एकदां त्यांना हृदयांत घट्ट धरून ठेवल्यावर !

**विसंभेना कदा आपुल्या दासासी । रामीरामदासीं कुळस्वामी ॥ ७ ॥**

हा आपला अनुभव त्यांनीं कितीदां सांगितला म्हणजे आपण एकदां तरी विचारांत पडूं ?

सर्वस्वाचा त्याग करून, साधनांचे कष्ट सोसून, घोर तपश्चर्या करून, श्रीसमर्थांनीं रामाला आपलें किती तरी ऋणी करून ठेवलें होतें ! ते म्हणतात, माझ्या मुखावाटे शब्द निघण्याचा अवकाश, तो शब्द झेलून धरण्यास प्रभु रामचंद्र तत्पर असतात !

**पडों नेदी शब्द माझा भूमीवरी ॥ $\frac{१३१}{३}$ ॥**

मुखावाटे तरी शब्द निघण्याची काय आवश्यकता आहे ? आपल्या मनांतील भाव जाणणें त्यांना काय कठीण आहे! श्रीसमर्थांनीं दुसरीकडे सांगितलें आहे, " जें जें मनें अभिळाषिलें । तें तें समर्थें पुरविलें ॥ " आपण मनांत आणावें आणि रामानें आपले कोड पुरवावे! इतका ज्या महापुरुषाचा अधिकार, त्याच्या सामर्थ्याला काय पारावार असणार! आपल्या उपासनेनें त्यांनीं रामाला च आपलें जणूं अंकित करून ठेवलें, ही च त्यांच्या सामर्थ्याची गुरुकिल्ली होय.

याप्रमाणें राम माझा शब्द भूमीवर पडूं देत नाहींत, त्याप्रमाणें तूं हि रामाला आपल्या हृदयांत सांठविशील, तर तुझी हि काळजी त्यांना लागेल, असें श्रीसमर्थ आपल्या लाडक्या शिष्याला प्रोत्साहनपूर्वक सुचवीत आहेत.

**पडों नेदी शब्द माझा भूमीवरी । दृढ चित्तीं धरी देवराणा ॥ ३ ॥**
**देवराणा सर्वां देवां सोडवीता । लागईल चिंता त्यासी तुझी ॥ ४ ॥**

केवढें हें श्रीसमर्थभक्ताचें भाग्य कीं त्याला श्रीसमर्थ ग्वाही देऊन सांगत आहेत :

**तुझी चिंता करी राव अयोध्येचा । कृपाळु दीनाचा दास म्हणे ॥ ५ ॥**

मला असा वारंवार प्रश्न पडे कीं, त्या अंदाधुंदीच्या, मुलुखगिरीच्या, आततायीपणाच्या काळांत बारा वर्षें तीर्थाटणाच्या निमित्तानें श्रीसमर्थ सारा देश पायाखालीं तुडवीत असतां, ते एकटे च हिंडत, का एकाद्या मेळ्याबरोबर जात, का कोणी समानधर्माचे सोबती बरोबर असत ? या प्रश्नाचें एक उत्तर श्रीसमर्थांनीं स्वतः आपल्या दोन चार अभंगांत देऊन माझें समाधान केलें आहे. ते म्हणतात, आपण एकटे असे केव्हां च कोठें गेलों नाहीं व जात नाहीं, आपण केव्हां हि एकटे नसतों च मुळीं.

**जेथें जाव तेथें राम समागमी । आतां कासया मी खंती करूं ॥ $\frac{१५९}{१}$ ॥**
**खंती करूं ज्याची तो समागमें चि । पाहातां सुखाची घडी होये ॥ २ ॥**
**होये देव खरा भूमंडळवासी । जातां दिगांतासी सारिखा चि ॥ ३ ॥**

केव्हां आतां दिगंताला सोडून जाणार च कोठें एकटे !

**सारिखा चि जनीं वनीं वनांतरीं । तो गिरिकंदरीं सारिखा चि ॥ ४ ॥**
**सारिखा चि कडांकपारीं पाहातां । राम आठवितां दास म्हणे ॥ ५ ॥**

नेत्र सजल होऊन, कंठ भरून येऊन, रामा! म्हणून हांक मारतां च ज्यांच्या संनिध राम येऊन उभे ठाकत, ते श्रीसमर्थ रात्रीं अपरात्रीं दऱ्याखोऱ्यांतून निर्भयपणें एकटे कसे हिंडत, या प्रश्नाचा उलगडा झाला. त्यांचे रक्षक, अष्टौप्रहर, ते जातील तेथें त्यांच्या आजुबाजूस असत!

**विदेशासी जातां देश चि लागला । पुढें सांपडला मायेबाप ॥ १६०/१ ॥**
**मायेबाप राम या विश्वलोकांचा । तो स्वामी आमुचा सर्व देशीं ॥ २ ॥**
**सर्व देशीं आहे विचारें पाहातां । जातां ना राहातां सारिखा चि ॥ ३ ॥**
**सारिखा चि देव कदा पालटेना । राहे त्रिभुवना व्यापुनीयां ॥ ४ ॥**
**व्यापुनीयां दासा संनीध चि असे । विचारें विलसे रामदासीं ॥ ५ ॥**

तात्पर्य, जेथें राम नाहींत तो विदेश होय आणि श्रीसमर्थांना विदेश कधीं लागला च नाहीं.

**रामेंवीण देश तो जाण विदेश । विदेशाचा देश राम करी ॥ १६१/१ ॥**
**राम भेटे ज्यासी तो नव्हे विदेसी । सर्व देश त्यासी आपले चि ॥ २ ॥**
**आपले चि देश या रामाकरितां । होये सार्थकता जेथें तेथें ॥ ३ ॥**
**जेथें तेथें राम देखतां विश्राम । संसारींचा श्रम आठवेना ॥ ४ ॥**
**आठवेना तेथें आठव विसर । दास निरंतर जैसा तैसा ॥ ५ ॥**

किती विस्तार करावा? श्रीसमर्थांच्या कृपाळुपणाला आपण पुरे पडणार नाहीं. श्रीसमर्थांपासून राम कधीं दूर झाले नाहींत, एवढें आपणांस समजलें म्हणजे पुरे आहे. आपल्या कर्मांत असेल तसें आपल्या हातून घडेल. श्रीसमर्थांचा शब्द मानण्याची आपणांस बुद्धि झाली पाहिजे. त्यांच्या सामर्थ्याचें बीज नुसतें समजल्यानें आपलें कल्याण होणार नाहीं. आपलें कल्याण व्हावें, आपलें नेहमीं बरें असावें, आपणावर हि रामाची कृपा व्हावी, म्हणून ते आपलें हृदय खुलें करून आपल्या जीवींचें गुज आपणांस सांगत असतां तदनुसार आपण वर्तन न करूं तर आपल्यासारखे अभागी आपण च, असें म्हटलें पाहिजे.

**माझे मनीं सर्व सुख व्हावें तुज । म्हणो नियां गुज सांगतसे ॥ १२९/१ ॥**
**सांगतसे हित तां जीवीं धरावें । भजन करावें राघवाचें ॥ २ ॥**
**" पावना रामा पतितपावना रामा "**
**राघवाचें प्रेम तें करी विश्राम । येर सर्व श्रम जाण बापा ॥ ३ ॥**
**जाण वा वचन हें माझें प्रमाण । वाहतसे आण राघवाची ॥ ४ ॥**

आणखी त्यांनीं किती आणि कसें सांगावें ? स्वतःस श्रीसमर्थांचे म्हणवून घ्यावयाचें आणि जन्मभर दुश्चित्त राहून एवढें हि त्यांचें ऐकावयाचें नाहीं, यासारखा, मी दुसऱ्यांना कशास विचारूं, मी माझ्या च मनाला विचारतों, यासारखा दुसरा अधमपणा कोणता ? रामाची शपथ घेऊन सांगितल्यावांचून हे लोक आपला शब्द मानणार नाहींत, असें समर्थांना वाटावें व त्यांना शपथ घ्यावी लागावी, याचें मला एकीकडे वाईट वाटतें, तर आपल्याविषयींचा त्यांच्या हृदयांतील हा कळवळा पाहून आनंद हि होतो.

**राघवाची भक्ती ते माझी विश्रांती । असों द्यावी चित्तीं दास म्हणे ॥ ५ ॥**

अशी त्यांची आपणां सर्वांस आज्ञा आहे. त्यांच्या विश्रांतीचें वर्म आपणांस समजलें. त्यांच्या सामर्थ्याची गुरुकिल्ली हि सुदैवानें आपल्या हातीं आली आहे. तेव्हां आतां ती किल्ली चालवून त्यांच्या हृदयाचें कपाट खुलें करून जितकें आपणांस आंत डोकावतां येईल, तितकें आपण डोकावून पाहूं.

ती रामाची कृपा ही त्यांच्या सामर्थ्याची गुरुकिल्ली होय,

## ( चार ) त्या रामाचें रूप

[illegible] पाहिजे.

[illegible] सगुण आणि निर्गुण असे दोन प्रकारचें आहे. सगुणाचेनि [illegible] पाहिलें पाहिजे [illegible]. श्रीसमर्थवाङ्मयांत [illegible] आहेत. मागे आठव्या शतांत [illegible] आहे. सगुणध्यान आणि निर्गुणध्यान

अशीं च त्यांचीं दोन स्वतंत्र लघु काव्यें असून तीं आपल्या अवलोकनांत पुढें येतील च. प्रस्तुतच्या स्फुट अभंगांत हि अनेक ठिकाणीं त्यांचीं वर्णनें आढळतात. त्यांपैकीं येथें एकादें सगुणरूपाचें व एकाददुसरें निर्गुणरूपाचें निवडक वर्णन देऊन आपण पुढचा मार्ग आक्रमूं.

समर्थांना श्रीरामाचा साक्षात्कार वयाच्या अकराव्या वर्षीं जांबेस च झाला होता, हें आपण स्वानुभवदिनकरग्रन्थाधारें पहिल्या खंडांत सिद्ध केलें च आहे. त्या वेळीं जें रूप त्यांच्या नजरेस पडलें, त्याची त्यांनीं वारंवार आठवण काढली आहे. अशा एका प्रसंगीं स्फुट अभंग नववा त्यांच्या मुखांतून बाहेर पडला असावा. त्यांत त्यांनीं रामाची करुणा भाकली आहे, आठवण केली आहे, स्वरूप वर्णिलें आहे. तें सगुणरूप आपण हि डोळे भरून आपादमस्तक अवलोकिलें पाहिजे.

**स्वामी माझा राम अंतरला दुरी । आवस्ता अंतरीं वाटतसे ॥ ९ ॥**
**वाटतसे खंती सर्वकाळ चित्तीं । केव्हां कृपामूर्ति भेटईल ॥ १० ॥**
**भेटईल केव्हां राम माझी माता । जीव हा दुश्चीता सर्वकाळ ॥ ११ ॥**
**सर्वकाळ माझे मनीं आठवण । युगासम क्षण जात आहे ॥ १२ ॥**

हें श्रीसमर्थांचें बोलणें औपचारिक नव्हे, किंवा नुसत्या अर्थवादाचें नव्हे, तें शब्दशः वास्तविक आहे. इतकी तळमळ लागावी, तेव्हां कृपा होते !

**जात आहे वय वेचोनीयां माझें । रूप रामा तुझें दिसेना कीं ॥१३॥**
**दिसेना कीं रूप सांवळें सुंदर ।**

तें रूप कसें आहे, त्याची आठवण करून ते सांगतात.

**कासे पीतांबर कासीयेला ॥ १४ ॥**
**कासीयेली आंगीं चंदनाची उटी । मुक्तमाळा कंठीं डोल देती ॥ १५ ॥**
**डोल देती माळा पद्कीं रत्नकीळा । मृगनाभी टिळा रेखीयेला ॥ १६ ॥**
**रेखीयेलें भाळीं सुगंध परीमळ । लोधले आळीकुळ झुंकारती ॥ १७ ॥**
**झुंकारती वास घेती सावकाश । राम राजाधीश शोभतसे ॥ १८ ॥**
**शोभतसे माथां मुगट रत्नकीळ । कीरटी तेजाळ रम्य शोभा ॥ १९ ॥**
**रम्य निमासुर श्रीमुख साजिरें । दिव्य मकराकारें तळपताती ॥ २० ॥**
**तळपती कुंडलें बाहीं बाहुंवटे । दोर्दंड गोमटे च्यापबाण ॥ २१ ॥**

**च्यापबाण करीं नवरत्नें भूषण । आणि वीरकंकण कीर्तिमुखें ॥ २२ ॥**
**मुख मुरडुनी सीह्य जाती वनीं । जघन देखोनी संकोचले ॥ २३ ॥**
**संकोचले दैत्य पुतळे तोडरीं । गर्जती गजरीं अंदू वांकीं ॥ २४ ॥**
**आंदु वांकीं पाईं शोभे वीरासन । माझे मनीं ध्यान आठवलें ॥ २५ ॥**
**आठवलें रामचंद्रध्यान चित्तीं ।**

आणि समवेत कोण कोण होते ?

**सन्मुख मारुती उभा असे ॥ २६ ॥**
**उभा असे सर्व बंधुसमुदाव । त्रिकुटीचा राव बिभीषण ॥ २७ ॥**
**बिभीषण आणि किष्किंदेचा राव । सर्व समुदाव वानरांचा ॥ २८ ॥**

श्रीसमर्थवर्णित रामायणाच्या शेवटीं जो दर्शनाचा प्रसंग वर्णिला आहे, तो हि प्रत्यंतराला आपल्या पाहण्यांत पुढें येईल च.

**वानरांसहित राम अयोध्येसी । आनंद जनासी थोर जाला ॥ २९ ॥**
**जाला येशवंत राम सूर्यवौसी । रामीं रामदासीं भेटी जाली ॥ ३० ॥**

प्रयत्नावांचून, साधनावांचून, पूर्वपूण्यावांचून आणि सद्गुरुकृपेवांचून आपल्या प्रत्ययास हें येणार नाहीं, हें खरें आहे. पण त्यावर पूर्ण विश्वास टाकून आपण प्रयत्नास लागलें पाहिजे. श्रीसमर्थांच्या या प्रत्यक्षाच्या, अनुभवाच्या गोष्टी आहेत. कोणास त्या अशक्य वाटल्या तरी त्या थोड्या च खोट्या होणार आहेत ?

**अनुभवी जाणे येथींचीये खुणे । येरां वीटवाणें वाटईल ॥ १/१ ५/८ ॥**
**वाटईल सुख संतसज्जनासी । रामीं रामदासीं भेटी जाली ॥ १९ ॥**

असो, सगुणाच्या भेटीचें जसें वर वर्णन आलें आहे, तसें निर्गुण-रामदर्शन हि त्यांनीं वर्णिलें आहे.

**पाहातां दिसेना तें चि बरें पाहे । तेथें रूप आहे राघवाचें ॥ ६/१ १ ॥**
**राघवाचें रूप जाणावें अरूप । सिद्ध सस्वरूप निराकार ॥ २ ॥**
**निराकार राम देखतां विश्राम । दुरी ठाके श्रम संसारींचा ॥ ३ ॥**
**संसारींचा श्रम राघवीं असेना । परी तो दिसेना राम डोळां ॥ ४ ॥**
**राम डोळां आहे अनुभवें पाहे । मीपण न साहे रामरूपीं ॥ ५ ॥**

**रामरूपी राम हें हि दोनी नाहीं । तेथें मना राहे सर्वकाळ ॥ ६ ॥**
**सर्वकाळ रामदर्शन होतसे । निर्गुणीं विश्वासे मन माझें ॥ ७ ॥**
**मन माझें रामरूपीं हें संचरे । तेणें देहीं भरे विदेहता ॥ ८ ॥**
**विदेहता देहीं अलक्ष लक्षावें । निशब्द बोलावें संतसंगें ॥ ९ ॥**
**संतसंगें घडे निःसंगाचा संग । राघवाचा योग रामदासीं ॥ १० ॥**

याचें तात्पर्य असें, राम, रामदास आणि ब्रह्म हे तिघे हि एका च स्वरूपाचे पर्याय होत. तेव्हां

## (पांच) तें ब्रह्मज्ञान

झालें म्हणजे राम आणि रामदास या उभयतांची हि भेट झाल्यासारखें होणार आहे. त्यांत च जन्माची सफलता आहे.

**मुख्य समाधान आत्मनिवेदन । निर्गुणीं अनन्य होतां बरें ॥३०६-१॥**

एऱ्हीं जन्म निरर्थक होय. कर्म आणि उपासना न मानणारे क्रियाभ्रष्ट लोक जसे पांगळे समजावयाचे, तद्वत् ब्रह्मज्ञान नसणारे आंधळे होत ! शब्दज्ञान पुष्कळ झालें आणि अनुभव थोडा हि नाहीं आला, तर जन्म वायां गेला असें समजावें. जो फुटत नाहीं तुटत नाहीं, चळत नाहीं ढळत नाहीं, रचत नाहीं खचत नाहीं, येत नाहीं जात नाहीं, दिसत नाहीं नाहींसा होत नाहीं, अशा त्या निर्विकल्प, निराकार, निरंजन देवाची ओळख झाली, तर च जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका व्हावयाची.

**वेर्थ जाती जन्म ज्ञानावांचुनीयां । केले कष्ट वायां निरार्थक ॥ १९२/३ ॥**
**निरार्थक जन्म पशुचीये परी । जवं तें अंतरीं ज्ञान नव्हे ॥ ४ ॥**
**ज्ञान नव्हे सोपें तें आधीं पाहावें । शाश्वत शोधावें दास म्हणे ॥ ५ ॥**

त्या शाश्वताचा शोध करावयाचा म्हणजे आपल्याला च आपण जाणावयाचें आहे. आपले वेद, आपलीं शास्त्रें, सर्व महानुभाव साधुसंत, सर्व महापुरुष सांगतात कीं, तें शाश्वत ब्रह्म आपण च आहोंत ! श्रीसमर्थ हि तें च सांगतात, म्हणतात, मजवर विश्वास ठेवा.

**दृढ धरा मनीं अहं ब्रह्म ऐसें । सांगती विश्वासें रामदास ॥ १५२/५ ॥**

( मुळांत ‘ सांगती ’ ऐवजीं ‘ सांगतो ’ आहे. ) नाहीं ऐकावयाचें श्रीसमर्थांचें ? केवढें आश्चर्य म्हणावयाचें कीं, आपण आपल्याला सर्व कांहीं समजतों, गरीब आहोंत श्रीमंत आहोंत, ब्राह्मण आहोंत क्षत्रिय आहोंत, देशभक्त आहोंत धर्मभक्त आहोंत, कोंकणस्थ आहोंत देशस्थ आहोंत, नवमतवादी आहोंत पुराणमतवादी आहोंत, शहाणे आहोंत विद्वान् आहोंत, सर्व कांहीं आहोंत हें समजतों, पण खरोखर जें आहोंत – जें ब्रह्म आहोंत – तेवढें च नेमकें कांहीं समजत नाहीं ! आणि त्यामुळें मूर्ख आहोंत, हें हि समजत नाहीं ! वेदावर, शास्त्रावर, सद्गुरुवचनावर विश्वास नाहीं, त्याचा हा परिणाम होय.

**तूं चि ब्रह्म ऐसें वेदाचें वचन । तें चि संतजन दृढ करी ॥ १ ॥**
**दृढ करी साधु तूं चि ब्रह्म ऐसें । तरी कां विश्वासें धरीजेना ॥ २ ॥**
**धरीजेना मनीं साधूचें वचन । वेद हि अमान्य कां करावा ॥ ३ ॥**

महाराज, आम्ही अमान्य कांहीं करीत नाहीं. साधुवचनावर आमचा विश्वास नाहीं, असें हि नाहीं. पण, हें स्वरूपज्ञान आमच्या प्रत्ययाला कोणी तरी आणून द्यावें, अशी आमची सर्वांच्या चरणापाशीं प्रार्थना आहे. आपण च केलेले प्रार्थनेचे ते दोन अभंग आपल्या सेवेसीं सादर करून आम्ही आपली प्रार्थना करतों, आम्ही अनाथ आहोंत, आम्हांस सनाथ करावें, आमच्यावर कृपा करावी.

( १९३ )

**नमूं रामकृष्णा आदिनारायेणा । तुम्ही त्या निर्गुणा दाखवावें ॥ १ ॥**
**दाखवावें निज स्वरूप आपुलें । दिसेनासें जालें काये करूं ॥ २ ॥**
**काय करूं आतां देवा नरहरी । पंढरीमाझारी पांडुरंगा ॥ ३ ॥**
**पांडुरंगा देवा अगा महादेवा । तुम्ही मज द्यावा ठाव ब्रह्मी ॥ ४ ॥**
**ब्रह्मीं ब्रह्मरूप तें मज करावें । रामदास भावें प्रार्थितसे ॥ ५ ॥**

( १९४ )

**सूर्यनारायेणा देवा नमस्कार । तुवां निराकार दाखवावें ॥ १ ॥**
**दाखऊनि द्यावें मज निववावें । चंद्रा तुज भावें प्रार्थितसे ॥ २ ॥**
**प्रार्थितसे मही आणि अंतरिक्षा । तुम्ही त्या अलक्षा दाखवावें ॥ ३ ॥**
**दाखवावें मज आपोनारायेणें । ब्रह्मप्राप्ती जेणें तें करावें ॥ ४ ॥**
**करावें सनाथ अग्निप्रभंजनें । नक्षत्रें वरुणें दास म्हणे ॥ ५ ॥**

अशी पंचभूतांची आणि देवादिकांची समर्थांनीं प्रार्थना केली आहे, त्यांना आमची प्रार्थना

**नमूं रामदासा सद्गुरु समर्था । पुरे जन्म आतां पावा वेगीं ॥**

कोणी तरी आम्हांस पावा आणि आम्हांला ब्रह्मप्राप्ती होईल असें करा! श्रीसमर्थांवांचून दुसऱ्या कोणास आमची दया येणार आहे? त्यांना च आमची ही प्रार्थना आहे. कृपा करून ज्ञानी माणसाची आम्हांस ओळख करून द्या आणि ज्ञानप्राप्तीच्या मार्गावर नेऊन सोडा. ज्ञानी माणसाची ओळख करून द्यावयाची म्हणजे श्रीसमर्थांनीं स्वतःची च लक्षणें सांगावयाचीं, असा अर्थ होतो. ते नाहीं तसा अर्थ करीत, आम्ही करतों. क्रमशः तीन अभंगांत त्यांनीं ज्ञानी, योगी आणि ईश्वरी पुरुष यांचीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्याकडे मी श्रीसमर्थांचें आत्मचरित्र च, या दृष्टीनें पहातों.

## ( २३७ ) ज्ञानी

**जाणावा तो ज्ञानी पूर्ण समाधानी । निःसंदेह मनीं सर्वकाळ ॥ १ ॥**
**मिथ्या देहभान प्रारब्धा आधेन । राखे समाधान पूर्णपणें ॥ २ ॥**
**आवडीनें करी कर्म उपासना । सर्वकाळ ध्यानारूढ मन ॥ ३ ॥**
**जाणे ब्रह्मज्ञान स्वयें उदासीन । मानितो वमन द्रव्यदारा ॥ ४ ॥**
**पदार्थाची हाणी होतां नये काणी । जयाची करणी बोला ऐसी ॥ ५ ॥**
**दास म्हणे धन्य सर्वांसी जो मान्य । जयाचा अनन्य समुदाव ॥ ६ ॥**

कोणत्या गुणांना श्रीसमर्थ प्राधान्य देत, तें या तिन्ही अभंगांवरून कळणार आहे. हे तिन्ही अभंग म्हणजे त्यांचें आत्मचरित्र च होय, असें मी अशावरून मानतों कीं, या तिन्ही अभंगांत एक एक लक्षण तरी मला त्यांचें च आहे, असें वाटतें. या अभंगांतील बाकीचीं लक्षणें सर्वसामान्य आहेत व इतरांबरोबर तीं श्रीसमर्थांच्या हि ठिकाणीं होतीं, पण ‘ जयाचा अनन्य समुदाव ’ हें लक्षण विशेषतः त्यांचें च होय.

## ( २३८ ) योगी

**जाणावा तो योगी सदा वीतरागी । अहंभाव त्यागी अंतरींचा ॥ १ ॥**
**स्वजन स्वदेश सांडुनि उदास । तेणें आशापाश तोडीयेला ॥ २ ॥**

**रमा सरस्वती वैभव वित्पत्ती । ज्ञानबळें चित्तीं चाड नाहीं ॥ ३ ॥**
**पूर्णी पूर्णकाम तेणें जो निःकाम । विषयांचा श्रम तुच्छ केला ॥ ४ ॥**
**विवेकाचें बळ जाहालें प्रबळ । बाह्य मायाजाळ त्यागीयेला ॥ ५ ॥**
**धन्य तो पैं दास संसारीं उदास । तया रामदास मानीतसे ॥ ६ ॥**

या अभंगांत तर, न कळत, श्रीसमर्थ सर्वथैव स्वतःकडे पाहून च बोलत आहेत, असें माझ्या मनांत येतें! त्यांतील सारीं च लक्षणें विशेषत्वानें त्यांचीं च होत, असें मी मानतों, पण त्यांतल्या त्यांत, आशापाश तोडून स्वजनांचा त्याग करून आणि स्वदेश सोडून साऱ्या भरतखंडभर उदास वृत्तीनें संचार केल्याचें दुसऱ्या एकाद्याचें उदाहरण कोणाच्या हि ऐकिवांत आहे काय?

## (२३९) ईश्वरी पुरुष

**जाणावा तो नर देव चि साचार । वाचे निरंतर राम नाम ॥ १ ॥**
**सगुणीं सद्भाव नाहीं ज्ञानगर्व । तयालागीं सर्व सारिखें चि ॥ २ ॥**
**निंदकां वंदकां संकटीं सांभाळी । मन सर्वकाळीं पालटेना ॥ ३ ॥**
**पालटेना मनीं परस्त्रीकांचनीं । निववी वचनीं पुढिलांसी ॥ ४ ॥**
**पुढिलांसी नाना सुखें देत आहे । उपकारीं देहे लावितसे ॥ ५ ॥**
**लावितसे देहे रामभजनासी । रामीरामदासीं हरिभक्ती ॥ ६ ॥**

यांतील सारीं च लक्षणें इतरांबरोबर श्रीसमर्थांच्या ठायीं विलसत होतीं, पण त्यांतल्या त्यांत त्यांच्याशिवाय दुसऱ्या कोणीं परोपकारांत सर्वथैव देह झिजविला होता?

जगाचा उद्धार करण्यास एक ब्रह्मज्ञान च समर्थ आहे, पण त्याकडे लक्ष च पुरवावयाचें नाहीं, तें तेवढें वगळून ज्ञानाच्या बाकीच्या सर्व अंगोपांगांची चौकशी करावयाची, असा माणसानें, समाजानें, राष्ट्रानें, जगानें संकल्प केला, तर त्याला कोण काय करणार? पूर्वजांनीं लावलेला आपल्या अंगणांतील कल्पतरु लाथाडून दुसऱ्यांच्या परसांतल्या बोरीबाभळींची हांव एकाद्यानें धरली तर त्याला शुद्धीवर कोणीं आणावें?

**ऐसें आत्मज्ञान उद्धरी जगासी । पाहेना तयासी काय करूं ॥ ५१/१ ॥**

हे निराशेचे उद्गार एकादे वेळीं आपल्या मुखांतून निघालेले खरे असले, तरी आपल्या चरणांपाशीं आमची प्रार्थना कीं, ब्रह्मज्ञानप्राप्तीचा मार्ग

आपण आम्हांस दाखवावा, मुक्कामामुक्कामांवरील खुणा सांगाव्या आणि आम्हांस शेवटच्या मुक्कामावर नेऊन पोंचवावें.

## ( सहा ) त्याच्या प्राप्तीचीं साधनें

अनुताप, अंत:शुद्धि, इंद्रियदमन, श्रवण, मनन, निदिध्यास, ग्रंथावलोकन, संतसंग, रामदास्य, गुरुदास्य, गुरुकृपा, विवेक, वैराग्य, सावधानता, नि:संगता, निष्कामता, येकांतसेवन, निरूपण, क्रियासंरक्षण, मानसपूजा, ध्यान, जप, धांवा, नामस्मरण इत्यादि साधनें या अभंगांतून सर्वत्र विखुरलेलीं आढळतात. पांच पंचवीस स्मरलीं तशीं वर दिलीं, पण हा सारा मला

## नवविधा भक्तीचा च विस्तार

वाटतो. श्रीसमर्थांनीं नवविधा भक्ति अनेक ठिकाणीं सांगितली आहे. त्यापैकीं येथें आपण एक अभंग पाहूं.

**आत्मज्ञानें होतें आत्मनिवेदन । भक्तीचें लक्षण नवविधा ॥ ११ ॥**
**नवविधा भक्ति श्रवणें करावी । धारणा धरावी श्रवणाची ॥ १२ ॥**
**श्रवणाची स्थिति ब्रह्मनिरूपण । श्रवण मनन निजध्यास ॥ १३ ॥**
**निजध्यास जनीं वस्तूचा धरावा । विचार करावा आपुला चि ॥ १४ ॥**
**आपुला चि ठाव ज्ञानें होतो वाव । जाणिजे उपाव श्रवणाचा ॥ १५ ॥**
**श्रवणाचा भाव जाणते जाणती । तिन्ही हि प्रचीति ऐक्यरूप ॥ १६ ॥**
**ऐक्यरूप देव भक्त नामांकित । अनन्य अनंत जैसा तैसा ॥ १७ ॥**
**तैसा आहे लाभ श्रवण भक्तीचा । जेथें विभक्तीचा ठाव नाहीं ॥ १८ ॥**
**ठाव नाहीं ऐसें श्रवणें जाणावें । कीर्तन करावें हें चि आतां ॥ १९ ॥**
**हें चि हें कीर्तन नित्य निरंतर । ग्रंथाचें अंतर विवरावें ॥ २० ॥**

ग्रंथ म्हणजे दासबोध. मनांत ग्रंथ आणून जेव्हां श्रीसमर्थ नुसता ग्रंथ शब्द योजितात, तेव्हां तो शब्दग्रंथराज दासबोधाला च अनुलक्षून असतो. याचें निर्विवाद प्रत्यंतर पुढें आनंदवनभुवनी प्रकरणांत आपणांस मिळेल. त्याप्रमाणें येथें हि " ग्रंथाचें अंतर विवरावें " म्हणजे ग्रन्थराज दासबोधाचें विवरण करावें. विवरतां विशेषाविशेष । कळों लागे ॥

**विवरावें जेणें तो चि तो जाहाला । रंक तो पावला राज्यपद ॥ २१ ॥**
**पदीं पद प्राप्त जालें संतसंगें । सद्य अंतरंगें समाधान ॥ २२ ॥**
**समाधान जालें श्रवणकीर्तनें । रामाच्या स्मरणें चित्तशुद्धी ॥ २३ ॥**
**चित्तशुद्धी जाली तेणें तें धरावें । सेवन करावें सद्गुरूचें ॥ २४ ॥**
**सद्गुरु करावा तें पादसेवन । सद्गुरूनें ज्ञान होत आहे ॥ २५ ॥**
**होत आहे ज्ञान सद्गुरु करितां । होये सार्थकता गुरुचेनी ॥ २६ ॥**
**गुरुचेनी परलोक ठांई पडे । सार तें निवडे प्रत्ययेंसीं ॥ २७ ॥**
**प्रत्ययेंसीं बोले तें चि तें बोलणें । अर्चन करणें गुरुदेवा ॥ २८ ॥**
**गुरुदेवालागीं करी नमस्कार । साहावा विचार भक्ति ऐसी ॥ २९ ॥**
**सर्व दास्य कीजे ते भक्ति सातवी । सख्य ते आठवी भक्ति जाण ॥ ३० ॥**
**नौमीचें लक्षण आत्मनिवेदन । सर्वदा अभिन्न परब्रह्मीं ॥ ३१ ॥**
**परब्रह्म स्वयें आपण चि होणें । ऐसीं हें लक्षणें सार्थकाचीं ॥ ३२ ॥**
**सार्थक भजन आत्मानिवेदन । विवेकें अभिन्न देव भक्त ॥ ३३ ॥**

याप्रमाणें ब्रह्मज्ञानप्राप्तीच्या सर्व साधनांचा अंतर्भाव नवविधाभक्तींत होत असला, तरी संतसंग, विवेक आणि या दोहोंच्या खालोखाल निरूपण, या तीन साधनांवर श्रीसमर्थांनीं विशेष भर दिलेला आढळतो. या अवघ्या ३२८ अभंगांत, न जाणों, शंभर वेळां श्रीसमर्थांनीं संतसंगाचा आणि कदाचित् त्याहून हि जास्त वेळां विवेकाचा पुरस्कार केलेला आढळेल. संतसंग, साधूची संगति, सज्जनसंगति, असे निरनिराळे शब्द आढळतील, पण सर्वांचा अर्थ एक च. संत, साधु, सज्जन म्हणजे बहुधा सद्गुरु. सद्गुरूवांचून जिणें व्यर्थ होय, त्यांच्यावांचून गति नाहीं, हा सिद्धान्त आहे. गुरु कोण करावे, याविषयीं दक्षता बाळगावी तितकी थोडी च आहे, पण गुरूवांचून मात्र कोणी राहूं नये ! श्रीसमर्थ निक्षून सांगतात :

**गुरुवीणें प्राणी त्या होये जाचणी । सत्य माझी वाणी मिथ्या नव्हे ॥ $\frac{११२}{१}$ ॥**
**मिथ्या नव्हे सत्य सांगतों तुम्हांला । अंतीं येमघाला चुकेना कीं ॥ २ ॥**
**चुकेना कीं येमयातना या जना । वेगीं निरंजना ठाईं पाडा ॥ ३ ॥**
**ठाईं पाडा वेगीं देव निरंजन । लावा तन मन सद्गुरूसी ॥ ४ ॥**
**सद्गुरूसी नाहीं जयाला वोळखी । तया झोंकाझोंकी यातनेची ॥ ५ ॥**
**यातनेची चिंता चुके येकसरी । वेगीं गुरु करी दास म्हणे ॥ ६ ॥**

आणि माझ्या हि मनाचा सिद्धान्त ठरून गेला आहे कीं, श्रीसमर्थांनीं सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असे सद्गुरु कोठें नसतील च, अथवा नाहींत च, हें म्हणणें चूक होईल. असतील, नाहीं कोणीं म्हणावें! पण एकंदरींत, हल्लींच्या कृत्रिमतेच्या काळांत कोणी कोणाच्या तरी नादीं लागून अखेरीस तोंडांत मारून घेण्याचा धोका पत्करण्यापेक्षां श्री ज्ञानेश्वर, श्री नामदेव, श्री एकनाथ, श्री तुकाराम आणि श्री समर्थ या महापुरुषपंचकापैकीं कोणाला हि मुमुक्षूनें शरण जावें, पण यांच्यापैकीं कोणा हि एकाची कांस धरल्यावांचून राहूं नये, हें मात्र त्रिवार सत्य होय. त्यावांचून जन्ममरणाचें, मीतूंपणाचें, संसाराचें, ब्रह्मांडाच्या उत्पत्तीचें, कशाचें च कोडें उलगडणार नाहीं. दुसऱ्यानें पुष्कळ सांगितलें तरी उमज पडणार नाहीं. गुरुवांचून सुटका नाहीं. एकदां,

**पाहे बापा देव कोण निरावेव। दास म्हणे भाव तेथें ठेवीं॥ १९७–५ ॥**

असें श्रीसमर्थांनीं म्हणतां च, एका तिऱ्हाइतानें ताड्कन उभें राहून विचारलें,

**भाविला नव जाये तेथें भाव ठेवीं। कैसें हो गोसावी सांगतसा ॥ १९८/१ ॥**
**सांगतसा परी न ये अनुमाना। हें कांहीं कळेना आम्हालागीं ॥ २ ॥**
**आम्हालागीं कळे हें कांहीं सांगा हो। गोसावी आहा हो भले तुम्ही ॥ ३ ॥**
**भले तुम्ही आहा मज उमजावें। उकलुनि द्यावें सर्व कांहीं ॥ ४ ॥**

यावर श्रीसमर्थांनीं एक च उत्तर दिलें:

**सर्व कांहीं कळे सद्गुरु करितां। दास म्हणे आतां गुरु करी ॥ ५ ॥**

## संतसंग, विवेक, निरूपण

यांची श्रीसमर्थांनीं सर्वत्र सांगड घातलेली आहे.

**सर्व धर्म कर्म हातींचें सांडावें। सत्वर धुंडावें शाश्वतासी ॥ २१८–१॥**
**शाश्वतासी ठाईं पाडावें विवेकें। निरूपणें येके साधुसंगें ॥ २ ॥**

**परब्रह्म खरें संतसंगें कळे। विवेकें निवळे मार्ग कांहीं ॥ १५५–३ ॥**

संतांच्या संगतींत जें निरूपण ऐकावयास मिळतें, त्यानें त्या वेळेपुरता तरी मनावर परिणाम घडतो. तो कायम टिकावा म्हणून अखंड विचार करावा, सदा सावध असावें, विचारांत मग्न होऊन राहावें. याप्रमाणें वागत गेल्यास वृत्ति स्थिर होत जातील.

**कीजे निरूपण संतांचे संगतीं । तेणें शुद्ध मती होत असे ॥ ३४-६ ॥**
**होत असे परी तैसें चि असेना । निश्चयो वसेना मनामधें ॥ ७ ॥**
**मनामध्यें सदा विवेक धरावा । निश्चयो करावा येणें रिती ॥ ८ ॥**

श्रीसमर्थांनीं आपल्या मनांत असलेल्या परमार्थमार्गांतील अनेक खुणा ठिकठिकाणीं सांगितल्या आहेत, त्यांतील एक खूण साधुसंगविषयक आहे.

**ब्रह्मादिकां लाभ ज्ञानाचा दुल्लभ । तो होये सुलभ साधुसंगें ॥ ७९-८ ॥**
**साधुसंगें साधु होईजे आपण । सांगतसे खूण रामदास ॥ ९ ॥**

आपण खूण सांगतां ती आम्हांस पटते, पण या काळांत साधुसंग दुर्लभ झाला आहे, तो कोठून आणावा? कदाचित् पृथ्वीच्या पाठीवर असतील हि अनेक प्रत्ययज्ञानी साधु आणि त्यांच्या भेटीच्या आड आमचें च पाप येत असेल! अशा परिस्थितींत अहोरात्र आपल्या वाङ्मयमूर्तीच्या सहवासांत असावें, एवढा च सुलभ उपाय आम्हांस सुचतो. या आपल्या वाङ्मयमूर्तीच्या अवलोकनानें आमच्यांत

## विवेक

जागृत होऊन, संसारांत गढल्यानें आमचीं गढूळ झालेलीं मनें निवळत जातील, असा आमचा विश्वास आहे.

**संसाराचें वर्म तोडितां तुटेना । मार्ग चि फुटेना विवेकाचा ॥ ५/३९ ॥**
**विवेकाचा मार्ग संतसंगें कळे । उदंड निवळे विवेकानें ॥ ४० ॥**

या आपल्या आश्वासनावर आमचा विश्वास आधारलेला आहे.

परमार्थमार्गांत विवेकाचें महत्त्व फार आहे व आपल्या हातांतील तें एक श्रेष्ठ साधन आहे. विचार च केला पाहिजे.

**विवंचितां राम राम चि होईजे । ये गोष्टीची कीजे विचारणा ॥ १७२/३ ॥**
**विचारणा सार विचारें उद्धार । साधु योगेश्वर विचारें चि ॥ ४ ॥**
**विचारें चि जनीं होतसे सार्थक । धन्य हा विवेक दास म्हणे ॥ ५ ॥**

ज्या विवेकाच्या योगानें आपण वस्तुरूप आहोंत असा बोध होऊन जन्माचें सार्थक होतें, तो विवेक, प्रत्येक जण सामान्यपणें जो विवेक म्हणजे विचार करीत असतो, त्याहून निराळा असला पाहिजे. तसा तो आहे हि. हा पारिभाषिक शब्द आहे. त्याचा श्रीसमर्थ काय अर्थ करितात, तो पाहिला पाहिजे. पांचवा जो विवेकप्रळय, तो हा विवेक होय. हे पंचप्रळय पुढें आपण दासबोधांत पाहूं.

**विवेकाचा अर्थ माईक सर्व हि । सस्वरूपीं नाहीं चराचर ॥ ५८–७ ॥**
**चराचर पंचभूतिक माईक । सिद्ध हा विवेक सज्जनाचा ॥ ८ ॥**
**सज्जनाचा भाव सर्व दृश्य वाव । दृश्यातीत देव जैसा तैसा ॥ ९ ॥**
**जैसा तैसा देव तो चि वोळखावा । प्रळय पांचवा दास म्हणे ॥ १० ॥**

हा असला विवेक ज्यांच्यापाशीं सदैव जागृत असतो, त्यांना भय कसलें असणार? असे विवेकी जन कोठें पहावयास मिळतील? अशांची संगति कोठें लाभेल? खेड्यापाड्यांत ते कोठून आढळणार?

**कुग्रामीचा वास आयुष्याचा नाश । विद्येचा अभ्यास तेथें कैचा ॥ २२९/१ ॥**
**तेथें कैचा देव कैचा तेथें धर्म । कैसें कर्माकर्म कळे चि ना ॥ २ ॥**
**कळेना परीक्षा चातुर्यमर्यादा । लागतसे सदा पोटधंदा ॥ ३ ॥**
**पोटधंदा नीच जनाची संगती । तेथें कैची गती विवेकाची ॥ ४ ॥**
**विवेकाची गती सज्जनसंगती । दास म्हणे स्थिति पालटावी ॥ ५ ॥**

म्हणून तर श्रीसमर्थ जांब सोडून पंचवटीस गेले नाहींत ना? श्रीसमर्थकालीन खेड्यांतील स्थितीचा या अभंगांत आदर्श च आहे म्हणावयाचा. मोठ्या शहरांत हि सज्जनसंगती हटकून लाभेल असें हि म्हणतां येत नाहीं. अशा स्थितींत सत्संगतीचा लाभ प्राक्तनावर सोंपवून स्वतः च आपलें आपण

**मन हें विवेकें विशाळ करावें । मग आठवावें परब्रह्म ॥ १६६/१ ॥**
**परब्रह्म मनीं तरी च निवळे । जरी बोधें गळे अहंकार ॥ २ ॥**
**अहंकार गळे संताचे संगती । मग आदि अंतीं समाधान ॥ ३ ॥**

त्या समाधानाचे श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेले उद्गार वाचून, कांहीं न समजतां, आपलें समाधान व्हावें, आपलें अंतःकरण आनंदानें उचंबळून यावें, हा चमत्कार च म्हणावयाचा!

**आतां किती बोलों धालों तृप्त जालों । विवेकें विरालों परब्रह्मीं ॥ $\frac{२०३}{१}$ ॥**
**परब्रह्मीं जातां ब्रह्म चि तत्वता । विचारें पाहातां आपण चि ॥ २ ॥**
**आपण चि असे कोणी च न दिसे । संशयाचें पिसें वाव जालें ॥ ३ ॥**
**वाव जालें भय सर्व संसारींचें । लाधलें हरीचें निजधाम ॥ ४ ॥**
**निजधाम बोधें विवेकें पहावें । दास जीवें भावें सांगतसे ॥ ५ ॥**

किती जीव तोडून श्रीसमर्थ सांगत आहेत ! हा अभंग घोकून घोकून पाठ करावा आणि एकांतांत डोळे मिटून अंतर्मुख होऊन

**आतां किती बोलों धालों तृप्त जालों । विवेकें विरालों परब्रह्मीं ॥**

असें सारखें चिंतनपूर्वक म्हणत च बसावें, असें एकाद्यास वाटेल, इतका आनंद या अभंगांत आहे.

सज्जनांच्या सहवासांत असतां जें

## निरूपण

ऐकावयास मिळतें किंवा त्यांनीं लिहून ठेवलेल्या ग्रन्थांत जें वाचावयास मिळतें, त्या योगें च आपल्या अंत:करणांत विवेकाचा उदय होत असतो. म्हणून परमार्थमार्गांत, सत्पुरुषांच्या मुखानें होणारें प्रतिपादन ऐकण्याचें किंवा त्यांच्या ग्रन्थांचें परिशीलन करण्याचें महत्त्व विशेष आहे.

निरूपण हा हि पारिभाषिक शब्द आहे. अद्वैत म्हणिजे निरूपण । अशी दासबोधांत त्याची व्याख्या केली आहे. अद्वैताचें प्रतिपादन तेंच निरूपण होय. त्याचें फळ फार मोठें आहे.

**निरूपणीं जनीं लाभे सर्व कांहीं । दुजें ऐसें नाहीं पाहों जातां ॥ $\frac{१०८}{१}$ ॥**
**साराचें हि सार वेदां अगोचर । तें लाभे साचार निरूपणें ॥ २ ॥**
**दाखवितां न ये बोलिलें न जाये । त्याची कळे सोये निरूपणें ॥ ३ ॥**
**मनासी ना कळे मीपणा नाडळे । तें गुज निवळे निरूपणें ॥ ४ ॥**
**वित्पत्तीचें कोडें तर्काचें सांकडें । तें जोडे रोकडें निरूपणें ॥ ५ ॥**
**मन हें चंचळ तें होये निश्चळ । साधनाचें फळ दास म्हणे ॥ ६ ॥**

असें निरूपणाचें महत्त्व आहे. एकदां जेवल्यानें जसें भागत नाहीं, दररोज जेवावें लागतें, तद्वत् एकदां निरूपण केल्यानें किंवा ऐकल्यानें कार्य होत नाहीं. त्याचें फळ पदरीं पडे तों आणि पडल्यावर हि तें चालूच ठेविलें पाहिजे.

अभंग १७५ ते १८१, दोन्ही धरून या सात अभंगांत सर्वस्वीं निरूपणाचें च महत्त्व दर्शविलें आहे. त्या सर्वांचें सार काढलें तर असें म्हणतां येईल कीं, निरूपणानें अनुताप होऊन भक्ति उदय पावते, वैराग्य उत्पन्न होतें, तर्ककुतर्क गळून पडतात, संदेह मावळतात, निःसंदेहता प्राप्त होते, भ्रांति नष्ट होते, पापिणी जाणीवेचें निसंतान होतें, शांतिक्षमादया इत्यादि दैवी गुणांचा उदय होतो, संसाराचीं बंधनें तुटतात, मायामोहपुरांत बुडण्याची भीति रहात नाहीं, देहबुद्धि म्हणजे च अहंता गळून पडते, देहीं विदेहता प्राप्त होते, रिद्धिसिद्धि दासीप्रमाणें हात जोडून उभ्या ठाकतात, अलभ्याचा लाभ होतो, समाधान होतें, सज्जनलक्षणें आंगीं बाणतात, ज्ञानाचीं बीजें हातीं येतात, वस्तूचा निर्धार होतो, आपली आपणांस ओळख पटते, अंतरीं विवेक सदा जागृत राहतो, उन्मनी अवस्था प्राप्त होते, शाश्वताची जोड मिळते, वासनांचें निर्मूलन होतें, मिळवावयाचें कांहीं रहात नाहीं, ब्रह्म आणि आपण एकरूप होतों, जन्माचें सार्थक होतें !

आपणांस शुद्धीवर आणण्यासाठीं श्रीसमर्थ किती शिणत आहेत हें पाहिलें, म्हणजे जीव कासावीस होतो.

आतांपर्यंत वर ज्या कांहीं साधनांचा नुसता नामनिर्देश केला, किंवा ज्यांचें थोडेंसें विवरण केलें, त्या सर्व साधनांना आपल्या पोटांत घेणारें व चहूं वर्णांना आणि आबालवृद्ध स्त्रीपुरुषांना अनुसरण्यास सुलभ जाणारें असें अमोघ साधन म्हणजे

## नामस्मरण

होय. याची महती हजारों ठिकाणीं वर्णिलेली आढळेल. सर्व साधुसंतांच्या प्रत्ययास आलेलें असें हें साधन होय. सर्वांचा त्यावर पूर्ण विश्वास असून, इतरांस अनुभव घेण्याचा त्यांनीं अति काकुळतीनें उपदेश केलेला आढळतो. अशा या साधनाविषयीं संशय धरणें पाप होय.

**कांहीं येक भाग्य होतें पूर्वजांचें । पापीयासी कैचें रामनाम ॥ ४८-३ ॥**
**रामनामें कोटी कुळें उद्धरती । संशय धरिती ते चि पापी ॥ ४ ॥**
**सर्व जाणे अंतीं रामनामें गती । आणि वेदश्रुती गर्जताती ॥ ७ ॥**
**गर्जती पुराणें आणि संत जन । करावें भजन राघवाचें ॥ ८ ॥**

पण त्या त्यांच्या गर्जना आमच्या कानापर्यंत आल्या नाहींत, किंवा येऊन हि त्यांची उपेक्षा करण्याइतके आम्ही पापी असलों तर ? तरी सुद्धां

**पापीयांचें पाप जळे येकसरें । जरी मनीं धरे रामनाम ॥ ५ ॥**

याचीं उदाहरणें सर्वांना श्रुत आहेत च.

**रामनामें उद्धरली ते गणिका । नेली देवलोका या च देहीं ॥ ६५/४ ॥**
**या च देहीं गती पावली कुंटणी । रामनाम वाणी उच्चारीतां ॥ ५ ॥**

पण आपणांस उदाहरणें ऐकून काय करावयाचें आहे ? श्रीसमर्थ सांगतात त्यावर आमचा पूर्ण विश्वास आहे. त्यांच्या अनुभवाचे दोन तीन अभंग आपण पाहूं. त्यांत त्यांच्या अंतरंगाच्या खुणा असल्यामुळें ते आपणांस जास्त च प्रिय वाटतील.

(१)

**क्षण येक राम आठवितां चित्तीं । तेणें उद्धरती कोटी कुळें ॥ ३३/१ ॥**
**कोटी कुळें वाट पाहाती तयाची । आवडी जयाची रामनामीं ॥ २ ॥**

*   *   *   *

**ठाईं पाडी राम जीवांचा विश्राम । तेणें सर्व काम पूर्ण होती ॥ ९ ॥**
**पूर्ण होती सर्व तुझे मनोरथ । राघवाचा स्वार्थ मनीं धरीं ॥ १० ॥**
**मनीं धरी सर्व देवांचा कैवारी । ध्यातसे अंतरीं महादेव ॥ ११ ॥**
**महादेव सर्व जना उपदेसी । रामीरामदासीं दृढ भाव ॥ १२ ॥**

(२)

**रामनामें हरु विश्रांती पावला । हें तों समस्तांला श्रुत आहे ॥ ३०/९ ॥**
**श्रुत आहे राम योगाचें मंडण । संसारखंडण महा भये ॥ १० ॥**
**महा भय कैचें रामासी भजतां । हे जाण अन्यथा वाक्य नव्हे ॥ ११ ॥**
**नव्हे सोडवण रामनामेंवीण । रामदास खूण सांगतसे ॥ १२ ॥**

(३)

**राघवाचें नाम राखसील जरी । तुज राखे तरी देवराणा ॥ १३०/१ ॥**
**देवराणा माझे जीवींचें जीवन । आवडीनें खूण सांगतसे ॥ २ ॥**
**सांगतसे खूण माझे अंतरीची । सर्व हि सुखाची सुखमूर्ति ॥ ३ ॥**

**सुखमूर्ति राम सोडूं नको कदा । तुज तो आपदा लागों नेदी ॥ ४ ॥**
**लागों नेदी कष्ट आपुल्या दासासीं । रामीरामदासीं साहाकारी ॥ ५ ॥**

त्रिवार सांगितलें, आणखी कितीदां सांगितलें म्हणजे आपण मानणार? आपल्या अंतरीं पटलेली खूण, आपलें केवळ जीवन, आपले सर्व मनोरथ पूर्ण करणारें साधन, असें हें रामनाम आहे; त्या योगें संसाराचें खंडण होतें, भयाचें निवारण होतें, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका होते, अशी, जणूं, श्रीसमर्थ प्रतिज्ञेवर साक्ष देत आहेत. आपलें म्हणणें केव्हां हि अन्यथा होणार नाहीं, अशी त्यांची प्रतिज्ञा आहे. तेव्हां आतां आपलें काम इतकें च, सदा सर्वदा, प्रातःकाळीं, माध्यान्हकाळीं, सायंकाळीं, सर्व काळीं हृदयांत राम सांठवून अखंड नामस्मरण करावयाचें.

**प्रातःकाळ जाल्या राम आठवावा । हृदईं धरावा क्षण येक ॥ ४६/१ ॥**
**क्षण येक राम हृदईं धरिजे । संसारीं तरिजे हेळामात्रें ॥ २ ॥**
**हेळामात्रें रामनामें होय गती । भाग्यवंत घेती सर्वकाळ ॥ ३ ॥**
**सर्वकाळ राम मानसीं धरावा । वाचे उच्चारावा नामघोष ॥ ४ ॥**

* * * *

**मानवांसीं अंतीं रामनामें गती । सांगे उमापती महादेव ॥ ९ ॥**
**महादेव सांगे जप पार्वतीस । तो चि तो विश्वास रामदासीं ॥ १० ॥**

जो त्यांचा विश्वास तो च आपला विश्वास पाहिजे. आपण त्यांच्यापासून थोडे च विभक्त निघाले आहोंत? पण कांहीं जण विभक्त हि निघालेले असतात. ते स्वतःस ज्ञानी समजतात, आपणांस राम राम घोंकत बसण्याचें काय कारण आहे, म्हणून ते विचारतात, आणि नुसते राम राम करीत बसल्यानें काय होणार आहे, असा उपहास करतात, भोळे भाबडे अज्ञानी असतील त्यांनीं आपला वेळ याप्रमाणें खुशाल वायफळ दवडावा, असें म्हणतात. असली आत्मघातकी विचारसरणी कोठें कोठें आढळते. पण ती चूक आहे. तें अनुभवावांचून बोलणें होय. तो शुद्ध वेडेपणा होय.

**मुक्तपणें नको रामाचा अव्हेरु । करी तो गव्हारु मुक्त नव्हे ॥ १७०/१ ॥**
**मुक्त नव्हे काये स्वयें शूळपाणी । रामनाम वाणी उच्चारितो ॥ २ ॥**
**उच्चारितो शिव तेथें किती जीव । बापुडे मानव देहेधारी ॥ ३ ॥**
**देहेधारी नर धन्य तो साच्चार । वाचे निरंतर रामनाम ॥ ४ ॥**
**रामनाम वाचे रूप अभ्यांतरीं । धन्य तो संसारीं दास म्हणे ॥ ५ ॥**

असा हा संसारांत राहून हि धन्य होण्याचा सुलभ मार्ग आहे. त्या मार्गानें सर्वांनीं जावें. साहजिक जिज्ञासा वाटते,

## (सात) स्वतः श्रीसमर्थांचा साधनमार्ग

कोणता होता ? ही जशी आज आपणांस जिज्ञासा वाटते, तशी त्यांच्या हि वेळीं त्यांच्या तत्कालीन शिष्यांना वाटे. श्रीसमर्थांना अनेक प्रश्न विचारावेत असें त्यांच्या मनांत येई. असे कांहीं प्रश्न आपल्या मनांत कल्पून श्रीसमर्थांनीं ते एका अभंगांत गोविले आहेत व दुसऱ्या एका अभंगांत त्यांचीं उत्तरें दिलीं आहेत. ६३ व्या अभंगांत प्रश्न आहेत व २८ व्यांत त्यांचीं उत्तरें आहेत. बाडांक ५१ त इतक्या अंतरानें व आधीं उत्तरें आणि मग प्रश्न अशा उलट्या क्रमांत हे दोन अभंग कल्याणांच्या हातानें कां लिहिले जावेत, तें माझ्या लक्षांत येत नाहीं. ६३ व्या अभंगांतील च प्रश्नांचीं उत्तरें २८ व्यांत आहेत, हें स्पष्ट आहे. असा च उलटा क्रम आणखी एका ठिकाणीं आढळतो, हें हि येथें ओघानें नमूद केलेलें असावें. ६४ व्या अभंगांत जे पंचवीस प्रश्न केलेले आहेत, बरोबर त्यांचीं च उत्तरें ३९ व्या अभंगांत दिलेलीं आहेत.

येथें आपणांस श्रीसमर्थांचा साधन मार्ग पहावयाचा आहे. या दृष्टीनें ६३ आणि २८ हे दोन प्रश्नोत्तरांचे अभंग पाहिले पाहिजेत.

## प्रश्नांचा ६३ वा अभंग

**संतसंगें तुज काये प्राप्त जालें । सांग पा वहिलें मजपासीं ॥ १ ॥**
**मजपासीं सांगें कोण मंत्र तुज । काये आहे गुज अंतरींचें ॥ २ ॥**
**अंतरींचें गुज काये समाधान । मंत्र जप ध्यान कैसें आहे ॥ ३ ॥**
**कैसें आवाहन कैसें विसर्जन । कैसें पिंडज्ञान सांगें मज ॥ ४ ॥**
**सांगें मज मनें काय उपासनें । मुद्रा तें आसनें सांग आतां ॥ ५ ॥**
**सांग पंचीकर्ण चित्तचतुष्टये । कैसे ते अद्वय जीव शिव ॥ ६ ॥**
**जीव शिव ऐक्य जालें कोणे रीती । सांग मजप्रती अष्टदेहे ॥ ७ ॥**
**अष्टदेहे पिंडब्रह्मांडरचना । तत्त्वविवंचना सांग मज ॥ ८ ॥**
**सांग मज भक्ती कैसी ते विरक्ती । सायोज्यता मुक्ती ते कवण ॥ ९ ॥**
**कोणतें साधन कोणाचें भजन । ऐसे केले प्रश्न रामदासें ॥ १० ॥**

## उत्तरांचा २८ वा अभंग

**संतसंगें मज काये प्राप्त जालें । सांगतों वहिलें तुजपासीं ॥ १ ॥**
**मंत्र हा तारक रामनाम येक । गुज हरादिक चिंतीताती ॥ २ ॥**
**ज्ञानें समाधान सगुणाचें ध्यान । निर्गुण अभिन्न आपण चि ॥ ३ ॥**
**दृश्य आवाहन दृश्य विसर्जन । तेथें पिंडज्ञान आडळेना ॥ ४ ॥**
**उपासना हरी मुद्रा अगोचरी । सिद्धासनावरी समाधान ॥ ५ ॥**
**पंचीकर्ण पिंड ब्रह्मांड आवर्ण । साक्ष तो आपण वेगळा चि ॥ ६ ॥**
**जीव शिव ऐक्य जालें येणें रीती । प्रकृतीचा प्रांतीं द्वैत कैचें ॥ ७ ॥**
**अष्टदेहे स्थूल सुक्षम कारण । चौथा देहे जाण महाकारण ॥ ८ ॥**
**विराट हिरण्य आणि अव्याकृती । आठवा प्रकृतीं मूळमाया ॥ ९ ॥**
**येक तत्त्व जाणा त्याचें नांव भक्ति । जाणावी विरक्ती संतसंगें ॥ १० ॥**
**सायोज्यता मुक्ती ते चि ते अचळ । साधकाचें मूळ गुरुदास्य ॥ ११ ॥**
**गुरुदास्यें चुके संसारयातना । अनुभवी खुणा जाणतील ॥ १२ ॥**
**अनुभवेंवीण जाण सर्व सीण । निरसले प्रश्न दास म्हणे ॥ १३ ॥**

असा हा श्रीसमर्थांचा साधनमार्ग होता. ( १ ) तारक रामनामाचा मंत्र, ( २ ) तें च शंकराचें गुज, ( ३ ) ज्ञानानें समाधान, ( ४ ) सगुणमूर्तीचें ध्यान, ( ५ ) ब्रह्म आणि आपण एक च, ( ६ ) दृश्याचें आवाहन, ( ७ ) त्याचें च विसर्जन, ( ८ ) उपासना हरीची म्हणजे वायुसुताची म्हणजे अंतरात्म्याची, ( ९ ) मुद्रा अगोचरी, ( १० ) आसन सिद्धासन, ( ११ ) पिंडब्रह्मांडाचें आवरण, (१२) त्याहून आपण वेगळे च केवळ साक्षी, ( १३ ) जीव आणि शिव एक च, ( १४ ) अष्टदेहांचा निरास, ( १५ ) तत्त्वज्ञान ही च भक्ति, ( १६ ) विरक्ती, ( १७ ) अचल सायुज्यता मुक्ति, ( १८ ) गुरुदास्य हें सर्व साधनांचें मूळ, ( १९ ) त्यानें संसारयातनांचा अंत आणि ( २० ) अनुभवावांचून मात्र सर्व व्यर्थ, अशा वीस गोष्टी आपण संतांच्या पासून शिकलों, असें श्रीसमर्थ या अभंगांत स्वमुखें सांगत आहेत, हें आपलें परम भाग्य होय. श्रीसमर्थप्रतापांतील तेराव्या समासांत श्रीराम आणि जानकी यांच्या संवादरूपानें जी माहिति गिरिधरांनीं दिलेली आहे, तिला या अभंगांत प्रत्यंतर मिळतें, हें पाहून मला आनंद वाटतो.

## ( आठ ) साराचें हि सार–गुरुमुख

साधनांचा विचार चालला असतां, या च विषयावरील एक मोठा थोरला ५१ कडव्यांचा अति महत्त्वाचा अभंग सबंध द्यावा कीं काय, असा प्रश्न माझ्या मनांत सारखा घोळत होता. त्या अभंगाच्या पहिल्या ५ कडव्यांत, श्रीसमर्थांनीं तुमच्या आमच्या भूमिकेवरून – अर्थात् आपल्या-साठीं – प्रश्न विचारला आहे व पुढच्या ४६ कडव्यांत त्याचें उत्तर दिलें आहे.

**संसार करितां होय सायोज्यता। ऐसें कांहीं आतां सांगा स्वामी ॥ ४/१ ॥**
**सांगा स्वामी कोण स्थिति जनकाची। राज्य करितां चि मुक्त कैसा ॥ २ ॥**
**मुक्त कैसा होता देहींच विदेही। कैसा लिप्त नाहीं करूनियां ॥ ३ ॥**
**करूनियां सर्व आपण वेगळा। सांगा ते चि कळा आम्हांलागीं ॥ ४ ॥**
**आम्हांलागीं सांगा त्याचें समाधान। रामदास खूण पुसतसे ॥ ५ ॥**

असा हा प्रश्न, केवळ आपली बाजू घेऊन, पुढें मांडण्यांत आला आहे. प्रश्न सोपा आहे, पण उत्तर कठीण आणि त्या मानानें समजण्यास जरा अवघड आहे. पण शांतपणें चिंतन करीत वाचल्यास कठीण तें च सोपें वाटणार आहे. माझ्यासकट सर्वांना मी विनंति करीन कीं, प्रत्यय येई तों प्रत्येकानें या अभंगाचें मनन करावें. या अभंगाच्या रूपानें आपणांस श्रीसमर्थांच्या मुखानें ज्ञानोपदेश होत आहे. तो वाचीत असतां श्रीसमर्थ सांगत आहेत आणि आपण ऐकत आहोंत, अशी भावना ठेवावी. सबंध अभंग देण्याचा मोह आवरून सारांश सांगतों, पण वाचकांस प्रार्थना कीं, आपण तो मुळावरून वाचण्याची कृपा करावी.

जनकाप्रमाणें विदेहस्थिति प्राप्त होण्याला **अहं ब्रह्मास्मि** हें जें स्वामीचें वचन तें विश्वासानें मानलें पाहिजे आणि तसें वागलें पाहिजे ( ६–१३ ). त्या वचनावर विश्वास बसला म्हणजे मनाचें उन्मन होऊन समाधान प्राप्त होईल ( १४ – १६ ). त्या उन्मनी अवस्थेंत द्वैत लयाला जातें, जनकानें हें च सांगितलें– संगं त्यक्त्वा सुखी भव ॥ तेथें मग शुक हि नाहीं आणि जनक हि नाहीं ( १७–२३ ). याप्रमाणें वेदवचन, स्वामीचें वचन आणि आत्मप्रचीति यांचें ऐक्य झालें पाहिजे ( २४–२५ ). एक ब्रह्म काय तें सत्य आहे, बाकी सर्व स्वप्नांतल्या जागृतीप्रमाणें भ्रम, मिथ्या आहे, देह

म्हणजे आपण नव्हे, तो प्रकृतीच्या ताब्यांतला आहे, प्रारब्धानुसार त्याचें काय व्हावयाचें असेल तें होईल. त्याचा अभिलाष धरूं नये ( २६–३३ ). याप्रमाणें देहाचा निरास व्हावा, संदेह मावळावा, वृत्ति शून्य व्हाव्या, हीं च संतलक्षणें होत, योगियांचें गुज तें हें च,

**आकाशमार्गी गुप्त पंथ । जाणती योगिये समर्थ ॥**

असें जें ग्रन्थराज दासबोधांत म्हटलें आहे, तो

## श्रीसमर्थांचा गुप्त पंथ

तो हा च, तो या ठिकाणीं आपणांस अनायासें शब्दानें समजला, अनुभवानें नाहीं समजला, योगी व्हावें म्हणजे समजेल, अनुभव येईल ( ३४–३७ ). अनुभव येण्यास कर्म – उपासना – ज्ञान या वेदप्रणीत मार्गानें च गेलें पाहिजे (३८), वेद आणि शास्त्रें फार आहेत, तीं आपल्याच्यानें जन्मांत पाहून होणार नाहींत, आपण साधूची संगती धरावी, म्हणजे आपल्या सर्व शंका दूर होऊन आपणांस ब्रह्मसाक्षात्कार होईल ( ३९–४७ ). तात्पर्य, याला मुख्य गुरुमुख पाहिजे ( ४८ ).

**गुरुमुखें सत्य मानावें अंतरीं । वेगीं सोये धरीं आलया रे ॥ ४९ ॥**
**आलया रे संग साधूचा धरावा । संसार तरावा साधुसंगें ॥ ५० ॥**
**साधुसंगें ज्ञान रामदासीं जालें । शरीर लागलें भक्तिमार्गें ॥ ५१ ॥**

श्रीसमर्थांना श्रीरामाचें गुरुमुख लाभलें ! आम्हीं कोणाच्या तोंडाकडे पहावें ? आपण आशेनें, आतुरतेनें, निष्ठेनें, अनन्य शरणागत होऊन श्रीसमर्थांच्या मुखाकडे पाहूं, त्यांची करुणा भाकूं, त्यांचा धांवा करूं; त्यांना आळवूं ! पावतील, पावतील, पावतील ! ! !

## ( नऊ ) धांवा, पावा, प्रेमपान्हा द्यावा

### ( श्री ) ( ११९ )

**तुजविण देवा मज कोणिह नाहीं । माझी चिंता कांहीं असों द्यावी ॥ १ ॥**
**वैराग्यें कनिष्ठ अभावें वरिष्ठ । माझे मनीं नष्ट संदेह तो ॥ २ ॥**
**विवेकें सांडीलें ज्ञानें वोसंडीलें । चित्त हें लागलें तुझा पाईं ॥ ३ ॥**

विद्या ना वैभव नेणे हावभाव । परी माझा भाव तुझा पाईं ॥ ४ ॥
तुझें नाम वाचें उच्चारीत असें । अंतरीं विश्वासें धरीयेलें ॥ ५ ॥
रामदास म्हणे मी तुझा अज्ञान । माझें समाधान करीं देवा ॥ ६ ॥

(ग) (३०७)

पतितपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ १ ॥
मन हें चंचळ न राहे निश्चळ । निरूपणीं पळ स्थिरावेना ॥ २ ॥
सांडुनियां ध्यान विषयचिंतन । करितसे मन आवरेना ॥ ३ ॥
रामदास म्हणे कथानिरूपणें । मनाचीं लक्षणें जैसीं तैसीं ॥ ४ ॥

(३०८)

पतितपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ १ ॥
वैराग्याचा लेश नाहीं माझा आंगीं । बोलतसे जगीं शब्दज्ञान ॥ २ ॥
देहे हें कारणीं लावावें नावडे । आळस आवडे सर्व काळ ॥ ३ ॥
रामदास म्हणे लाज तुझी तुज । कोण पुसे मज अनाथासी ॥ ४ ॥

(३०९)

पतितपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ १ ॥
भक्तीची आवडी नाहीं निरंतर । कोरडें अंतर भावेंविण ॥ २ ॥
माझें मीतूंपण गेलें नाहीं देवा । काये करूं ठेवा संचिताचा ॥ ३ ॥
रामदास म्हणे पतिताचें उणें । पतितपावनें सांभाळावें ॥ ४ ॥

(३१०)

पतितपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ १ ॥
मुखें बोले ज्ञान पोटीं अभिमान । पाहे परन्युन्य सर्वकाळ ॥ २ ॥
दृढ देहेबुद्धी तेणें नाहीं शुद्धी । जाहालों मी क्रोधी अनावर ॥ ३ ॥
रामदास म्हणे ऐसा मी अज्ञान । सर्व ब्रह्मज्ञान बोलोनीयां ॥ ४ ॥

(३११)

पतितपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ १ ॥
मिथ्या शब्दज्ञानें तुज अंतरलों । संदेहीं पडलों मीपणाचे ॥ २ ॥
सदा खळखळ निर्गुणाची घडे । सगुण नावडे ज्ञानगर्वें ॥ ३ ॥
रामदास म्हणे ऐसा मी पतित । मीपणें अनंत पाहों जातां ॥ ४ ॥

## ( १ ) षड्रिपु

हीं पांच काव्यें मिळून एक गट श्रीसमर्थांनीं च मानला होता, असें दिसतें. नाहीं पेक्षां, श्री कल्याणांनीं बाडांक ५१ मध्यें पांचव्या काव्याच्या शेवटीं पांच हि काव्यें मिळून होणारी श्लोकसंख्या दिली नसती. तेव्हां या पांच हि काव्यांचा आपण एका च सदरांत क्रमशः विचार करूं.

षड्रिपु म्हणजे काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर, असे हे सहा रिपु होत, असें ग्रन्थांतरीं आढळतें व सर्व जण तसें च मानीत आले आहेत. पण श्रीसमर्थांच्या षड्रिपूंत एक मोठा फरक आहे. काम, क्रोध आणि मद, मत्सर या चौघांना त्यांच्या षड्रिपूंत स्थान आहे, पण लोभ आणि मोह यांच्या ऐवजीं दंभ आणि प्रपंच, असे दोन, पांचवा आणि सहावा रिपु होत, असें त्यांनीं मानलें आहे. लोभाचा समावेश कामांत होतो व मोहाचें व्यक्त स्वरूप म्हणजे च प्रपंच होय, असें मानतां येईल. श्रीसमर्थांच्या स्वतःच्या तत्त्वज्ञानाला आणि आचरणाला अनुसरून त्यांचें वर्गीकरण आहे, असें मला वाटतें. बायकापोरांचा प्रपंच सोडा, असें सांगून कोणी प्रपंच सोडणार नाहीं, हा विचार मनांत आणून त्यांनीं प्रपंचाची तरफदारी अन्यत्र किती हि केलेली असली, तरी प्रपंचाकडे पाहण्याची स्वतः त्यांची दृष्टि ही अशी होती. बायकापोरांच्या प्रपंचाला ते शत्रु समजत. प्रपंचाविषयींचीं त्यांचीं अनुकूल, प्रतिकूल, संमतिदर्शक, विरोधात्मक सर्व तऱ्हेचीं वचनें अवलोकन करून मला असें दिसतें कीं, लोकांचा स्वभाव आणि मगदूर पाहून प्रपंच करण्याला त्यांनीं अनुमति दिलेली आहे, परंतु तो त्यांच्या पोटांतला भाव नव्हे. त्यांची 'पोटस्थ' इच्छा एकवीससमासीवरून पुढें दिसून येणार च आहे, पण त्या हि पेक्षां येथें त्यांनीं प्रपंचाची गणना षड्रिपूंत उघड करून आपलें मनोगत स्पष्ट दर्शविलें आहे.

सामान्य लोकांकडून हे षड्रिपु जिंकले जाणें अशक्य आहे, हें जाणून त्यांनीं कांहीं मर्यादा घालून तुम्हां आम्हांला कांहीं सवलती दिल्या आहेत.

**( १ ) कामवेड जडे ज्याला । तो प्राणी आत्मघातकी ॥ $\frac{\text{काम}}{४}$ ॥**

या कामाच्या तावडींत सांपडून कित्येक जण

**बाटले भ्रष्टले मेले । बुडाले कामवासने ॥ काम/७ ॥**

असा प्रकार तेव्हां घडत होता, आतां हि घडत आहे आणि नेहमीं च घडत राहणार ! या कामाच्या पायीं

**रूपहाणी शक्तिहाणी । द्रव्यहाणी परोपरीं ।**
**यातिहाणी कुळहाणी । सर्व हाणी च होतसे ॥ काम/९ ॥**

पण म्हणून कामाला तुडविण्याची किंवा जाळून भस्म करण्याची शक्ति सर्वांत कोठून असणार ? म्हणून श्रीसमर्थांनीं मर्यादा घातली कीं,

**विधीनें विषयो घ्यावा । अविधी नस्तां बरें ।**
**आश्रमीं न्यायनीतीनें । प्रपंच करणें सुखें ॥ काम/१२ ॥**

कामापासून च प्रपंचाचा उद्भव होतो, हा हि भावार्थ या अष्टाक्षरींतून निघत आहे. काम आणि प्रपंच या दोहोंपुरती श्रीसमर्थांनीं अशी मर्यादित सवलत दिली आहे. तशी इतर चार रिपूंच्या बाबतींत दिलेली नाहीं.

(२) **क्रोध** आला म्हणजे मनुष्य कसा वेडा होतो, त्याचा विवेक कसा सुटतो, त्याला न्याय कसा सुचेनासा होतो, त्याची शुद्धि कशी जाते आणि शरीर अनावर होऊन कशी दुर्दशा होते, याचें हुबेहूब वर्णन करून

**क्रोध चांडाळ जाणिजे ॥ क्रोध/१३ ॥**

असे त्याच्याविषयीं कठोर उद्गार श्रीसमर्थांच्या मुखांतून निघाले आहेत. शेवटीं उपदेश करितात

**भल्यांनीं कोप सांडावा । शांतीनें असतां बरें ।**
**क्षुल्लकें कोप पाळावा । भल्यांचें काम तों नव्हे ॥ क्रोध/१४ ॥**

(३) **मद** म्हणजे उन्मत्तपणा, गर्व. तो कशाचा हि असो, देहाचा, शक्तीचा, द्रव्याचा, विद्येचा, भाग्याचा, इत्यादि कशाचा हि असला, तरी तो वाईट च. याचे नमुने जगांत सर्वत्र पहावयास सांपडतात.

**मदानें भुलला प्राणी । विचारें उमजे चि ना ।**
**पराचें सत्य मानेना । विवरेना कदापि हि ॥ मद/६ ॥**

वेद, शास्त्र, न्याय, नीति, संत, साधु, फार काय, प्रत्यक्ष ब्रह्मदेव या सर्वांना तुच्छ लेखून आपलें तें च बरोबर, इतक्या उच्च कोटीला मद पोंचला म्हणजे पापाची परमावधि झाली, असें समजावें. वास्तविक पाहतां, गर्व करण्यासारखें काय आहे? कशाचा गर्व वाहावा?

**मरतां मद काशाचा । कोण पुसे तया मदा ।**
**पूर्वी च कळला नाहीं । तऱ्हेनें जन्म नासिला ॥ मद/१४ ॥**
**देहे गेलें बळ गेलें । द्रव्य गेलें येकेकडे ।**
**बंड गेलें थोंब (स्तोम) गेलें । येकला जातसे खळु ॥ १५ ॥**

आला तसा हात झाडून गेला, मद येथें च राहिला!

(४) **मत्सर** तर मदाहून हि हानिकारक. मदांध मनुष्य आपल्या च अहंकारांत चूर होऊन असतो, तर मत्सरी मनुष्य दुसऱ्याच्या निंदेला प्रवृत्त होत असतो.

**जें कांहीं आपणा नाहीं । तें सर्व उडवीतसे ॥ मद/११ ॥**

याचीं श्रीसमर्थांनीं दिलेलीं अनेक उदाहरणें लोकपरीक्षा करण्याची त्यांची हातोटी दर्शवितात.

**आपणु करंटा आहे । समर्था निंदितो सदा ॥ ३ ॥**
**आपणु टोणपा आहे । सर्वज्ञा न मनी कदा ।**
**आपणु तामसी आहे । पुण्यवंतां पडे चि ना ॥ ४ ॥**
**आपणु कुकर्मी प्राणी । सत्कर्मासी उछेदितो ।**
**आपणु चोरटा आहे । सकळांसी चोरटे करी ॥ ५ ॥**
**आपणु भ्रष्टला आहे । भल्यांला भ्रष्ट भावितो ।**
**आपणु घातकी मोठा । पराला घातकी म्हणे ॥ ६ ॥**
**पोटींचा कपटी मोठा । जनाला कपटी म्हणे ।**
**आपणा भक्ति ठाकेना । हरिभक्तां उछेदितो ॥ ७ ॥**
**आपणु नीच कुळींचा । कुळवंत मना न ये ।**
**आपणु ठाईंचा लंडी । रणशूरांसी हांसतो ॥ ८ ॥**
**आपणु भ्याड ठाईंचा । धारिष्टां कर्कशु म्हणे ।**
**आपणु वोंगळु आहे । निर्मळां कर्मठु म्हणे ॥ ९ ॥**
**आपणु लालची मोठा । वैराग्याची उडावणी ।**

तात्पर्य, स्वतःला करवेना आणि दुसऱ्याचें देखवेना

**ऐसा तो मत्सरी नरु ॥**

त्या मत्सराच्या पायीं व्यक्तीचें आणि समाजाचें भाग्यवैभव नष्ट होऊन इहपरलोकीं निकृष्टावस्था प्राप्त होते. श्रीसमर्थांच्या या शिकवणीचा, व्यक्तीप्रमाणें समाजानें हि, आपल्या पडत्या काळांत शांतपणें विचार करून बोध घेतला पाहिजे.

( ५ ) **दंभ** म्हणजे डौल, नमता मोटेपणा, ढोंग. हा हि मोठा शत्रु होय. तत्कालीन समाजाकडे पाहून हा एक नवीन च प्रबळ शत्रु श्रीसमर्थांना सुचलेला दिसतो. ज्याच्या अंगीं गुण नसतो, त्याला च दंभ करावासा वाटतो. खरें साधुत्व, खरें वैराग्य, खरी निस्पृहता आंगीं नसते म्हणून सोंगाची संपादणी करावी लागते, एरव्हीं खऱ्याला ढोंगाची गरज च काय ?

श्रीसमर्थांच्या मुखांतून आत्मचरित्र बाहेर पडत आहे :

**ज्ञानियां दंभ बाधीना । येकायेकी खडाखडी ।**
**उठोनि चालिला योगी । दंभ तो कुतरें किती ॥** ७ **॥**

**वैराग्य पाहिजे आंगीं । उदास फिरती लीळा ।**
**दंभ तो उडाला तेथें । लोलंगता चि खुंटली ॥ ८ ॥**

**निस्पृहा दंभ बाधीना । निस्पृह पाहिजे बरा ।**
**अंतरें अंतरा भेदी । तेथें दंभ चि नाडळे ॥ ९ ॥**

दांभिकपणा ओळखण्याची श्रीसमर्थांनीं एक कसोटी सांगितलेली दिसते. चार दांभिक माणसें एके ठिकाणीं जमून कोणतें हि कार्य करूं शकत नाहींत. ते एके जागीं आले कीं, त्यांच्यांत भांडणें सुरू होतात. ते एकमेकांचे दोष काढूं लागले, म्हणजे समजावें, हे दांभिक आहेत, त्यांत एक हि खरा नाहीं. दांभिकांचें कधीं एकमेकांशीं पटावयाचें नाहीं.

हा हि शत्रु वाईट च. ज्या विचारानें मद जिंकावयाचा, त्या च विचारानें दंभाचें हि निर्दलन केलें पाहिजे.

**दंभ तो चोर जाणावा । लालची करिती मुढें ।**
**शेवटीं सर्व हि जातें । प्रेत होतें भूमंडळीं ॥ दंभ/१० ॥**

**मढ्याला कासया व्हावें । जाणावें पहिलें चि हि ।**
**लावावें कारणीं देहो । दंभ कैचा उरेल तो ॥ ११ ॥**

**अखंड आठवावें रे । मरणाचें ध्यान अंतरीं ।**
**तेव्हां चि वैराग्य उठे । दंभ लोटे परोपरीं ॥ १२ ॥**

लोटे म्हणजे दूर सरतो, दूर होतो.

(६) **प्रपंच** हा शेवटचा सहावा वैरी होय. त्याचा प्रताप सर्व प्रपंची जन जाणत च आहेत. हा वैरी मुख्यतः आपली आणि देवाची भेट होऊं देत नाहीं. अहोरात्र तो आपला पिच्छा सोडीत नसल्यामुळें

**देव तो राहिला दुरी । ऐसा वैरी प्रपंच हा ॥ प्र/३ ॥**

जन्मभर तो आपल्यापासून दूर होत नसल्यामुळें देवाला आपल्या जवळ येण्याची, आपल्या हृदयांतरीं प्रकट होण्याची संधि च मिळत नाहीं. बाळपणीं आईचा वियोग पळभर सहन व्हावयाचा नाहीं, पोरपणीं पोरांत खेळण्यापलीकडे कांहीं सुचावयाचें नाहीं, तारुण्यांत

**नोवरी आवडे जीवीं । नटावेंसें मनीं उठे ॥ प्र/७ ॥**

प्रौढपणांत पोरांबाळांपुढें उसंत मिळत नाहीं, खर्च वाढत जातो, ऋण काढावें लागतें, तें वाढत जाऊन फिटेनासें होतें, देशांतराला जाण्याचा प्रसंग येतो, तरी बायकापोरांचें पोट भरत नाहीं, तें नाहीं च, मनुष्य खंगूं लागतो, वृद्धपण येतें आणि अखेरीस

**कष्टला शेवटीं मेला । गेला प्रपंच हातींचा ।**
**घातला मागुता जन्मा । ऐसा वैरी प्रपंच हा ॥ प्र/१२ ॥**

तेव्हां, श्रीसमर्थ विचारतात, याप्रमाणें भोंवतालच्यांचीं चरित्रें पाहून शहाण्यानें आधीं च उमजूं नये काय ?

**आधीं च सर्व जाणावें । काये येतें समागमें ।**
**निर्वाणीं अंतींचा देवो । कोण्ही येकें चुकों नये ॥ प्र/१४ ॥**

**घर गांव ठाव माझा । शेत वाडे मळे गुरें ।**
**कन्या पुत्र वधु माझी । सर्व सांडुनि चालिला ॥ १५ ॥**
**माझें माझें म्हणे वेडा । स्वार्थबुद्धि बहुतसी ।**
**सर्व सांडुनि गेला रे । येकायेकी उठोनियां ॥ १६ ॥**
**प्रपंचें भुलला प्राणी । वेर्थ आयुष्य वेचलें ।**
**देव ना धर्म ना कांहीं । ऐसा हा साहवा रिपु ॥ १७ ॥**

हें सर्व आधीं च ओळखून जो विवाहाच्या पाशांतून निसटतो, तो च खरा विवेकी ! श्रीसमर्थांच्या मनांतून आत्मचरित्र सांगण्याचें नसतें, पण

**आधीं केलें मग सांगितलें ।**

हा त्यांचा बाणा असल्यामुळें ते जें सांगतात, त्यांत त्यांचें चरित्र येऊन जातें.

**आधींच जाणिजे सर्वै । विवेकी त्यासी बोलिजे ।**
**प्रपंच लाथळावा रे । वैरी हा सोडिला कसा ॥ प्र./२१ ॥**

हा उपदेश करण्याची व प्रश्न विचारण्याची, श्रीसमर्थांशिवाय दुसऱ्या कोणाची योग्यता आहे ? खरें आहे, पण महाराज, हें सर्वांना कसें साधावें ?

**सर्वांस योग साधेना ।**

हा योग म्हणजे प्रपंचाला लाथ हाणून ऐन लग्नसमारंभांतून निसटून जाण्याचा योग, असें च मी समजतों,

**सर्वांस योग साधेना । पुण्य उदंड पाहिजे ।**
**सहस्रामाजी तो येकु । ज्ञान वैराग्य नेटकें ॥ प्र./२२ ॥**

आपण म्हणा, सहस्रामाजी तो येकु, पण, पुढचें आम्ही सांगूं शकत नाहीं, आज मात्र आम्ही म्हणूं शकतों कीं,

**त्रिशतकांत तो येकु । जाहला सर्व जाणती ॥**

याप्रमाणें हें षड्रिपु काव्य लहानसें च, पण वारंवार वाचून बोध घेण्यासारखें आहे. काव्याचा शेवट करतांना त्यांनीं जी अष्टाक्षरी योजिली आहे, तींत हि आम्हांस त्यांचें च चरित्र भासतें.

**षड्रिपु जिंकिले जेणें । तो चि ज्ञानी महा भला ।**
**दीक्षेनें उद्धरी लोकां । वैरागी तो उदासीनु ॥ प्र./२३ ॥**

दुसऱ्या कोणाचें हें चरित्र म्हणावें ?

---

## ( २ ) पंचीकरणयोग

या काव्यांत पंचीकरण आहे. श्रीसमर्थांनीं आपल्या निरनिराळ्या काव्यांत आणि स्फुट कवितेंत अनेकदां पंचीकरण सांगितलें आहे. तें पूर्वीं आलें आहे आणि पुढें हि येईल. प्रस्तुतचें लघु प्रकरण केवळ पंचीकरणाचें आहे. त्याचे पांच योग असून प्रत्येक योगांत वीस अष्टाक्षरी श्लोक आहेत. बाडांक ५१ मध्यें या योगांना नांवें दिलेलीं नाहींत, पण बाडांक ५०३ आणि ९३५ यांत त्यांचीं नांवें आढळतात तीं अनुक्रमें अंतर्कळायोग, ज्ञानयोग, तत्त्वयोग, प्रकृतियोग व स्वरूपनिर्णययोग अशीं आहेत. पांचव्या योगांत ब्रह्मनिरूपण आहे, तें आपण आधीं पाहूं व ब्रह्मापासून उतरत उतरत पिंडापर्यंत म्हणजे आपल्यापर्यंत येऊन पोंचूं. पांचव्या योगांत जसें ब्रह्मनिरूपण आहे, त्या च तऱ्हेचें निरूपण, या प्रकरणाच्या पुढचें च जें प्रकरण – चतुर्थमान – त्याच्या दुसऱ्या मानांत आहे. हृदयग्रन्थाचा शेवट गांठण्याच्या आंत निर्गुण ब्रह्माची आणि आपली पूर्ण गांठ पडली पाहिजे. ब्रह्म दिसत नाहीं, मळत नाहीं, भिजत नाहीं, जळत नाहीं, उडत नाहीं, तें थंड नाहीं उष्ण नाहीं, टणक नाहीं कोमल नाहीं, त्याला सुगंध वा दुर्गंध कांहीं नाहीं, तें नित्य, परिपूर्ण, स्थिर, घनदाट असें आहे. चमत्कार असा आहे, तें सर्वकाळ आपल्या अगदीं निकट असून त्याचा आपणांस साक्षात्कार होत नाहीं. साऱ्या विश्वांत तें कोंदाटलें आहे व विश्व त्यांत बुडालें आहे. तें खालीं, वर, आंत, बाहेर, चहूंकडे आहे. आणि भाग्याची गोष्ट अशी, असें जें ब्रह्मस्वरूप आहे तें दुसरें तिसरें कांहीं नसून आपण च आहोंत ! पण हें कळत नाहीं, अनुभवाला येत नाहीं, या कर्माला काय म्हणावें ?

हें कळावें कसें ? श्रवणमनननिदिध्यास यापरतें साधन नाहीं. श्रवणमनननिदिध्यासाच्या मार्गानें जाऊन च आत्मनिवेदन होणार आहे. आत्मनिवेदन आणि ब्रह्मसाक्षात्कार एक च. त्या पायरीला आपण जाऊन पोंचलों म्हणजे मनाच्या सर्व वृत्ति मावळतील, ज्ञानाचें विज्ञान होईल, तेथें बोलणें खुंटेल, देहाचें निरसन होईल. कार्य कर्ता कारण, दृश्य द्रष्टा दर्शन, ध्येय ध्याता ध्यान, ज्ञेय ज्ञाता ज्ञान या सर्व त्रिपुटी तेथें नष्ट होतील. तेथें येकंकार आहे, याच्या अलीकडे नाहीं ! अशी ही वृत्तिशून्य,

अभेद भक्तीची अवस्था आहे. अहं ब्रह्मास्मि या महावाक्याचा हा असा अर्थ आहे. आत्मनिवेदनी क्रिया ती ही. असें श्रीसमर्थ सांगत आहेत आणि मी म्हणतों, आपल्या श्रीसमर्थांचें स्वरूप तें हें च! त्यांना

**आगमीं निगमीं शोधा। बुद्धी बोधा परोपरीं।**
**जाणता भक्त तो देवो। आत्मनिवेदनी क्रिया॥** २० **॥**

याप्रमाणें शब्दांनीं सांगतां न येण्यासारखें जें निःशब्द ब्रह्म तें कळतें तरी कोणाला?

**तें ब्रह्म जाणती भले।**

असें या प्रश्नाचें उत्तर चतुर्थमानाच्या दुसऱ्या मानांत दिलें आहे; असो.

अशा त्या निश्चळ निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणीं जें पहिलें स्फुरण झालें, जें पहिलें स्मरण चेतलें, जशी कांहीं वायूची बारीक झुळुक, जाणीवेचा सूक्ष्मतर तरंग, त्याला च मूळमाया म्हणतात, जगज्जोती म्हणतात, ईश्वर म्हणतात. शारदा ती ती च. सर्व कांहीं ती च. ती अनेक नांवांनीं संबोधिली जाते. हा पुढचा सारा पसारा, तिच्यापासून. ब्रह्म कांहीं करीत नाहीं.

**सर्व कर्तव्यता तेथें॥** १३ **॥**

तेथें म्हणजे मायेच्या ठिकाणीं

**मुळीं ते येकली जाली। ईश्वरु बोलिजे तिये।**
**देवत्रये जयेचेनि। पुढें ब्रह्मांड जाहलें॥** १४ **॥**

आपल्या सर्वांचें पालनपोषण ती करते. पण आपण हें जाणत नाहीं, त्याला काय करावें? द्रव्य जमिनींत पुरलेलें असावें आणि तें ठाऊक नसल्यामुळें खायाला काय मिळेल म्हणून एकाद्या दरिद्री माणसानें त्या च भूमीवर चिंता करीत बसावें, तशी कांहींशी आपली अवस्था झाली आहे.

**पोटानें गांजिले प्राणी। मृत्यानें मारिले सदा।**
**नेणती हित तें कैसें। कांहीं केल्यां कळे चि ना॥** १९ **॥**

**नेणणें आडवें केलें। ज्ञान पैलाड राहिलें।**
**व्यासंगें भुलले प्राणी। बुद्धियोग कळे चि ना॥ २०॥**

नेणणें आडवें केलें! म्हणजे एका बाजूस आपण आहोंत, पलीकडच्या बाजूस ज्ञानदेव आहेत आणि दोहोंमध्यें अज्ञानाचा पडदा आहे. त्यामुळें देवाची आणि आपली गांठ पडत नाहीं. यासाठीं

**सर्व हि सांडणें मागें । आधीं देवासि धुंडणें ।**
**धुंडितां धुंडितां देवो । सत्संगें सांपडे जनीं ॥ २/१ ॥**

केव्हां हि निराश न होतां सत्संगतींत अंतरींच्या देवाचा शोध घ्यावा, म्हणजे केव्हां तरी त्याचें दर्शन होईल, असें श्रीसमर्थांचें आश्वासन आहे. परंतु याप्रमाणें न वागतां, बहिर्मुख होऊन केवळ लौकिक मार्गाला च लागूं, तर देव राहिला एकीकडे आणि आपण चाललों भलती च कडे, असें होण्याचा फार संभव असतो. लौकिक साधनें नाहींत किंवा त्याज्य आहेत, असें म्हणतां येत नाहीं, पण त्यांत च गुरफटून जाण्याचा संभव फार! कदाचित् हेतु साधावयाचा असला, तरी कालावधि फार लागणार. कर्माची दगदग नको असेल, कामनेसाठीं उपासना करावयाची नसेल, तर सत्संगतींत

**श्रवणभक्तीच्या योगें । मुक्ति सायोज्य पाविजे ॥ २/१२ ॥**

ज्ञान आणि उपासना दोन नाहींत, दोन्ही एक च. दोन्ही मनानें च साधणार. मनानें केलेला सत्य संकल्प तो च विष्णु. तें च ज्ञान आणि ती च उपासना.

**ज्ञानउपासनेमध्यें । भेद तो पाहातां नसे ।**
**मन चि जाणिजे ज्ञान । मनरूप उपासना ॥ २/१४ ॥**
**सत्य संकल्प तो विष्णु । ते चि ज्ञान उपासना ।**
**सर्वज्ञ बोलिजे देव । ज्ञान सर्वज्ञ होय कीं ॥ १५ ॥**
**ज्ञानें चि चालते सृष्टी । ज्ञान हें देव बोलिजे ।**
**ज्ञानें चि पाविजे सर्वै । ज्ञानरूप हरी पाहा ॥ १६ ॥**
**हरी तो अंतरीं नांदे । अंतःकर्ण चि जाणिजे ।**
**तो देव सकळां पाळी । आतां प्रत्यक्ष रोकडा ॥ १७ ॥**

याप्रमाणें देव जवळ असतां बाहेर कोठें धुंडावयास जातां आणि वृथा शीण पावतां? तुम्हांला देवदर्शन घ्यावयाचें आहे कां नुसतें च बाहेरून देवालय पाहून समाधान मानावयाचें आहे?

**गृहें चि पाहातां वेथें । गृहस्वामीस पाहाणें ।**
**देवालय पूजितां खोटें । आधीं देवासि पाहणें ॥ २/२० ॥**

त्या देवाला ओळखल्यावांचून जन्ममरणाचे फेरे चुकणार नाहींत. पुनरुक्तीचा दोष पतकरून श्रीसमर्थ सांगतात, सत्संग धरावा, पंचीकरण समजून घ्यावें, चार च कां, आठ हि देह निरसावे, महावाक्य प्रत्ययास आणावें आणि निवांत होऊन बसावें, मग व्याप करा कीं करूं नका. असें म्हणून श्रीसमर्थ पंचीकरणाची प्रस्तावना करितात :

**चळेना ढळेना ब्रह्म**
|
(त्या) **निश्चळीं जाहाली माया । सत्य संकल्प जाणिजे ।**
**ईश्वरु बोलिजे त्याला । सर्वज्ञ अष्टधा मुळीं ॥ ३/९ ॥**

अष्टधा = पंचभूतें + त्रिगुण

सारा खेळ हिचा आहे, ब्रह्म जसेंच्या तसें निर्विकारी.

(अशी ही) **कुमारी मूळमाया ते ।**
|
**गर्भिणी गुणक्षोभिणी ।**
|
**सत्त्व रज तमोगुण । तीजपासाव जाहाले ॥ १० ॥**
|
**आकाश बोलिले कवि । परंतु तो अंतरात्मा ।**

इतर त्याला आकाश म्हणतात, परंतु श्रीसमर्थ त्याला अंतरात्मा म्हणतात आणि आपल्या म्हणण्याचें समर्थन करितात :

**चळतो तो अंतरात्मा । आकाश न चळे कदा ॥ ११ ॥**
|
**वायु**
|
**तेज**
|
**आप**
|
**पृथ्वी**

पृथ्वी, आप, तेज, वायु, अंतरात्मा हीं पंचभूतें जशीं ब्रह्मांडांत आहेत, तशीं तीं पिंडांत हि आहेत. पिंडीं जसे स्थूल, सूक्ष्म, कारण आणि महाकारण हे चार देह आहेत, तसे ब्रह्मांडांत हि विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत आणि मूळप्रकृति या नांवांनीं चार देह कल्पिलेले आहेत. उभयतांत साम्य हि दाखविण्यांत येत असतें.

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश या पंचभूतांचा स्थूल देह बनलेला आहे.

| पिंडांतील स्थूल देह | | ब्रह्मांडांतील विराट देह |
|---|---|---|
| (१) काम, क्रोध, शोक, मोह, भय— | | (१) अंतरात्मा किंवा लोकमताप्रमाणें आकाश |
| (२) चळण, वळण, प्रसारण, निरोधन, आकुंचन— | | (२) वायु |
| (३) क्षुधा, तृषा, निद्रा, आलस्य, मैथुन— | | (३) तेज |
| (४) | आप | |
| शुक्लीत | .... .... | मेघ |
| श्रोणीत | .... .... | भूमिगर्भींचें |
| लाळ | .... .... | पाझर |
| मूत्र | .... .... | क्षारसिंधु |
| स्वेद | .... .... | द्रव |
| (५) | पृथ्वी | |
| अस्थि | .... .... | धोंडे |
| मांस | .... .... | माती |
| त्वचा | .... .... | वायु |
| नाडी | ... ... | नदी |
| रोम | ... .... | द्रुमलता |

याचप्रमाणें पिंडांतील सूक्ष्मदेहाची ब्रह्मांडांतील हिरण्यगर्भाशीं तुलना केलेली आढळते. अंतःकरणपंचक, प्राणपंचक, विषयपंचक, ज्ञानेंद्रियपंचक, आणि कर्मेंद्रियपंचक अशा पांच पंचकांचा सूक्ष्मदेह बनलेला असतो.

| पिंडांतील सूक्ष्मदेह | ब्रह्मांडांतील हिरण्यगर्भ |
|---|---|

(१) **अंतःकरणपंचक**

| | |
|---|---|
| अंतःकरण .... .... .... | विष्णु |
| मन .... .... .... | चंद्रमा |
| बुद्धि .... .... .... | विरंची |
| चित्त .... .... .... | नारायण |
| अहंकार .... .... .... | रुद्र |

(२) **प्राणपंचक**

| | |
|---|---|
| प्राण<br>अपान<br>व्यान<br>उदान<br>समान | वायु |

(३) **विषयपंचक**

| | |
|---|---|
| शब्द<br>स्पर्श<br>रूप<br>रस<br>गंध | ब्रह्मांडांत हि ते च, फरक इतका च कीं ब्रह्मांडांत ते अस्फुट (तन्मात्रा,) असतात, ते पिंडांत स्फुट झालेले असतात. |

(४) **ज्ञानेंद्रियपंचक**

| | |
|---|---|
| श्रोत्र .... .... .... | दिशा |
| त्वचा .... .... .... | वायु |
| चक्षु .... .... .... | सूर्य |
| जिव्हा .... .... .... | जल (वरुण) |
| नासिक .... .... .... | (अश्विनीकुमार) |

## (५) कर्मेंद्रियपंचक

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वाचा | .... | .... | .... | वन्ही |
| पाणी | .... | .... | .... | इंद्र |
| पाद | .... | .... | .... | उपेंद्र |
| शिस्न | .... | .... | .... | विधी |
| गुद | .... | .... | .... | नैर्ऋत्य |

याप्रमाणें पिंडांतील स्थूल आणि सूक्ष्म देहांची ब्रह्मांडांतील विराट आणि हिरण्यगर्भ देहांशीं आपण तुलना केली खरी, पण ती केवळ शास्त्राला धरून केली आहे.

**पंचीकर्ण पंचभूतें। येक येकांसी वाढली।**
**तयाचा कर्दमु जाला। शास्त्राकारें चि बोलिला॥ ३/३ ॥**

आपणांस या सर्व तुलनेचा प्रत्यय येतो च असें नाहीं.

**कांहींसा प्रत्ययो येतो। कांहींसा प्रत्ययो न ये॥ ४/९ ॥**

पण मग आपण निश्चयानें काय मानून चालावें, असा आपणांस प्रश्न पडतो. त्याचें श्रीसमर्थ उत्तर देतात :

**पंचभूतें तीन गुण। पिंडब्रह्मांडऐक्यता।**
**निश्चयो हा चि जाणावा। येर संदेह वाढवी॥ ४/१० ॥**

पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश हीं पांच भूतें आणि सत्त्व, रज, तम हे तीन गुण पिंडांत आहेत, तसे च ते ब्रह्मांडांत आहेत, एवढें आपणांस समजलें म्हणजे पुरे आहे. बाकीचें सारें कोणी कसें हि मानोत आणि प्रतिपादोत, आपण त्या घोटाळ्यांत पडूं नये.

एक परब्रह्म आणि त्याच्या ठिकाणीं स्फुरलेली अष्टधा माया, ती माया तो च ईश्वर, तो च सकळांसी निर्मिता देव, तो च जगदीश, हा सिद्धान्त कायम समजावा. पंचीकरणाला आरंभ करतांना वर जो वंशवृक्ष आला आहे, त्यांत मूळमायेपासून अंतरात्म्याची चौथी पिढी दिसते, पण खरें पाहूं गेल्यास

**महद्भुत अंतरात्मा। मुळींची जाणती कळा।**
**वायो तेज आप पृथ्वी। हे तत्त्वें चाललीं पुढें॥ ३/१९ ॥**

हा अंतरात्मा, ही जाणीव कळा, हें पांचवें भूत मूळमायेंत पहिल्यापासून असतें च. त्याची च ही सारी लीला होय :

**मुळीं तत्त्व मूळ माया । संकल्प मुळींचा मुळीं ।**
**सत्य संकल्प तो देवो । स्वयें चि होत जातसे ॥ ४/१२ ॥**

**सकळांसी निर्मिता देव । देवासी निर्मिता नसे ।**
**सर्वांसी मूळ तो देवो । देवासी मूळ नाडळे ॥ १३ ॥**

**जगाचा ईश तो देवो । जगदीश म्हणोनियां ।**
**ऐश्वर्य सर्व हि याचें । ईश्वरू या च कारणें ॥ १४ ॥**

**येकाचें लुटिती येक । भोक्ता तो येकला दिसे ।**
**सांडि फिटे विटे नासे । तेथें तो देहधारकु ॥ १५ ॥**

**अन्नाचे ते भोक्ते लोक । तृणाचे ते भोक्ते पशु ।**
**भोगत्यागें चि जे जीती । ऐसे हे जीव वर्तती ॥ १६ ॥**

**केर पुंजा राख माती । नाना जीनस कुजकें ।**
**भोक्ता तो सर्व हि भोगी । नाना देहीं भरोनियां ॥ १७ ॥**

**वायां जाऊं नेदी कांहीं । बहुतीं बहुतांतरें ।**
**जातिभेदें देहभेदें । सर्व हि मान्य होतसे ॥ १८ ॥**

**च्यारी खाणी च्यारी वाणी । शोधितां पाहातां कळे ।**
**ब्रह्मांडीं जितुके प्राणी । येका तत्त्वें चि वर्तती ॥ १९ ॥**

**तत्त्व तें येक जाणावें । विस्तार वाढला पुढें ।**
**त्रिगुण पांच हि भूतें । अष्टधावीण नाडले ॥ २० ॥**

तात्पर्य, त्रिगुण आणि पंचभूतें या अष्टधा मूळमायेशिवाय, या अंतरात्म्याशिवाय, या जगदीशाशिवाय त्रिभुवनांत दुसरें कांहीं नाहीं. त्या देवाची उपासना श्रीसमर्थांनीं ग्रन्थराज दासबोधांत सांगितली आहे, ती आपण पुढें पाहूं.

---

# ( ३ ) चतुर्थमान

कांहीं बाडांत या प्रकरणास चतुर्थयोग म्हटलेलें आढळतें. योग, मान, समास यांचा अर्थ एक च करावयाचा. या प्रकरणाचे जे चार मान आहेत, ते एकमेकांशीं संबद्ध आहेत, असें म्हणतां येत नाहीं. कांहीं बाडांत त्यांचीं नांवें आढळतात तीं अशीं – सर्वात्माविवरण, स्वरूपविवरण, विवेकलक्षण आणि प्रबोधलक्षण.

पहिल्या मानांत अंतरात्म्याचें विवेचन आहे. श्रीसमर्थवाङ्मयोदधीच्या तीरापासून अजून आपण फार दूर आलों नाहीं, तों च ही गोष्ट वाचकांच्या लक्षांत आली असेल व जसजसे सरकत पुढें जाऊं, तसतसें त्यांना जास्त पटत जाणार आहे कीं, श्रीसमर्थांचें नुसतें तत्त्वज्ञान च नव्हे, तर त्यांचें संपूर्ण जीवनचरित्र जाणण्याची किल्ली म्हणजे अंतरात्म्याचें ज्ञान होय. श्रीसमर्थहृदयग्रन्थाचा शेवट गांठण्याच्या आंत तें ज्ञान आपणांस न होईल तर माझे ग्रन्थ लिहिण्याचे आणि वाचकांचे तो वाचण्याचे श्रम वायां गेले, असें होणार आहे ! तसें न व्हावें, म्हणून कागदावर जरी नाहीं, तरी मनामध्यें श्रीसमर्थांची सारखी करुणा भाकली पाहिजे. या अंतरात्म्याचें वर्णन आतांपर्यंत आलें आहे, या मानांत आहे आणि पुढें अनेकदां येणार आहे. हा अंतरात्मा म्हणजे च श्रीसमर्थांचे राम होत. त्या रामाची ओळख करून घेणें, त्याची सेवा करणें, त्याची कृपा संपादन करणें, हें प्रत्येक जीवाचें आद्य कर्तव्य होय.

**राम तो जाणिजे आत्मा । सर्वांतरात्मा तो चि तो ।**
**त्रैलोक्य चालवितो तो । आतां हि रोकडा पाहा ॥ १/१ ॥**

आतां हि म्हणजे केव्हां हि. तो सर्व काळीं, सर्व स्थळीं, सर्व देहीं होता, आहे आणि असणार. युगायुगाचे ठायीं तो च नांदत आला आहे व नांदत राहणार आहे. तो दिसत नाहीं, पण सर्वत्र आहे, जगांतल्या, माणसांतल्या, जनावरांतल्या, पशुपक्ष्यांतील, किडामुंगींतील, बऱ्या वाईट, वंद्य निंद्य, हसण्यारडण्याच्या, प्रेमाच्या कलहाच्या, सुस्थितीच्या विपत्तीच्या, यच्चयावत् सर्व क्रिया त्याच्यामुळें घडतात. त्रिभुवनांतील सर्व कर्तृत्व याचें आहे. तो च—

**नाना मतांतरीं वर्ते । प्रवर्ते योगसाधनीं ।**
**भोगी त्यागी महा योगी । संयोगी योगनास्तिकु ॥ १/१२ ॥**

तो म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणीं जें पहिलें स्फुरण झालें, तें. तो च ईश्वर. सर्व देव तो च

**द्रष्टा साक्षी तिहीं लोकीं । मुळींचा मूळ ईश्वरु ।**
**गणेश शारदा जाला । मल्हारी क्षेत्रपाळ तो ॥** १/२२ **॥**
**तुळजा काळिका चंडी । लक्ष्मी तो नारायेणु ।**
**महादेव बहु शक्ती । रामकृष्णादि भार्गउ ॥ २३ ॥**
**नाना क्षेत्रें पूज्य स्थानें । देव भक्त दोहींकडे ।**
**प्रेमळु नाचतो गातो । किती म्हणोनि सांगणें ॥ २४ ॥**
**सर्व हि करितो तो तो । किती म्हणोनि सांगणें ।**
**बोलिलें कळायासाठीं । रामदास जनीं वसे ॥ २५ ॥**

तात्पर्य, अंतरात्मा म्हणजे श्रीसमर्थांचे राम आणि तुमचे आमचे रामदास. रामदास जनीं वसे. अशा अंतरात्म्याचें ज्ञान म्हणजे जगांत व्यापून उरलेल्या श्रीसमर्थहृदयाचा ठाव होय.

दुसऱ्या मानांत ब्रह्मनिरूपण आहे. तें निरूपण शब्दांनीं च केलें आहे, तरी पण, ब्रह्मज्ञान होण्याला तें निरूपण पुरें पडत नाहीं. म्हणून च तें ब्रह्म

**निशब्द याचिकारणें ॥**

असें सतरादां सांगितलें आहे. तें जाणावयाचें असतें, शब्दांनीं सांगावयाचें नसतें.

**जाणावें, काये बोलावें । आत्मनिवेदनापुढें ॥** २/१५ **॥**

तिसऱ्या आणि चौथ्या मानांत प्रपंचपरमार्थाची शिकवण आहे :

(१) मागें स्वतंत्र प्रकरणांत षड्रिपूंचें वर्णन केलें असलें, तरी येथें उपदेश करितात,

**काम क्रोध कुटावा तो । लुटावा मदमछरु ।**
**तुटावा संशयो धोका । दंभ प्रपंच त्यागणें ॥** ३/१ **॥**

(२) कुबुद्धि टाकावी, सुबुद्धि धरावी

(३) अपकीर्ति होऊं देऊं नये, सत्कीर्ति राखावी

(४) थोरथोरांना अहंता पछाडते, ती आपण बुकलावी आणि भजनाकडे लावावी

(५) शहाण्यांनीं भ्रष्टाकार करूं नये, भ्रष्टाकार केल्यास कष्ट होतील, घात होईल

(६) वैराग्य धारण करून वासना जिंकाव्या

(७) विचित्र मतें धारण करूं नयेत

(८) धारणा धरावी मोठी

(९) कर्तव्याचा—ध्येयाचा—विसर पडूं देऊं नये

(१०) आळसाला कदापि क्षणभर हि थारा देऊं नये

(११) प्रयत्न सोडूं नये

(१२) अभ्यास वाढवावा रे । येहलोकपरत्रींचा ॥

(१३) शहाणे असोत, वेडे असोत, सर्वांना राजी राखावें

(१४) कर्कश बोलूं नये, सर्वांसी गोड बोलावें

(१५) लोकमान्य मार्गानें जावें

(१६) कोणाच्या हि ठिकाणीं असलेला गुण घ्यावा, गुणी माणसाला आपल्याकडे वेधून घ्यावें

(१७) सर्वांची परीक्षा केलेली असावी

(१८) प्रयत्नावांचून नुसतें शब्दज्ञान फोल समजावें. अशांचा संग काय कामाचा? त्यापरीस निःसंग होऊन राहणें बरें. प्रत्यय पाहिजे, प्रत्ययाचें ज्ञान पाहिजे

(१९) **अर्थपुष्ट बरें गाणें । नाचणें समजोनियां ।**
**उगें चि भुंकणें खोटें । गधडे भुंकती जसे ॥ ३/११ ॥**
**प्रेमा प्रबंद हि नाहीं । ज्ञान ध्यान असे चि ना ।**
**कळा हि पुरती नाहीं । तें गाणें श्रम वाढवी ॥ १२ ॥**

गाणें अर्थपुष्ट असावें, त्यांत प्रेम, प्रबंद म्हणजे सूत्रबद्धता, ज्ञान, ध्यान, कळा हीं असावींत

(२०) श्रीमंतापुढें आपला तोरा मिरवूं नये

(२१) रणशूरापुढें आपली बडबड चालवूं नये

(२२) शुचिष्मंतापुढें भ्रष्ट माणसाची काय किंमत? शुचिष्मंत असावें

(२३) पंडितापुढें हुंब्यानें म्हणजे ठोंब्यानें, रडक्यानें काय बोलावें? आंगीं पांडित्य असावें

(२४) अनुमानानें सहसा बोलूं नये

(२५) शहाण्यापुढें वेडें काय बोलणार? आंगीं शहाणपण असावें

(२६) खऱ्यापुढें खोट्याचें काय चालणार? सत्य तें च बोलावें आणि तदनुसार चालावें

(२७) जाणपण, ज्ञान ही यशाची किल्ली आहे. जाणण्यानें च दारिद्य नष्ट होतें, रोग हटतात, युद्धांत जय मिळतो, सर्व सौख्यें प्राप्त होतात, जन्ममरण टळतें, स्वतःची फसवणूक होत नाहीं, उलट, दुसऱ्यास चकवूं म्हटलें तर चकवितां येतें

(२८) एकोऽहं बहुःस्याम्। या जाणिवेपासून च जगाचा आरंभ झाला आहे, तेव्हां ज्ञानावांचून कशांत च यश येणार नाहीं. ज्ञानानेंच अष्ट देहांचें निरसन होईल, विज्ञान प्राप्त होऊन उन्मनी अवस्था भोगावयास मिळेल

(२९) असें पहा, मापट्यानें धान्य मोजलें जातें, अंत्यज खजिना वाहून नेतो, करंडींत आंब्याचा नजराणा पाठविला जातो, पण त्या मापट्याला धान्याचा, अंत्यजाला खजिन्याचा व करंडीला आंब्याचा जसा लाभ होत नाहीं, तद्वत् प्रत्ययावांचून नुसतें शब्दज्ञान फोल होय. पोकळ शब्दज्ञानाची योग्यता त्या मापट्याहून, अंत्यजाहून, करंडीहून जास्त नसते! तात्पर्य,

(३०) **उमजणें समजणें आधीं। प्रवृत्तीनिवृत्तीकडे।**
**भाग्यश्री मोक्षश्री होते। विरताविवरतां पुढे॥** ३/२५ ॥

प्रपंचांतील भाग्यश्री आणि परमार्थांतील मोक्षश्री ज्ञानावर अवलंबून असते

चौथ्या मानांत हि शिकवण च पुढें चालविली आहे. जसजसे आपण पुढें जाऊं तसतशी या शिकवणीची उजळणी हि होत जाईल आणि तिच्यांत सारखी भर पडत राहील. श्रीसमर्थांना पहावयाचें तें त्यांच्या शिकवणींत च पाहिलें पाहिजे, कारण त्यांच्या शिकवणींत त्यांच्या हृदयाचें प्रतिबिंब पडलेलें असतें ! चौथ्या मानांत हि शिकवण च आहे.

(१) जगांत गुणांची चहा होत असते, तेव्हां गुण संपादन करावे
(२) गुण संपादन करण्यासाठीं अभ्यास करावा
(३) नुसते शब्द समजून उपयोग नाहीं, शब्दांचा अर्थ समजून घेऊन स्वत: अर्थरूप व्हावें
(४) लोकांचें मनोगत जाणून घेऊन त्यांना राजी राखावें, त्यांत च सुख आहे
(५) मन ताब्यांत ठेवावें, अर्थ पहावा, प्रचीति घ्यावी आणि तसा इतरांस बोध करावा
(६) न्याय, अन्याय जाणावा आणि तदनुसार योग्य तें वर्तन घडावें
(७) बोलावयाचें तें सत्य, नेमस्त आणि अचूक असावें
(८) इहलोकीं तसें परलोकीं यशस्वी होण्यास प्रत्ययाचें ज्ञान पाहिजे
(९) जाणत्याला जाणता भेटला म्हणजे दोघे एकजीव होतात
(१०) निवृत्तिपद प्राप्त झाल्यावर देव आणि भक्त, राम आणि दास, गुरु आणि शिष्य हे निरनिराळे, किंवा एकमेकांपासून विभक्त रहात नाहींत, ते एकरूप होतात

सामान्य व्यवहाराच्या उपदेशापासून आरंभ करून एक एक पाऊल पुढें टाकीत आत्मस्वरूपांत त्या उपदेशाचा उपसंहार करणें, ही श्रीसमर्थांची हातवटी त्यांच्या वाङ्मयांत सर्वत्र पहावयास सांपडते. या च ठिकाणीं पहा ना. वरील उपदेशाच्या दहा बाबींकडे नजर फेंका. सामान्यापासून आरंभ करून उपदेशाचा असामान्यांत शेवट केला आहे. तो शेवट करतांना, देवभक्तांतील भेद दूर सारून श्रीसमर्थ स्वत:विषयीं म्हणतात :

**देह माझें मन माझें । माझें अज्ञान निर्सिलें ।**
**अज्ञान विज्ञान हि नाहीं । वृत्तिशून्य निरंजनु ॥ ४/१ ॥**

या अष्टाक्षरीचा दुसरा काय अर्थ होतो? माझा देह, माझें मन, माझें अज्ञान ज्ञान विज्ञान, या सर्वांचें निरसन करून माझ्या गुरूनें मला वृत्तिशून्य अशा निरंजनस्वरूपांत विलीन करून सोडलें, याशिवाय या श्लोकाचा कांहीं निराळा अर्थ आहे काय? असें स्वतःविषयीं बोलून परब्रह्माच्या वर्णनांत जेव्हां श्रीसमर्थ प्रवेश करितात, तेव्हां परब्रह्माचें तें वर्णन म्हणजे त्यांच्या स्वतःच्याच स्वरूपाचें वर्णन होय, असें आपण कां न मानावें? त्यांत आपलें कोठें चुकणार आहे? श्रीसमर्थ आपल्या निरंजनस्वरूपाचें वर्णन करितात :

अनंता अंत नाहीं रे । अलक्षा लक्षितां न ये ।
अपारा पार नाहीं रे । मायातीत निरंजनु ॥ १२ ॥

निर्मळा मळ लागेना । निश्चळा चळणा नसे ।
निसंगा संग तो नाहीं । निसंग तो निरंजनु ॥ १३ ॥

अतर्का तर्क लागेना । अनाम्या नाम नाडळे ।
अमूप तें काय मोजावें । अमूप तो निरंजनु ॥ १४ ॥

निर्गुणीं गुण कैचे हो । खूण कोण्हासी दाखऊं ।
उगवेना मावळेना । मायातीत निरंजनु ॥ १५ ॥

सत्य तें जाणिजे ब्रह्म । मिथ्या माईक दृश्य तें ।
दृश्यभास मुळीं नाहीं । मायातीत निरंजनु ॥ १६ ॥

उदंड हारपेना तें । पाहों जातां दिसे चि ना ।
सन्मुख भोंवतें आहे । मायातीत निरंजनु ॥ १७ ॥

जनीं वनीं विजनीं तें । व्योमाकारें चि संचलें ।
संच विसंच हि नाहीं । मायातीत निरंजनु ॥ १८ ॥

जन्म ना मृत्य पावेना । रचेना खचेना कदा ।
येईना जाईना कोठें । मायातीत निरंजनु ॥ १९ ॥

सन्मुख पाहातां आहे । विमुख करितां न ये ।
सबाह्य अंतरीं आतां । मायातीत निरंजनु ॥ २० ॥

त्यामधें सृष्टि आहे रे । सृष्टीमधें चि तें वसे ।
विवेकें सार जाणाया । मायातीत निरंजनु ॥ २१ ॥

**अभ्र धूम्र नभामधें। येतसे जातसे सदा।**
**तैसी च अष्टधा माया। मायातीत निरंजनु ॥ २२ ॥**

**अवकाश गगना ऐसा। भकाश पैस मोकळा।**
**धरितां सांडितां ये ना। मायातीत निरंजनु ॥ २३ ॥**

**जेथें जेथें मन जातें। तेथें तेथें चि तें चि तें।**
**पदार्थावेगळें पाहे। मायातीत निरंजनु ॥ २४ ॥**

**थोर तत्व मूळमाया। तीहुनी पर तें असे।**
**संपूर्ण सकळा ठाईं। मायातीत निरंजनु ॥ २५ ॥**

हे नुसते शब्द नाहींत, हा त्यांचा अनुभव आहे, ही त्यांची स्वतःची स्थिति आहे. रे, हो, इत्यादि शब्दांनीं आपणांस हांक मारून ते जें सांगत आहेत, तें त्यांना पटलेलें, त्यांच्या अनुभवाचें असलें पाहिजे, हें उघड आहे.

# (४) मानपंचक

या पांच मानांचीं नांवें अनुक्रमें उपासनानिरूपण, ज्ञाननिरूपण, निर्मळब्रह्मनिरूपण, सर्वसख्यनिरूपण आणि प्रबोधनिरूपण अशीं कांहीं जुन्या बाडांतून आढळतात, पण तीं श्रीसमर्थांनीं च ठेवलेलीं असावींत, असें मला वाटत नाहीं.

या काव्याच्या पहिल्या मानांत **रामनामाचा महिमा** सांगून नंतर श्रीसमर्थांनीं **रामराज्याचें वर्णन** केलें आहे. तसलें रामराज्य त्यांना महाराष्ट्रांत स्थापावयाचें होतें व रामाच्या कृपेनें तें स्थापन हि झालें होतें. दुसऱ्या मानांत त्यांनीं **उपासना** समजावून दिली आहे, तिसऱ्या मानांत ती उपासना करण्याचा **मार्ग** दाखविला आहे, चौथ्यांत त्या उपासनेची **व्यापकता** सांगितली आहे, आणि पांचव्या मानांत **उपासक** कसा असतो, तें, माझ्या समजुतीप्रमाणें, स्वतःच्या उदाहरणावरून त्यांनीं दर्शविलें आहे. अर्थात्, त्या मानांत आपणांस श्रीसमर्थांचें दर्शन घडतें. वास्तविक ते सर्वव्यापी आहेत, त्यांच्या वाङ्मयांत ते अमुक स्थळीं नाहींत, असें म्हणतां च यावयाचें नाहीं, ते त्यांत सर्वत्र नटून राहिले आहेत, फक्त कोठें त्यांचीं पाउलें स्पष्ट उमटलेलीं दिसतात तर कोठें तीं गुप्त असतात.

## रामनाममहिमा

**राम विश्राम देवांचा । राम भक्तांसि आश्रयो ।**
**राम योगीमुनीध्यानीं । राम रक्षी ऋषीकुळा ॥ १ ॥**

**राम ध्यातो चंद्रमौळी । राम राम सदा जपे ।**
**रामकथा ऐकताहे । रामरूप निरंतरीं ॥ २ ॥**

**पार्वती पुसतां सांगे । रामजप अत्यादरें ।**
**सुंदरें दोनि अक्षरें । निवालों अंतरीं सुखें ॥ ३ ॥**

**जाळिलें पोळिलें वीषें । कर्कशें काळिमा चढे ।**
**उपाय बहुधा केले । रामनामें चि सुटिका ॥ ४ ॥**

**सव्य अपसव्य या नामें । तरले सुटले बहु ।**
**अंतकाळीं सर्व काळीं । सुटिका सकळै जना ॥ ५ ॥**

अशा रीतीनें शंकराचें पौराणिक उदाहरण देऊन गोड आकर्षक शब्दांत रामनामाची थोरवी त्यांनीं वर्णिली आहे आणि सर्वांना जन्ममरणाच्या जंजाळांतून सुटण्याचा मार्ग दाखविला आहे. पण या हि पेक्षां, या च प्रकरणाच्या चौथ्या मानांत त्यांनीं स्वतःचा च दाखला देऊन स्वतःविषयीं जे धन्यतेचे, कृतार्थतेचे, कृतज्ञतेचे व इतरांचे कष्ट पाहून दुःखाचे उद्गार काढले आहेत, ते विषयानुरोधानें आपण येथें च पाहणें इष्ट होय.

**कास या रघुनाथाची । धरितां सुख पावलों ।**
**इतर कष्टती प्राणी । थोर संसारसांकडीं ॥ ४/१ ॥**
**सांकडीं तोडिलीं माझीं । राघवें करुणालयें ।**
**पूर्वीं च तुटली माया । दुःख शोक विसंचला ॥ २ ॥**
**सेवकु मानवीयांचे । कष्टती बहुतांपरीं ।**
**सेविला देव देवांचा । तेणें मी धन्य जाहलों ॥ ३ ॥**
**नीच हे मानवी प्राणी । नीचाश्रय कामा नये ।**
**महत्कीर्ति श्रीरामाची । फावला महदाश्रयो ॥ ४ ॥**
**विबुधां आश्रय ज्याचा । पावले बंदमोचनें ।**
**सेवकु मारुती ऐसा । त्याचा मी म्हणती जनीं ॥ ५ ॥**
**निवाला शिव ज्या नामें । ज्या नामें वाल्मीक ऋषी ।**
**जें नाम सकळां तारी । तें नाम मज अंतरीं ॥ ६ ॥**

या सहा श्लोकांचें महत्त्व समजावून सांगण्यास मी आणि माझी वाणी, हीं असमर्थ आहेत ! अंतरीं म्हणजे हृदयांत. श्रीसमर्थहृदयाचा ठाव लागावा, हा हेतु मनांत धरून श्रीसमर्थवाङ्मयोदधींत बुड्या मारण्यास आपण सुरुवात केली, तो ठाव येथें लागला, आतां येथें च मुक्काम करावा, पुढें जाण्याचें कारण उरलें नाहीं, ग्रन्थ येथें च संपवावा, असें मनांत येतें ! आपल्या हृदयांत काय आहे, तें श्रीसमर्थांनीं येथें उघड सांगितलें असतां, त्या हृदयाचा ठाव घेण्यास आणखी कोठें जाणार ? येथें च थांबावें आणि ग्रंथ संपवावा, पण तसें करीत नाहीं, येथें थोडा वेळ विश्रांति घेऊन आपण पुढें जाऊं ! पुढें आणखी काय काय लाभ होणार आहे, तो आज च कोणीं पाहिला आहे !

हे सहा श्लोक मला अत्यन्त जिव्हाळ्याचे वाटतात. श्रीसमर्थांच्या साद्यन्त चरित्राचें त्यांत सार आहे. ‘ पूर्वीं च तुटली माया ’ म्हणजे लग्नांतून

निसटले तेव्हां च ! मनुष्याचा काय भरंवसा धरावा, देव च आपुलासा करावा ! तिसऱ्या आणि चौथ्या श्लोकांत परिस्थितीविषयीं श्रीसमर्थांनीं तीव्र उद्गार काढले आहेत. ‘ तें नाम मज अंतरीं ’ असें सांगून त्यांनीं आपलें अंत:करण उघडें करून दाखविलें आहे. श्रीसमर्थवाङ्मयांत त्यांच्या भक्ताच्या जीवाला चटका लावून त्यांच्या चरणीं आपोआप मस्तक ठेवावयास लावणारीं जीं कांहीं स्थळें आहेत – तीं थोडीं थोडकीं नाहींत, त्यांपैकीं हें एक प्रमुख स्थळ होय. त्यांचें सारें च वाङ्मय आपणांस धांडोळावयाचें आहे, पण त्यांत हि त्यांच्या हृदयाचें आविष्करण करणारीं अशीं जीं स्थळें आहेत, तेथें आपण गुंग होऊन, हातांतली लेखणी खालीं ठेवून, कांहीं वेळ थांबलों आणि चिंतनांत मग्न झालों, तर तें सर्वथैव क्षम्य होय. श्रीसमर्थ स्वानुभव स्वमुखानें इतका उघडा करून सांगत असतां त्यावर विश्वास न ठेवणारा आपल्या महाराष्ट्रांत कोणी हि जन्मास आलेला नसावा आणि न येवो.

## रामराज्य

राष्ट्रांत ज्या रामराज्याची स्थापना व्हावी म्हणून श्रीसमर्थांचा अवतार, त्या रामराज्याचें श्रीसमर्थांनीं केलेलें वर्णन आपण त्यांच्याच शब्दांत ऐकलें पाहिजे :

**राज्य या रघुनाथाचें । कळीकाळासि नातुडे ।**
**बहु वृष्टी अनावृष्टी । हें कदा न घडे जनीं ॥ ७ ॥**
**उद्वेग पाहतां नाहीं । चिंता मात्र नसे जनीं ।**
**व्याधी नाहीं रोग नाहीं । लोक आरोग्य नांदती ॥ ८ ॥**
**युध्य नाहीं च अयोध्या । राग ना मछरु नसे ।**
**बंद निर्बंद हि नाहीं । दंड दोष कदा नसे ॥ ९ ॥**
**कुरूपी पाहतां नाहीं । जरा मृत्यु असे चि ना ।**
**आदरु सकळै लोका । सख्य प्रीति परस्परें ॥ १० ॥**
**बोलणें सत्य न्यायाचें । अन्याय सहसा नसे ।**
**अनेक वर्तती काया । येक जीव परस्परें ॥ ११ ॥**
**दरिद्री धुंडितां नाहीं । मूर्ख हा तों असे चि ना ।**
**परोपकार तो मोठा । सर्वत्र लोकसंग्रहो ॥ १२ ॥**

**अद्भुत पिकती भूमी । वृक्ष देती सदा फळें ।**
**अखंड दुभती धेनु । आरोग्यें वाहती जळें ॥ १३ ॥**

**जळजें श्वापदें पक्षी । नाना जीव भूमंडळीं ।**
**आनंदरूप बोभाती । नाना स्वर परस्परें ॥ १४ ॥**

**नद्या सरोवरें वावी । डोलती नूतनें वनें ।**
**फळती फुलती झाडें । सुगंध वनवाटिका ॥ १५ ॥**

**उदंड वसती ग्रामें । नगरें पुरें चि पट्टणें ।**
**तीर्थें क्षेत्रें नाना स्थानें । शिवालयें गोपुरें बरीं ॥ १६ ॥**

**मठ मढ्या पर्णशाळा । ऋषीआश्रम साजिरे ।**
**वेदशास्त्रधर्मचर्चा । स्नान संध्या तपोनिधी ॥ १७ ॥**

**चढता वाढता प्रेमा । सुखानंद उचंबळे ।**
**संतोष समस्तै लोकां । रामराज्य भूमंडळीं ॥ १८ ॥**

स्वराज्य कसें असावें, याचें किती सुंदर आणि नमुनेदार हें चित्र आहे. अशी स्थिति पृथ्वीवर नांदूं लागली म्हणजे स्वर्ग च खालीं पृथ्वीवर आला, असें होईल! श्रीसमर्थांच्या डोळ्यांपुढें रामराज्याचें हें ध्येय होतें.

**रामराजा दयासिंधु । बोळला सेवकावरी ॥ २४ ॥**

आणि रामराज्याचें सुख त्यांनीं अनुभविलें.

**धर्मस्थापनेसाठीं । कर्मकांड उपासना ॥ २५ ॥**

**उपासना** म्हणजे काय व ती ज्या देवाची तो देव कसा आहे, याचें विवेचन दुसऱ्या मानांत आहे. देव आपल्या हृदयांत आहे. तो सर्वांच्या च हृदयांत आहे. जनीं जनार्दन हा शब्दप्रयोग सर्वांच्या परिचयाचा आहे. त्याचा अर्थ करण्यांत मात्र पुष्कळांची गफलत होऊन तें वादाला कारण होतें. सर्वांच्या हृदयांत देव आहे, तर मग सर्व लोक सारखे आहेत, सारखे च पूजनीय मानले पाहिजेत, त्यांच्यांत उंचनीच असा भेदाभेद करतां येत नाहीं, करणें योग्य होणार नाहीं, असा आत्यंतिक अर्थ करण्याची प्रवृत्ति कित्येकांत आढळते. ती प्रवृत्ति प्रामाणिक असली, तरी चुकीची आणि भ्रामक आहे, असें श्रीसमर्थ स्पष्टपणें बजावतात.

**जनीं जनार्दन आहे । परंतु सज्जनीं वसे ।**
**जना आणि सज्जनाला । येक चि करितां नये ॥ १३ ॥**

जगांत जगदात्मा आहे हें खरें आहे, पण त्या च जगांत एक सुखासनावर बसलेला स्वामी आणि दुसरा कावाडकष्ट करणारा त्याचा सेवक, असा भेद आपण प्रत्यक्ष पहात असतों, मग सर्व सारखे च कसे मानावे ? वैद्य आणि रोगी, ज्ञानी आणि अज्ञानी, एक भाग्यवंत तर दुसरा अभागी, एक तारणारा आणि दुसरा बुडणारा, मोक्षदाता सद्गुरु आणि त्याचा मुमुक्षु सच्छिष्य, अमृत आणि विष, वंद्य निंद्य असे असंख्य भेद आणि त्यांचे भिन्न भिन्न परिणाम दिसत असतां, सर्वांना एका च मालिकेंत कसें गोंवतां येईल, एका च पातळीवर आणून कसें ठेवतां येईल, किंवा समानतेच्या एका च बैठकीवर कसें बसवितां येईल ? प्रत्यक्ष आपल्या शरीरांत

**भेदाभेदक्रिया देहीं । लागली हे सुटे चि ना ।**
**जेथील विषयो तेथें । विपरीत करितां नये ॥ १४ ॥**
**मुखें चि सेवितां अन्नें । अपानीं घालितां नये ।**
**अन्याय करिती तैसा । समान मानिती जनीं ॥ १५ ॥**

विंचू, सर्प, व्याघ्र, लांडगे यांच्यांत अंतरात्मा नसतो काय ?

**परंतु हित तें घ्यावें । समान वर्ततां नये ॥ १६ ॥**

तात्पर्य, ईश्वरानें केलेले भेद न मानणें हें पाखंड होय. मग जगांत वागावें कसें, असें विचाराल, त्याचें उत्तर श्रीसमर्थ देतात :

**समान देखणें आत्मा । समान करणें दया ।**
**वंद्य निंद्य विचारावें । हे मुख्य जाणती कळा ॥ १८ ॥**

मारक तारक, पाप पुण्य, कुबुद्धि सुबुद्धि, अन्मार्ग सन्मार्ग, असे भिन्न भिन्न प्रकार जगांत आहेत, हें जाणून आपण यातिभ्रष्ट, क्रियाभ्रष्ट, अनर्गळ होऊं नये, अशांची संगति धरूं नये. ती संगति आपल्या अधःपाताला कारणीभूत होईल ! क्रियेचें संरक्षण देहानें करावयाचें असतें, तें करीत असून हि भूतदया, जनसेवा, ईश्वरसेवा करतां येते. अशा उपासनेंत च चित्ताची खरी प्रसन्नता असते.

ती उपासना कशी करावी? आधीं विध्युक्त कर्म करावें आणि मग देवाचा छंद, सत्संग, वैराग्य आणि ज्ञान या क्रमानें मोक्षप्राप्ति होईल. मोक्ष म्हणजे अभेद भक्ति, आत्मनिवेदनी स्थिति.

**पिंडब्रह्मांडीचे देहे। निर्शितां काय उरलें।**
**विवरावें विचारावें। प्रत्ययो पाहातां कळे॥ ३/२४ ॥**

स्थूळ, सूक्ष्म, कारण आणि महाकारण हे पिंडांतील चत्वार देह आणि विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत, मूळमाया हे ब्रह्मांडींचे चत्वार देह, अशा अष्टदेहांचें निरसन झाल्यावर काय उरलें बरें? अग्नि आणि कापूर यांचा संयोग होऊन जें उरतें, तें च उरलें! दोन्ही एक होऊन जातात!

**पावकु शुद्ध कर्पुरें। येक चि होत जातसे।**
**देव भक्त अंतरात्मा। येक चि होत जातसे॥ २५॥**

हा च दृष्टान्त देऊन मागील चतुर्थमानांतील दुसऱ्या मानाचा शेवट केलेला होता.

**कर्पुर जाळितो वन्ही। दोघां होते बराबरी॥**

याप्रमाणें देव आणि भक्त, दोघे हि अंतरात्म्यांत एक होऊन जातात. तो अंतरात्मा सर्वत्र भरलेला असल्यामुळें, त्याची उपासना करावयाची म्हणजे ब्रह्मांडाची च उपासना करावयाची, असा अर्थ होतो. इतकी व्यापक उपासना श्रीसमर्थांची होती.

अशी विश्वव्यापक उपासना करणारा उपासक कसा असतो? श्रीसमर्थांशिवाय दुसऱ्या कोणाकडे बोट दाखवावें? त्याचें वर्णन पांचव्या मानांत आहे. म्हणजे तें श्रीसमर्थांचें आत्मचरित्र च होय. तें आपण थोडक्यांत पाहूं.

**दुःख जाणे पराव्याचें। ऐसा तो विरुळा गुणी॥ ५/३ ॥**
**सद्बुद्धि सांगणें लोकां। जेणें ते सुख पावती।**
**प्रसंग राखणें आधीं। सोसावें बहुतांपरीं॥ ६॥**

**न्याय अन्याय सोसावा। सोसितां हि विटों नये।**
**न्युन्य पैशुन्य झांकावें। तेणें ते प्रस्तावां पडे॥ ७॥**

नैराश ने घेतां सांगे । निववी चंद्नापरी ॥ ९ ॥
सर्वत्र मान्य तो ज्ञाता । प्रत्यय बोलतो खरें ॥ १० ॥
नीतिन्यायें मिळों जाणे । तो चि तो लोकसंग्रही ॥ ११ ॥
मनें च्चि पारखी लोकां । परंतु नोबले कदा ॥ १३ ॥
जाणत्या नेणत्या लोकां । प्रसंगें वर्तवी जगीं ॥ १४ ॥

तो च्चि तो अंश देवाचा । मिळाला जगदांतरें ।
नैराश तापसी ज्ञानी । सर्वांसी पाहिजे सदा ॥ १९ ॥

हिंडतां हिंडतां लोकीं । आवडे नित्य नूतनु ।
पुण्यात्मा सुकृती धर्मी । भक्तराज भूमंडळीं ॥ २० ॥

कर्म उपासना राखे । राखे वैराग्य आदरें ।
ज्ञान तें प्रत्ययें राखे । नित्यानित्यविचारणा ॥ २१ ॥

काळ तो नेटका घाली । हरिकथानिरूपणें ।
विचारें प्रत्यया आणीं । धूर्त तार्किक तीक्ष्णु ॥ २२ ॥

पावनु तो च्चि तो येकु । बद्ध लोकांसी सोडवी ॥ २३ ॥

## (५) पंचमान

**राघवा राजसा रामा । रामचंद्रा रघोत्तमा ।**
**रत्नविभूषणा देवा । रम्यराजीवलोचना ॥ १/३ ॥**

किती कर्णमधुर शब्दांनीं हें स्मरण केलें आहे ! जांबेस अकराव्या वर्षीं ज्यांनीं दर्शन दिलें, त्यांना हें या प्रेमळ नांवांनीं आळविणें आहे. आपण हि डोळे मिटून त्या स्वरूपाकडे लक्ष लावून एकाग्र चित्तानें हांका माराव्या ! या अष्टाक्षरीला, माझ्या समजुतीप्रमाणें, मंत्राचें स्वरूप प्राप्त झालें आहे.

या काव्याचें पहिलें मान स्तवनपर आहे. तें मला एक स्तोत्र वाटतें. त्याच्या पहिल्या दहा श्लोकांत अनेक देवतांचें अनुरूप शब्दांत आवाहन केलें आहे आणि नंतरच्या पंधरा श्लोकांत अनेक ऋषि-मुनि-देव-देवता इत्यादिकांपैकीं कोणाचें ध्यान केलें असतां कोणतें फळ होतें तें सांगितलें आहे. वास्तविक हें सबंध स्तोत्र मीं येथें उद्धृत करावें, पण तें मूळ ग्रन्थावरून अवलोकावें, अशी वाचकांस विनंति करितों. शेवटचे चार श्लोक मात्र येथें देतों, कारण त्यांत श्रीसमर्थांचें वैशिष्ट्य आहे. त्यांतील ध्यानें पूर्वीं कोणीं सांगितलीं नसतील ! सांगतील च कोठून ? श्रीसमर्थांशिवाय तीं ध्यानें घडलीं च आहेत कोणाला ? या चार श्लोकांत श्रीसमर्थांचें दर्शन घडतें !

**तीर्थें क्षेत्रें झरे टांकीं । कूप बावी सरोवरें ।**
**नाना पुण्यभुमी श्रेष्ठा । आटणें धर्मवासना ॥ १/२२ ॥**
**खंडें द्वीपें सप्तसिंधु । भुयेरीं देऊळें स्थळें ।**
**नाना बनें बनारण्यें । या ध्यानें वृत्ति वावरे ॥ २३ ॥**
**कपाटें विवरें गुंफा । पावनें गिरिकंदरें ।**
**या ध्यानें तापसी होणें । दिशा दिग्गज दिग्पती ॥ २४ ॥**
**रवी शशी ग्रह तारा । ढग मेघ विद्युल्लता ।**
**भुमी आपोनळो वायो । या ध्यानें तर्क निवळे ॥ २५ ॥**

हीं ध्यानें श्रीसमर्थांच्या अनुभवाचीं होत. तीं त्यांनीं केलीं, त्यांचीं फळें अनुभविलीं, म्हणून तीं त्यांना सांगतां आलीं ! झरे, टांकीं, कूप, बावी, भुयेरीं, बनें, अरण्यें, कपाटें, विवरें, गुंफा, गिरिकंदरें हे कोणाच्या ध्यानाचे

विषय असल्याचें कधीं कोणीं ऐकलें आहे काय ? ढग, मेघ, विद्युल्लता यांचें कोण ध्यान करितात ? मनांत कांहीं एक ध्येय ठेवून, आकाशाकडे नजर लावून, विचारांत मग्न होऊन स्वच्छंदानें साऱ्या देशभर दुसऱ्या कोणीं पर्यटन केलें आहे ? रात्रीं अपरात्रीं सदा अरण्यांत वास करणें आणि डोंगरोडोंगरीं संचार करणें, ही केवळ श्रीसमर्थांची च खास मिरासी होती. तीर्थाटनाच्या योगानें धर्मवासना जागृत होतात, भुयेरीं, वनें, वनारण्यें इत्यादिकांच्या सहवासांत वृत्ति विशाल होऊन भावना प्रस्फुरित होतात, कपाटें, विवरें, गुंफा, गिरिकंदरें यांत वास्तव्य केल्यानें वैराग्य उत्पन्न होऊन तपाचरणाची प्रवृत्ति होते, फार काय, ढग, मेघ, विद्युल्लता यांच्या अवलोकनानें बुद्धीला प्रखरता येते, हें स्वानुभवानें दुसरें कोण सांगूं शकणार आहे ? अशा विशिष्ट उल्लेखांवरून च आपणांस श्रीसमर्थचरित्र कळण्याचा आणि त्यांच्या हृदयाची ओळख पटण्याचा संभव असतो.

दुसऱ्या मानांत अंतरात्म्याचें विवरण आहे. श्रीसमर्थवाङ्मयांत हा अंतरात्मा जेथें तेथें आपणांस भेटणार, हें निश्चित समजावें. त्याची आतांपर्यंत आपणांस थोडी ओळख झाली आहे व मला पूर्ण भरंवसा आहे, जसजसे आपण पुढें जाऊं तसतसें अंतरात्म्याचें स्वरूप आपणांस जास्त उमगत जाईल व जेव्हां आपण श्रीमत् ग्रन्थराज दासबोध हातीं घेऊं तेव्हां त्याचें पूर्ण ज्ञान झाल्याशिवाय ग्रन्थराज आपण खालीं ठेवणार च नाहीं ! अंतरात्मा म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणचें पहिलें स्फुरण. त्याचे घटक दोन, एक वायु आणि दुसरा जाणीव. वायु आणि जाणीव मिळून अंतरात्मा, ती च जगज्जोति, ती च मूळमाया, तो च ईश्वर. तो सर्वत्र भरलेला आहे. हें सर्व मागें अनेकदां सांगून झालें व पुढें अनेकदां सांगावें लागणार आहे. अंतरात्मा दिसत नाहीं पण त्यामुळें च सर्वांचे देह चालले आहेत. स्वतःच्या देहाकडे पाहून आपणांस सांगतां येईल कीं, प्राण आणि वासना यांच्या योगें आपला देह चालला आहे. प्राण म्हणजे वायु व वासना म्हणजे जाणीव. हीं दोन्ही भिन्न आहेत. हें निश्चित होय. गाढ निद्रेंत श्वासोच्छ्वास चालला च असतो, पण जाणीव नसते. देह पडला म्हणजे हीं दोन्ही निघोन जातात.

असा हा सर्वव्यापी अंतरात्मा प्रत्ययास आला पाहिजे.

**गुरु तो शिष्य तो जाला । शिष्य तो चि पुढें गुरु ।**
**देव तो भक्त तो ज्ञानी । सर्व तो जगदांतरें ॥ १९ ॥**
**कितेक देवतें भूतें । कितेक ब्रह्मयोगिणी ।**
**कितेक हरिहरादिक । सर्वत्र जाणती कळा ॥ २० ॥**

हें सर्व च खोटें कसें मानावें ! परंतु लोक

**आपलाल्या साभिमानें । मीपणें वाद घालिती ॥ २२ ॥**

पण आपण श्रीसमर्थांवर विश्वास टाकून चाललें पाहिजे.

देव, देवता, दैवतें, भूतें वायुरूपें विराजती, हें सत्य होय.

**वास घे वासना देवो । स्थूळेंवीण खातां न ये ।**
**म्हणोनी ब्राह्मणा द्यावें । विप्रमुखें संतृप्तता ॥ २३ ॥**

कोण्या जीवाचा आपला पूर्वी कसा संबंध असेल, सांगतां येत नाहीं, म्हणून शहाण्यानें सर्वांशीं निर्वैर वृत्तीनें वागलें पाहिजे. पण तसें घडतें आहे कोठें ? विचार करावा, श्रीसमर्थांचें ऐकावें.

**मागील कोण तो जन्म । माता पिता कळे चि ना ।**
**कन्या पुत्र बंधु कोण । कोण ते जन्मभूमिका ॥ २६ ॥**
**मागील नाठवे आतां । आतांचें नाठवे पुढें ।**
**येकाकी येकलें जावें । मायाजाळें भ्रमे जनु ॥ २७ ॥**
**संचितासारिखे येती । प्राणी हे भोग भोगिती ।**
**भोगणें पूर्वीचा ठेवा । म्हणोनि पुण्य पाहिजे ॥ २८ ॥**

तिसऱ्या मानांत पुण्यवंताचें वर्णन आहे. अशा वर्णनांतून च श्रीसमर्थचरित्र आपोआप बाहेर पडतें. कसें तें पहा :

**धन्य ते योगिये साधु । पावले परमेश्वरा ।**
**आपुलें हित तें केलें । तरले तारिले जना ।**
**सत्कर्मै शोभती वेषें । बोलणें मधुरा गिरा ।**
**पुण्यात्मे सुकृती न्यायी । योजिती धर्मस्थापना ॥ २ ॥**
**विशाळा पावना बुद्धि । विशाळा सुखकारकी ।**
**परोपकारणी काया । परत्र लोकसंग्रही ॥ ३ ॥**

विषय असल्याचें कधीं कोणीं ऐकलें आहे काय ? ढग, मेघ, विद्युल्लता यांचें कोण ध्यान करितात ? मनांत कांहीं एक ध्येय ठेवून, आकाशाकडे नजर लावून, विचारांत मग्न होऊन स्वच्छंदानें साऱ्या देशभर दुसऱ्या कोणीं पर्यटन केलें आहे ? रात्रीं अपरात्रीं सदा अरण्यांत वास करणें आणि डोंगरोडोंगरीं संचार करणें, ही केवळ श्रीसमर्थांची च खास मिरासी होती. तीर्थाटनाच्या योगानें धर्मवासना जागृत होतात, भुयेरीं, बनें, बनारण्यें इत्यादिकांच्या सहवासांत वृत्ति विशाल होऊन भावना प्रस्फुरित होतात, कपाटें, विवरें, गुंफा, गिरिकंदरें यांत वास्तव्य केल्यानें वैराग्य उत्पन्न होऊन तपाचरणाची प्रवृत्ति होते, फार काय, ढग, मेघ, विद्युल्लता यांच्या अवलोकनानें बुद्धीला प्रखरता येते, हें स्वानुभवानें दुसरें कोण सांगूं शकणार आहे ? अशा विशिष्ट उल्लेखांवरून च आपणांस श्रीसमर्थचरित्र कळण्याचा आणि त्यांच्या हृदयाची ओळख पटण्याचा संभव असतो.

दुसऱ्या मानांत अंतरात्म्याचें विवरण आहे. श्रीसमर्थवाङ्मयांत हा अंतरात्मा जेथें तेथें आपणांस भेटणार, हें निश्चित समजावें. त्याची आतांपर्यंत आपणांस थोडी ओळख झाली आहे व मला पूर्ण भरंवसा आहे, जसजसे आपण पुढें जाऊं तसतसें अंतरात्म्याचें स्वरूप आपणांस जास्त उमगत जाईल व जेव्हां आपण श्रीमत् ग्रन्थराज दासबोध हातीं घेऊं तेव्हां त्याचें पूर्ण ज्ञान झाल्याशिवाय ग्रन्थराज आपण खालीं ठेवणार च नाहीं ! अंतरात्मा म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणचें पहिलें स्फुरण. त्याचे घटक दोन, एक वायु आणि दुसरा जाणीव. वायु आणि जाणीव मिळून अंतरात्मा, ती च जगज्जोति, ती च मूळमाया, तो च ईश्वर. तो सर्वत्र भरलेला आहे. हें सर्व मागें अनेकदां सांगून झालें व पुढें अनेकदां सांगावें लागणार आहे. अंतरात्मा दिसत नाहीं पण त्यामुळें च सर्वांचे देह चालले आहेत. स्वतःच्या देहाकडे पाहून आपणांस सांगतां येईल कीं, प्राण आणि वासना यांच्या योगें आपला देह चालला आहे. प्राण म्हणजे वायु व वासना म्हणजे जाणीव. हीं दोन्ही भिन्न आहेत. हें निश्चित होय. गाढ निद्रेंत श्वासोच्छ्वास चालला च असतो, पण जाणीव नसते. देह पडला म्हणजे हीं दोन्ही निघोन जातात.

असा हा सर्वव्यापी अंतरात्मा प्रत्ययास आला पाहिजे.

**गुरु तो शिष्य तो जाला । शिष्य तो चि पुढें गुरु ।**
**देव तो भक्त तो ज्ञानी । सर्व तो जगदांतरें ॥ १९ ॥**
**कितेक देवतें भूतें । कितेक ब्रह्मयोगिणी ।**
**कितेक हरिहरादिक । सर्वत्र जाणती कळा ॥ २० ॥**

हें सर्व च खोटें कसें मानावें ! परंतु लोक

**आपलाल्या साभिमानें । मीपणें वाद घालिती ॥ २२ ॥**

पण आपण श्रीसमर्थांवर विश्वास टाकून चाललें पाहिजे.

देव, देवता, दैवतें, भूतें वायुरूपें विराजती, हें सत्य होय.

**वास घे वासना देवो । स्थूळेंवीण खातां न ये ।**
**म्हणोनी ब्राह्मणा द्यावें । विप्रमुखें संतृप्तता ॥ २३ ॥**

कोण्या जीवाचा आपला पूर्वीं कसा संबंध असेल, सांगतां येत नाहीं, म्हणून शहाण्यानें सर्वांशीं निर्वैर वृत्तीनें वागलें पाहिजे. पण तसें घडतें आहे कोठें ? विचार करावा, श्रीसमर्थांचें ऐकावें.

**मागील कोण तो जन्म । माता पिता कळे चि ना ।**
**कन्या पुत्र बंधु कोण । कोण ते जन्मभूमिका ॥ २६ ॥**
**मागील नाठवे आतां । आतांचें नाठवे पुढें ।**
**येकाकी येकलें जावें । मायाजाळें भ्रमे जनु ॥ २७ ॥**
**संचितासारिखे येती । प्राणी हे भोग भोगिती ।**
**भोगणें पूर्वींचा ठेवा । म्हणोनि पुण्य पाहिजे ॥ २८ ॥**

तिसऱ्या मानांत पुण्यवंताचें वर्णन आहे. अशा वर्णनांतून च श्रीसमर्थचरित्र आपोआप बाहेर पडतें. कसें तें पहा :

**धन्य ते योगिये साधु । पावले परमेश्वरा ।**
**आपुलें हित तें केलें । तरले तारिले जना ।**
**सत्कर्मैं शोभती वेषें । बोलणें मधुरा गिरा ।**
**पुण्यात्मे सुकृती न्यायी । योजिती धर्मस्थापना ॥ २ ॥**
**विशाळा पावना बुद्धि । विशाळा सुखकारकी ।**
**परोपकारणी काया । परत्र लोकसंग्रही ॥ ३ ॥**

हें दुसऱ्या कोणाचें चरित्र आहे ? त्यांनीं स्वतःचा संसार केला च नाहीं. दुसऱ्यांचा पाहिला आणि स्वतः निसटले.

**संसार पाहिला डोळां । रंग वोरंग होतसे ।**
**हांसती रुदती प्राणी । सुखदुःखें परोपरीं ॥ ७ ॥**
**देखिलें चाखिलें मागें । जन्मदारभ्य आठवे ।**
**निशेष राहिल्या शक्ती । रोग व्याधी विटंबणा ॥ ८ ॥**
**दैन्यवाणा देहे जातो । ते काळीं हित नाकळे ।**

म्हणून श्रीसमर्थांसारखे

**म्हणोनि धन्य ते साधु । मायात्यागें चि सुटले ॥ ९ ॥**

बाकीच्या सर्वांना श्रीसमर्थ बावळ्यांत आणि मूर्खांत काढीत आहेत.

**संपती संतती विद्या । शक्ती सामर्थ्य जातसे ।**
**दक्ष ते जाणिती आधीं । बावळीं भुललीं सदें ॥ १० ॥**
**राहिला कोण ये लोकीं । संव्हार रावणादिकां ।**
**इतरां कोण तो लेखा । नेणती मूढ माणसें ॥ ११ ॥**
**मधें चि झांकिली काया । येतां जातां दिगांबरी ।**

म्हणून श्रीसमर्थांसारखे आधीं च

**जाणती तापसी योगी । संगत्यागें सदा सुखी ॥ १२ ॥**

अशा या दुःखमय, कष्टमय संसारांत

**लाभ तो येक जाणावा । परमात्मा परमेश्वरु ।**
**भक्तीनें आपुला कीजे । विचक्षणें चुकों नये ॥ १५ ॥**
**चुकतां मुख्य देवासी । चुकेना यमयातना ।**
**म्हणोनि सद्गुरु कीजे । न कीजे अवलक्षणु ॥ १६ ॥**

असें म्हणून श्रीसमर्थांनीं नंतर पांच पांच श्लोकांत गुरूचीं आणि शिष्याचीं अवलक्षणें सांगितलीं आहेत, तीं वाचकांनीं मुळांत पाहून टाळावीं आणि सच्छिष्य बनून श्रीसमर्थभजनीं लागावें.

चौथ्या मानाच्या २९ श्लोकांत एक भाविक आणि दुसरा विवेकी कल्पून आणि आपल्या उपासनेचा बडिवार आठवून, भाविक जेवढीं म्हणून साधनें

करतो तेवढीं सर्व, ज्ञान न झाल्यास, वायां जातात, असें श्रीसमर्थांनीं निःसंदिग्धपणें म्हटलें आहे.

भाविक काय करीत असतो ? नामस्मरणांत त्याचें चित्त रमतें, मंत्र यंत्र जप ध्यान हीं त्याला आवडतात, तीर्थें व्रतें तपें दानें करण्यांत त्याला सुख होतें, होम याग पुरश्चरणें यांवर त्याची निष्ठा असते, चमत्कार आसनें मुद्रा पूजा यांवर त्याचा विश्वास असतो, प्रतिमापूजा त्याला आवडते, पुराणें महात्में ऐकून त्याला बरें वाटतें, फलश्रुतीकडे त्याचें लक्ष असतें, शकुन ग्रहदशा मुहूर्त हीं त्यास पहावींशीं वाटतात, राजस आणि तामस कर्में तो आचरतो आणि नवस करीत असतो, उपोषणें करून देहाला दंड करणें त्याच्या कार्यक्रमांत येतें, भोग राहाण गोंधळ इत्यादि क्रिया तो करीत असतो, त्यास हटयोग करावासा वाटतो, जीव लावून तो तीर्थें पर्वें महोत्सव करीत असतो, अशा एक ना दोन, अनेक साधनांच्या पाठीमागें तो लागलेला असतो. परंतु श्रीसमर्थ म्हणतात :

**आयुष्य वेचलें वायां । तपें दानें तीर्थाटणें ।**
**देखणीं आसनें मुद्रा । शङ्खचक्र योगधारणा ॥ ५/२२ ॥**
**धोती पोती भुजंगी ते । अष्टांग योगसाधनें ।**
**गोरांजनें धूम्रपानें । पंचाग्नी हिमसाधनें ॥ २३ ॥**

हीं सर्व साधनें, अहं ब्रह्मास्मि या प्रत्ययज्ञानाच्या अभावीं व्यर्थ होत ! श्रीसमर्थांनीं स्पष्ट म्हटलें आहे :

**नणतां वेर्थ कष्टावें । नेणतां तामसी क्रिया ।**
**नेणतां निर्फळी विद्या । नेणणें सर्व घातकी ॥ २१ ॥**

भाविक मनुष्य देहाला अकारण कष्टवील, तो खाणार नाहीं, पिणार नाहीं, लेणार नाहीं, निरोध करून देहाचे हाल करून घेईल, पण काय उपयोग ? सारासार विचार आणि नित्यानित्य विवेक, यांवाचून सर्व फोल होय.

आणि विवेकी काय करीत असतो ?

**विवेकी जाणते घेती । सारासारविचारणा ॥**

हीं दोन चरणें १ ते १५ श्लोकांपर्यंतचीं सारखीं पालुपदें च आहेत.

**शोधितां अष्ट हि काया । पिंडब्रह्मांडनायकु ।**
**तुटला थोर संदेहो । धोका यमयातनेचा ॥ १६ ॥**
**हें वर्म जाणती ज्ञानी । तत्त्वज्ञ जाणते जनीं ।**
**पंचीकर्ण महावाक्यें । सारासारविचारणा ॥ १७ ॥**

या सर्वांचें तात्पर्य इतकें च, भाव ठेवावा, पण त्यांत च सर्व कर्तव्याची परिसमाप्ति करूं नये, ज्ञानांत परिसमाप्ति करावी.

**नित्यानित्यविवेकानें । चुकती यमयातना ।**
**प्रत्ययो पाहणें आतां । रोकडा ब्रह्मनिश्चयो ॥ २८ ॥**
**मी कोण हें चि शोधावें । मायातीत निरंजन ।**
**निसंग होईजे येणें । ज्ञानें मुक्ती सायोज्यता ॥ २९ ॥**

त्या ज्ञानाची थोरवी शेवटच्या मानांत गाइलेली आहे.

**ज्ञानें चि चुकती जन्म । ज्ञानें चि सुटिका घडे ।**
**ज्ञानें चि पाविजे मुख्या । निर्गुणा परमेश्वरा ॥ $\frac{५}{१}$ ॥**

ज्ञानानें संदेह मावळतात, सर्व कळा आणि सिद्धि प्राप्त होतात, बुद्धि तीक्ष्ण होते, धारणा येते, अंगीं धैर्य बाणतें.

ज्ञान म्हणजे काय? जगाला जेथून आरंभ झाला, तें ज्ञान. "अहं ब्रह्मास्मि" हें स्फुरण, तें चैतन्य, तो साक्षी, ती जाणीव कळा, तें ज्ञान, ज्ञान तो च देव.

**अंतःकरण जाणतें तें । प्राण चैतन्य बोलिजे ।**
**जडांश चेतवीतो तो । मुख्य प्राण देहे धरी ॥ १६ ॥**

अंतःकरण म्हणजे जाणीव + प्राण म्हणजे वायु = पुरुष आणि प्रकृति = मूळमाया = अंतरात्मा.

**पंचभूतिक हे काया । शोधितां पांच पंचकें ।**
**कर्णपंचक तें जाणे । प्राणपंचक चेतवी ॥ १८ ॥**

कर्णपंचक म्हणजे अंतःकरणपंचक हें उघड आहे.

**तत्त्वार्थ प्रत्यया आणी । धन्य तो ज्ञानसाधकु ॥ १९ ॥**
**तत्त्वार्थ शोधितां आतां । प्रचीत रोकडी घडे ।**
**मोक्ष तो हा चि जाणावा । तत्त्वबंदविमोचनें ॥ २० ॥**

तत्त्वबंदविमोचन म्हणजे काय, याचा उत्कृष्ट उलगडा ग्रन्थराजांतील ६×२×३० ते ३३ या चार ओव्या वाचून होणार आहे.

**तत्त्वांचें गांठोडें शरीर । याचा पाहातां विचार ।**
**येक आत्मा निरंतर । आपण नाहीं ॥ ६-२-३३ ॥**

अशा पंचभूतात्मक शरीररूपी गांठोड्याची गांठ सोडतां आली म्हणजे मोक्षप्राप्ति झाली, असें समजावें. असा प्रत्यय येण्याला श्रीरामाची कृपा झाली पाहिजे.

**हें ज्ञान रामकृपेनें । धन्य रामउपासना ।**
**रामदास्य घडे ज्याला । ते सर्वत्र रामदास हो ॥ ५/२२ ॥**

---

## श्रीरामदासांकित

**********

देह माझें मन माझें । सर्व नेलें गुरुराजें ॥ १ ॥
आम्ही स्वामीचे अंकित । रामनामें मुद्रांकित ॥ ध्रु० ॥
अहं ब्रह्म उपदेशिलें । अहं गेलें ब्रह्म ठेलें ॥ २ ॥
आली अनुभवाची खूण । खूण केली रामार्पण ॥ ३ ॥
वेणीस्वामी अवघा जाला । विज्ञानासी अंत आला ॥ ४ ॥

# ( १ ) स्फुट प्रकरणें

( १ ) अध्यात्मसार, ( २ ) आनंदवनभुवन, ( ३ ) रामवरदायिनी माता, ( ४ ) श्रीसमर्थांचीं उमटलेलीं पाउलें, ( ५ ) करुणापर प्रकरणें, ( ६ ) अंतरात्मा, ( ७ ) शिकवणीचे २० धडे, ( ८ ) अवांतर.

धर्म, व्यवहार, समाज, राष्ट्र, प्रपंच, परमार्थ इत्यादि बाबतींत विविध प्रकारचा उपदेश या अष्टाक्षरी स्फुट प्रकरणांत जितका आढळतो तितका ग्रन्थराज वगळून इतर वाङ्मयांत आढळत नाहीं. स्वाभाविक आहे. कारणाकारणानें अनेक प्रसंग उद्भवतात व तदनुसार उपदेश केला जातो. यामुळें या प्रासंगिक स्फुट प्रकरणांत संप्रदायाची कोणती च बाजू वगळली गेली नाहीं.

या स्फुट प्रकरणांत हि दोन प्रकरणें श्लोकसंख्येच्या दृष्टीनें विशेष मोठीं असल्यामुळें त्यांचा स्वतंत्र उल्लेख करणें इष्ट होय. हीं दोन प्रकरणें म्हणजे ( १ ) ५७ श्लोकांचें, ६७ व्या क्रमांकाचें **अध्यात्मसार** व ( २ ) ५९ श्लोकांचें, ५८ व्या क्रमांकाचें **आनंदवनभुवन** हें प्रकरण होय. हीं दोन्ही प्रकरणें इतकीं विलक्षण अप्रतिम आहेत कीं, श्रीसमर्थवाङ्मयापैकीं दुसरें कांहीं न वाचतां हीं नुसतीं दोन च प्रकरणें ज्याच्या अवलोकनांत येतील त्याच्या ठिकाणीं, श्रीसमर्थहृदयाची ओळख पटून, श्रीसमर्थांविषयीं अत्यन्त प्रेमादर उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं. काव्य या दृष्टीनें त्यांच्यांत पूर्ण रस भरलेला आहे, पण त्या दृष्टीनें आज आपणांस त्यांच्याकडे पहावयाचें नाहीं. श्रीसमर्थहृदयाचा शोध घेण्यासाठीं आणखी दुसरीकडे कोठें जावयास नको, असें श्रीसमर्थांच्या एखाद्या भक्तास हीं दोन प्रकरणें वाचून वाटलें तरी तें योग्य होईल. इतकी श्रीसमर्थहृदयाची पूर्ण ओळख पटविणारीं हीं दोन प्रकरणें आहेत. श्रीसमर्थहृदयांत प्रवेश करण्यास प्रवृत्त झालेल्या आपणांस तीं दोन्ही प्रकरणें चिंतनपूर्वक साद्यन्त वाचल्याशिवाय पुढें जातां येणार नाहीं.

## ( १ ) अध्यात्मसार

ठकाराचें ठाण करीं चापबाण । माझें ब्रह्मज्ञान ऐसें आहे ॥ हें जसें श्रीसमर्थांचें ब्रह्मज्ञान, त्या च भूमिकेवरचें हें अध्यात्मसार आहे.

सीताशुद्धीसाठीं रामलक्ष्मण वनांत हिंडत असतां त्यांना जगन्मातेनें भेट देऊन वर दिल्याचें व तेव्हांपासून तिला रामवरदायिनी म्हणण्यांत येत असल्याचें आपण ऐकत आलों, पण श्रीसमर्थ म्हणतात, मला तें ठाऊक नाहीं, मला प्रत्यय आला पाहिजे, तर च मी तें खरें मानीन, एरव्हीं मानणार नाहीं !

**मला तो प्रत्ययो नाहीं । मानेना या च कारणें ।**
**मानेना अनुमानेना । काय कैसें कळे चि ना ॥ ३७/४४ ॥**

आपणांस प्रत्यय आला पाहिजे, हा श्रीसमर्थबालकाचा आपल्या आईपाशीं हट्ट ! मला काय पाहिजे आहे, तें तिला ठाऊक आहे !

**मातेसी काय चोरावें । सर्व हि ठाउकें तिला ॥ ५६ ॥**

तिनें जी कृपा रामावर केली व जें वरदान त्यांना दिलें, तें च आज आपणांस प्राप्त झालें पाहिजे. ती जगन्माता आज

**प्रतापगिरीचे ठाईं । आदिशक्ती विराजते ।**
**कामना पुरती तेथें । प्रचीती रोकड्या जनीं ॥ २२ ॥**
**तुळजापुरीची माता । प्रतापें चि प्रगटली ।**
**आदिशक्ती माहंमाया । कुळींची कुळस्वामिणी ॥ २३ ॥**

असें म्हणून त्या आदिशक्तीच्या स्वरूपाचें श्रीसमर्थांनीं केलेलें वर्णन अपूर्व आहे, तें आपण साद्यन्त पाहिलें पाहिजे. जगाला तारणारी आणि मारणारी ती च आदिशक्ति होय.

**शक्तीनें पावती सुखें । शक्ती नस्तां विटंबणा ।**
**शक्तीनें नेटका प्राणी । वैभवें भोगितां दिसे ॥ २६ ॥**
**कोण पुसे अशक्ताला । रोगीसें बराडी दिसे ।**
**कळा नाहीं कांति नाहीं । युक्ती बुद्धी दुरावली ॥ २७ ॥**
**साजिरी शक्ति तों काया । काया माया चि वाढवी ।**
**शक्ती तों सर्व हि सुखें । शक्ती आनंद भोगवी ॥ २८ ॥**
**सार संसार शक्तीनें । शक्तीनें शक्ती भोगिजे ।**
**शक्त तो सर्व हि भोगी । शक्तीवीण दरिद्रता ॥ २९ ॥**
**शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे ।**
**शक्ती युक्ती जये ठाईं । तेथें श्रीमंत धांवती ॥ ३० ॥**

हीं दोन चरणें उच्चारीत असतां श्रीसमर्थांना श्रीमत् भगवद्गीतेंतील शेवटच्या श्लोकाचें स्मरण झालें होतें हें उघड आहे. योगेश्वर कृष्ण आणि धनुर्धर पार्थ एकत्र येणें म्हणजे च युक्तिशक्तींचा संगम होणें होय.

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।**
**तत्र श्रीः**

ब्राह्मतेज आणि क्षात्रतेज एक होतात, तेव्हां यशाची प्राप्ति होते. दोघे आपसांत भांडत राहिले म्हणजे दोघे हि रसातळास जातात. जगावें अशी इच्छा असेल त्यांनीं, श्रीकृष्णार्जुनाच्या काळापासून तों श्रीशिवसमर्थांच्या काळापर्यंत चालत आलेला हा धडा गिरवावा आणि मरावें असे च ज्यांना डोहळे लागले असतील त्यांनीं तो धडा पुसून टाकून आपसांत तंडत रहावें !

**युक्ती ते जाडकळा । विशक्तीसी तुळणा नसे ।**
**अचुक चुकेना कोठें । त्याचीं राज्यें समस्त हि ॥ ३१ ॥**

**युक्तीनें चालती सेना । युक्तीनें युक्ती वाढवी ।**
**संकटीं आपणा रक्षी । रक्षी सेना परोपरी ॥ ३२ ॥**

**उदंड खस्तीचीं कामें । मर्द मारुनि जातसे ।**
**नामर्द काय ते लंडी । सदा दुश्चीत लालची ॥ ३३ ॥**

**फित्व्यानें बुडती राज्यें । खबर्दारी असे चि ना ।**
**युक्ती ना शक्ती ना बेगी । लोक राजी असे चि ना ॥ ३४ ॥**

**बदादी बेकैद सेना । कारबारी च चोरटे ।**
**धण्याची राखणें राजी । कदा काळीं घडे चि ना ॥ ३५ ॥**

**चोरटीं होरटीं तुंदें । नासकें लांच इछिती ।**
**लौंढीचे दुरी घालावे । मारावे राजकारणें ॥ ३६ ॥**

श्रीसमर्थांचा हा कोणाला उपदेश चालला आहे ?

**सेवकां आवरूं नेणे । तो राजा मूर्ख जाणिजे ।**
**मूर्खाचें राज्य राहेना । कोणाचें कोण ऐकतो ॥ ३७ ॥**
**लोकांसी राखणें राजी । तें राज्य प्रबळे बळें ।**

त्रिकालाबाधित सिद्धान्तांचें प्रतिपादन चाललें आहे

**बंद बेबंद जाणावे । तावे तावे परोपरी ॥ ३८ ॥**
**खळ खोंचर काढावें । तंदुळासारिखे खडे ।**

**खरें तें आदरें घ्यावें । खोटें सर्वत्र टाकिती ॥ ३९ ॥**
**सगट सारिखें जेथें । तेथें होतें बराबरी ।**

बुद्धीला भ्रम झाल्याचें च तें लक्षण समजावें.

**सार गार कळेना कीं । जाणते नेणते जनीं ॥ ४० ॥**
**कांहीं येक परीक्षावें । शोधावें बहुतांपरीं ।**
**नेटकें कार्य साधावें । रोधावें कुटिळा जना ॥ ४१ ॥**

श्रीसमर्थ विचारतात, कोठवर हें अध्यात्म चालवावें ?

**असो हें बोलणें जालें । युक्तीवीण कामा नये ।**
**युक्तीला पाहिजे शक्ती । तस्मात् शक्ती प्रमाण हे ॥ ४२ ॥**

कसें आहे श्रीसमर्थांचें अध्यात्म ? नवल नाहीं. मायाब्रह्म वोळखावें । तयास अध्यात्म म्हणावें ॥ अशी त्यांची अध्यात्माची व्याख्या आहे. या प्रकरणांत ते आदिमायेची थोडक्यांत ओळख करून देत आहेत, म्हणून त्यास अध्यात्मसार म्हटलें आहे. आदिमाया, आदिशक्ति, अंतरात्मा एक च. या प्रकरणाचा शेवटचा श्लोक हें च दर्शवितो.

**बोलणें चालणें तीचें । देखणें चाखणें सदा ।**
**अखंड खेळते अंगीं । प्राणीमात्राचिये पाहा ॥ ५७ ॥**

या च आदिमायेनें त्रेतायुगांत रामाच्या वेळीं

**मुक्त केल्या देवकोडी । सर्व हि शक्तीच्या बळें ॥ ४३ ॥**

तें च कार्य आज हि तिनें केलें पाहिजे, असें श्रीसमर्थांचें मागणें होतें. रामाच्या वेळीं

**उन्मत्त रावणें येणें । त्रैलोक्य पीडिलें बळें ।**
**देव ते घातले बंदीं । कैपक्षी राम पावला ॥ ४ ॥**

तसें च आतां हि

**दुःखदारिद्र्यउद्वेगें । लोक सर्वत्र पीडिले ॥ १ ॥**

म्हणून तेव्हां जशी आदिशक्ति रामाच्या रूपानें प्रकट होऊन सर्वांचें रक्षण करिती झाली, तद्वत् तिनें आतां हि प्रकट होऊन आपणांस प्रत्यय आणून

दिला पाहिजे, असा श्रीसमर्थांचा आग्रह ! तसें होण्यास काय करावें, असा त्यांना प्रश्न पडला. त्यांनीं पुष्कळ विचार केला, अनंत कल्पना केल्या आणि ठरविलें

**रक्षिता देव देवांचा । त्याचा उद्धाव इच्छिला ॥४५॥**

ती त्यांची इच्छा आदिमातेनें पूर्ण केली.

**इच्छा पूर्ण करी माता । वाढवी बहुतापरी ।**
**दयाळु मयाळु माता । स्वभावें जाणती कळा ॥४६॥**
**जीवींचा पुरला हेतु । कामना मनकामना ।**
**घमंड जाहालें मोठें । घबाड साधलें बळें ॥४७॥**

श्रीसमर्थांना दुसरी इच्छा तरी कोणती होती ? जगन्मातेपाशीं त्यांचें एक च मागणें होतें. तो त्यांचा हेतु पूर्ण होऊन मोठें घबाड साधलें ! तें घबाड म्हणजे १५९६ च्या ज्येष्ठ शुद्ध १३ स रायगडीं चंद्रसूर्यांनीं जें पाहिलें, त्याशिवाय दुसरें कोणतें असणार ?

**बोलतां भवानी माता । महींद्र दास्य इच्छिती ।**
**बोलणें हें प्रचीतीचें । अन्यथा वाउगें नव्हे ॥५२॥**

हें **अध्यात्मसार** प्रकरण श्रीशिवरायाच्या अभ्युदयकाळाच्या प्रारंभींचें असावें, तर **आनंदवनभुवन** हें त्यांच्या पूर्ण उत्कर्षाच्या शेवटच्या काळांतील असावें, असें मला वाटतें.

## ( २ ) आनंदवनभुवन

आनंदवनभुवन म्हणजे खरोखर वाराणसी व या प्रकरणांत वाराणसीचा च उल्लेख आहे, पण लौकिकांत मात्र हें वर्णन महाराष्ट्राचें आहे, असा समज झाला आहे. " संसार त्यागणें जाणें । आनंदवनभुवना ॥ " म्हणजे येथें महाराष्ट्रांतून संसाराचा त्याग करून काशीस जावयाचें. काशीस जन्मांत ' येकदां ' तरी जावें. कशासाठीं ? " देहेत्यागासी येणें हो । आनंदवनभुवना ॥" त्या काशीस श्रीसमर्थ ' हिंडतां फिरतां ' गेले होते. तेथें " स्वर्गीची लोटली जेथें । रामगंगा महा नदी । तीर्थासी तुळणा नाहीं । आनंदवनभुवनीं ॥ "

इत्यादि उल्लेख पाहिले म्हणजे हें वर्णन महाराष्ट्राचें नसून काशीचें आहे, याविषयीं शंका रहात नाहीं. असें असतां हें वर्णन महाराष्ट्राचें आहे असा समज रूढ कसा झाला? श्रीहनुमंतस्वामींनीं बखरींत तसें म्हटलें आहे म्हणून. हनुमंतस्वामींचा तरी तसा समज कां व्हावा व लोकांना हि आजपर्यंत तो कसा मान्य झाला? याला कारण श्रीसमर्थांची मनोवृत्ति. काशीच्या विद्यापीठाचें जरी ते वर्णन करीत होते, तरी त्यांच्या मनश्चक्षूंपुढून महाराष्ट्र ढळलेला नव्हता. 'हिंदुस्थान बळावल्याच्या' गोष्टी करीत असतां हि

**विजयी दीस जो आहे। ते दीसीं सर्व ऊठती॥**

असे ते महाराष्ट्रांतील त्या वेळेचे शूर वीर मराठे मावळे आणि

**भीम चि धाडिला देवें। वैभवें धांव घेतली॥३१॥**

ते भीमपराक्रमी श्रीशिवराय त्यांना दिसत च होते. एऱ्हीं

**बुडाला औरंग्या पापी। म्लेंच्छसंव्हार जाहला॥३३॥**

**बुडाले भेदवाही ते। नष्ट चांडाळ पातकी॥३४॥**

इत्यादि प्रत्ययवचनें त्यांच्या मुखांतून बाहेर पडलीं नसतीं!

या प्रकरणाविषयीं आजपर्यंत पुष्कळांनीं पुष्कळ विवेचन केलेलें आहे. प्रकरण आकर्षक आहे, पण तसें च तें गूढ हि आहे. श्रीसमर्थ वाङ्मय वाचीत असतां कोणाच्या हि लक्ष्यांत येणारा एक प्रकार विचारांत घेतला, तर या प्रकरणांत भासणारें गूढ थोडेंसें तरी उलगडलें जाईल. आपण असें अनेकदां पाहिलें आहे, रामरावणकालीन देशस्थितीचें आणि लोकस्थितीचें वर्णन करीत असतां श्रीसमर्थांच्या दृष्टीपुढें स्वतःच्या वेळची परिस्थिति उभी राही, दोहोंतील साम्य त्यांना दिसे आणि त्यामुळें ते प्रकट वर्णन जरी रामरावणकालीन स्थितीचें करीत, तरी तें असे शिवराय आणि औरंगजेब यांच्या वेळच्या स्थितीचें! मागील अध्यात्मसार प्रकरणाप्रमाणें या प्रकरणांत तसें च झालें आहे. श्रीसमर्थांच्या मनाची ही ठेवण विचारांत घेऊन हि या प्रकरणांतील सर्व च गूढ विधानांचा आपणांस अर्थ लावतां येईल, असें मात्र नव्हे. तत्कालीन साद्यंत इतिहास आणि बारीक-सारीक प्रकार हि आपणांस कोठें ठाऊक आहेत? ध्यानीं मनीं स्वप्नीं श्रीसमर्थांना एक च ध्यास लागला होता!

उत्तर हिंदुस्थानांत जो धुमाकूळ मांडलेला होता, तो ते ऐकून होते आणि प्रत्यक्ष पाहून हि होते. तीं च स्वप्नें त्यांना पडत !

**स्वप्नीं जें देखिलें रात्रीं । तें तें तैसें चि होतसे ।**
**हिंडतां फिरतां गेलों । आनंदवनभुवना ॥ ७ ॥**

**हे साक्ष देखिली दृष्टी । किती कल्लोळ ऊठिले ।**
**विघ्नघ्ना प्रार्थिलें गेलों । आनंदवनभूवना ॥ ८ ॥**

हें सबंध च प्रकरण या क्षणीं वाचकांच्या हातांत पाहिजे, असें मला वाटतें, म्हणून तें येथें देण्याचें माझ्या मनांत येतें. कारण मला असें म्हणावयाचें आहे कीं,

**स्वधर्माआड जें विघ्नें । तें तें सर्वत्र ऊठिलीं ।**

आणि तीं सर्व

**लाटिलीं कुटिलीं देवें । दापिलीं कापिलीं बहु ॥ ९ ॥**

या नवव्या श्लोकापासून तों चोविसाव्या श्लोकापर्यंतचें वर्णन रामरावणाच्या वेळचें आहे कां शिवमोगलकाळाला उद्देशून आहे, असा वाचकांस मोह उत्पन्न करणारें आहे. परंतु माझें स्पष्ट मत आहे कीं तें मराठ्यांच्या पराक्रमाला अनुलक्षून च आहे ! फक्त मला अजून उलगडा होत नाहीं तो २२ आणि २३ या श्लोकांचा.

**मंगळें वाजती वाद्यें । माहांगणासमागमें ।**
**आरंभीं चालिला पुढें । आनंदवनभुवनीं ॥ २२ ॥**

**राशभें राखिलीं मागें ।**

मागें म्हणजे रावणाच्या वेळीं—‘ गणेश गाढवें वळी ’

**। तेणें रागें चि चालिला ।**
**सर्वत्र पाठीसी फौजा । आनंदवनभुवनीं ॥ २३ ॥**

हा रावणाच्या वेळचा गणेशाचा उल्लेख शिवकालीन कोणा पुरुषासंबंधानें आहे, तें निश्चित सांगतां येत नाहीं. हुबेहुब हा च संबंध श्रीसमर्थवाग्देवता-मंदिरांतील बाडांक ६४ तील श्रीसमर्थांच्या एका अप्रकाशित स्फुटांत आलेला **श्रीरामदासी संशोधन** प्रथम खंड या ग्रन्थांत नमूद आहे, तो असा :

**श्री गणाधिपती फरश घेउनी । मुशकारूढ होउनी ।**
**आंकुश लखलख आवनी । आकाश बिंबलें ॥ १३ ॥**

**ऐसा देव विघ्नहरु । वेष्टूनि गणाचा दळभारु ।**
**स्वामी कार्तिका सारिखा येकांग वीरु ।**
**वीरभद्र हि चालिला ॥ १६ ॥**

**आवघिया पुढें लंबोदरु । त्याचे पाठीसी मुख्येश्वरु**
**सकळ गणाचा दळभारू । साठी सहस्रें ॥ १७ ॥**

'लंबोदरु म्हणजे मोरो त्रिमल व मुख्येश्वरु म्हणजे शिवाजी महाराज असा कांहीं संकेत यांत आहे कीं काय' अशी त्या ग्रन्थांत मीं पृच्छा करून ठेवली आहे. कोडें च आहे.

पुढें २५ व्या श्लोकापासून तों ४० पर्यंत उघड च शिवकालाचें व शिवोत्कर्षाचें वर्णन असून श्रीसमर्थांनीं कृतार्थतेमुळें आपणांस वाटणारा आनंद व्यक्त केला आहे आणि नंतर ४१ पासून अखेरपर्यंत राम आणि रामवरदायिनी माता यांच्या कृपेचें हें फळ होय, असें सांगून त्याचा आस्वाद घेण्याचें भाग्य महाराष्ट्रास यथावकाश लाभेल असा आशीर्वाद दिला आहे !

असें हें महत्त्वाचें प्रकरण आहे. त्यांत आपणांस श्रीसमर्थांचें अंतरंग बरेंचसें पहावयास मिळालें. सर्व कांहीं उलगडा मला करतां आला, असें मी मानीत नाहीं. मी चांचपडत च आहें. प्रकरण मोठें आहे, पण तें सर्वांच्या नजरेपुढें नेहमीं असावें, म्हणून संपूर्ण सादर करणें इष्ट वाटतें. त्याचा प्रत्येक श्लोक वाचून, थांबून, विचार च केला पाहिजे. असें केलें म्हणजे श्रीशिवसमर्थ यांचें स्वर्गीय परस्परप्रेम वाचकांच्या निदर्शनास येऊन त्यांना गुदगुल्या होतील, देवानें मनांत आणलें म्हणजे सर्व विघ्नांचा नाश होऊन भक्तांचे सर्व मनोरथ पूर्ण होतात असा विश्वास वाटेल, आणि

**देव सर्वस्व भक्तांचा । देव भक्त दुजें नसे ॥ ४५ ॥**

हा बोध होऊन श्रीसमर्थचरणीं भृंगवत् त्यांचें चित्त जडून राहील.

(५८)

जन्मदुःखें जरादुखें। नित्य दुःखें पुन्हपुन्हा।
संसार त्यागणें जाणें। आनंदवनभुवना ॥ १ ॥

वेधलें चित्त जाणावें। रामवेधीं निरंतरीं।
रागें हो वीतरागें हो। आनंदवनभुवना ॥ २ ॥

संसार वोढितां दुखें। ज्याचें त्यासी च ठाउकें।
परंतु एकदां जावें। आनंदवनभुवना ॥ ३ ॥

न सोसे दुख तें होतें। दुख शोक परोपरीं।
येकाकी येकदां जावें। आनंदवनभुवना ॥ ४ ॥

कष्टलों कष्टलों देवा। पुरे संसार जाहला।
देहत्यागासी येणें हो। आनंदवनभुवना ॥ ५ ॥

जन्म ते सोसिले मोठे। अपाय बहुतांपरी।
उपायें धाडिलें देवें। आनंदवनभुवना ॥ ६ ॥

स्वप्नीं जें देखिलें रात्रीं। तें तें तैसें चि होतसे।
हिंडतां फिरतां गेलों। आनंदवनभुवना ॥ ७ ॥

हे साक्ष देखिली दृष्टीं। किती कल्लोळ ऊठिले।
विघ्नघ्ना प्रार्थिलें गेलों। आनंदवनभूवना ॥ ८ ॥

स्वधर्माआड जें विघ्नें। तें तें सर्वत्र ऊठिलीं।
लाटिलीं कुटिलीं देवें। दापिलीं कापिलीं बहु ॥ ९ ॥

विघ्नाच्या उठिल्या फौजा। भीम त्यावरी लोटला।
घाडिलीं चिर्डिलीं रागें। रडविलीं बडविलीं बळें ॥ १० ॥

हाकिलीं टाकिलीं तेणें। आनंदवनभुवनीं।
हांक बोंब बहु जाली। पुढें खतल्ल मांडिलें ॥ ११ ॥

खौळले लोक देवाचे। मुख्य देव चि ऊठिला।
कळेना काय रे होतें। आनंदवनभुवनीं ॥ १२ ॥

स्वर्गीची लोटली जेथें। रामगंगा माहां नदी।
तीर्थासी तुळणा नाहीं। आनंदवनभुवनीं ॥ १३ ॥

ग्रंथीं जे वर्णिली मागें। गुप्तगंगा माहां नदी।
जळांत रोकडे प्राणी। आनंदवनभुवनीं॥ १४॥

सकळ देवांची साक्षी। गुप्त उदंड भूवनें।
सौख्य च पावणें जाणें। आनंदवनभुवना॥ १५॥

त्रैलोक्य चालिलें तेथें। देव गंधर्व मानवी।
ऋषी मुनी माहां योगी। आनंदवनभुवनीं॥ १६॥

आक्रा आक्रा बहु आक्रा। काय आक्रा कळे चि ना।
गुप्त तें गुप्त जाणावें। आनंदवनभुवनीं॥ १७॥

त्रैलोक्य चालिल्या फौजा। सौख्य बंदविमोचनें।
मोहीम मांडली मोठी। आनंदवनभुवनीं॥ १८॥

सुरेश उठिला आंगें। सुरसेना परोपरी।
विकटें कर्कशें यानें। शस्त्रपाणी माहां बळी॥ १९॥

देव देव बहु देव। नाना देव परोपरीं।
दाटणी जाहली मोठी। आनंदवनभुवनीं॥ २०॥

दिग्पती चालिले सर्वै। नाना सेना परोपरीं।
वेष्टीत चालिले सकळै। आनंदवनभूवनीं॥ २१॥

मंगळें वाजती वाद्यें। माहांगणासमागमें।
आरंभीं चालिला पुढें। आनंदवनभुवनीं॥ २२॥

राशभें राखिलीं मागें। तेणें रागें चि चालिला।
सर्वत्र पाठीसीं फौजा। आनंदवनभुवनीं॥ २३॥

अनेक वाजती वाद्यें। ध्वनीकल्लोळ ऊठिला।
छबीनें डोलती ढाला। आनंदवनभूवनीं॥ २४॥

विजई दीस जो आहे। ते दीसीं सर्व ऊठती।
आनर्थ मांडला मोठा। आनंदवनभूवनीं॥ २५॥

देव चि तुष्टला होता। त्याचे भक्तीस भुलला।
मागुता क्षोभला दुःखें। आनंदवनभुवनीं॥ २६॥

कल्पांत मांडला मोठा । म्लेंचदैत्य बुडावया ।
कैपक्ष घेतला देवीं । आनंदवनभूवनीं ॥ २७ ॥

बुडाले सर्व ही पापी । हिंदुस्थान बळावलें ।
अभक्तांचा क्षयो जाला । आनंदवनभूवनीं ॥ २८ ॥

पूर्वीं जे मारिले होते । ते चि आतां बळावले ।
कोपला देव देवांचा । आनंदवनभूवनीं ॥ २९ ॥

त्रैलोक्य गांजिलें मागें । ठाउकें विवेकी जना ।
कैपक्ष घेतला रामें । आनंदवनभूवनीं ॥ ३० ॥

भीम चि धाडिला देवें । वैभवें धांव घेतली ।
लांगूळ चालिलें पुढें । आनंदवनभूवनीं ॥ ३१ ॥

येथून वाढला धर्मु । रमा धर्मसमागमें ।
संतोष मांडला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ ३२ ॥

बुडाला औरंग्या पापी । म्लेंचसंव्हार जाहाला ।
मोडलीं मांडलीं छेत्रें । आनंदवनभुवनीं ॥ ३३ ॥

बुडाले भेदवाही ते । नष्ट चांडाळ पातकी ।
ताडिले पाडिले देवें । आनंदवनभूवनीं ॥ ३४ ॥

गळाले पळाले मेले । जाले देशधडी पुढें ।
निर्मळ जाहाली पृथ्वी । आनंदवनभुवनीं ॥ ३५ ॥

उदंड जाहालें पाणी । स्नान संध्या करावया ।
जप तप अनुष्ठानें । आनंदवनभुवनीं ॥ ३६ ॥

नाना तपें पुन्हश्चर्णें । नाना धर्म परोपरीं ।
गाजली भक्ती हे मोठी । आनंदवनभुवनीं ॥ ३७ ॥

लिहिला प्रत्ययो आला । मोठा आनंद जाहाला ।
चढता वाढता प्रेमा । आनंदवनभुवनीं ॥ ३८ ॥

बंड पाषांड उडालें । शुध अध्यात्म वाढलें ।
राम कर्ता राम भोक्ता । आनंदवनभुवनीं ॥ ३९ ॥

देवाळयें दीपमाळा । रंगमाळा बहुविधा ।
पूजिला देव देवांचा । आनंदवनभुवनीं ॥ ४० ॥

रामवरदायनी माता । गर्द घेउनी ऊठिली ।
मर्दिले पुर्वीचे पापी । आनंदवनभुवनीं ॥ ४१ ॥

प्रतेक्ष चालिली राया । मूळमाया समागमें ।
नष्ट चांडाळ ते खाया । आनंदवनभुवनीं ॥ ४२ ॥

भक्तांसी रक्षिलें मागें । आतां हि रक्षिते पाहा ।
भक्तांसी दीधलें सर्वे । आनंदवनभुवनीं ॥ ४३ ॥

आरोग्य जाहाली काया । वैभवें सांडिली सीमा ।
सार सर्वस्व देवाचें । आनंदवनभुवनीं ॥ ४४ ॥

देव सर्वस्व भक्तांचा । देव भक्त दुजें नसे ।
संदेह तुटला मोठा । आनंदवनभुवनीं ॥ ४५ ॥

देव भक्त येक जाले । मिळाले जीव सर्व हि ।
संतोष पावले तेथें । आनंदवनभूवनीं ॥ ४६ ॥

सामर्थ्यें येशकीर्तीचीं । प्रतापें सांडिली सीमा ।
ब्रीदें चि दिधलीं सर्वें । आनंदवनभुवनीं ॥ ४७ ॥

राम कर्ता राम भोक्ता । रामराज्य भुमंडळीं ।
सर्वस्व मी च देवाचा । माझा देव कसा म्हणों ॥ ४८ ॥

हें चि शोधुनी पाहावें । राहावें निश्चळीं सदा ।
सार्थक श्रवणें होतें । आनंदवनभुवनीं ॥ ४९ ॥

वेद शास्त्र धर्मचर्चा । पुराणें माहात्में किती ।
कवित्वें नूतनें जीर्णें । आनंदवनभुवनीं ॥ ५० ॥

गीत संगीत सामर्थ्यें । वाद्यकल्लोळ ऊठिला ।
मिळाले सर्व अर्थार्थी । आनंदवनभूवनीं ॥ ५१ ॥

वेद तो मंद जाणावा । सिद्ध आनंदभूवनीं ।
आतुळ महिमा तेथें । आनंदवनभुवनीं ॥ ५२ ॥

मनासी प्रचीत आली । शब्दीं विश्वास वाटला ।
कामना पुरती सर्वै । आनंदवनभुवनीं ॥ ५३ ॥

येथुनी वांचती सर्वै । ते ते सर्वत्र देखती ।
सामर्थ्य काये बोलावें । आनंदवनभुवनीं ॥ ५४ ॥

उदंड ठेविलीं नामें । आपस्तुती च मांडिली ।
ऐसें हें बोलणें नाहीं । आनंदवनभुवनीं ॥ ५५ ॥

बोलणें वाउगें होतें । चालणें पाहिजे बरें ।
पुढें घडेल तें खरें । आनंदवनभूवनीं ॥ ५६ ॥

स्मरलें लिहिलें आहे । बोलता चालता हरी ।
काये होईल पाहावें । आनंदवनभुवनीं ॥ ५७ ॥

महिमा तो वर्णवेना । विशेष बहुतांपरीं ।
विद्यापीठ तें आहे । आनंदवनभुवनीं ॥ ५८ ॥

सर्वसद्या कळा विद्या । न भूतो न भविष्यति ।
वैराग्य जाहालें सर्वै । आनंदवनभुवनीं ॥ ५९ ॥

प्रत्यक्ष प्रकरण वाचल्यावर वाचकांना माझें म्हणणें मान्य होईल कीं, रामकालीन आणि शिवकालीन लोकस्थितींतील साम्य पाहून च रामकालीन स्थितीचें वारंवार वर्णन करून लोकांना बोध करण्याची स्फूर्ति श्रीसमर्थांना होत असावी. याचें ठळक उदाहरण अवघ्या नऊ च श्लोकांच्या ६४ व्या प्रकरणांत उत्कृष्ट पहावयास मिळतें. या च प्रकरणाच्या अनुरोधानें वाचकांच्या पाहण्यांत तें हि प्रकरण आलेलें असावें.

राम हा देव देवांचा । देव प्रतक्ष सोडिले ।
गाजली गोष्टी वैकुंठीं । माजली सचराचरीं ॥ ६४/१ ॥

रावणु तर्टकु मोठा । त्रैलोक पीडिलें बळें ।
पीडिले, पाळिले सर्वै । रामव्याघ्रपंचाननें ॥ ३ ॥

असे सात श्लोकांपर्यंत रामरावणकाळांत संचार करीत असतां एकदम विद्यमान काळाकडे वळून श्रीसमर्थ म्हणतात :

प्रस्तुत कोपला देवो । देवद्रोही पुरे पुरे ।
सर्व हि चालिल्या फौजा । सेनाभार परोपरीं ॥ ८ ॥
देव तो चेतला आहे । भडसा पुरवीतसे ।
काये होईल पाहावें । राहावें सुखभुवनीं ॥ ९ ॥

देवद्रोह्यांनो, पुरे करा आतां आपला बाजार, तुमचे चाळे बंद पाडण्यासाठीं आणि सज्जनांच्या भडसा म्हणजे इच्छा पूर्ण करण्यासाठीं च सुखभुवनीं म्हणजे आनंदवनभुवनीं पुनरपि रामावतार प्रकट झाला आहे! श्रीशिवछत्रपतींविषयीं श्रीसमर्थांच्या काय कल्पना होत्या, त्याला आणखी कांहीं पुराव्याची आवश्यकता आहे काय? तथापि तो हि पुरावा ओघाओघानें पुढें येईल.

## ( ३ ) रामवरदायनी माता

तुळजापुरच्या देवीला किंवा प्रतापगडच्या देवीला श्रीसमर्थ जरी रामवरदायनी म्हणत असले, तरी रामवरदायनी माता म्हणजे जगन्माता, मूळमाया, आदिशक्ति, अंतरात्मा होय. मागील दोन्ही प्रकरणांत तिचा उल्लेख आला च आहे, त्याशिवाय या मातेचें वर्णन ३३, ३६, ३७, ५३ वगैरे प्रकरणांत हि आहे. ती जशी रामाला वर देती झाली, तसा तिनें श्रीसमर्थांना आणि श्रीशिवरायांना वर दिला होता आणि जे कोणी तिचे अनन्य उपासक होतील त्या सर्वांना ती वरदायनी होणारी आहे, अशी श्रीसमर्थांची साक्ष आहे. ती त्यांची उपासना होती. तिचा त्यांना मोठा आधार होता. ते सर्वस्वीं तिच्यावर भरंवसा टाकून निश्चिंतपणें देशभर वावरत होते.

देखिली तुळजा माता । निवालों अंतरीं सुखें ।
तुटली सर्व हि चिंता । थोर आधार वाटला ॥ ३३/१ ॥
संसार पाहातां मागें । पाळिलें सर्व हि कुळां ।
प्रस्तुत प्रत्ययो आतां । रक्षिते बहुतांपरीं ॥ २ ॥
पुर्विते कामना सर्वै । इच्छा पूर्ण मनोगतें ।
धन्य हा देव लोभाळु । सांभाळ करितो सदा ॥ ३ ॥
आघात संकटें वारी । निवारी दुष्ट दुर्जना ।
संकटीं भर्वसा मोठा । तत्काळ काम होतसे ॥ ४ ॥

असा श्रीसमर्थ आपला अनुभव निवेदन करीत आहेत. ३६ व्या प्रकरणांत तर, तिनें रामाला जसा वर दिला होता, तसा आपणांस हि दिला, असें

स्पष्ट सांगून श्रीशिवरायाच्या अभ्युदयासाठीं श्रीसमर्थांनीं तिच्यापाशीं याचना केली आहे. त्या याचनेचे तेवढे च श्लोक सर्वतोमुखीं झालेले आहेत, परंतु त्या लहानशा प्रकरणावरून, श्रीसमर्थहृदयांत सांठविलेली जी तळमळ आपल्या प्रत्ययास येत आहे, ती सर्वांच्या नजरेंत कायमची भरावी, म्हणून तें प्रकरण डावलून आपणांस पुढें जातां येणार नाहीं.

हें प्रकरण श्रीसमर्थांनीं कोणत्या प्रसंगीं रचलें, ती हकिकत सर्वविश्रुत आहे. तिचा संदर्भ प्रत्यक्ष प्रकरणांत हि आला आहे. श्रीसमर्थांच्या संबंधानें वडिलांनीं तुळजापुरच्या देवीला कांहीं नवस केला होता, तो फेडावयाचा तसा च राहिला होता, तो श्रीसमर्थांनीं स्वतः च प्रतापगडच्या देवीपुढें फेडला. तो नवस फेडून तिचे उतराई होत असतां, तिच्यापाशीं श्रीसमर्थांनीं श्रीशिवरायांसाठीं आणखी रदबदली करून ठेवली ! श्रीसमर्थ तुमच्या आमच्याशीं इतक्या मोकळेपणानें न बोलोत, पण त्या प्रकरणांत आपलें हृदय मोकळें करून जगन्मातेपाशीं त्यांनीं जें हितगुज केलें आहे, तें आज आपणांस आडून तरी ऐकावयास मिळत आहे, हें आपलें भाग्य म्हणावयाचें.

**प्रपंचीं आमचे कुळीं । तुळजा कुळदेवता ।**
**नेणतां ऐकिलें होतें । जाणतां स्मरलें मनीं ॥ १ ॥**
**श्रेष्ठांची कामना होती । पुर्विली मनकामना ।**
**नौस जो नौसिला होता । तो त्यापासुनि चुकला ॥ २ ॥**
**पुत्र चि घेतला त्यांचा । जोगी करूनि सोडिला ।**
**ख्यानती दाविली मोठी । न्याय नीति चुके चि ना ॥ ३ ॥**
**वैराग्य घेतलें पोटीं । सर्व संसार सांडिला ।**
**तुझिया दर्शना आलों । कृपादृष्टीं नवाजिलों ॥ ४ ॥**
**तुझा नवाजिला आहे । महंत म्हणती जनीं ।**

आम्हांस ठाऊक नव्हतें !

**तुझें चि सर्व हि देणें । सर्व हि तुजपासुनी ॥ ५ ॥**
**संसारीं मोकळें केलें । आनंदीं ठाव दिधला ।**
**तोडिली सर्व हि चिंता । तूं माया सत्य जाहलें ॥ ६ ॥**
**पुर्विलें काय मी सांगों । इच्छा पूर्ण परोपरीं ।**
**मागील आठवेनासें । केलें आश्चीर्य वाटलें ॥ ७ ॥**

सदानंदीं उदो जाला । सुखसंतोष फावला ।
पराधेनता गेली । सत्ता उदंड चालिली ॥ ८ ॥
उदंड ऐकिलें होतें । रामासी वरु दिधला ।
मी दास रघुनाथाचा । मज हि वरदायनी ॥ ९ ॥
श्रेष्ठांचा नौस जो होता । तो मी फेडीनसें म्हणे ।
पुष्प देउनि उतराई । ऐसें हें कल्पिलें मनीं ॥ १० ॥
तुळजापुर ठाकेना । चालिली पश्चिमेकडे ।
पारघाटीं जगन्माता । सद्य येउनी राहिली ॥ ११ ॥
ऐसें हे ऐकिलें होतें । हेत तेथें चि पावला ।
पुष्पाची कल्पना होती । तेथें पुष्प चि दिधलें ॥ १२ ॥
ऐसी तूं दयाळु माता । हेमपुष्प चि घेतलें ।
संतुष्ट भक्तिभावानें । त्रैलोक्यजननी पहा ॥ १३ ॥
थोड्यानें श्लाघ्यता केली । थोर संतोष पावलों ।
उत्तीर्ण काय म्यां व्हावें । तुझे कृपेंसी रोकडें ॥ १४ ॥
तुझें चि तुजला दिल्हें । म्यां हें कोठुनि आणिलें ।
संकटें वारिलीं नाना । रक्षिलें बहुतांपरीं ॥ १५ ॥

त्या नाना संकटांची आपणांस कोठें कल्पना आहे ?

जीवींचें जाणते माता । तूं माता मज रोकडी ।
लोकांच्या चुकती माता । आचुक जननी मला ॥ १६ ॥
येक चि मागणें आतां । द्यावें तें मजकारणें ।

श्रीसमर्थांच्या जीवाला दुसरी कोणती च तळमळ लागलेली नव्हती, हें "येक चि" शब्दानें चांगलें व्यक्त होत आहे. मला एक च हवें आहे, दुसरें कांहीं नको, देणें तर तें दे,

तुझा तूं वाढवी राजा । सीघ्र आम्हा चि देखतां ॥ १७ ॥
दुष्ट संव्हारिले मागें । ऐसें उदंड ऐकतों ।
परंतु रोकडें कांहीं । मूळ सामर्थ्य दाखवी ॥ १८ ॥
देवाचीं राहिलीं सत्वें । तूं सत्व पाहसी किती ।
भक्तांसीं वाढवीं वेगीं । इच्छा पूर्ण परोपरीं ॥ १९ ॥
रामदास म्हणे माझें । सर्व आतुर बोलणें ।
क्षमावें तुळजे माते । इच्छा पूर्ण चि ते करी ॥ २० ॥

उतारे मोठाले होत आहेत, हें मला दिसतें पण त्यांत च श्रीसमर्थांच्या हृदयाचा पूर्ण आविर्भाव होत असल्यामुळें त्यांचा संक्षेप करणें मला शक्य नव्हे. मी एकवार वाचकांना कायमचें आश्वासन देऊन ठेवतों, उतारे देतांना वाचकांचें स्मरण होऊन मी थबकत असतों व संक्षेप करण्याचा होईल तितका प्रयत्न करीत असतों, परंतु जेव्हां वाचकांचें विस्मरण होऊन केवळ श्रीसमर्थांचीं उमटलेलीं पाउलें च दिसूं लागतात, तेव्हां माझा नाइलाज होतो. मागाहून वाचकांचें स्मरण होतें आणि वाटतें, पण काय उपयोग ? अशा वेळीं वाचकांनीं क्षमा केली पाहिजे.

## ( ४ ) श्रीसमर्थांचीं उमटलेलीं पाउलें

तीं च आतां आपण आणखी कांहीं पाहूं. आधीं केलें मग सांगितलें ही श्रीसमर्थचरित्र जाणण्याची गुरुकिल्ली लक्ष्यांत घेतली म्हणजे त्यांच्या प्रत्येक उपदेशपर बोलण्यांत आपणांस त्यांचें चरित्र दिसलें पाहिजे. आपलें अमुक सांगणें आत्मप्रत्ययाचें आहे, असें ते जेव्हां म्हणतात, तेव्हां संशयाला, जागा च उरत नाहीं. दोन्ही तऱ्हेचीं चार पांच उदाहरणें पाहूं.

### ( श्री ) देव आणि भक्त

या प्रकरणांत तुम्हांआम्हांस उपदेश आहे आणि त्यांचें चरित्र हि स्पष्ट आहे. आपला प्रत्यय सांगून ते उपदेश करीत असतां आपण तो उपदेश मनावर न घेणें हें मला मोठें पाप वाटतें. आमच्या बुद्धींत त्यांनीं च पालट करावा.

**भक्तांचा देव लोभाळु । भक्तांचें मनींचें करी ।**
**हारद्र जीवीचें जाणें । राजा त्रिलोक्यनाथ कीं ॥ १ ॥**

**भक्तांसीं त्याविणें नाहीं । त्यास हि भक्त दुलभु ।**
**विदेशीं येक ते दोघे । वेगळे नव्हती कदा ॥ २ ॥**

**सांपडे भक्त जो जैसा । तैसा तो होतसे तया ।**
**सर्व हि आपणापासीं । मनासी पुसणें बरें ॥ ६ ॥**

**देव तो दयाळु मोठा । अन्याय क्षमणें बहु ।**
**भक्तांचा साभिमानी तो । बुद्धिदाता परोपरी ॥ ४ ॥**

**कोण रे चालवी ऐसें । नुन्य (न्यून) तें पुरतें करी ।**
**उभा चि पाठीसी देवो । जेव्हां तेव्हां क्षणक्षणा ॥ ५ ॥**

**साहेब जाहाला मोठा । कोण वेळेसी पावतो ।**
**धणी ते लालची मोठे । चोरटे सेवकु जनीं ॥ ६ ॥**

**विश्वास येकमेकाचा । कदापि न घडे जनीं ।**
**जपती येकमेकांला । परस्परें चि घातकी ॥ ७ ॥**

**मारिती विष देतानी । स्वामी सेवक ते पाहा ।**
**आडोन चालते सृष्टी । विपट पडिलें सदा ॥ ८ ॥**

**देवासी तुळणा कैची । पाहों जातां भूमंडळीं ।**
**भक्त होईल देवाचा । संसार सर्व सांडुनी ॥ ९ ॥**

**त्यास बोढेल हे सृष्टी । येदर्थी संशय नसे ।**
**प्रत्यय वाक्य नेमाचें । कित्येक जाणती जनीं ॥ १० ॥**

या दहा श्लोकांतील शब्दाशब्दांत श्रीसमर्थांचीं पाउलें उमटलेलीं वाचकांस दिसतील, त्यांवर मस्तक ठेवून येथें च थांबावें, असें त्यांना वाटेल ! आपल्या प्रत्ययाच्या आणि नेमाच्या म्हणजे निश्चयाच्या गोष्टी श्रीसमर्थ सांगत असतां त्यावर विश्वास न टाकण्याइतके आम्ही पापी खास नाहीं. या दहा श्लोकांचें विवरण करण्यास मजजवळ शब्द नाहींत. ते दहा श्लोक मी कंठीं धारण करूं इच्छितों व वाचकांनीं हि तसें करावें, अशी त्यांना विनंति करतों. ते वारंवार सावकाश वाचावे, शब्दाशब्दाचा अर्थ मनीं आणावा आणि जाववेल तितकें श्रीसमर्थांच्या जवळ जावें. भक्त होईल देवाचा । संसार सर्व सांडुनी । त्यास बोढेल हे सृष्टी । येदर्थी संशय नसे ॥ हीं चरणें श्रीसमर्थचरित्र च प्रत्यक्ष पटवून देत आहेत. भक्त म्हणवून घेणें सोपें असेल, भक्त होणें कठीण आहे !

त्या काळीं सर्व देशभर, निरनिराळ्या प्रांतांत, भिन्न भिन्न भाषा बोलणाऱ्या लोकांत, दऱ्याखोऱ्यांत श्रीसमर्थ हिंडत, तेव्हां ते एकटे च असत का कोणाची सोबत असे, त्यांच्यावर काय प्रसंग आले असतील, त्यांतून ते कसे निभावले असतील, त्यांचें रक्षण कोणीं केलें असेल, इत्यादि अनेक प्रश्न माझ्या चिंतनांत उद्भवत. त्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें, मागें स्फुट ओव्यांत आपण पाहिलीं, तीं च या दहा श्लोकांत आणखी एकवार मिळत

आहेत. श्रीसमर्थ केव्हां हि एकटे नसत च मुळीं. श्रीसमर्थप्रतापांत गिरिधरांनीं म्हटलें आहे, तें च खरें.

**समर्थासी जगोद्धार करणें आहे।**
**समर्थतनु ते श्रीरामतनु पाहें।**
**दोनी तपें श्रीरामें रक्षिली काया हे।**
**धर्मस्थापनेकारणें॥ स. प्र. ३-२५॥**

दोनी तपें म्हणजे पुरश्चरणाचीं बारा वर्षें व तीर्थाटणाचीं बारा वर्षें, मिळून १५४२ ते १५६६ अशीं चोवीस वर्षें.

**समर्थासी रक्षित दोनी धनुर्धारी।**
**समागमें गुप्त असती विपिनविहारीं।**
**कोठें न विसंबती येक क्षणभरी।**
**आत्माराम समर्थस्वामी॥ २६॥**

वरील अष्टाक्षरी दहा श्लोकांत श्रीसमर्थ स्वतः हें च सांगत आहेत—

**विदेशीं येक ते दोघे। वेगळे नव्हती कदा॥ २॥**
**उभा चि पाठीसी देवो। जेव्हां तेव्हां क्षणक्षणा॥ ५॥**

## (रा) राम आणि रामदास

या च पांचव्या प्रकरणाच्या पुढच्या दहा श्लोकांत या दोघांचें नातें सांगितलें आहे.

**भक्ताला काय उणें रे।देव त्रैलोक्य वर्तवी।**
**तो देव आपुला जाला। वैभवा कोण पुसतें॥ ११॥**
**टाकितां लाविते मागें। देव दाता चि जाहला।**
**घ्यावें तें कोणतें किती। त्रैलोक्य भरलें असे॥ १२॥**
**आपण सर्व देवाचा। देवाचें आपणाकडे।**
**किती घ्यावें किती न्यावें। भोगावें कोण तें किती॥ १३॥**
**दाता अनंत भुजांचा। भडसा पुरवीतसे।**
**पुरे पुरे पुरे आतां। देव देतां विटे चि ना॥ १४॥**
**भक्त तो घेईना कांहीं। देवें त्रैलोक्य दीधलें।**
**सर्व हि सांडिलें दोघीं। येकमेकासी लाविती॥ १५॥**

**ऐसी हे प्रीति दोघांची । चढती वाढती सदा ।**
**दोघे हि तापसी योगी । वियोगी नव्हती कधीं ॥ १६ ॥**

कोण हें दैवी प्रेम! भक्ताचें केवढें हें भाग्य!! जन्मास येऊन आणखी काय साधावयाचें असतें!!! हें श्रीसमर्थांशिवाय दुसऱ्या कोणाचें चरित्र आहे? दोघे हि तापसी योगी। या वचनांत श्रीसमर्थांचें पाऊल उमटलेलें दिसतें, नाहीं काय? राम हि तापसी आणि रामदास हि तापसी! त्यांनीं चौदा वर्षें वनवासांत काढलीं आणि यांनीं चोवीस वर्षें तप आणि तीर्थाटण केलें. त्यांच्या मस्तकीं पिंगटा जटा शोभूं लागल्या आणि यांनीं हि योगदीक्षा घेऊन तो च वेष धारण केला!

**भक्तानें अंतरीं देवो । जाणोनि धरिला बळें ।**
**देव हि विसंभेना कीं । सोडीना भक्तवछळु ॥ १७ ॥**

असें नातें श्रीसमर्थांशीं जोडावें तेव्हां समर्थभक्त म्हणवावें, एरव्हीं समर्थभक्त म्हणवून घेण्याची लाज वाटावी!

**भक्ताचें नुन्य सोसीना । नुन्य तें पुरतें करी ।**
**भक्ताचा भार वाहीतो । ब्रीदें चि चालिलीं असे ॥ १८ ॥**

परंतु आम्ही पापी--श्रद्धाहीन, भावहीन, आचारहीन! साक्षात् श्रीसमर्थ आपला अनुभव सांगत असतां त्यावर आम्हीं भरंवसा ठेवूं नये आणि निश्चय करूं नये, हें केवढें पाप! त्याचें क्षालन कसें व्हावें? वृथा समर्थभक्त म्हणवून कां घ्यावें! कोणीं म्हटल्यास, ते शब्द ऐकूं नयेत, कान झांकून घ्यावे, तोंड अंधारांत लपवावें. किंवा, दुसरा पर्याय म्हणजे त्यांच्या दयेला आपण पात्र होऊं अशी भक्ति करावी!

**अभावें भर्वसा नाहीं । मूढाला निश्चय नसे ।**
**दया हे थोर देवाची । भक्ताला वज्रपंजरु ॥ १९ ॥**

**रामदास म्हणे माझा । राम स्वामी दयानिधी ।**
**सोडिले बंद देवाचे । तो हा त्रयलोक्यनायकु ॥ २० ॥**

ही श्रीसमर्थांची प्रत्ययाची, धीराची आणि विश्वासाची वाणी नास्तिकाला हि आस्तिक बनवील!

## ( म ) फिरणें बहुतां ठायीं

सर्व देशभर संचार करीत असतां श्रीसमर्थ कसे वागत असावे, याची किंचित् कल्पना ४२ व्या प्रकरणावरून होण्यासारखी आहे.

**फिरणें बहुतां ठाईं । संसार हा बहुचकु ।**
**बहुतांसी बोलणें लागे । गांवोगांवीं घरोघरीं ॥ १ ॥**

**घरींचीं माणसें राजी । राखावीं तीं परोपरी ।**
**भंगलें चित्त जाणावें । रक्षावें बहुतांपरीं ॥ २ ॥**

**अंतरीं प्रीति राखावी । शब्दाशब्दीं परोपरी ।**
**तुटली प्रीति ते खोटी । रक्षिली पाहिजे बरी ॥ ३ ॥**

**विपट पडिलें लोकीं । चालतें तें कळे चि ना ।**
**शोधिलें पाहिजे लोकीं (१) । जाणजाणोनि वर्तणें ॥ ४ ॥**

**वर्ततां येत नाहीं रे । वर्तणें न कळे जनीं ।**
**सकळांसी राखणें राजी । हे मुख्य भक्ति (२) जाणिजे ॥ ५ ॥**

## ( द ) त्या सकळांत सर्व आले

सकळांसी राखणें राजी । यांत अन्य धर्मांचे हि लोक आले, असें माझ्या मनानें घेतलें आहे. पदपदांतरांत जीं हिंदी पदें आलीं आहेत, त्यांवरून ही गोष्ट जास्त स्पष्ट होणार आहे. या स्फुट प्रकरणांत हिंदी भाषेंतील एक च ४१ वें प्रकरण आहे. त्यावरून हि ही च गोष्ट सिद्ध होत आहे. त्या प्रकरणांत जें तत्त्वज्ञान सांगितलें आहे, तें आपलें च आहे, पण तें सर्व धर्मांच्या लोकांना हि मान्य व्हावें, असें आहे.

**सुनावे गैबक्यां (३) बाता । गैबी (४) मर्द उसे कहो ।**
**बडा (५) सो पीर (६) सो वली (७) । खुदाई बाट (८) काहवी ॥ १ ॥**

**गैबी सो गैब है सारा । नजेरों दीसतां झुटा (९) ।**
**ईसमें है दगाबाजी । खबरदार हुशार बे ॥ २ ॥**

---

( १ ) 'लोकीं' ऐवजीं 'आधीं' व ( २ ) 'भक्ति' ऐवजीं 'वर्म' अशीं पाठान्तरें बाडांक ३५ त आहेत. लोकांना राजी राखण्यावर श्रीसमर्थांचा केवढा कटाक्ष असे. ( ३ ) ज्ञानाच्या, ( ४ ) ईश्वरी, ( ५ ) ज्ञानवृद्ध, ( ६ ) साधु, ( ७ ) ईश्वराची, ( ८ ) वाट, ( ९ ) यद्दृष्टं तन्नष्टं ।

**झुट सो झुट छोडो रे। सत्य सो दीलुमे धरो॥ १०॥**
**दुन्या तो ज्यायेगी सारी। रहेगा सो धणी बडा॥ १२॥**
**भला तो येक है आल्ला। पंचभुतखाना बुरा।**
**फुटता तुटता नहि रे। आलखसुं लख लावणा॥ १४॥**
**नजीक देखता नहि रे। चौफेर सामने खुदा।**
**आस्मान देख रे कैसा। वैसा वहि खुदा बडा॥ १६॥**
**पुकार करते सारे। खुदा तो बोलता नहि।**
**गुमशुध सबही लोकां। खुदाकुं ज्यानते नहि॥ १७॥**

ह्या प्रकरणांतील उपदेश केवळ मुसलमान समाजापुढें, निदान हिंदुमुसलमानांच्या मिश्र समाजापुढें श्रीसमर्थांनीं केला असावा, असें तुम्हांस नाहीं वाटत? उत्तर हिंदुस्थानांत सर्वत्र हिंडतांना सर्व तऱ्हेच्या लोकांशीं त्यांचा संबंध येत असला पाहिजे, त्यांत मुसलमानांच्या गांठी पडत असल्या पाहिजेत. मिश्र समाजापुढें त्यांचीं कीर्तनें हि होत असलीं पाहिजेत, असें पदपदांतरांवरून माझें मत झालें आहे, तें आपण पुढें पाहूं. हिंदूंप्रमाणें मुसलमानांना हि प्रत्ययज्ञानाच्या बळावर ते आपल्या वक्तृत्वानें मंत्रमुग्ध करून सोडीत असले पाहिजेत, याविषयीं मला शंका वाटत नाहीं.

## (स) स्थळ तें माजलें मोठें

प्रकरण ५४ वें चाफळला उद्देशून असावें, असें मला भासतें. चाफळकडे म्हणजे अर्थात् तेथील श्रीराम आणि श्रीरामोत्सव यांकडे वृद्ध तरुण, म्हातारे म्हाताऱ्या, आपले परके, खाजगी राजकी, इत्यादि सर्वांचीं मनें श्रीसमर्थांनीं कशीं वेधून घेतलीं होतीं, हें या प्रकरणावरून चांगलें समजतें. सर्वांचें लक्ष चाफळकडे लागावें, या च दृष्टीनें या प्रकरणांत त्यांनीं बोध केलेला आहे. जें स्वतः केलें तें च दुसऱ्यास करण्यास सांगितलें, हें श्रीसमर्थचरित्र जाणण्याचें मुख्य सूत्र लक्ष्यांत घेतलें, म्हणजे या प्रकरणांत त्यांचें आत्मचरित्र आहे, हें निराळें सांगावयास नको. या प्रकरणांतील शिकवणीचें मी माझ्या भाषेंत सार सांगूं, का मला श्रीसमर्थांचे च शब्द सादर करण्याचें नेहमीं प्रेम वाटतें, त्यास अनुसरून मूळ प्रकरण च येथें देऊं, असा मला प्रश्न पडला आहे. दोन्ही मार्ग स्वीकारतों.

(१) ईश्वर, (२) पंचभूतात्मक देह, (३) वेहुशार.

आरंभ करतों माझ्या शब्दांनीं, शेवट गोड करतों त्यांच्या जिव्हाळ्याच्या शब्दांत.

उत्सव जवळ आला, अभ्यासाला लागा, नीट वाचा, वाचाल त्याचा अर्थ करा, कांहीं गाळूं नका आणि कांहीं पदरचें घालूं नका, लोकांना कळेल असें सोप्या भाषेंत आणि स्पष्ट बोला, आपला हा भक्तिमार्ग अखंड चालला पाहिजे ना? मग, लोकांच्या अंतःकरणांत शिरून बोला, त्यांना कळूं द्या, हळूहळू त्यांना सर्व कांहीं सांगा, कथानिरूपणद्वारा त्यांच्यांत विद्येची पेरणी करा, त्यांना शहाणे करून सोडा, जें सांगणें तें असें सोपें आणि नीट उकलून दाखवा कीं, लोकांना तुमच्या म्हणण्याचा तत्काळ पडताळा यावा आणि त्यांचा निश्चय व्हावा, त्यांना समजावून देण्याचा कंटाळा करूं नका, त्रास मानूं नका, हांसत खेळत सांगा, लोक चुकतील, चुकणार च, तुम्ही त्यांना झिडकारूं नका, त्यांचें तुमच्याकडे सारखें मन लागेल असें वागा, त्यांना तुमचे उपकार वाटले पाहिजेत, त्यांच्या ठिकाणीं विचार जागृत झाला पाहिजे, ते तुमच्यावर नेहमीं खुष असले पाहिजेत, असें वागा कीं, त्यांनीं तुमच्याविषयीं नेहमीं बरें च बोलावें, त्यांची तुमच्याशीं मनापासून मैत्री जडली पाहिजे, तुमचें त्यांना इतकें वेड लागावें कीं, त्यांनीं तुमचे जणूं भाट होऊन रहावें, उभयतांना परस्परांविषयीं प्रेम वाटलें पाहिजे, माया जडली पाहिजे, तुम्ही आणि लोक इहपरलोकीं परस्परांच्या सुखदुःखाचे वाटेकरी झालें पाहिजे, तुम्हां सर्वांचा जीव इतका एक व्हावा कीं, तुम्हांला त्यांच्यावांचून आणि त्यांना तुमच्यावांचून करमूं नये, प्रयत्नपूर्वक असें तुम्ही वागाल तर लोकमान्य व्हाल, लहान मोठे सर्व लोक तुम्हांस येऊन मिळतील, परिचय असो नसो, मग दूरदूरचे लोक तुमच्याकडे येतील, कोठकोठून येतील तें तुम्हांस कळणार सुद्धां नाहीं. तात्पर्य,

**सर्वांसी राखणें राजी। सर्वकाळ मृदोत्तरें।**
**येक चि जीव सर्वांचा। कट्टबंध ढळे चि ना॥ १५॥**

**सर्वांस सुख होताहे। ज्याचें त्याचे परी सदां।**
**विचित्र साज सामे ते। किती म्हणोनि सांगणें॥ १६॥**

**सोईच्या धाईच्या लोकां। सवे चि लागली सदां।**
**राजकी भोवते येती। ते हि त्यासी च मिळती॥ १७॥**

धाकुटीं थोरलीं मुलें। वृद्ध तारुण्य सारिखें।
उदंड वृद्ध म्हाताऱ्या। मुलें घेऊन धांवती ॥ १८ ॥
सर्वत्र वोढती तेथें। विचित्र न कळे कळा।
स्थळ तें माजलें मोठें। माजलें वाद्य गायन ॥ १९ ॥
भक्तीचा जिव्हाळा मोठा। खोटा मार्ग असे चि ना।
रामदास म्हणे माझा। राम त्रैलोक्यनायकु ॥ २० ॥

राष्ट्रगुरु आणखी कसा असतो, हें मला कोणी समजावून सांगेल काय?

## ( ५ ) करुणापर प्रकरणें

करुणापर उद्गार तर श्रीसमर्थांच्या मुखांतून असंख्य वेळां निघालेले आहेत. ते आपण किती पाहणार? या प्रकरणांपैकीं माझ्या नजरेंत विशेष भरलेलें असें एक च प्रकरण वाचकांच्या नजरेस आणून देण्याचा माझा विचार आहे. तें करुणापर असून त्याचा शेवट श्रीसमर्थांनीं प्रत्ययज्ञानांत केला आहे.

जन्मदुःख पुरे आतां। मायबापा रघोत्तमा ॥ ११ ॥
अनाथ रंक मी तुझें। जन्मापासुनि सोडवीं।
पतीतपावना देवा। सांभाळीं गा दयानिधी ॥ १२ ॥
तूं भक्तवछळा देवा। भक्ती हे करितां नये।
कोंवसा सकळै लोकां। धांव पाव कुडावया ॥ १३ ॥
प्रल्हाद रक्षिला देवें। नाना विघ्नें निवारिलीं।
गजेंद्र सोडिला नेटें। येकायेकींच धांवणी ॥ १४ ॥
अजामेळ महापापी। स्मरणें तारिले तया।
राखिले उदंडां भक्तां। दयाळु भक्तवछळु ॥ १५ ॥
ब्रीदें हि चालती तुझीं। पवाडे ऐकिले बहु।
समर्थें वाहावी चिंता। मी तुझा शरणागतु ॥ १६ ॥
संकटीं भर्वसा तुझा। भक्तासी वज्रपंजरु।
वोळला मेघ सुखाचा। आनंद सचराचरीं ॥ १७ ॥
बुद्धीनें शोधिला देवो। भावें तत्काळ पावला।
पाहिली भक्ति हे नौमी। योगें वियोग तुटला ॥ १८ ॥
देवाचा योग तो योगी। वियोगी योगिया नव्हे।
विभक्तीनें नव्हे भक्ती। जाणती भक्त जाणते ॥ १९ ॥

ब्रीद तें प्रत्यया आलें। सत्य जालें प्रचीतीनें।
धन्य गा पावना देवा। भावना उरली नसे ॥ २० ॥

यांचें सरळ तात्पर्य असें कीं, आत्मनिवेदन भक्तीचा टप्पा गांठल्यावांचून देवाची भेट होणें नाहीं व जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका नाहीं.

आपल्या करुणापर कवितेला करुणाष्टकें हें नांव श्रीसमर्थांनीं दिलेलें नाहीं. श्रीकल्याणादि प्रत्यक्ष शिष्यांनीं हि तें नांव योजिलेलें नाहीं. मागाहून कोणी तरी आपल्या आवडीनें दहा बारा करुणापर प्रकरणें निवडून त्यांना करुणाष्टकें हें नांव दिलें होतें. त्यांत च त्यानें " बुद्धि दे रघुनायका " या करुणापर श्लोकांचा समावेश केला होता. सभेनें प्रकाशित केलेल्या करुणाष्टकांच्या पुस्तकांत ते श्लोक नाहींत. ते श्लोक अष्टाक्षरी असल्यामुळें त्यांचें मूळचें स्थान या अष्टाक्षरी स्फुट प्रकरणांतील होय. २३ वें प्रकरण म्हणजे ते श्लोक होत. वाचकांनीं अवलोकावें.

## ( ६ ) अंतरात्मा–तो देव देव देवांचा।

अंतरात्मा विश्वव्यापक असल्यामुळें व ती च श्रीसमर्थांची उपासना असल्यामुळें तो आपणांस श्रीवाङ्मयांत जेथें तेथें भेटणार च. भेटण्याचा त्याचा हक्क च आहे. परंतु आपण ग्रन्थराज दासबोध हातीं घेऊं तेव्हां त्याची खुलासेवार मुलाखत घेण्याचा आपला संकल्प झालेला असल्यामुळें तत्पूर्वीं मार्गांत कोठें हि त्याची भेट झाल्यास नुसता नमस्कार करून आपण पुढें जात जाऊं. या स्फुट प्रकरणांपैकीं १, ४, १५, १६, १८, २० आणि ६८ हीं प्रकरणें आपण पाहून ठेवलीं पाहिजेत.

जें रचत नाहीं खचत नाहीं, फुटत नाहीं तुटत नाहीं, चळत नाहीं ढळत नाहीं, येत नाहीं जात नाहीं, उडत नाहीं बुडत नाहीं, दिसत नाहीं भासत नाहीं, रुळत नाहीं मळत नाहीं, धरतां येत नाहीं टाकतां येत नाहीं, जें उष्ण नाहीं थंड नाहीं, काळें नाहीं पिवळें नाहीं, तांबडें नाहीं हिरवें नाहीं, ज्याला कोणता च वर्ण नाहीं आकार नाहीं, जें झिजत नाहीं कुजत नाहीं, जें येथें आहे तेथें आहे, आकाशांत आहे पाताळांत आहे, जें ब्रह्मांडाच्या आंत आहे बाहेर आहे, जें सर्वत्र आणि सदोदित संचलें आहे, पण जें श्रीगुरुकृपेवांचून कळत नाहीं, असें जें ब्रह्म, त्याच्या ठिकाणीं जें पहिलें स्फुरण झालें त्यास तुम्ही मूळमाया म्हणा, जाणीवकळा

म्हणा, जगज्योति म्हणा, ज्ञान, साक्षी, ईश्वर, देव, नारायण, कांहीं हि म्हणा, त्याला श्रीसमर्थ अंतरात्मा म्हणतात, त्याची उपासना त्यांनीं केली आणि आपणांस करावयास सांगतात. ती उपासना न घडेल तर जन्म वायां जाईल! म्हणून अंतरात्म्याची जेथें जेथें भेट होईल तेथें तेथें नुसता नमस्कार तरी करीत गेलें पाहिजे.

(१) धन्य कर्तार तो गैवी । पाहों जातां दिसे चि ना ।
सर्व कर्तव्यता त्याची । जेथें तेथें चहुंकडे ॥ १५/१ ॥
येकला आवरी सर्वे । कोण्या येत्नें कळे चि ना ।
अद्भुत तो चि तो जाणे । त्यावीण दुसरा नसे ॥ ४ ॥
अनंत लाघवी लीळा । त्यावीण दुसरा नसे ।
येक सूत्रें तिहीं लोकां । बोलवी चालवीतसे ॥ ८ ॥
तो देव देव देवांचा । ज्ञानी ते जाणती तया ॥ ११ ॥

गैवी म्हणजे गुप्त, कूटस्थ, अंतरात्मा. त्याच्यापासून मग पुढें त्रिगुण आणि त्रिगुणानंतर हें सारें ब्रह्मांड. तो एकटा एक अंतरात्मा त्रैलोक्यांत भरला आहे. केवढा चमत्कार म्हणावा? तो चमत्कार प्रत्ययास आला पाहिजे. तर च इहपरलोकीं सार्थकता आहे.

(२) येकला सर्व कर्ता जो । तयासी तुळणा नसे ।
त्यावीण जाणता कैचा । पाहों जातां चराचरीं ॥ १६/१ ॥
चळेना कळेना ब्रह्म । नित्य निश्चळ सर्वदा ।
विकारी होत जातें तें । निर्विकारी जसे तसे ॥ २ ॥
कर्ता साक्षी अंतरात्मा । थोर तो हा चि जाणिजे ।
याहुनी पर तें कैचें । कोणी नाहीं कांहीं नसे ॥ ३ ॥
असें हें दृश्य जाणावें । नस्तें शून्य जाणिजे ।
दोहीवेगळें तें ब्रह्म । आहे नाहीं घडे चि ना ॥ ४ ॥

(३) येकला पुर्वला कैसा । हे चि येक अपूर्वता ।
अनंत भेद योनीचे । सांग साहित्य दाखवी ॥ २०/१ ॥
होये रे सूत्रधारी हा । नाना सूत्रें बहुविधा ।
नाचवी खेळवी सर्वै । त्रैलोक्य सचराचरीं ॥ १० ॥

**तो देव वोळखावा रे। लोक हो विसरों नका।**
**भक्त जो तो चि जाणावा। येदर्थी संशय नसे॥११॥**

त्या देवाची जो ओळख करून घेतो तो च खरा भक्त.

(४) पण जगाची तऱ्हा अशी आहे, त्या अंतरात्म्याला विसरून देहाचें च कोडकौतुक केलें जातें. वास्तविक पाहिलें तर देह हें नुसतें देऊळ आहे, त्यांत राहणारा तो देव. पण त्या देवाकडे न पाहतां, शहाणे शहाणे हि बाह्य देवळाचें च सौंदर्य वर्णन करण्यांत गुंग होऊन जातात!

**देहेदेवाळयामध्यें। पाहणें देव तो बरा।**

परंतु

**देव सांडुनि देवाल्यें। वर्णिती सर्व हि कवी॥ ६८-१॥**

कवि म्हणजे शहाणे लोक, विद्वान् माणसें.

अशीं देहरूपी देवळें अनंत कोटी आहेत, पण त्यांतील नायक एक च एक आहे. आपण आपल्या बोलण्याचालण्यानें, कोणत्या हि कृतीनें कोठल्या हि देहाला सुख दिलें म्हणजे त्या देहांतील देव संतुष्ट होतो.

**देव तो येक, देवाल्यें। अनेक दिसती पाहा।**
**भेद देवाळयामध्यें। अभेद देव पाहतां॥ ११॥**

आणि चमत्कार असा, त्या देवाला कोणी विचारीत नाहींत, आणि देवळा-साठीं मात्र भांडत बसतात!

**भांडती देवळासाठीं। देव चुकोनि राहिला॥ १६॥**

**शरीरमात्र देवाल्यें। जीर्ण सांडुनि जातसे।**
**नूतनें रम्य देवाल्यें। त्यामध्यें देव नाटकु॥ १७॥**

एकादें देऊळ जीर्ण झालें म्हणजे त्याचा जीर्णोद्धार करण्याच्या भानगडींत त्यांतील देव फारसा पडत नाहीं; एकदां दोनदां वैद्याला बोलावून पहातो, पण अखेरीस त्या मोडकळीस आलेल्या देवळाचा नाद सोडून देऊन नवीन, सुंदर, रम्य, मनोहर अशा देवळाच्या आश्रयाला तो निघून जातो!

(५) या च ६८ व्या प्रकरणांतील पुढचे सात श्लोक अत्यंत चिंतनीय आहेत. मन घालून हे श्लोक वाचल्यास प्रथम ब्रह्म, नंतर मूळमाया, तिला च

ईश्वर, जगदीश्वर, देवदेव्या, बहुरूपा, अर्धनारीनटेश्वर म्हटलें आहे, नंतर त्रिगुणात्मक ब्रह्मा विष्णु महेश्वर, अशीं देवळें लागतात, व त्यांत नांदणारा तो देव, असा बोध होतो. जेवढें म्हणून जड आहे तेवढें सर्व देऊळ, त्यांत नांदणारा देव तो चंचळ व या जड चंचळाच्या पलीकडे निश्चळ आणि निर्विकारी असा मुख्य निरंजन देव आहे.

**थोर देवाल्य मुळींचें । ईश्वरु जगदेश्वरु ।**
**देवदेव्या बहुरूपा । अर्धनारीनटेश्वरु ॥ १९ ॥**

**त्यापुढें तीन देवाल्यें । ब्रह्मा विष्णु महेश्वरु ।**
**तया आभ्यांतरीं देवो । तो देव सत्य जाणिजे ॥ २० ॥**

**तो चि जो तो हा जाणा । नाना देवाळयामधें ।**
**औतरे देवळामध्यें । त्यासी औतार बोलिजे ॥ २१ ॥**

**आतां म्या काय सांगावें । सांगावें त्या परमेश्वरा ।**
**अखंड अंतरीं ध्यावें । जांव रे निश्चळाकडे ॥ २२ ॥**

**जड तें सर्व देवाल्यें । देव तो चंचळ असे ।**
**निश्चळु निर्विकारी तो । मुख्य देवो निरंजनु ॥ २३ ॥**

**नांव रूप जया नाहीं । कार्य कारण तो नव्हे ।**
**महाकारण हि खोटें । देवाल्य मुळींचें मुळीं ॥ २४ ॥**

आणि आपण आणि तो एक आहोंत, हा बोध होई तों वारंवार वाचलें पाहिजे, बुद्धि चालविली पाहिजे, चिंतन केलें पाहिजे, कृपा भाकली पाहिजे.

**अनन्य दास देवाचा । वाचा रे मन घालुनि ।**
**पाहातां कोण तो कैचा । भेदाचा ठाव नाडळे ॥ ३० ॥**

## (७) शिकवणीचे २० धडे

श्रीसमर्थांच्या बहुविध शिकवणींत हि त्यांचें आत्मचरित्र स्वाभाविकपणें प्रतिबिंबित झालेलें असतें. त्यामुळें त्यांच्या कोणत्या हि काव्यांत उपदेशपर जो भाग असतो तो अवश्य पाहिला पाहिजे. या स्फुट प्रकरणांत उपदेशपर भाग पुष्कळ च आला आहे. त्यांच्या इतर काव्यांतील हि शिकवण आपण पहात च जाऊं, पण आपल्या असें निदर्शनास येईल कीं, त्याच त्या शिकवणीची

पुनरुक्ति फार झालेली आहे. असें होण्याचें मुख्य कारण म्हणजे भिन्न भिन्न ठिकाणीं वेगवेगळ्या लोकांना उपदेश करण्याचे प्रसंग त्यांच्यावर आले असले पाहिजेत. लोककल्याणाचा त्यांचा मार्ग ठरलेला होता. त्या मार्गावरील खुणा स्वानुभवानें निश्चित झालेल्या होत्या. त्यामुळें केव्हां हि आणि कोठें हि, कोणत्या हि निमित्तानें उपदेश करण्याचा प्रसंग आला म्हणजे त्या च ठरलेल्या मार्गानें जाण्याविषयीं ते सांगणार.

सर्वांचें ऐहिक आणि पारलौकिक कल्याण व्हावें, हें श्रीसमर्थांचें मुख्य ध्येय होतें.

**अवघें चि सुखी असावे । ऐसी वासना ।**

हें मी त्यांच्या तात्त्विक, नैतिक, व्यावहारिक शिकवणीचें मुख्य सूत्र मानीत आलों आहें. मला तें स्वच्छ दिसतें, पण तें इतरांना पटवून देण्याचें सामर्थ्य मजमध्यें नाहीं, याचें वाईट वाटतें. तथापि मला असा विश्वास वाटतो कीं, श्रीसमर्थवाङ्मयाकडे प्रतिभावान् थोर निष्ठावंत विद्वानांचें यापुढें दिवसानुदिवस जास्त लक्ष लागून मला जें साधतां आलें नाहीं, तें त्यांना साधेल. हा विश्वास हें च माझ्या प्रस्तुतच्या तोकड्या प्रयत्नाचें प्रोत्साहक कारण होय; असो.

या धोरणानें, स्फुट प्रकरणांत श्रीसमर्थांची जी लहान मोठी शिकवण आली आहे, ती आतां आपण पाहूं. वाचकांनीं मात्र स्वतः १ ते ४, २५, ४०, ४२ इत्यादि प्रकरणें मुळावरून एकवार सायंत वाचावीं, अशी विनंति आहे.

समाजाचे खालपासून वरपर्यंत जे थर असतात, त्या सर्व थरांतील लोकांच्या स्थितिगतीचें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्या श्रीसमर्थांच्या दृष्टिपथांतून कोणती म्हणून परिस्थिति निसटली असेल, असें मला वाटत नाहीं. बाल वृद्ध, नर नारी, श्रीमंत गरीब, दैववान करंटे, स्वामी सेवक, राज्यसंस्थापक, राज्यरक्षक, धर्मसंस्थापक आणि धर्मरक्षक, प्रपंची परमार्थी, बद्ध मुमुक्षु, साधक सिद्ध इत्यादि सर्व अवस्थांतील सर्व तऱ्हेच्या लोकांना त्यांनीं उपदेश केलेला त्यांच्या वाङ्मयांत आढळतो. त्यांचा देव जसा सर्वव्यापी आणि उपासना जशी विश्वव्यापक होती, तसें च त्यांचें कर्तृत्व हि ब्रह्मांडव्यापक होतें. राष्ट्रगुरु ही पदवी त्यांना च साजते.

## ( १ ) संसारीं दोन्ही साधावीं

विवेकी दक्ष जो कोण्ही । पुरुषार्थी धर्मरक्षकु ।
आमोल्य जन्म हा तेणें । वेर्थ चि द्वडूं नये ॥ ५५-२७ ॥
संसारीं दोनि साधावीं । येहलीक परत्र हि ॥ २८ ॥

इहलोक म्हणजे नुसता बायकापोरांचा प्रपंच नव्हे, किंबहुना बायकापोरांचा प्रपंच न केला तरी चालेल, पण राष्ट्रप्रपंच केला पाहिजे, नाहीं पेक्षां श्रीसमर्थ लग्नसमारंभांतून कां निसटते ?

## ( २ ) त्याला यत्न केला पाहिजे

( रा ) भाग्यासी काय उणें रे । यत्नावांचुनि राहिलें ।
यत्न तो करावा कैसा । हें चि आधीं कळे चि ना ॥ २-१ ॥
मुख्य यत्न विचाराचा । त्यावरी बोलणें बरें ।
चालणें सत्य नेमाचें । नीतिन्याय चुकों नये ॥ २ ॥

सत्य, नीति, न्याय यांना धरून विचार, उच्चार, आचार घडला पाहिजे.

( म ) यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नेवीण दरिद्रता ॥ १-१ ॥
( दा ) अत्यंत साक्षपी व्हावें । न व्हावें आळसी कदा ।
घ्यावा या देहाचा लाहो । जायाचे हें म्हणोनियां ॥ ३/१८ ॥

देह मोठा दगलबाज आहे, तो केव्हां गुंगारा देऊन चालता होईल, याचा नेम नाहीं, म्हणून तो आपल्या स्वाधीन आहे तोंवर, दयामाया न करतां, त्याच्याकडून चोपून काम घ्यावें, त्याला क्षणभर आळसांत बसूं देऊं नये.

( स ) वन्ही तो चेतवावा रे । चेतवितां च चेततो ।
विवेक जाणिजे तैसा । वाढवितां च वाढतो ॥ ३०-१ ॥
संग तो साक्षपीयाचा । धरितां साक्षपु घडे ।
साक्षपें साक्षपु वाढे । पुरती मनकामना ॥ २ ॥
कष्टतां सौख्य मानावें । कष्टीं फळ चि पाविजे ।
आळसें सुख वाटे तें । दुःखब्रह्मांड भोगवी ॥ ३ ॥
केल्यानें होत आहे रे । आधीं केलें चि पाहिजे ।
यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरितां बरें ॥ ४ ॥
अचूक यत्न तो देवो । चुकणें दैत्य जाणिजे ।
न्याय तो देव जाणावा । अन्याय राक्षसी क्रिया ॥ ५ ॥

यत्नाला श्रीसमर्थांनीं देवपदावर नेऊन बसविलें आहे! हें त्यांनीं च करावें! पुरश्चरणाचे कष्ट, तीर्थाटणाचे कष्ट, दऱ्याखोऱ्यांतून हिंडण्याचे कष्ट, राष्ट्राची चिंता, धर्माची चिंता, यापुढें त्यांना क्षणाचा तरी अवकाश मिळाला असेल काय, असें माझ्या मनांत येतें! देव पावला असें आपण म्हणत असतों म्हणजे कोण पावतो? यत्न पावतो.

## (३) काळ कठीण आला आहे, म्हणून धीर सोडूं नये

**धीर धरा धीर धरा तकवा। हडबडूं गडबडूं नका।**
**काळ देखोनि वर्तावें। सांडावें भय पोटींचें॥ ४५-२॥**

**धरावा धीर तो मोठा। विचारें पाहातां बरें।**
**अधीर माणसें खोटीं। काम कांहीं कळे चि ना॥ ३॥**

**धाकें चि चळचळां कांपे। भेणें चि फळफळां मुते।**
**बोबडी पडिली तोंडीं। घाबिरें चाचरें पडे॥ ४॥**

**खादाड आळसी मंदु। सूचना ते कळे चि ना।**
**प्रसंगीं चळचळां कांपे। तो प्राणी आत्मघातकी॥ ५॥**

एकाद्या सेनानायकांनीं सैन्याला प्रोत्साहन द्यावें, तशी ही धीराची वाणी आहे. काळ कसा कठीण आला होता आणि लोक कसे भयभीत झाले होते, याची पूर्ण कल्पना या चार श्लोकांवरून होते. अशा काळीं आणि अशा लोकांत श्रीशिवसमर्थांना रामराज्याची स्थापना करावयाची होती.

## (४) करावें आणि मग सांगावें

समाज निर्नायक झाला, ध्येयच्युत झाला, उथळ बनला, हा हा हो हो करावें, हंसावें, खिदळावें, आचावाचा बोलावें, एवढें च काम त्याला उरलें, म्हणजे शहाणे आणि वेडे सर्व जण सांगत सुटतात, त्यांना न्याय, नीति, शास्त्र, लोकधाटी, कांहीं पहावें लागत नाहीं! समाजाच्या विनाशकाळाचें च तें लक्षण समजावें.

**सांगों चि जाणती सर्वैं। कर्ता कोण्ही दिसे चि ना।**
**जाणते नेणते सांगों। स्वभाव लागला जनीं॥ ३/४॥**

**शास्त्र हो लोक हो कोण्ही। नीति हो न्याय हो न हो।**
**दाटुनी सांगती वेडे। आदरें हो अनादरें॥ ५॥**

मिथ्या च सांगती वार्ता । नेटें पाटें बळाविती ।
ऐसे हे लोक सृष्टीचे । प्रवाहीं पडिले पाहा ॥ ६ ॥

करंटे मिळाले सर्वै । जो तो बुद्धि च सांगतो ।
सांगावें तें आपणाला । आपणु करितां बरें ॥ ७ ॥

## ( ५ ) सर्वांना राजी राखावें

लोकांना राजी राखण्यावर श्रीसमर्थांचा केवढा कटाक्ष! त्यांच्या वाङ्मयांत, न जाणों, एक हजार वेळां हा उपदेश आढळेल. लोक राजी म्हणजे देव राजी.

लोक हे राखतां राजी । सर्व राज च होतसे ।
अंतरें चुकतां तेथें । सर्व भाजी च होतसे ॥ ४०/१७ ॥

जन हे वोळतु जेथें । अंतरात्मा चि वोळला ।
जन हे खौळले जेथें । अंतरात्मा चि खौळला ॥ १८ ॥

जन, देव, अंतरात्मा एक च. तो देव खवळला म्हणजे त्याच्यापुढें कोण टिकाव धरूं शकणार?

प्रसंगें वर्ततां आलें । येथातथ्य चि सूचिलें ।
मनुष्य राखिलें राजी । तो प्राणी शाहाणा बरा ॥ १/१५ ॥

## ( ६ ) नित्य नूतन हिंडावें

श्रीसमर्थ सारखे हिंडत च ! म्हणून च तर इतरांस सांगत आहेत.

( श्री ) हिंडतां शाहाणें होतें ॥ १-२ ॥

( रा ) हिंडतां पारखी लोकां । कार्यकर्ता जिवीं धरी ॥ १/६ ॥

( म ) प्रत्यहीं मागणें भिक्षा । मिळाली न मिळे तरी ।
नित्य नूतन हिंडावें । धुंडावे भक्त प्रेमळ ॥ ३/६ ॥

## ( ७ ) हिंडतांना आणखी काय करावें ?

सर्वत्र लोक शोधावे । बोधावे भक्तीच्या गुणें ।
राहावें दुर्बळाचेथें । देवाल्यें कां नदीतीरीं ॥ ३-८ ॥

पर्वतीं उद्कापासीं । संन्निध चि येकीकडे ।
फार येकांत सेवावा । अभ्यास नित्य नूतनु ॥ ९ ॥

साहावीं सीतउष्णादि । पाहावीं रम्यसीं स्थळें ।
करावे आपण कष्ट । बांधावीं तें हळु हळु ॥ १० ॥

वोळखी कराव्या दाटा । येके ठाईं स्थिरों नये ।
वादवेवाद तो खोटा । दाटावा मद मछर ॥ ११ ॥

उद्धट बोलणें खोटें । बोलावीं मृद उत्तरें ।
नेटकी पाहिजे दीक्षा । रक्षावी भक्ति आदरें ॥ १० ॥

पुण्यमार्ग प्रतिष्ठावा । लावावी धर्मवासना ।
देवाल्यें करावीं मोठीं । वापी कूप सरोवरें ॥ २० ॥

इत्यादि. ही शिकवण, सर्वत्र संचार करणाऱ्या त्यांच्या महंतशिष्यांना आहे, हें उघड आहे. ज्यांना श्रीसमर्थ दीक्षा देत, त्यांच्यापासून ते कसली अपेक्षा करीत, तें या शिकवणीवरून दिसतें. या सहा श्लोकांचे चोवीस चरण होतात व त्या प्रत्येक चरणांत एक एक धडा आहे. राष्ट्रगुरुशिवाय हे धडे कोणी घालून देणार नाहीं. स्वतः श्रीसमर्थ पर्यटण करीत असतां कसे वागत असले पाहिजेत, याचा बोध या शिकवणीवरून होत आहे. त्यांच्या वाङ्मयांतील त्यांच्या अंतरंगाच्या या असल्या खुणा क्षणभर कां होईना, मला वेडा करितात, तें च वेड वाचकांपर्यंत नेऊन पोंचवावें, अशी मला हांव सुटली आहे.

## (८) यशाची किल्ली

गलबला हों चि नेदावा । गल्बला बुद्धि भ्रष्टवी ।
मुळीं च नेणतें व्हावें । जाणत्यानेणत्यामधें ॥ ४०-३० ॥

महत्त्व वेगळें आहे । महत्त्व जाणती कळा ।
नेणत्याला मिळों जाणे । पुढें सांगे हळु हळु ॥ ३१ ॥

गलबला म्हणजे अर्थात् मतामतांचा गलबला, वादविवाद. अकारण वादांग वाढवूं नये.

## (९) वेवाद खोटा

संवाद वेवाद होतां । वेवादें युध्य होतसे ।
म्हणोनि लोक सोडावे । अरण्य धरितां बरें ॥ $\frac{१४}{१०}$ ॥

संगत्यागें सुखी व्हावें । वाचावें बहुतांपरीं ।
प्रत्ययो पाहातां पोटीं । साधकु सिद्ध होतसे ॥ ११ ॥

## ( १० ) परोपकाराविषयीं तत्परता

**पराचें कार्य कर्ता जो । त्याचें कार्य कसें नव्हे ।**
**तांतडी तांतडी धांवे । बरेपणें मनोगतें ॥ १-१६ ॥**

**पराचें कार्य कर्ता जो । उभाउभी खडाखडी ।**
**कळलें पाहिजे सर्वै । लिहितां वाचितां कळे ॥ १७ ॥**

निःस्वार्थबुद्धीनें च परोपकार करीत असावें, पण त्यांत च स्वार्थ साधतो.

## ( ११ ) येकांत सेवावा

येकांताचें महत्त्व श्रीसमर्थांनीं अनेकदां सांगितलें आहे. येकांत हें फार प्रभावी साधन आहे. त्याचा कोणी हि अनुभव घेऊं शकेल.

**( रा ) चाळणा करावी सर्वै । येकांतीं राहातां बरें ।**
**येकांत मानला ज्याला । त्याला साधे हळु हळु ॥ १४/३ ॥**

जवळ जवळ या च शब्दांत ग्रन्थराजांत म्हटलें आहे :

**जयास येकांत मानला । आवघ्या आधीं कळे त्याला ॥ १८ १०/५० ॥**

**( म ) येकांत सेवितां आधीं । चाळणा करितां बरी ।**
**अभ्यासीं लावितां बुद्धि । आकस्मात च्रि संभवे ॥ ४०/२८ ॥**

संभवे म्हणजे स्फुरतें. एकांतांत अभ्यास आणि चिंतन केल्यास एकदम स्फूर्ति होऊं शकते.

**ल्याहावें शुद्ध वाचावें । जाणावें तदनंतरें ।**
**जाणतां कळतां बिंबे । बिंबतां स्फूर्ति होतसे ॥ २५/४ ॥**

## ( १२ ) जें करणें तें तारुण्यांत च केलें पाहिजे

**देह्याचा भर्वसा नाहीं । तारुण्य चळतें जनीं ।**
**वृधापीं विटंबे काया । रूप विद्रूप होतसे ॥ २-१ ॥**

असें म्हणून पुढील नऊ श्लोकांत, वृद्धपणीं मनुष्याची काय स्थिति होते तिचें वर्णन श्रीसमर्थांनीं केलें आहे. तें आपणांस कितपत लागू पडतें तें पडताळून पाहण्यासाठीं वृद्धांनीं ते श्लोक वाचावे व आपली हि अवस्था पुढें अशी च होणार, हें मनांत आणून, जें काय परमार्थसाधन करावयाचें असेल

तें तत्काळ सुरू करावें, हा बोध घेण्यासाठीं तरुणांनीं वाचावें. वृद्धपणींच्या आपदा सांगून त्वरा करण्याविषयीं श्रीसमर्थ तरुणांना सुचवीत आहेत.

**ऐसें हें दुःख वृधापीं । कळलें पाहिजे जना ।**
**परत्र साधणें आधीं । तारुणीं च उठाउठी ॥ ११ ॥**

## ( १३ ) प्रत्ययाची महती

**उत्तमु प्रत्ययज्ञानी । मध्यमु शास्त्रनिश्चयी ।**
**अधमु लोकधाटीचा । पाषांडी अधमोधमु ॥ १७ ॥**

**उत्तमु कल्पनातीतु । मध्यमु शब्दबोलिका ।**
**अधमु नेणता गर्वी । पापी तो अधमोधमु ॥ १८ ॥**

**उत्तमु मुख्य ज्ञानी तो । मध्यमु तो उपासकु ।**
**अधमु संशयी कर्मी । कर्मभ्रष्ट अधमोधमु ॥ १९ ॥**

**धन्य जो सर्व हि जाणे । सार शोधून घेतसे ।**
**प्रत्ययेंवीण मानीना । तो ज्ञाता दुल्लभु जनीं ॥ २० ॥**

प्रत्ययावर इतका त्यांचा कटाक्ष असे. नुसत्या अनुमानानें कांहीं मानूं नये. प्रत्यय पहावा. प्रत्ययज्ञानी दुर्लभ आहे. अशा स्थितींत श्रीसमर्थांच्या सांगण्यावर पूर्ण भरंवसा टाकून प्रत्यय यावा म्हणून धडपडत, तळमळत, विनवीत असावें, एवढें च आमचें काम आहे !

## ( १४ ) वृत्ति मोकळी असावी

**संसार नासका आहे । विटंबे भलते सवा ।**
**मन तें सांवरेना कीं । उभाउभी खडाखडी ॥ ९ ॥**

जात्या संसार हा सुखदुःखमिश्रित आहे, तो केव्हां उघडा पडेल याचा नेम नाहीं. मन त्याच्यांत च गढून गेलेलें असल्यास, म्हणावें तेव्हां तें त्याच्यांतून बाहेर पडणार नाहीं. यासाठीं आरंभापासून च

**यालागीं मोकळी वृत्ती । असिली पाहिजे सदा ।**
**धन्य ते जाणती ज्ञानी । उदास गिरिकंदरीं ॥ १० ॥**

स्वतःकडे पाहून च श्रीसमर्थ नेहमीं बोलत असत कीं काय, न कळे, इतकें त्यांचें स्वतःचें, चरित्र, ते जें बोलतात आणि सांगतात, त्यांत आपल्या प्रत्ययास येत असतें.

आटाआटी जनामध्यें । आरडा त्रिरडा निघे ।

परंतु श्रीसमर्थांसारखा

उदासवृत्तिचा योगी । न लिंपे असतां जनीं ॥ ११ ॥

## ( १५ ) समजलें तर तसें वागलें पाहिजे

तर च तें समजलें म्हणावें. नुसतें समजलें पण तदनुसार वर्तन घडलें नाहीं, तर तें समजणें फोल होय.

जाणोनि काय होतें रे । वर्तणें खस्त पाहिजे ॥ ४६/१८ ॥

खस्त म्हणजे पूर्णत्वानें त्यासारखें.

## ( १६ ) मित्र कसा असावा ?

मित्र तो पाहिजे ज्ञानी । विवेकी जाणता भला ।
श्लाघ्यता पाहिजे तेथें । येहलोक परत्र हि ॥ ९/८ ॥

उगा चि वेळ घालाया । नासके मित्र पाहिले ।
कुबुद्धि कुकर्मी दोषी । त्यांचें फळ भोगावया ॥ ९ ॥

सारीचे मित्र नारीचे । चोरीचे चोरटे खवी ।
मस्तीचे चोरगस्तीचे । कोटगे लत पावती ॥ १० ॥

संगदोषें महादुःखें । संगदोषें दरिद्रता ।
संगतीनें महद्भाग्य । प्राणी प्रतक्ष पावती ॥ ११ ॥

संग तो श्रेष्ठ शोधावा । नीच सांगात कामा नये ।
न्यायवंत गुणग्राही । येत्नाचा संग तो बरा ॥ १२ ॥

सामान्य, पण लहानथोरांनीं ऐकण्यासारखा हा उपदेश आहे.

## ( १७ ) राजा कसा असावा ?

मोठें तें पाप लोकांचें । प्रभु तो जाणता नव्हे ।
वर्ततो शिकविल्या बोले । तो काय म्हैसमंगळु ॥ २/१३ ॥

खचतें काम तें ऐसें । रचतें काम तें नव्हे ।
कारबार बुडाला तो । कोण कोणास पुसतें ॥ १४ ॥

लाच चोरी बहु जाली । घालाघाली परस्परें ।
धण्याला नेणवें कांहीं । बेदादी नगरी पहा ॥ १५ ॥

धणी तो राहिला मागें । कारबारी च नासिती ।
पाप हें थोर लोकांचें । सांगावें कवणापुढें ॥ १६ ॥

कोणाचें उदाहरण डोळ्यांपुढें येऊन श्रीसमर्थ हें बोलत आहेत, तें कळण्याला मार्ग नाहीं !

प्रपंच नासतो ऐसा । भाग्य जातें निघोनियां ।
यालागी सर्व सांभाळी । तो चि साहेब नेटका ॥ १७ ॥

खबर्दार बरा राजा । विवेकी सर्व साक्षपी ।
आज्ञेनें सर्व हि चाले । तेणें सौख्य बहु जना ॥ १८ ॥

## ( १८ ) ब्राह्मण कसा असावा ?

ब्राह्मणु ब्रह्मवेत्ता तो । ब्राह्मणु ब्रह्मनिश्चयी ।
ब्राह्मणु ब्रह्मस्थितीचा । ब्राह्मणु म्हणिजे गती ॥ १७/१० ॥

ब्राह्मणावांचून गति नाहीं, असें सर्वांना वाटेल, असा ब्राह्मण असावा ! ब्रह्माचा ज्याला निश्चय झाला, ब्रह्म ज्यानें जाणलें, जो ब्रह्म च झाला, तो ब्राह्मण ! अशा ब्राह्मणावांचून साऱ्या जगाचें अडेल, यांत काय शंका आहे ?

## ( १९ ) ज्ञानावांचून गति नाहीं

मरणोत्तर सदाचारी आणि विशेषतः दुराचारी यांची काय गति होते ती ६२ व्या प्रकरणांतील ७ ते १२ श्लोकांत वेदशास्त्राधारें वर्णिलेली आहे. ती वाचली म्हणजे अंगावर शहारे च आले पाहिजेत. त्या यातना चुकविण्याचा मार्ग एक च .

परत्र साधिलें जेहीं । ते लोक सुकृती भले ।
यम ते रंक त्यांपुढें । भक्त देव चि जाणिजे ॥ ६२/१३ ॥

यम ते दास देवाचे । देव तो आपुला असे ।
परत्र हें चि जाणावें । ज्ञानें मोक्ष चि होतसे ॥ १४ ॥

तो देव शोधून आपलासा केला पाहिजे.

## ( २० ) त्याला बुद्धियोग चि पाहिजे

भल्याची संगती व्हावी । स्नानसंध्या पवित्रता ।
परोपकारणी काया । नित्यानित्यविचारणा ॥ १/१८ ॥

स्नानसंध्या टिळे माळा । उदास तापसी फिरे ।
उत्तमु तो नये वाट्या । जेथें तेथें विराजतो ॥ १९ ॥
येके स्थळीं स्थिरावेना । नित्य नूतन साजिरा ।
कीर्ति ते दिगांतीं धांवे । नेमस्त राहतां जनीं ॥ २० ॥
श्लाघ्य दुर्लभ तें जाणे । कोड कौतुक होतसे ।
विख्यात होतसे योगी । धुंडितां सांपडों नये ॥ २१ ॥
येकांत सांपडे मोठा । बुद्धियोग ठाई पडे ।
येहलोकपरलोकीं । बुद्धियोग चि पाहिजे ॥ २२ ॥

हा असा विख्यात योगी श्रीसमर्थांशिवाय दुसरा कोणता ?

## (८) अवांतर

स्फुट प्रकरणांतील अवांतर अशा तीन च गोष्टी नमूद कराव्याशा वाटतात.

**एक**—प्रकरण ३९ त गायनी कलेची धन्यता गायिली आहे. तिची धन्यता खरी च आहे. गायनकला ज्याला अवगत असते तो ज्याला त्याला हवासा वाटतो. गायन ऐकण्याचें वेड सर्वांना असतें. पशु, पक्षी सुद्धां गायनानें लुब्ध होतात, मग बालकें, स्त्रिया, पुरुष होतील यांत काय नवल आहे? अशा या दिव्य कलेचा दुरुपयोग न करतां परमेश्वराला आळविण्याकडे तिचा उपयोग केला, तर अशा गुणी माणसाला परमेश्वर लवकर प्रसन्न होईल, असें मला वाटतें. श्रीसमर्थांना ती कला पूर्ण अवगत होती. या कलेच्या योगानें

येकाकी महंती येते । उदंड कीर्ति वाढते ।
विख्यात सकळै लोकीं । धन्य ते गायनी कळा ॥ ३९/४ ॥
राहाती लोक ते राजी । आवडी उपजे मनीं ।
वर्णितां कीर्ति देवाची । धन्य ते गायनी कळा ॥ ५ ॥

**दुसरी**—प्रकरण ५१ त संसार व्यर्थ कशानें जातो व ५२ त तो धन्य कशानें होतो, हें सांगितलें आहे.

कटकटी खटखटी रागें । चटपटी वटवटी सदा ।
चुर्चुरी चुमुरी रागें । वेर्थ संसार जातसे ॥ ५१/१ ॥
तीर्थ नाहीं यात्रा नाहीं । नाहीं कथा निरूपण ।
तृप्त हे वासना नाहीं । वेर्थ संसार जातसे ॥ ६ ॥

परंतु याच्या उलट

**स्नानसंध्या टिळे माळा । अंतर्निष्ठ उपासना ।**
**नित्यानित्य विवेकानें । धन्य संसार होतसे ॥ ५२/१ ॥**

**अन्नोदकवस्त्रदानें । धन्य धन्य ब्राह्मणीं भजे ।**
**उदास वृत्तीनें लोकीं । धन्य संसार होतसे ॥ ४ ॥**

**कदापि सत्य सोडीना । नित्य नेमस्त बोलणें ।**
**वोढतो बहुतां लोकीं । धन्य संसार होतसे ॥ ७ ॥**

**नवविधा भक्ति देवाची । मुख्य कोण विचारणें ।**
**अध्यात्म शोधितां सर्वै । धन्य संसार होतसे ॥ १० ॥**

**दासाचें बोलणें ऐसें । सर्वज्ञ जाणते तुम्ही ।**
**तुम्ही आम्ही विचारावें । धन्य संसार होतसे ॥ १२ ॥**

**तिसरी**—प्रकरण ५० त महाबळेश्वराचें वर्णन आहे, हें अंतर्गत पुराव्यावरून हि स्पष्ट होत आहे, पण प्रकरण ३२ त कोणत्या स्थळाचें वर्णन आहे, तें निश्चित सांगतां येत नाहीं. बहुधा तें हिमालयाकडील एकाद्या रम्य ठिकाणचें असावें, असें मनांत येतें.

**गिरीचे मस्तकीं गंगा । तेथुनी चालली बळें ।**
**धबाबां लोटल्या धारा । धबाबां तोय आदळे ॥ ३२/१ ॥**

वगैरे वर्णन ७ व्या श्लोकापर्यंत करून श्रीसमर्थ म्हणतात :

**विश्रांती वाटते तेथें । जावया पुण्य पाहिजे ।**
**कथा निरूपणें चर्चा । सार्थकें काळ जातसे ॥ ८ ॥**

त्या च प्रमाणें ५९ व्या प्रकरणांतील वर्णन कोणत्या स्थळाचें आहे तें निश्चित करतां न आलें, तरी त्यांतील उल्लेखांवरून दक्षिणेकडील कांची, मदुरा, तंजाऊर, रामेश्वर वगैरेपैकीं एकाद्या स्थानाचें तें वर्णन असावें, असें वाटतें.

उत्तरेचा हिमालय, दक्षिणेचा रामेश्वर आणि मधला महाबळेश्वर यांचीं हीं वर्णनें होत. त्या भयंकर अंदाधुंदीच्या काळांत भरतखंडाच्या आठ हि दिशांना निर्धास्तपणें संचार करणाऱ्या श्रीसमर्थांच्या चिंतनांत आजचा उरलेला दिवस जावा, म्हणून आज आतां लेखणी खालीं ठेवतों.

---

# ( २ ) अष्टाक्षरी स्फुट श्लोक

( १ ) या श्लोकांचीं एकंदर ६१ प्रकरणें आहेत. श्रीसमर्थांच्या वाङ्मयांत या श्लोकांची मला किंचित् निराळी तऱ्हा भासते. जी शिकवण, जें तत्त्वज्ञान किंवा जें व्यवहारचातुर्य त्यांच्या इतर वाङ्मयांत आहे, तें च या हि श्लोकांत आढळतें, त्यांतील कांहीं कांहीं वचनें तर सुभाषितासारखीं अखंड कंठीं धारण करण्याजोगीं आहेत. पण या श्लोकांत, त्यांच्या इतर वाङ्मयांत नाहीं, असा गूढपणा फार आहे, असें मला वाटतें. भाषा हि तितकी साधी नाहीं. एकंदरींत मला असें वाटतें, या प्रकरणांत प्रत्येकानें स्वतः गढून जाऊन त्यांतील गूढपणा उकलण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

( २ ) हीं प्रकरणें श्रीसमर्थांच्या अवतारकार्याच्या आरंभींच्या काळांतील असावींत, असें वाटतें. या अवघ्या ६१ प्रकरणांत वीस पंचवीस ठिकाणीं यांनीं स्वतःचा निर्देश 'कवि' म्हणून केला आहे, तितका इतरत्र मुळीं च नाहीं. असा उल्लेख त्यांच्या ज्या ज्या काव्यांत किंवा प्रकरणांत आला असेल, तें तें काव्य किंवा प्रकरण त्यांच्या काव्यरचनेच्या प्रारंभींच्या काळांतील असावें, असें मी मानीत असतों.

( ३ ) या स्फुट श्लोकांतील एका लहानशा प्रकरणांत त्यांच्या चरित्रांतील एका प्रसंगाचें वर्णन असावें, असें दिसतें. उन्हातान्हाचे ते नेहमीं च हिंडत, तेव्हां हा प्रसंग त्यांच्यावर कोठें आणि केव्हां आला होता, हें कळण्याला मार्ग नाहीं. कुबडीतीर्थाचा प्रसंग श्रीशिवरायासंबंधाचा आहे. ५४ व्या प्रकरणांतील प्रसंग खुद्द श्रीसमर्थांवर च आलेला दिसतो.

**बहुत तान लागली । तनु विशेष भागली ।**
**सुरंग तो विरंगला । प्रसंग रंग भंगला ॥ ५४–१ ॥**

**कठीण वेळ पातली । तनु विशेष श्रांतली ।**
**तगबगीतसे मना । कराल भेटि जीवना ॥ २ ॥**

**सुगंध नीर गारसें । दिसेल काय फारसें ।**
**घळाळ वोतितां बरें । नये मनास दुसरें ॥ ३ ॥**

**कळकळीत हा पळु । कवी बहुत वीकळु ।**
**कळवळोनि पोळला । दयाळ राम बोळला ॥ ४ ॥**

अति तहान लागली होती, तोंड कोरडें पडलें होतें, शरीराची सारखी तगबग होऊं लागली होती, गात्रें विकल झालीं होतीं! दयाळ राम बोळले, पाणी मिळालें! देशासाठीं आणि धर्मासाठीं त्या महापुरुषानें कसकसे प्रसंग साहिले, ते त्यांचे त्यांना ठाऊक!

(४) स्फुट प्रकरणांत आरंभीं च आपण अध्यात्मसार आणि आनंदवनभुवन या दोन प्रकरणांचा जसा स्वतंत्र उल्लेख केला होता, तसा या स्फुट श्लोकांत आरंभीं तीन प्रकरणांचा स्वतंत्र उल्लेख केला पाहिजे.

**एक**—५५ वें प्रकरण अवघ्या ४० श्लोकांचें असून त्यांत वेदांतील कर्म, उपासना आणि ज्ञान या त्रिकांडांचें थोडक्यांत वर्णन आहे. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ४४८ त या प्रकरणास ज्ञानकांड म्हटलें आहे व बाडांक ४७८ आणि ११६९ यांत विज्ञानकांड म्हटलें आहे.

**(श्री) त्रिकांड वेद बोलिला। उदंड अर्थ चालिला।**
**बुझेल तो भला भला। जनीं महंत शोभला॥५५-१॥**
**देह्यासि कर्म लागलें। विध्योक्त चालतां भलें।**
**बहुत कर्म शोभलें। भलें तयास लाभलें॥ २॥**

* * *

**(रा) अपार कर्ममार्ग हा। घडे चि ना चि सांग हा।**
**कचाट कर्मसूचना। पुढें असे उपासना॥ १०॥**
**स्वधर्म चुकतां जनु। हरि पतितपावनु।**
**दुजा जनीं असे चि ना। म्हणोनियां उपासना॥ ११॥**
**उदंड देव देवता। जनीं बुझेल पुरता।**
**ऋणानुबंद जीकडे। भजेल लोक तीकडे॥ १२॥**

* * *

**(म) कळे तया उदंड हें। म्हणोन ज्ञानकांड हें।**
**समूळ सर्व जाणणें। तयास ज्ञानसें म्हणे॥ ३०॥**
**भजन तें बहुविधा। तयांत मुख्य नौविधा।**
**तयांत हे निवेदनी। जनीं पतितपावनी॥ ३१॥**
**प्रचीतीनें चि सूटिका। प्रबोध सांपडे निका।**
**प्रपंच होतसे फिका। निशब्द गुज हें शिका॥ ३२॥**

**दुसरें**—५८ वें प्रकरण १२५ श्लोकांचें असून त्यांत **श्रीरामकथा** आहे. कायमची लक्ष्यांत घेण्यासारखी गोष्ट अशी कीं, या लघु कथेंत हि युद्धकांडाचा च भाग सर्वस्वीं आणला आहे. यांत हि लंकेवर चालून जाण्याचा हेतु, सीतामाईची भेट हा सांगितला नसून रावणाच्या बंदिवासांतून देवादिकांची मुक्तता करणें, हा च दिला आहे. या दोन्ही मुद्यांचा जास्त विचार श्रीसमर्थकृत **बृहद्रामायण** आपण हातीं घेऊं तेव्हां करूं. प्रस्तुतच्या रामकथेच्या तुलनेनें त्यास मीं बृहद्रामायण म्हटलें आहे. नाहीं तरी या प्रकरणास चाफळमठांतील एका बाडांत '**लघु रामायण**' अशी संज्ञा दिलेली च आहे. या कथेच्या आरंभीं नमनाच्या तीन श्लोकांनंतर श्रीसमर्थ स्वतःचा उल्लेख **लहानसा कवी नवा** असा करीत आहेत. 'कवि' या संज्ञेमुळें मीं वर जी कल्पना व्यक्त केली आहे, तिला या उल्लेखानें बळकटी येत आहे. न जाणों, असें हि झालें असेल कीं, पूर्व वयांत जसें हें लहानशा नव्या कवीनें लघु रामायण लिहिलें, तसें तें बृहद्रामायण प्रथितयश विख्यात अशा राष्ट्रगुरूनें उत्तर वयांत लिहिलें असावें.

रावणाच्या बंदींत देव पडले असतां त्यांची जी दशा झाली होती, ती वाचीत असतां, हें वर्णन करण्यांत श्रीसमर्थांचा कोणता हेतु असावा, असा प्रश्न वाचकांच्या मनांत स्वाभाविक उभा राहून, त्या हेतूचा सुगावा लागावा म्हणून वाचकांना श्रीसमर्थहृदयांत प्रवेश करावा च लागेल. एरव्हीं, श्रीसमर्थांपासून दूर राहून त्यांच्या अंतःकरणाचा सुगावा लागणार कसा? श्रीसमर्थांच्या हृदयाशीं समरस झालें पाहिजे! बंदिशाळेंत देवांच्या वांट्याला कोणतीं कामें दिलीं होतीं व त्यांची काय अवस्था झाली होती, ती पहा :

**समीर लोटितो खडे। वरुण घालितो सडे।**
**मयंक साउली धरी। मळीण पावकु हरी॥ ५८–१३॥**

**विधी विधीस धाकतो। सुरेंद्र बाग राखतो।**
**करावयास निग्रहो। भुमंडळासि विग्रहो॥ १४॥**

**अखंड चाकरी करी। सदा वरुची भादरी।**
**सटी आरंधळी दळी। गणेश गाढवें वळी॥ १५॥**

**परोपरीं विटंबणा। वदेल कोण रावणा।**
**उदंड देव पीडिले। मदें पदासि खंडिलें॥ १६॥**

**बहु कठीण काळ हो । समस्त पावले मोहो ।**
**हिणादिनाचिया परी । सदा गळीत अंतरीं ॥ १७ ॥**

अशी हीन स्थिति होऊन खालीं माना घालून नुसते उष्ण श्वास टाकीत व अश्रु ढाळीत देव बसले होते.

**समस्त केश लांबले । कितेक वेस्त लोंबले ।**
**नखें चि योग साधले । समस्त देव गादले ॥ १८ ॥**

डोकीवरचे केंस लांबले, दाढा अस्ताव्यस्त लोंबल्या, हातापायांच्या बोटांचीं नखें वाढलीं, जणूं योगी बनले! सर्व देव इतके त्रस्त झाले होते.

**निशाचरें बहु वसे । कठीण वर्तमानसें ।**
**म्हणोनि राम पावला । बहु बळें उठावला ॥ १९ ॥**

सीतेला सोडवावयाची हें कांहीं खरें कारण नव्हतें, तें नुसतें निमित्त होतें, खरा हेतु सुरबंधविमोचनाचा होता.

**निमित्त मात्र ते सीता । विबुधपक्ष पुरता ।**
**समर्थ तो भला भला । कुढावयासि पावला ॥ २० ॥**

या कथेचा शेवट करतांना श्रीसमर्थांनीं, आपणांस आपले कोण वाटतात, तें सांगितलें आहे.

**समर्थ हे उपासना । जनांत आणिती मना ।**
**रघोत्तमा उपासिती । सखे चि ते चि वाटती ॥ २२ ॥**

श्रीसमर्थांनीं एकवार स्वमुखानें "**हा आपला आहे**" असें म्हणून आपणांस त्यांनीं आपल्या लाडक्या शिष्यांत सामील करून घ्यावें, अशी ज्यांना तळमळ लागली असेल, त्यांना ती तळमळ शांत होण्याचा उपाय या श्लोकांत सांपडेल!

प्रकरणाच्या अगदीं शेवटच्या श्लोकांत या लहानशा नव्या कवीची त्या वेळीं काय अपेक्षा होती ती दिली आहे :

**विरक्त भक्त जाणते । अगम्य खूण बाणते ।**
**शरीर त्या घरीं पडो । मनांत राम सांपडो ॥ १२५ ॥**

**तिसरें**—५९ वें प्रकरण एकंदर १०२ श्लोकांचें असून त्यांत **श्रीकृष्णकथा** आहे. या प्रकरणास श्रीकल्याणस्वामींच्या बाडांत च **भागवत**

असें म्हटलें आहे. त्याचे तीन पोटविभाग केलेले आहेत. पहिल्यांत, घात करण्यास आलेल्या माभळभटाची खोड मोडून त्याच्याकडे बोट दाखवून तात्पर्यार्थ धडा शिकविला तो असा :

**श्रीकृष्ण देव द्रोहिला । जिहीं नव्हीं दुराविला ।**
**तया खळास हे गती । बळें चि येम ताडिती ॥ २९ ॥**

**उदास दास तो कवी । बहु जनास सीकवी ।**
**उणें कदा वदों नका । न मानितां घडे धका ॥ ३० ॥**

दुसऱ्या पोटविभागांत

**विषें भरूनियां स्तना । कुटिल घात पूतना ॥**

नाशार्थ आली असतां तिची खबर घेतली आहे आणि तिसऱ्यांत, एकंदर हरिलीला वर्णन करून बोध केला आहे कीं,

**श्रीकृष्ण कृष्ण हें वदा । तुटोन जाति आपदा ।**
**नको कदा देहेमदा । तरी च पावसी पदा ॥ ५९ ॥**

( ५ ) **थोडी शिकवण**—प्रत्यय पहावा, सर्वांस राजी राखावें, अखंड सावधानता असावी, इत्यादि जी त्यांची शिकवण इतरत्र आढळते, ती च या हि स्फुट श्लोकांत आहे, तऱ्हा किंचित् वेगळी. आपण अगदीं थोडक्यांत पाहूं.

( १ ) श्रीसमर्थांच्या वेळीं कठीण काळ आला होता. जनता हवालदील आणि भयभीत झाली होती. लोक भीतीनें, जबरदस्तीनें वा लालुचीनें पटापट स्वधर्माचा त्याग करून परधर्माच्या आश्रयाला जात. अशा वेळीं, हे हि दिवस जातील, एकसारखा काळ कधीं रहात नाहीं, असें सांगून श्रीसमर्थ त्यांना **धीर** देत.

**कित्येक जीव जन्मती । कितेक मृत्य पावती ।**
**कितेक होत जातसे । मना प्रचीत येतसे ॥ १६-१ ॥**

**कितेक वृक्ष वाढती । कितेक वृक्ष मोडती ।**
**कितेक पाहातां रचे । कितेक मागुतें खचे ॥ २ ॥**

**पुरें कितेक पट्टणे । कळे समस्त आट्टणें ।**
**कितेक होत दाटणी । स्थळें न येत वांटणी ॥ ३ ॥**

**रुणानुबंद तों घडे । पुन्हा सवें चि विघडे ।**
**कितेक काळ तों वसे । सवें चि सर्व निरसे ॥ ४ ॥**

**कितेक देश लागला । कितेक देश भंगला ।**
**कितेक नृपती भले । परंतु मृत्य पावले ॥ ५ ॥**
**कितेक उत्पत्ती स्थिती । कितेक पावती गती ।**

हें सर्व तुम्ही पाहातां, जाणतां, मग धाक कसचा बाळगतां ?

**तुम्ही समस्त देखता । कठीण काळ धाकता ? ॥ ६ ॥**

दिवस कठीण आले आहेत खरे, पण म्हणून हातपाय गाळून काय उपयोग! प्रयत्नांतीं परमेश्वर हें ओळखून सावध राहून प्रयत्न केला पाहिजे.

**अखंड सावधान रे । प्रयोग प्रेत्न मान रे ।**
**प्रसंग हा तुफान रे । नको चि वेवधान रे ॥ ६/१ ॥**

**म्हणे उदास दास हा । बरें पाहा बरें पाहा ।**
**करील प्रेत्न जीतुका । तयास लाभ तीतुका ॥ ५ ॥**

जसा प्रयत्न तसें फळ. संकट ओळखून त्याला पुरा पडेल असा अचूक प्रयत्न केल्यास यश हटकून आहे.

**प्रसंग हा कठीण हो । बहुत पावले मोहो ।**
**परंतु येत्न पाहती । सुखें चि ते चि राहती ॥ ४५-१ ॥**

यासाठीं लोकांस प्रसंगाची जाणीव करून देऊन वारंवार **सावधानतेची सूचना** देण्याचा श्रीसमर्थांनीं कधीं कंटाळा केला नाहीं. त्यांची भाषा हि, अशा वेळीं, प्रसंगाला अनुरूप अशी धीराची आणि प्रोत्साहनाची असे.

**प्रसंग हा तडतडी । करा विवेक तांतडी ।**
**सुचीत व्हा घडी घडी । प्रबोध घ्या खडाखडी ॥ १२/३ ॥**
**देश काळ वर्तमान । सर्व हि अवेवधान ।**
**कोणतें विधी विधान । सावधान सावधान ॥ २९/१ ॥**

ही द्विरुक्तीनें केलेली आज्ञा **श्री रामदास आणि रामदासी मासिकानें** मस्तकीं धारण केल्याचें वाचकांच्या लक्षांत आलें च असेल.

(२) अशा त्या संकटकाळीं श्रीसमर्थांनीं जनांस **रामोपासनेचा उपाय** सुचविला. त्रेतायुगांत अशा च तऱ्हेच्या संकटावस्थेंत ज्या स्वामीसेवकाच्या जोडीनें धर्मरक्षण केलें, ती च जणूं जोडी, आतां हि तुमचें रक्षण करील, असें त्यांनीं जनतेस आश्वासन दिलें.

**श्री राम राम राम रे। समर्थ योगधाम रे।**
**दयाळ तो दया करी। कवी जनासि वीवरी ॥ ११/१ ॥**

**धनुष्यबाण धारकु। हरि जनासि तारकु।**

पुढच्या चरणांतील 'प्रचंड ध्यान' पाहून, 'हरिजनासि' असा एक शब्द मानून 'तारकु' पहिल्या चरणांतील रामाचें विशेषण न करतां, 'हरि जनासि' असे शब्द मीं तोडले आहेत व 'तारकु' हें हरीचें विशेषण केलें आहे. हरि म्हणजे मारुती.

**प्रचंड ध्यान तें धरा। मनांतरीं च वीवरा ॥ ३ ॥**

**जसा तसा चि काळ हो। मनीं धरा दयाळ हो।**
**तुम्हांसि तो दया करु। अनन्य भाव वीवरु ॥ ५ ॥**

(३) अहंकारानें उत्पन्न होणारे आपसांतील कलह मात्र मिटवून ऐक्य साधलें पाहिजे.

**अभेद भक्तीचा ठसा। अनन्य भाव तो कसा।**
**निवेदनें चि वोळखा। अहंपणें झकों नका ॥ १७/४ ॥**

आपसांतील कलह मिटविण्याला श्रीसमर्थ जो उपाय सुचवीत आहेत, तो सर्वदा चित्तांत बाळगण्यासारखा आहे.

**धरून पक्ष काय रे। उपाय तें अपाय रे।**
**तुम्ही तुम्हांस विवरा। स्वहित तें मनीं धरा ॥ ३७/१० ॥**

**जनीं उदंड पाहिलें। कळहो करीत राहिलें।**
**अनन्य देव भेटला। कळहो तयास तुटला ॥ ११ ॥**

**कळहो करील शब्द रे। अनंत तो निशब्द रे।**
**तुम्ही अनंत कां न व्हा। वेवादतां अव्हासव्हा ॥ १२ ॥**

**अनंत ब्रह्म तें असे। तयास पक्ष हि नसे।**
**संत संत संत रे। निवांत रे निवांत रे ॥ १३ ॥**

**स्वयें चि तो चि होइजे। पदीं मिळोनि जाइजे।**
**उरेल तो कळहो करु। उदंड पक्ष हि धरु ॥ १४ ॥**

कोणत्या हि प्रश्नाच्या बाबतींत, आणि विशेषत: श्रीशिवसमर्थांच्या बाबतींत विकारवश होऊन अकारण वितंड वाद घालणारांना आपलें हेंच उत्तर असावें :

**उदंड हो बरें बरें । तुम्ही म्हणाल तें खरें ।**
**कळेल तें सुखें करा । धराल तें सुखें धरा ॥ १५ ॥**

कारण वितंड वाद घालणारांना सत्याची चाड नसते च मुळीं.

**हितार्थ सांगणें घडे । विवंचितां तिढा पडे ।**
**जना प्रचीत नावडे । कुळाभिमान तो जडे ॥ १९ ॥**

(४) **मनाला मन** मिळालें पाहिजे. नुसत्या देहानें देहाला भेटून उपयोग काय? मनें एक झालीं पाहिजेत. मनें भिन्न तर ध्येयें भिन्न आणि तें च कलहाचें मूळ होय.

**तनास भेटलीं तनें । मनास चुकलीं मनें ।**
**चुकी चुकी बहु चुकी । परस्परें चुकामुकी ॥ $\frac{३१}{१}$ ॥**
**मढ्यास भेटलें मढें । करील काय बापुडें ।**
**मनें मनाचिया खुणा । बुझेल लोभ त्या दुणा ॥ २ ॥**
**उगें चि वेचलें वये । मनास भेटतां नये ।**
**मनें मनास राखणें । सुखें सुखास चाखणें ॥ ३ ॥**

अगदीं तद्वत् म्हणतां येईल कीं, श्रीसमर्थहृदयांत प्रवेश करतां आला नाहीं, तर त्यांचें वाङ्मय नुसतें वाचून काय उपयोग?

(५) **परांतर** राखलें पाहिजे. ही हि बहुमोल शिकवण श्रीसमर्थ-वाङ्मयांत कितीदां आढळेल, याची कल्पना करवत नाहीं.

**परांतरास राखणें । अचूक सुख चाखणें ॥ $\frac{३१}{१२}$ ॥**
**परांतरास राखणें । समस्त सुख चाखणें ॥ $\frac{३३}{३}$ ॥**

आणि ३६ व्या प्रकरणांत दुसरें काय आहे? ही च शिकवण आहे.

**मनें मनासि मीळणी । तयासि मानिती गुणी ।**
**परांतरासवें भरे । प्रसंगमान वीवरे ॥ $\frac{३६}{१}$ ॥**
**विभक्त दीसती खरें । परंतु येक अंतरें ।**
**अनन्य येकि धारणा । मिळोन जाय कारणा ॥ ४ ॥**
**मिळोन जाय अंतरा । तदंश तो चि तो खरा ।**
**विचार येक धारणा । मिळोन जाय कारणा ॥ ५ ॥**

(६) **प्रचीति** पाहिजे. प्रचीतीवांचून नुसती बडबड आणि कुत्र्याचें उगें च भुंकणें यांत फरक काय? प्रचीति घ्यावी आणि प्रचीतीनें बोलावें.

**कदा नये चि प्रत्ययो । तयास काय तो जयो ।**
**पतीत तो चि पातकी । विनाप्रचीत घातकी ॥ २६/१३ ॥**

**नसे प्रचीत तें सुणें । उगें चि काय भुंकणें ।**
**स्वयें प्रचीत तो वरु । उगा चि सिंतरु खरु ॥ १४ ॥**

(७) यत्न तो देव जाणावा, इतकी प्रयत्नाची प्रतिष्ठा वाढविणारे श्रीसमर्थ **ऋणानुबंध** म्हणून कांहीं असतो, असें केव्हां केव्हां मानतात, हें पाहून, कारण लक्षांत येत नाहीं, पण मला आनंद वाटतो. यत्न तो देव खरा च, पण प्राक्तन हि अनुकूल पाहिजे. सर्व साधनें करून हि ज्ञान होण्याला अखेरीस, श्रीसद्गुरुकृपा जशी लागतेच, तद्वत् प्रयत्न करून हि यश येण्याला प्राक्तनीं हि लिहिलेलें असावें लागतें च, असें वाटतें.

**रुणानुबंद तों घडे । पुढें समस्त वीघडे ।**
**पशु मनुष्य संपदा । घडोन वीघडे सदा ॥ ४७/१ ॥**

**भरों च लागतां भरे । भरे कदापि नावरे ।**
**सवें चि वोसरे सरे । सरे चि तें कदा नुरे ॥ २ ॥**

**बरी च वेळ लागतां । घडोन ये न मागतां ।**
**उगा च काळ विषमु । पराक्रमु च तो श्रमु ॥ ३ ॥**

**बरा चि काळ तो बरा । न मागतां चि ये घरा ।**
**बळें चि लोक बोलती । सुखें सुखी कल्लोळती ॥ ४ ॥**

**उदास राहतां गती । भले विवेक सांगती ।**
**घडेल तें सुखें घडो । पडेल तें सुखें पडो ॥ ५ ॥**

हें सर्व जाणून हि प्रयत्न हा केला च पाहिजे.

---

[ ४ ]

# श्लोकबद्ध प्रकरणें

( १ ) रामायण

( २ ) करुणाष्टकें वगैरे

( ३ ) श्री श्लोक मनाचे

## ( १ ) रामायण

या तिन्ही प्रकरणांची भाषा, त्यांचा विषय, तीं लिहिण्यांतील हेतु इत्यादिकांचा विचार केला म्हणजे मला असें वाटतें, आधीं रामायण, सर्व आयुष्यभर प्रसंगानुसार मधून मधून करुणाष्टकें आणि शेवटीं मनाचे श्लोक रचले गेले असावेत. श्रीशिवरायाला राज्याभिषेक होण्याच्या पूर्वी रामायण रचलें गेलें असावें व राज्याभिषेक होऊन रामराज्याची स्थापना झाल्यावर मनाच्या श्लोकांची रचना झाली असावी. धर्मरक्षणार्थ राज्यस्थापनेचा घेतलेला ध्यास फलद्रूप झाला होता, अवतारकार्य सिद्धीस गेल्याचें समाधान प्राप्त झालें होतें, चित्ताला प्रसन्नता आली होती, अशा सुखमय, निश्चित अवस्थेंत श्रीसमर्थ असतां त्यांच्या मुखावाटें मनाचे श्लोक बाहेर पडलेले दिसतात. तेव्हां आपण हि आधीं रामायण, मध्यंतरीं करुणाष्टकें आणि शेवटीं श्री श्लोक मनाचे, या क्रमांत या तिन्ही श्लोकबद्ध प्रकरणांचा विचार करूं.

( १ ) मला आपलें हें दुर्दैव वाटतें कीं, श्रीसमर्थांच्या रामायणाकडे श्रीसांप्रदायिकांचें, अभ्यासकांचें व इतरांचें असावें तितकें लक्ष नसतें. तें यापुढें तरी लागावें, अशी मी प्रार्थना करितों. श्रीसमर्थांनीं रामायणाचे श्लोक उगीच केले नाहींत. समाजकारण, धर्मकारण, राजकारण, प्रपंच आणि परमार्थ, व्यक्तिनीति आणि राजनीति यांची त्यांना समाजाला सोदाहरण आणि सप्रचीत शिकवण द्यावयाची होती, म्हणून त्यांनीं सुंदरकांडाचें एक शत व युद्धकांडाचीं तेरा शतें, मिळून चौदा शतें रामायणाची श्लोकबद्ध रचना केली.

(२) १८१ श्लोकांचें किष्किंधाकांड श्रीसमर्थांचें म्हणून प्रकाशित करण्याला प्रथम कोणीं आरंभ केला, तें मला ठाऊक नाहीं. नंतरचे प्रकाशक अंधपरंपरेनें तें त्यांचें म्हणून प्रकाशित करीत आले आहेत व डोळे उघडून कधीं पाहावयाचें च नाहीं, असा त्यांचा दंडक असल्यामुळें यापुढें हि करीत राहतील, पण किष्किंधाकांड श्रीसमर्थांचें नाहीं, याविषयीं तिळमात्र शंका नको . त्याची भाषा श्रीसमर्थांची नाहीं, त्यांतील विचारसरणी त्यांची नाहीं. श्रीसमर्थांच्या मठांतील हजारों बाडें आज आपल्यापुढें आहेत,

त्यांपैकीं एका हि बाडांत किष्किंधाकांड नाहीं. श्रीसमर्थांच्या चरित्रकारांपैकीं कोणी हि त्याचा उल्लेख करीत नाहीं, इतकें च नव्हे, तर शिरगांवमठपति भीमस्वामी

**स्वामीच्या मानसीं रामकथा कांहीं। वर्णावी हे पाही इछा जाली ॥**
**सुंदरकांडाचे केले शत श्लोक। युद्धकांड देख तेरा शतें ॥**
**ऐसें चौदा शतें केलें रामायण। जयाच्या श्रवणें दोष जाती ॥**

असें निःसंदिग्धपणें सांगत आहेत. बाडांक ५१ त श्रीकल्याणस्वामींनीं श्रीसमर्थांचें रामायण लिहिलें आहे, त्यांत किष्किंधाकांड श्रीसमर्थकृत असतें तर ते न लिहिते काय? त्यांत ते सुंदर आणि युद्धकांड लिहून शेवटीं "येकूण संख्या चौदासें बासष्टी" अशी फक्त या दोन च कांडांची ग्रंथसंख्या नमूद करितात. तात्पर्य, किष्किंधाकांड श्रीसमर्थांचें नव्हे. तें लिहिण्याचा त्यांचा विचार हि नसावा. श्रीरामचरित्रपर प्रकाशित आणि अप्रकाशित अशीं त्यांचीं स्फुट पदें, अष्टकें, श्लोक शतशः आहेत, पण त्यांना मुख्य मारुतीचा पराक्रम, श्रीरामाचें भक्तप्रेम, रावणाचा वध, देवबंधविमोचन व तदनुषंगिक कथाभाग, एवढा च वर्णावयाचा होता व तो त्यांचा हेतु या दोन कांडांनीं साधत होता.

(२) हीं दोन कांडें लिहितांना, त्यांनीं स्वतः केलेली श्रीवाल्मीकिरामायणाची प्रत त्यांच्याजवळ होती, याविषयीं मला शंका उरली नाहीं. वाल्मीकिरामायणाच्या ज्या प्रती प्रकाशित आहेत, त्यांत नसलेले कांहीं प्रसंग श्रीसमर्थरामायणांत आहेत व त्यांचें मूळ त्यांनीं केलेल्या वाल्मीकिरामायणाच्या प्रतींत आढळतें. प्रस्तुतचीं दोन्ही कांडें त्या प्रतीला बहुतांशीं धरून आहेत. युद्धकांडाच्या सहाव्या शताच्या शेवटीं

**म्हणे दास उदास श्रोतीं न व्हावें।**
**ऋषी बोलिला तें चि हें सार घ्यावें ॥ ६–१०६ ॥**

अर्थात्, पाल्हाळ सर्व टाकून आपल्या हेतूला पोषक असा मुद्याचा तेवढा च भाग त्यांनीं वर्णिला आहे.

ते म्हणतात हि

**किती येक पाल्हाळ सांडूनि मागें।**
**कथा चालिली ते पुढें लागवेगें ॥ १०–१०७ ॥**

त्पुनरागत्य कुंजरेण रथेन वा ॥ राजमार्गेपि दृष्ट्वा नः स्मित्वा पृछत्यनामयं ॥ ३४ ॥ अग्निहो
त्रेषु दारेषु शिष्यप्रेष्यजनेषु च ॥ सानुकंप्यः सदा रामः पृछत्यस्माननामयं ॥ ३५ ॥ अभ्यंतरे
च राज्ये च पौरजानपदे तथा ॥ स्त्रियो वृद्धास्त[illegible]यश्च देवान् राजगृहे गृहे ॥ ३६ ॥ रामस्यै
वाभियाचंते यौवराज्याभिषेचनं ॥ तासां नयोचितं राजन् त्वत्प्रसादात्प्रसिद्धतां ॥ ३७ ॥ रामभिंदी
वरश्यामं प्रजानामनुकंपकं ॥ पश्यम युवराजं तमभिषिक्तं त्वदाज्ञया ॥ ३८ ॥ स राजव
र्यमिजमात्मवंतं गुणान्वितं रामं नरलोककांतं ॥ रामं च देवार्हसि लोकनाथमिहाभिषेक्तुं
युवराजमुख्यं ॥ ३९ ॥ ॥ इत्यार्षे रामायणे वाल्मीकीये बालचरिते आदिकां
डं समाप्तमिति ॥ ॥ समाप्तमादिकांडं ॥ ॥ श्रीराम ॥ ॥ श्रीरस्तु ॥ ॥ रामार्पणमस्तु ॥

॥ ॥ शाकसंवत् १५४४ ॥ दुंदुभिनाम संवत्सरे माघशुद्ध १३ रवौ अस्मिन् शुभदिने रामेण
रामदासेन लिखितमिदं पुस्तकं ॥ ॥ श्रीरघुनाथार्पणमस्तु ॥ ॥ रमाकांतप्रीतो भवतु ॥
॥ ॥ श्रीराम राघव रमेश्वर रामचंद्र राजीवनेत्र रघुवर्य रमेश ईश ॥ श्रीरामभद्र भुवनेश्वर
तीर्थपाद कंठे करोमि सततं तव नाममालां ॥ १ ॥

तो सारा कथाभाग सारांशरूपानें हि येथें देण्याचा माझा हेतु नाहीं. त्या कथाभागांत श्रीसमर्थांना श्रीराम, मारुती, सुग्रीव, अंगद, इत्यादिकांना पाहावयाचें होतें आणि आतां आपणांस त्यांत श्रीसमर्थ, श्रीशिवराय आणि त्यांचे साह्यकारी यांना पाहावयाचें आहे. जेथें मला त्यांचा थोडासा तरी भास होईल, तेथें मी थबकणार व वाचकांस हि थांबविणार.

( ४ ) या रामायणांत वाचकांस श्रीसमर्थांचा पहिला साक्षात्कार रामकथेचा हेतु श्रवण करतांना च होतो. स्पष्ट तसें न म्हणतां, प्रत्यक्ष वाल्मीकिशीं हि श्रीसमर्थांनीं आपला मतभेद दर्शविला आहे. वाल्मीकिमुनींच्या मताप्रमाणें, रामानें लंकेवर स्वारी करून देवांना बंदिवासांतून मुक्त केलें, हें खरें आहे, पण ती आनुषंगिक गोष्ट होय, लंकेवर स्वारी करण्यांत श्रीरामाचा मुख्य हेतु सीतादेवीला परत मिळवून कुळाला लागलेला कलंक धुऊन काढावयाचा, हा होता. श्रीसमर्थांनीं या सर्व हेतूंना दुय्यम स्थान दिलें आहे ; किंबहुना, खरी जगन्माता रावणानें हरण करून नेली च नव्हती, तर तिला परत आणण्याचा हेतु मुख्य असेल च कसा ! तें नुसतें निमित्त होतें. मुख्य हेतु देवांच्या बंधविमोचनाचा होता. मागील स्फुट श्लोकांतील लघु रामायणांत श्रीसमर्थांनीं या च हेतूचें समर्थन केल्याचें आपण पाहिलें च आहे.

( ५ ) श्रीसमर्थांचें सुंदरकांड च पहा. सीताशुद्धीसाठीं मारुती शंभर योजनें समुद्र उड्डाण करून जातात आणि आधीं काय पाहतात ?

**त्रिकूटाचळीं मारुती सर्व पाहे ।**
**लघूरूप होऊनि तो हिंडताहे ।**
**गृहें गोपुरें पाहिल्या धर्मशाळा ।**
आणि **अकस्मात त्या देखिल्या बंदिशाळा ॥ सुं. १७ ॥**

त्यांत देवादिकांची कशी स्थिति झालेली त्यांच्या नजरेस पडली ?

**हिणासारिखे देव ते दीन जाले ।**
**नसे शक्ति ना युक्ति पोटीं गळाले ।**
**भयाभीत ते कांपती दैन्यवाणे ।**
**बहु गांजिलें दुःख तें कोण जाणे ॥ १८ ॥**

देवांची अशी दुर्दशा पाहून

**सुरांकारणें कोप भीमासि आला ।**
**मनामाजि आवेश तो थर्थरीला ।**
**रुपें भर्भरीला तमें गर्गरीला ।**
**प्रसंगीं तये मारुती गुप्त जाला ॥ १९ ॥**

आणि मनामध्यें गांठ मारून ठेविली कीं,

**मनामाजि आवांकिलें सर्व कांहीं ।**
**सिमा सांडिली तूळणा त्यासि नाहीं ।**
**बहु मातले गर्व मोठ्या बळाचा ।**
**तया झोडितो दास मी राघवाचा ॥ २० ॥**

याप्रमाणें आधीं देवांकडे पाहून व मनोमनीं निश्चय करून मग मारुतिराय सीतेकडे वळले

**कपीवीर तेथूनि वेगीं उडाला ।**
**अशोकावनामाजि वृक्षीं दडाला ।**
**अधोमूख तो जानकीलागि पाहे ।**
**कपी राममुद्रा पुढें टाकिताहे ॥ ५१ ॥**

वगैरे.

( ६ ) तें कांहीं असलें तरी इतकें खरें कीं, श्रीसमर्थांच्या मतें रामायणाची महती सुरबंधविमोचनामुळें होय. युद्धकांडाला सुरुवात करतांना तशी ती त्यांनीं स्पष्टपणें सांगितली हि आहे :

**कथा शंकराची कथा कार्तिकाची ।**
**कथा चंडिकेची कथा मोरयाची ।**
**कथा वेंकटीची कथा वीठलाची ।**
**कथा मल्लयाची कथा भैरवाची ॥ यु. १–५ ॥**

**कथा नृसीह्या वामना भार्गवाची ।**
**कथा कौरवा पांडवा माधवाची ।**
**कथा देव इंद्रादि ब्रह्मादिकाची ।**

अशा कथा पुष्कळ आहेत, पण

**समस्तांमधें श्रेष्ठ या राघवाची ॥ ६ ॥**

कां ? सीतेला परत मिळविली म्हणून ? नव्हे, तर

**जेणें फेडिला पांग ब्रह्मादिकाचा ।**
**बळें तोडिला बंद त्या त्रीदशांचा ।**
**म्हणोनी कथा थोर या राघवाची ।**

आणि अशी कथा श्रवण करण्याचें फळ हि ऐकण्यासारखें आहे

**जनीं ऐकतां शांत होते भवाची ॥ ७ ॥**

सर्व दुःखांचा परिहार, हें या चरित्रश्रवणाचें फळ होय, असें श्रीसमर्थांनीं अनेकदां प्रसंगानुसार सांगितलें आहे, (पहा २–१००, ५–१०७, ९–१०२, १३–९२ इत्यादि) पण एका ठिकाणीं तर ही फलश्रुति आपल्या प्रत्ययास आल्याचें त्यांनीं सांगितलें आहे.

**कथा ऐकतां नासलें कार्य होतें ।**
**महा विघ्न तें भग्न होऊनि जातें ।**
**सुखानंद आनंद नाना विळासीं ।**
**अखंडीत प्रचीत हे रामदासीं ॥ ८–१०८ ॥**

(७) अशा प्रकारचें रामकथेचें स्वरूप असल्यामुळें तींत कांहीं व्यावहारिक आणि राजकीय नीतीचे धडे यावेत, हें स्वाभाविक आहे. यांपैकीं कांहीं धड्यांना वाल्मीकिरामायणाचा आधार असला तरी कित्येक धडे श्रीसमर्थांच्या स्वतंत्र बुद्धीचे द्योतक आहेत. असे दोन्ही प्रकारचे थोडे धडे आपण येथें पाहूं. कारण त्यांत हि आपणांस श्रीसमर्थहृदयाचा ठाव घेण्याची संधी मिळणार आहे.

(श्री) सीताशुद्धीसाठीं पहिल्या खेपेस आल्यावेळीं मारुतीनें लंकेंत जो धुमाकूळ मांडला, तो बंद पाडून त्यास पकडून आणण्याची आज्ञा रावणानें आपल्या अंकित असलेल्या ब्रह्मदेवाला केली. ब्रह्मदेव विचारे काय करणार ? भेटले मारुतीला आणि त्याला विनविलें, बाबा रे, तूं आमच्या मुक्ततेसाठीं च धडपड करीत आहेस खरें, पण आज माझ्या जीवावर बेतली आहे, तेव्हां तूं जो लंकेचा नाश आणि राक्षसांचा संहार मांडला आहेस, तो बंद कर आणि माझ्याबरोबर चल व रावणाच्या आधीन हो !

वाल्मीकिरामायणांत हा प्रसंग नाहीं, असें वाटतें. पण श्रीसमर्थांनीं तो वर्णिला आहे. अन्य उपायांनीं मारुती पकडला जात नाहीं,

**तया टाकितां पाश मोठा चि होतो ।**
**लघूरूप होऊनि नीघोनि जातो ।**
**कदा ही पडेना कदा सांपडेना ।**
**तेणें मारिली दैत्य ऊदंड सेना ॥ सुं. ६८ ॥**

असे जेव्हां रावणाच्या लोकांनीं हातपाय गाळले आणि आपण मारुतीस पकडण्यास असमर्थ आहोंत असें रडगाणें गाइलें, तेव्हां रावणानें शेवटचा हुकमी उपाय योजिला :

**विधीलागि बोलाविलें रावणानें ।**

आणि कोपायमान होऊन, तुमची च मारुतीला फूस असली पाहिजे, असा त्याजवर आरोप करून आज्ञा केली, जा, त्याला पकडून आणा, नाहीं तर तुम्हांस च—तुम्हांस कसलें, तुला च—शासन करीन

**कठीणोत्तरीं गांजिलें दुर्जनानें ।**
**म्हणे जाय रे आणिं वेगीं कपीला ।**
**तया नाणितां शीघ्र ताडीन तूला ॥ सुं. ६९ ॥**

पुढें काय झालें ? पाल्हाळ कशास हवा, श्लोक च देतों. पुढें

**विरंची पुढें घातला चालवीला ।**
**असंभाव्य तो लोक मागें मिळाला ।**
**वनामाजि येतां नमस्कार घाली ।**
**तया मारुतीची बहू स्तूति केली ॥ ७० ॥**

**बहूतांपरी कीर्तिचें येश घ्यावें ।**
**दयाळा कपी ये घडी शांत व्हावें ।**
**न होतां मला मारिती ब्राह्मणाला ।**
**बहूसाल कल्याण व्हावें तुम्हांला ॥ ७१ ॥**

मी हात आवरतों, वाचकांनीं कृपा करून मूळ पाहावें अशी विनंति करतों. इतिहासांतील हुबेहुब असे च प्रसंग वाचकांस कैक आठवतील. मला एक आठवतो. रावणाच्या ऐवजीं आदिलशहा, मारुती म्हणजे शिवाजी आणि ब्रह्मदेव म्हणजे शहाजी मानून हा कथाभाग वाचला तर तो त्या प्रसंगाला तंतोतंत शब्दशः लागू पडतो.

वाल्मीकिरामायणांत हा प्रसंग नाहीं ना? मग काय, प्रत्यक्ष डोळ्यांपुढें घडत असलेला प्रकार पाहून च हा प्रसंग श्रीसमर्थांनीं वर्णिला असेल काय? त्यांना च विचारूं!

(रा) मनांत कांहीं असलें तरी, जुलमी आणि दुराग्रही राजा असला म्हणजे सत्य त्याला पटत नाहीं, असें दिसतां च त्याच्या मनासारखें बोलावें लागतें! काय करावें म्हणून रावण मंत्र्यांचा आणि इतरांचा सल्ला घेत असतां कुंभकर्णाची अशी अवस्था झाली. प्रथम त्यानें सरळ सल्ला दिला

**वदे कुंभकर्णू तया रावणाला।**
**मदें सर्व ही नीतिधर्म बुडाला।**
**अकस्मात लंकापती बुद्धि नासे।**
**पुढें सर्व ही सूख तेणें विनासे॥** यु. १-४४॥

**जगें निंदिलें तें चि ठाकूनि येतां।**
**पुढें वेळ नाहीं तया दुःख होतां।**
**विषें घोळलें ठेवितां प्रीति तेथें।**
**पुढें सत्वर जाइजे मृत्यपंथें॥ ४५॥**

**वदे कुंभकर्णू असें काय केलें।**
**सिता आणितां सर्व ही राज्य गेलें।**

परंतु हें सरळ, न्यायाचें, हिताचें बोलणें रावणास रुचत नाहीं, असें पाहतांच, ज्याचें कर्म त्याच्या बरोबर असें मनांत आणून, कुंभकर्णानें आपलें बोलणें फिरविलें

**पुढें भंगलें चित्त जाणोनि जीवें।**
**तयासारिखें बोलिला तो स्वभावें॥ ४६॥**

**शुभाशूभ जें मानलें तूजलागी।**
**घडो तें चि आतां भलें ये प्रसंगीं।**
**बळें माझिया सर्व सूखें रहावें।**
**पुढें काय होईल तसें पहावें॥ ४७॥**

**कपी मानवी सर्व कैसे मिळाले।**
**क्षुधेकारणें माझिये प्राप्त जाले।**
**रिपू घालितों ऊदरामाजि सांठा।**
**नरें वानरें ग्रास घेतों गटाटां॥ ४८॥**

वगैरे मग कुंभकर्णानें पोकळ गर्वोक्ति केली आहे. आपलें सरळ बोलणें रावणास पटेना म्हणून कुंभकर्णानें भाषणाची दिशा बदलली, असें वाल्मीकींत बहुधा नाहीं. हें श्रीसमर्थांचें मानवस्वभावाचें निरीक्षण होय.

( म ) सर्वांचीं तोंडदेखलीं अधर्माचीं अनन्वित भाषणें ऐकून बिभीषणाचा मात्र संताप झाला आणि त्यानें उद्गार काढले

**म्हणे रे रघूनाथ पूर्ण प्रतापी ।**
**दुरात्मे तुम्ही नष्ट चांडाळ पापी ॥ ५४ ॥**

त्याला भविष्य दिसूं लागलें आणि त्यानें सल्ला दिला—तत्काळ जानकी परत करा.

**तुम्ही राक्षसें निर्बळें बुद्धिहीणें ।**
**मती मंदली पातकाचेंनि गुणें ।**
**सुरांकारणें राम आला कळेना ।**
**मदें मातला रावणू वोळखेना ॥ ५५ ॥**

**कपीवीर ते दूरि टाकूनि शंका ।**
**मिळाले करायासि निर्मूळ लंका ।**
**त्रिकूटाचळू दृश्य नाहीं तयाला ।**
**तवं जानकी भेटवा राघवाला ॥ ५६ ॥**

इत्यादि. बिभीषणाचा हा हितोपदेश ऐकून सर्व सभा संतप्त झाली, सर्व जण त्याला अद्वातद्वा बोलूं लागले, रावणाचा तर कोप अनावर होऊन, बिभीषणाला

**सभेमाजि धीकारिलें रावणानें ।**
**उठोनी पदें ताडिलें दुर्जनानें ।**
**बहूतांमधें येकला धर्ममूर्ती ।**
**मनीं खोंचला तो उदासीन चित्तीं ॥ ६० ॥**

सभेकडे पाठ फिरवून बिभीषण चालता झाला, तसा त्याच्या मागोमाग आणखी चौघांनीं त्या अधर्मप्रवर्तक सभेचा त्याग केला.

जगाच्या इतिहासांत अगदीं परवांपरवांपर्यंत अशीं अनेक उदाहरणें घडल्याचें आपण वाचीत आलों आहोंत.

( ज ) बिभीषण तडक रामाकडे जावयास निघाले. बाहेर वानर होते, त्यांस आपण कोण हें कळवून रामाची आपणांस भेट करवून द्या, अशी बिभीषणानें त्यांची विनवणी केली. त्या वानरांत सुग्रीव होते, ते बिभीषणास म्हणाले, क्षणभर बाहेर बसा, आपण रामास कळवून सांगतों. सुग्रीव रामाकडे जाऊन सांगतात, राक्षसांकडील एक जण आला आहे, कोण कसा आहे काय सांगावें, एकदम ठेवून घेऊन त्यास आश्रय देणें राजनीतीला धरून होईल काय? रामानें सर्वांचा विचार घेतला, पण त्यांना स्वतःला च लोकांची परीक्षा चांगली करतां येत होती, त्यांनीं बिभीषणाचें अंतःकरण ओळखिलें आणि त्यास भेटीस आणविलें.

कोणत्या हि काळांत दोन युद्धमान राष्ट्रांत जशा गोष्टी घडाव्या, तसा हा प्रसंग श्रीसमर्थांनीं वर्णिला आहे. "क्षणभर बाहेर बसा, आपण रामास कळवून सांगतों" या शिष्टाचाराचें मला फार कौतुक वाटलें. ते चार पांच श्लोक सर्वांच्या अवलोकनांत असावेत.

बिभीषण येऊन म्हणतात :

म्हणे बंधु मी होय लंकापतीचा ।
परी दास अंकीत या राघवाचा ॥ ६५ ॥

पुरी त्यागिली सर्व येका जिवेंसीं ।
करा हो तुम्ही भेटी या राघवेंसीं ।
म्हणे सत्य बिभीषणू नाम माझें ।
नव्हे सर्वथा अन्यथा वाक्य दूजें ॥ ६६ ॥

कपी सर्व ही जुत्पती धर्ममूर्ती ।
बहूतांपरीं ऐकिली वाड कीर्ती ।
समस्तीं तुम्हीं हीत माझें करावें ।
कृपाळूपणें राघवा भेटवावें ॥ ६७ ॥

त्यावर सुग्रीव म्हणतात :

म्हणे वीर सुग्रीव नावेक बैसा ।
त्वरें मात हे जाणवीतों सुरेशा ।
कपीराज तो लागवेगें निघाला ।
अती आदरें भेटला राघवाला ॥ ६८ ॥

**समाचार साकल्य तो सांगताहे ।**
**म्हणे भेटि नीशाचरू इछिताहे ।**
**परी अंतरीं कोण कैसा कळेना ।**
**तया ठेवितां राजनीती मिळेना ॥ ६९ ॥**

पण सर्वांच्या अंतःकरणाचे साक्षी श्रीराम !

**समस्तांकडे पाहिलें राघवानें**
**बहूतांपरीं बोलिलें ते सभेनें ।**
**मनीं पाहतां देखिला दैन्यवाणा ।**
**कृपाळूपणें आणवी रामराणा ॥ ७० ॥**

आणि मग

**उभें राहिलें भाग्य बिभीषणाचें ।**
**करी अंतरीं ध्यान पादांबुजाचें ।**
**भिजे दिव्य सर्वांग त्या अश्रुबिंदीं ।**
**मिठी घातली रामपादारविंदीं ॥ ७१ ॥**

कसकसलें कौतुक करूं ! शिष्टाचाराचें करूं, का रामाच्या कृपाळूपणाचें करूं, का बिभीषणाच्या भक्तिप्रेमानें थबथबलेल्या अंतःकरणाचें करूं, का श्रीसमर्थांच्या अनुपम काव्याचें करूं ! वाटतें, आपण हि क्षणभर येथें थांबावें, तें च ध्यान करावें, तशी च मिठी मारावी, तसे च अश्रु ढाळावे आणि मग दुसरीकडे सरकावें.

बिभीषणाच्या वर्तनाबद्दल वाद घालणारे खुशाल घालोत. इतक्या गोष्टी सत्य आहेत :

(१) रावणाचा असत्पक्ष होता, (२) सदुपदेश ऐकावयास तो तयार नव्हता, (३) बिभीषणानें त्यास न्यायाच्या आणि नीतीच्या गोष्टी सांगून पाहिल्या, (४) रामाला लंका जिंकून लंकेवर आधिपत्य गाजवावयाचें नव्हतें, (५) तसें त्यानें गाजविलें हि नाहीं, (६) त्यानें बिभीषणास चिरंजीव करून लंकाधिपति केलें, (७) अधर्माचा काळ संपून लंकेस धर्मराज्य सुरू झालें, (८) लंकावासी जनाला तें मानवलें, ते सुखी झाले आणि त्यांनीं आपली मान्यता दर्शविली. यांत कोठें हि स्वजनद्रोह नाहीं, अधर्म नाहीं, अन्याय नाहीं, जुलूम नाहीं, जबरदस्ती नाहीं !

( य ) इंद्रजित आणि बिभीषण समोरासमोर ठाकले, तेव्हां च त्या उभयतांचीं उत्तरप्रत्युत्तरें होऊन या वादाचा निकाल लागला होता.

बिभीषणास समोर समरंगणीं पाहून इंद्रजित त्याजवर आरोप ठेवून गर्वानें बोलतो :

**म्हणे रे बहूतां दिसां देखिलासी ।**
**वृथापुष्ट रे राक्षसांमाजि होसी ।**
**नरें वानरें दास जालासि त्यांचा ।**
**मनू भंगिला रे तुवां पूर्वजांचा ॥ ९–९७ ॥**

**तुज ठाउका कोप माझा कृदांतु ।**
**मज इंद्रजीतापुढें मश्यका तूं ।**
**करूं पाहसी थोर सामर्थ्य येथें ।**
**समरंगणीं धाडितों मृत्यपंथें ॥ ९८ ॥**

आरोपाचें खंडण करून बिभीषण प्रत्युत्तर करितात :

**बहू शीकवीलें तुम्हां दुर्जनासी ।**
**परी नायका रे तुम्ही पापरासी ।**
**मज सांगतां हीत अव्हेर केला ।**
**समस्तांसि येणें गुणें मृत्य आला ॥ १०० ॥**

**मज ताडिलें वैभवाचेनि तोषें ।**
**बुडालेति रे सर्व तेणें चि दोषें ।**
**समस्तांसि मारील हा रामराजा ।**
**समरंगणीं मी च पाहेन वोजा ॥ १०१ ॥**

**सभामंडपीं फार तां गर्व केला ।**
**कळेना तुला मृत्य संन्नीध आला ।**
**तुज आजि मारील सौमीत्र बाणीं ।**
**मुढा राक्षसा जाण हे सत्य वाणी ॥ १०२ ॥**

(रा) दोन राष्ट्रांत वैर उत्पन्न झालें म्हणजे रणकंदनाला सुरुवात होण्यापूर्वी जे शिष्टाईचे किंवा सामदामादि उपायांचा अवलंब करण्याचे प्रकार होत असतात, ते सर्व प्रस्तुत प्रसंगीं उभय पक्षांनीं करून पाहिले. त्यांत रावणानें भेदनीतीचा हि प्रयोग करून पाहिला. सुग्रीवाला फोडण्यासाठीं

रावणानें शुक नामक एक हेर पाठविला होता. तो सुग्रीवाला हिताच्या गोष्टी सांगूं लागला :

म्हणे सुग्रिवा ऐक रे येकभावें ।
कपी वेर्थ आलासि मागें फिरावें ।
त्वरें आपल्या भूवनामाजि जावें ।
समरंगणीं वाउगें कां मरावें ॥ १-९२ ॥

त्रिकूटाचळा रामकांतेसि नेलें ।
कपी सांग पां रे तुझें काय गेलें ।
तया मानवां साह्य जालासि कैसा ।
मनीं नेणतां चालिला मूर्ख जैसा ॥ ९३ ॥

ऐक, तुला व्यवहारांतली नीति सांगतों :

बळें हीण झुंझासि त्याच्या न जावें ।
कदा कृपणाचे वऱ्हाडी न व्हावें ।
महा मूर्ख रे सख्य त्याचें नसावें ।
स्वयें हीत तें ज्ञान पोटीं वसावें ॥ ९४ ॥

तेव्हां अशा दुर्बलांचा पक्ष घेऊन तुम्ही सारे येथें मरावयाला कां आलांत ?

त्रिकूटाचळू लभ्य नाहीं सुरेशा ।
नरां वानरां प्राप्त होईल कैसा ।
कपीपुंगवा वेर्थ आलासि वायां ।
समरंगणीं बाणघातें मराया ॥ ९५ ॥

समस्तीं रणामाजि जीवें मरावें ।
तये मैत्रकीचें जनीं काय घ्यावें ॥

तेव्हां तुम्हीं सर्वांनीं आतां रामाचा पक्ष सोडून आपआपल्या घरीं जावें, हें उत्तम.

शुकाच्या भेदनीतीला यश आलें नाहीं.

(म) अनिवार अहंकारानें राजाची किंवा नेत्याची बुद्धि ग्रासली गेली म्हणजे सत्य पण अप्रिय असा अभिप्राय त्याच्यापुढें व्यक्त करण्याची सोय नसते. सारण राक्षसाला हा च पेंच पडला. रामसैन्याची माहिती काढून

आपणांस कळवावी म्हणून रावणानें च त्याला आज्ञा केली होती. ती माहिती यथार्थ देत असतां शत्रुपक्षाच्या गौरवाचे दोन शब्द सारणाच्या मुखांतून निघाले मात्र, तों रावण हातीं खड्ग घेऊन त्यास मारावयास उठला. सारण जरा धीट आणि स्पष्टवक्ता होता.

**म्हणे सारणू जी पिडा कां करीता।**
**मुखें बोलिलों सर्व ही सत्य वार्ता ॥ २-७९ ॥**

**तुळाया दळें पाठवीलें भुपाळें।**
**रिपूचीं दळें पाहिलीं तीं विशाळें ।**
**तयासारिखें बोलिलों सत्य भावें।**
**समर्थापुढें मिथ्य कैसें वदावें ॥ ८० ॥**

**प्रभू आमुचा कोण अन्याय जाला।**
**खरें सांगतां कोप येतो तुम्हाला।**
**नसे पाहतां अल्प अन्याय कांहीं।**
**नसे मिथ्य आम्ही नव्हों स्वामिद्रोही ॥ ८१ ॥**

रावण शुद्धीवर आला आणि सारणाचा मार चुकला, हें त्याचें भाग्य.

(ज) ज्या वालीचा श्रीरामानें वध केला, खुद्द त्या वालीचा पुत्र अंगद, श्रीरामाचा सत्पक्ष जाणून त्यास मिळाला, हा अंगदाचा निर्मल राष्ट्राभिमान आणि धर्माभिमान होय. श्रीरामांना हि अंगदाची स्वाभाविकपणें धन्यता वाटली. अंगदास रावणाकडे शिष्टाईस पाठवितांना राम त्यास म्हणतात,

**स्तुतीउत्तरीं राम बोले तयासी।**
**म्हणे धन्य गा अंगदा गूणरासी।**
**मिळालासि तूं आमुच्या स्नेहवादा।**
**विवेकें तुवां सांडिलें पित्रद्वंदा ॥ ३-११ ॥**

बापाचें वैर विसरून, केवळ राष्ट्रधर्माकडे पाहून, बापाच्या च शत्रूला साहाय्य होणें, खरोखर च अपूर्व होय. तसें करण्यास उदात्त हेतु च पाहिजेत. असलीं माणसें उच्च कोटीचीं म्हटलीं पाहिजेत. सामान्य माणसांच्या ठिकाणीं असलें निष्कलंक आचरण संभवत नाहीं. सदसद्विचार न करतां सामान्य माणसें वैर च उगाळीत बसतात.

इतिहासांत असल्या सामान्य माणसांचीं च उदाहरणें फार, पण क्वचित् थोरांचीं हि आढळतात आणि म्हणून च तीं अपूर्व वाटतात. अशा विरल उदाहरणांपैकीं, आपल्या इतिहासांतील खंडो बल्लाळांचें उदाहरण, या प्रसंगीं, कोणाच्या हि ध्यानांत येईल. प्रत्यक्ष बापाचा – बाळाजी आवजीचा – संभाजीमहाराजांनीं वध केला असतां व तो हि अकारण आणि अविचारानें केला असतां, तें वैर विसरून जाऊन, केवळ राष्ट्रकार्याकडे लक्ष देऊन, स्वतःच्या जीवावर उदार होऊन खंडो बल्लाळांनीं संकटसमयीं राजाराममहाराजांना साहाय्य व्हावें, ही केवढी अपूर्वता! वरील श्लोकांत 'अंगदा'च्या जागीं 'खंडूजी' योजून तो श्लोक खंडो बल्लाळांना उद्देशून राजाराममहाराजांनीं म्हटला तरी शोभेल. ते हि राम च होत.

अंगदाच्या शिष्टाईला यश यावयाचें च नव्हतें. रावणाचा गर्व शिगेला चढला होता. त्यापुढें त्यास न्याय आणि अन्याय यांतील भेद दिसेनासा झाला होता. अंगदानें परत येऊन रामास कळविलें

**बहु बोलिलों जी तया रावणासी।**
**परी नायके मातला गर्वरासी।**
**भिजेना जळामाजि पाषाण जैसा।**
**धरीना मनीं सांगतां शब्द तैसा॥ ३–२७॥**

(य) कुंभकर्णाच्या निमित्तानें अधर्मी, अविचारी, तमोगुणी राक्षस-धूडांचें वर्म श्रीसमर्थांनीं मोठ्या चातुर्यानें दाखविलें आहे. तें वाल्मीकींना हि सुचलें नव्हतें. तें श्रीसमर्थांना कोणत्या कारणानें किंवा कोणाकडे पाहून सुचलें असावें, सांगतां येत नाहीं. कठीण प्रसंग पातलेला पाहून, कुंभकर्णाला उठवा म्हणून रावणाची आज्ञा झाली. पर्वतप्राय शरीराच्या कुंभकर्णाची झोंप म्हणजे प्रळयकाळची च निद्रा होय व तशा निद्रेंतून त्यास जागें करण्याचे जे उपाय वाल्मीकींनीं विस्तारानें आणि श्रीसमर्थांनीं संक्षेपानें वर्णिले आहेत ते हि अद्भुत च होत! त्यांच्याशीं आपणांस कांहीं कर्तव्य नाहीं, पण त्या सर्व उपायांत एक उपाय, जो वाल्मीकींना सुचला नाहीं आणि समर्थांना सुचला, तेवढा पाहिला पाहिजे. गदा हाणल्या, टोंचून पाहिलें, मोठमोठाले वृक्ष अंगावर घातले, प्रचंड शिळा टाकल्या, त्या धूडावरून हत्तींना चालविलें

इत्यादि अनेक आश्चर्यकारक आणि हास्यकारक उपाय योजण्यांत आले, पण कुंभकर्णाला जाग आली नाहीं, तेव्हां

**तवं जाहलें अंतरीं वर्म ठावें ॥ ४-२१ ॥**

कोणाच्या अंतरीं कोण जाणे? रावणदूतांच्या का श्रीसमर्थांच्या? ग्राम्यसुखामध्यें कुंभकर्ण महिनेच्या महिने रत होऊन पडत असे, हें वर्म आठवलें व गंधर्वस्त्रियांना बोलावून आणून त्यांचें गायन सुरू करण्यांत आलें.

**तया किन्नरी रम्य गाती विशेषें ।**
**अळापें शिळा वीरती तोय जैसें ।**

दगडांतून पाणी पाझरावें, त्याप्रमाणें

**जयाचेनि नट्वांग लावण्यवेशें ।**
**मनीं होय शक्रादिका कामपीसें ॥ ४-२२ ॥**

अशा उपायानें कुंभकर्णाला जागृति आली!

(ज) वालीवधानंतर काय किंवा रावणवधानंतर काय, मरणान्तानि वैराणि या च नीतीचा श्रीरामांनीं अवलंब केला. रावणवधानंतर श्रीराम बिभीषणास आज्ञा करितात

**म्हणे राम बिभीषणा जाय आतां ।**
**बहूतांपरीं तोषवावें समस्तां ।**
**निमाल्यावरी वैर कां हो करावें ।**
**विवेकें चि मंदोदरी नीववावें ॥ १०-२ ॥**

(य) कल्पनातीत वैभव प्राप्त होऊन मत्त व्हावें, गर्वानें आंधळें व्हावें, कुत्त्या वासना धराव्या आणि अखेरीस नाश पावावें, हा व्यक्तींच्या आणि राष्ट्रांच्या चरित्रांत जो क्रम आढळतो, त्याचें ठळक उदाहरण म्हणजे रावणाचें आणि त्याच्या राज्याचें. रावणाची योग्यता खरोखर केवढी मोठी होती!

**नव्हे रावणासारिखा संपतीचा ।**
**नव्हे रावणासारिखा वित्पतीचा ।**
**बहू सांगतां वैभवालागिं कांहीं ।**
**प्रतापी तयासारिखा वीर नाहीं ॥ ९-९५ ॥**

पण अशा हि रावणाचा शेवट कसा झाला आणि कां ? परस्त्रीहरण आणि स्त्रियांचा छळ यासारिखें दुनियेंत घोर पातक नाहीं. रावणाच्या या पापामुळें श्रीसमर्थांनीं बिभीषणाच्या मुखानें 'नष्ट चांडाळ पापी' या शब्दांनीं रावणाची संभावना केली आहे. या च शापशब्दांचा वर्षाव आनंदवनभुवनी प्रकरणांत श्रीसमर्थांनीं केलेला आपण मागें पाहिला च आहे. असल्या चांडाळांचा संपूर्ण निःपात झाल्याशिवाय त्यांच्या पातकाची निष्कृति होत नसते!

**मज रावणासारिखा कोण आहे ।**
**समरंगणीं काळ भीडों न राहे ॥ २–५१ ॥**

या च घमेंडींत शेवटपर्यंत रावण होता, सर्वांचा हितोपदेश त्यानें झिडकारला, प्रत्यक्ष स्वस्त्री मंदोदरी तिचा हि सदुपदेश त्यानें ऐकला नाहीं आणि अखेरीस सर्वस्वाचा नाश करून घेऊन स्वतःच्या प्राणाला हि मुकला!

(रा) युद्धकांडापासून आणखी एक धडा शिकतां येण्यासारखा आहे. तो म्हणजे

**यत्न तो देव जाणावा ॥**

हा होय. किती हि दौर्बल्य प्राप्त होवो आणि किती हि बलवान् शत्रु असो, विचारपूर्वक योग्य, अचूक आणि पुरेसा प्रयत्न केला, म्हणजे यश आल्यावांचून राहात नाहीं. समुद्रातीरीं राम आले आणि थबकले. समुद्र ओलांडून जावयाचें कसें, हा प्रश्न पडला. रावणानें सीता लंकेंत नेऊन ठेवली होती, हा शोध लागला होता. रामाला ससैन्य बेटावर चालून गेल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कर्म अशक्यप्राय होतें. रावणाला हि तें दिसत होतें आणि म्हणून च तो आपल्या बेटांत निश्चिंत होता. परंतु प्रयत्नांतीं अशक्य कांहीं नसतें, हें जगाच्या निदर्शनास आणण्यासाठीं

**समुद्रातिरीं राम राजीवनेत्रें ।**
**भुमी सेज दर्भासनीं तीन रात्रें ॥ २–१ ॥**

कंठिल्या, तरी मार्ग सांपडेना, म्हणून ते कोपायमान झाले. तेव्हां प्रसन्न होऊन सिंधूनें च उपाय सुचविला

**म्हणे स्वामिया थोर अन्याय जाला ।**
**समुद्रासि हो सीघ्र पाल्हाण घाला ॥ २–५ ॥**

**नळाचेनि हस्तें जळीं चंड सीळा।**
**गिरीशृंग तर्तील हो जी भुपाळा।**
**वदे निश्चयें आदरें तो समुद्र।**
**तेणें थोर आनंदला रामचंद्र ॥ ६ ॥**

राम सर्व सैन्यासह समुद्र ओलांडून आले, तरी रावण कांहीं शुद्धीवर आला नाहीं.

(म) सर्वांचे च प्रयत्न यशाला कारणीभूत झाले, पण त्यांत हि मारुतीचे विशेष च होत. रामानें आज्ञा करावी आणि मारुतीनें ती पार पाडावी. लौकिक दृष्ट्या किती हि अवघड काम असूं द्या, रामाची आज्ञा ती मारुतीला सुलभ च वाटावी. मारुती द्रोणागिरि कसा आणूं शकतील, अशी बिभीषणांनीं किंचित् शंका प्रगट केली, तेव्हां तिचें निराकरण करतांना जांबुवंत म्हणतात

**म्हणे गा विरा काय तूं बोलिलासी।**
**कपीसारिखें मारुता भावितोसी।**
**परी जाण हा ईश्वरू साक्षरूपी।**
**कळेना जना रुद्र पूर्णप्रतापी ॥ ४-२८ ॥**

मारुतीचा पराक्रम पाहतां मारुतीला कोणाची उपमा द्यावी? सूर्य, शेष, गरुड हे हि त्याच्यापुढें फिके पडतात.

**बहू पंथ चाले रवी भार नेना।**
**बहू भार वाहे फणी तो उडेना।**
**गरूडासि तो आचळू हालवेना।**
**दुजी साम्यता ब्रह्मगोळीं दिसेना ॥ ५-१५ ॥**

दोनदां द्रोणागिरि आणला आणि नेऊन ठेवला आणि एकदां तर एका रात्रींत च! मारुतीचा हा पराक्रम आणि ही सेवेविषयींची तत्परता पाहून श्रीराम हि गहिंवरत!

मारुती द्रोणागिरि आणण्यासाठीं गेले आणि आले तेव्हां रामानें मारुतीकडे व मारुतीनें रामाकडे कसें पाहिलें, त्या प्रसंगीं त्या उभयतांच्या

भावना परस्परांविषयीं कशा होत्या, याचें फार मार्मिक आणि हृदयांत भिनणारें असें वर्णन दोन श्लोकांत आहे.

मारुती गेले तेव्हां आणि आले तेव्हां रामाला कसें वाटलें ?

**सखा जीविंचा तो असे दूरि देसीं ।**
**सदा लागलें चित्त हें त्याजपासीं ।**
**पुढें पाहतां तो अकस्मात आला ।**
**तयासारिखें वाटलें राघवाला ॥ ५-१७ ॥**

आणि रामाला पाहून मारुतीला कसें वाटलें ?

**कपीनें कसें पाहिलें राघवासी ।**
**पुढें देखिलें लोभियानें धनासी ।**
**तथा बाळकें लक्षिलें जन्ननीला ।**
**तयासारिखें वाटलें मारुतीला ॥ १८ ॥**

असा राम आणि मारुती यांचा संबंध होता. असा सद्गुरु आणि सच्छिष्य यांचा संबंध असतो. असा श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय यांचा संबंध होता. वाघिणीच्या दुधाची गोष्ट आहे ना ठाऊक ? तसा च श्रीसमर्थ आणि श्रीकल्याण यांचा संबंध होता. श्रीसमर्थांनीं अपरात्रीं चंची मागितली आणि पुढें काय घडलें तें सर्वांना ठाऊक असणार च.

द्रोणागिरि आणला आणि नमस्कार करून हात जोडून रामापुढें मारुती उभे राहिले असतां

**म्हणे राम तो धन्य गा धन्य वीरा ।**
**कपी काय द्यावें तुझ्या ऊपकारा ॥ १९ ॥**

**अगा मारुती तूझिया ऊपकारें ।**
**जिवा ऋण जालें बहूसाल भारें ।**
**सदा सर्वदा आमुची तूज चिंता ।**
**समस्तांसि तूं येकला प्राणदाता ॥ २० ॥**

असा रामानें प्रेमानें मारुतीचा गौरव केला म्हणून मारुती थोडे च हुरळून जाऊन दुश्चित्त होणार होते. त्यांनीं तत्काळ उत्तर केलें :

**म्हणे मारुती सर्व स्वामीप्रतापें ।**
**प्रभू काय कीजेल म्या दीनरूपें ।**
**समर्था तुझीये कृपेवीण कांहीं ।**
**स्वतः अल्प ही कार्य होणार नाहीं ॥ २१ ॥**

मारुती हें सिद्धान्तवचन बोलले आहेत. श्रीसमर्थकृपा ही च यशाची किल्ली होय. ती हस्तगत करून घेतली पाहिजे. भगवंताचें अधिष्ठान म्हणतात तें ती च.

( ८ ) असले बोधप्रद प्रसंग आणखी हि कित्येक सांगतां येतील, पण कोठें तरी थांबलें च पाहिजे. तें भगवंताच्या अधिष्ठानापाशीं थांबलेलें बरें. शिवाय आपल्या मंत्राचीं त्रयोदशाक्षरें हि संपलीं आहेत. श्रीसमर्थांचें संपूर्ण हृद्गत मी जाणूं शकेन किंवा प्रकट करूं शकेन, असें मला वाटत नाहीं. यापुढें तरी श्रीसमर्थाभिमानी सज्जनांनीं श्रीसमर्थांच्या रामायणाची उपेक्षा करूं नये, एवढी च माझी विनंति आहे. श्रीसमर्थांचे विशिष्ट शब्द, विशिष्ट तऱ्हेची त्यांची वाक्यरचना, भोंवतालीं पाहून अर्थांतरांत वाचकांचा प्रवेश करून देण्याची त्यांची खुबी, हें सारें वाचकांनीं स्वतःशीं पडताळून पाहिलें पाहिजे. कित्येक अगदीं सामान्य स्थळें अशीं आढळतात कीं, तीं वाचतांना, श्रीसमर्थांचें लोकाचाराचें ज्ञान पाहून कौतुक वाटतें व वाचकाच्या चेहऱ्यावर स्मित उमटतें. उदाहरणार्थ, असलीं दोन स्थळें दाखवितों.

( रा ) राम आले, भरतानें धांवत धांवत येऊन रामचरणीं मस्तक टेविलें, रामानें उठवून त्यास हृदयाशीं धरिलें.

**स्फुरद्रूप आलिंगनीं वीरगात्रीं ।**
**जळें लोटलीं रम्य राजीवनेत्रीं ।**
**तया राम रामानुजा भेटि जाली ।**
**प्रसंगीं तये सृष्टि सूखें निवाली ॥ ११-८९ ॥**

नंतर भरत लक्ष्मणाला भेटले, जानकीला त्यांनीं नमस्कार केला आणि उभे राहिले. तेव्हां रामानें खुणाविल्यावरून भरतानें सुग्रीवाला आलिंगन दिलें. हें रामाचें खुणावणें आणि तें श्रीसमर्थांनीं सांगणें, हीं वाचतांना वाचकांना गुदगुल्या होतात.

**सुमित्रासुता भेटला वीतरागी।**
**नमस्कारिली जानकी ते प्रसंगीं।**
**खुणा दावितां रामराजाधिराजें।**
**कपीनाथ आळंगिला योगिराजें॥ ९०॥**

(म) शेवटचा वियोगाचा क्षण आला. बिभीषणासह सर्व वानर रामाचा निरोप घेण्यासाठीं गेले

**समस्तीं प्रभूला नमस्कार केले।**
**पुढें सर्व ही हात जोडून ठेले॥ १३-४५॥**

**समस्तीं विरीं राम गुणागराला।**
**बहू प्रार्थिलें त्या दयासागराला।**
**समस्तांसि देवें निरोपासि द्यावें।**

आणि आपण प्रेमाच्या पाहुण्यांना नित्य जसें म्हणतों, तसें राम त्यांना म्हणाले,

**म्हणे राम तो सीघ्र जेऊनि जावें॥ ४६॥**

(९) अशा अनेक दृष्टींनीं या रामायणाकडे पाहिलें पाहिजे. रणक्षेत्राचें चित्र (शत तृतीय ६९ ते ७९), अग्निशस्त्र, मेघशस्त्र, वायुशस्त्र, गिरिशस्त्र, वज्रशस्त्र, ब्रह्मास्त्र, रुद्रास्त्र, महेश्वरास्त्र इत्यादि एकाहून एक वरचढ आणि मारक शस्त्रास्त्रें (शत सप्तम २७ ते ४७),

**म्हणोनी मला राघवेंवीण कांहीं।**
**सदा सर्वदा वैभवीं चाड नाहीं।**
**मला भेटवी राम आत्मा जगाचा।**
**वदे मारुतीलागि तो दीन वाचा॥**

या श्लोकानें शेवट केलेलें भरताच्या वैराग्याचें वर्णन (शत एकादश ६५ ते ७०) आणि

**प्रभू देव हा सर्व ब्रह्मादिकांचा।**
**जया वर्णितां शीणली वेदवाचा।**
**स्वयें वास जेथें जगन्नायकाचा।**
**महीमा वदे कोण हो त्या स्थळाचा॥**

या श्लोकानें आरंभिलेलें अयोध्यापुरीचें वर्णन (शत द्वादश ७५ ते १०६), इत्यादि सर्व स्थळें वाचकांनीं स्वतः अवलोकावीं, अशी माझी विनंति आहे.

(१०) इतर राष्ट्रांची मला कल्पना नाहीं, पण या राष्ट्रांतील स्त्रीजीवन हजारों वर्षांच्या पूर्वीपासून तों आतांपर्यंत अत्यन्त कष्टप्रद असल्याचें च मला दिसतें. त्यांना केव्हां च सुरक्षितता नव्हती. रामायणकाळीं नव्हती, श्रीसमर्थकाळीं नव्हती, दरम्यानच्या काळांत नव्हती, केव्हां च नव्हती आणि आज हि नाहीं. ज्या राष्ट्रांत स्त्रियांना सुरक्षितता नसते, त्या राष्ट्रानें भाग्योदयाची आशा कालत्रयीं करूं नये, असें मला स्वच्छ दिसतें आणि स्पष्ट बोलावेंसें वाटतें. परमेश्वराच्या नंतर – किंबहुना, आधीं हि – कोणाचा मान ठेवावयाचा असेल तर तो स्त्रीजातीचा. स्त्रीच्या पावित्र्यावर घाला, यासारखें रौरवनरकाचें साधन नाहीं. श्रीसमर्थांच्या काळीं दुसऱ्याचा पराभव केला म्हणजे त्या पराभूत राजाच्या जनानखान्यांतील स्त्रिया आधीं हस्तगत करावयाच्या आणि त्या वांटून घ्यावयाच्या! तुझी बहीण, मुलगी मला दे, अशी तहांत शर्त असावयाची व ती पराभूत राजाला कबूल करणें भाग पडे! श्रीसमर्थांचा संताप झाला असेल व असल्या स्थितीचा शेवट झालाच पाहिजे, असा त्यांनीं संकल्प केला असेल, तर तो असले स्त्रीहरणाचे प्रकार पाहून आणि ऐकून. हें विषयांतर वाटेल, पण तें विषयांतर नव्हे. त्या जगन्मातेचे कोण ते हाल आणि शेवटपर्यंत कोण ती विटंबना! जिच्यासाठीं एवढा खटाटोप ती जगज्जननी सीता रामाज्ञेनें अशोकवनांतून आणल्यावर तिला पाहून सर्वांना किती तरी हर्ष झाला!

**तये देखतां सर्व सूखें निवाले।**
**कपी बोलती आजि निःपाप जालें॥ १०–८६॥**

पण हा त्यांचा आनंद फार काळ टिकावयाचा नव्हता. मन घट्ट करून लोकापवाद टाळण्यासाठीं रामाला वर्तावणी करणें भाग होतें.

**सिता देखती जाहली रामचंद्रा।**
**नमस्कार तैसा चि केला महींद्रा।**
**तया राघवें पाहिलें जानकीला।**

पण भुंवया वर चढवून त्यांनीं तिचा अव्हेर केला!

**पुढें भ्रूलता वक्र अव्हेर केला ॥ १०-८७ ॥**

त्या प्रसंगीं रामानें अति कठोर भाषण केलें. राम का जाणत नव्हते ?

**रघूनाथ हा हेत जाणे मनाचा ।**
**सदा सर्वदा साक्ष सर्वै जनाचा ॥ ९१ ॥**

पण त्यांना संपादणी करावयाची होती.

**म्हणे राम तो जानकीलागि जावें ।**
**स्वइछा सुखें तां दिगांतीं भ्रमावें ॥ ९२ ॥**

ती कठोर भाषा ऐकून

**अधोमूख सीताऽवलोकी भुमीतें ।**
**मही भीजती जाहली अश्रुपातें ॥ ९३ ॥**

अखेरीस मन घट्ट करून ती रामाला म्हणाली

**म्हणे न्याय अन्याय सर्वै बुडाला ।**
**दिसे आज कल्पतरू वांज जाला ।**
**नसे अल्प अन्याय ब्रह्मांड केला ।**
**वृथा दंड हा कोण धर्मा मिळाला ॥ ९४ ॥**

फार बोलून काय उपयोग, असें पाहून अग्निप्रवेश करून भस्म होऊन जावें, असा तिनें संकल्प केला,

**म्हणे जानकी त्या रिसां वानरांसी ।**
**बहुसाल रे कष्ट जाले तुम्हांसी ।**
**परी मागुतें येक जीवीं धरावें ।**
**बहुसाल त्या पावका चेतवावें ॥ ९६ ॥**

कुंड तयार झालें, अग्नि चेतविला, त्याच्या ज्वाला वरपर्यंत भिडल्या, त्याच्या जवळ कोणास जाववेना. सर्वांच्या मनाची काय अवस्था झाली असेल !

**मनामाजि पूजा यथासांग केली ।**
**पुढें जानकी पावकामाजि गेली ।**
**तये स्पर्शतां पावकु शुद्ध जाला ।**
**प्रसंगीं तये शांत जाला निवाला ॥ १०० ॥**

हा चमत्कार पाहून

**महा वीर ते गर्जती नामघोषें ।**
**कपी वीर ते तोषले थोर तोषें ।**
**सुरीं अंबरीं पुष्पवर्षाव केला ।**
**नभीं दुंदुभीवाद्यकल्लोळ जाला ॥ १०३ ॥**

खरें म्हणजे

**सिता मुख्य ते पावकामाजि होती ।**
**वृथा रावणें चोरिली हे वदंती ॥ १०४ ॥**

ज्याचा शेवट गोड तें सारें च गोड. केवळ लोकापवाद टाळण्यासाठीं रामानें मनाचा हिय्या केला होता.

**जनाच्या मनाकारणें धीर केला ।**
**कृपेच्या कृपासागरा पूर आला ।**
**कृपादृष्टिनें पाहिलें जानकीला ।**
**पुढें सीघ्र आळंगिलें ते सितेला ॥ १०६ ॥**

( ११ ) नवव्या शताच्या आरंभीं, आपणांस चार गोष्टींची चिंता लागली आहे, असें लक्ष्मणानें रामास सुचविलें आहे : (१) सुरेशांसि हो मुक्त आधीं करावें ॥ (२)अरिभ्रातया राज्य हें सीघ्र द्यावें ॥ (३) कपीराज हा राज्य त्यागूनि आला । कपीसीं पुन्हा पाहिजे शीघ्र गेला ॥ आणि (४) प्रभू नीजबंधूसि त्या भेटि द्यावी ॥ यांत या उभयतां बंधूंना सीता परत मिळविण्याची चिंता लागलेली दिसत नाहीं. त्यांची पहिली चिंता, पारतंत्र्यांत खितपत पडलेल्या देवांना मुक्त करण्याची. त्या चार हि चिंता क्रमशः दूर झाल्या. रावणाचा वध होऊन देव मुक्त झाले, बिभीषणास राज्य मिळालें, सुग्रीव सर्व कपींसह प्रथम अयोध्येस जाऊन आपल्या देशीं परत गेला आणि ठरल्या वेळीं भरताची हि भेट झाली.

मुक्त झाल्यानंतर महादेव, ब्रह्मदेव, इंद्र इत्यादिकांनीं अकराव्या शतांत श्रीरामाचा गौरव केला आहे, त्यांत ब्रह्मदेवानें केलेली स्तुति भूत, भविष्य, वर्तमान काळाला अनुसरून सर्वांच्या च वतीनें केल्यासारखी मला वाटते,

म्हणून ती वाचकांस सादर करून मग सर्वांच्या बरोबर अयोध्येस जाऊन रामाचा निरोप घेऊं. ब्रह्मदेव स्तुतिपर भाषण करितात :

**किती बंधनें पावलों पूर्वपापें ।**
**बहू दीस वोसंडिलें मायबापें ।**
**बहू कष्टलों स्वामि देवाधिदेवा ।**
**कृपाळूपणें सीघ्र केला कुढावा ॥ ११–१५ ॥**

**तुम्हावेगळे सर्व ही दीन जालों ।**
**त्रिकूटाचळीं बंदिशाळे मिळालों ।**
**हिनासारिखे जाहलों दैन्यवाणे ।**

त्या दैन्यावस्थेचें वर्णन आपण मागें पाहिलें च आहे.

**प्रभू आमुचें दुःख तें कोण जाणे ॥ १६ ॥**
**बहू कष्टवीलें तया रावणानें ।**
**घडीनें घडी त्रासिलें दुर्जनानें ।**

त्यांतला एक प्रसंग आपण वर पाहिला च आहे.

**गमे हा नियंता मनामाजि चिंता ।**
**समस्तांसि कोण्ही नसे सोडवीता ॥ १७ ॥**

**बहू वोखटी वेळ येऊनि गेली ।**
**कृपासागरें धावणी सीघ्र केली ।**
**सुतालागि झेंपावला व्याघ्र जैसा ।**
**जगजन्नका तूं समस्तांसि तैसा ॥ १८ ॥**

पुरे, पुरे, पुरे ही स्तुति असें म्हणून

**कृपाळूपणें वारिलें राघवानें ॥**

भक्तिभावार्थ पाहिजे, निदिध्यास घेतला पाहिजे, हें सर्व आपणांकडे च आहे, ते तर वाट पाहात असतात !

( १२ ) सर्व जण अयोध्येच्या समीप गेले, राम येताहेत अशी वर्दी भरतास पोंचविण्यांत आली, सर्वत्र आनंदाच्या लाटा उसळल्या, तिकडचा आणि इकडचा अपार जनसंमर्द लोटला. स्त्रीवर्गाची धांदल पुसूं च नका.

**रुपें राजसा सुंदरा त्या प्रितीनें ।**
**रघूनाथ वोवाळिती आवडीनें ।**
**मनामाजि ते लागलीसे अवस्था ।**
**सुखें पाहती येकपत्नीव्रतस्था ॥ १३-१० ॥**

सर्वत्र एक च घोष उठला. चवदा वर्षांमागें राम वनवासास निघाले, तेव्हां हि असा च घोष, पण दुःखाचा उठला होता. तेव्हांचा दुःखाचा घोष

**पहा हो पहा राम आरण्यवासी ।**
**पुरी त्यागिली सर्व येका जिवेसीं ।**
**मऊ सूमनें सेज खूपे जयाला ।**
**असा राम तो सीघ्र पाईं निघाला ॥ करुणाष्टकें ७०-१ ॥**

आणि आतांचा आनंदाचा घोष

**पहा हो पहा पैल तो राम आला ।**
**असंभाव्य हा वीरमेळा मिळाला ।**
**दिसेना पुढें पाहतां गर्द जाला ।**
**समस्तीं करें ताळिकाघोष केला ॥ १३-१३ ॥**

त्या आनंदाचें वर्णन कोण, किती करूं शकेल ? कल्पनेनें जाणलें पाहिजे, डोळे मिटून पाहिलें पाहिजे. राम भद्रासनीं विराजमान झाले ! रामाला पाहण्याला असंख्य लोकमांदी मिळाली

**झडा घालिती राम पाहावयाला ।**
**समस्तां मनीं थोर आनंद जाला ॥ २१ ॥**

महोत्सव सुरू झाला. नित्य नेम चालू झाले, दानें झालीं, भोजनें उरकलीं, कांहीं शांतता पसरली आणि रामाचा निरोप घेण्यासाठीं

**कपी रीस राक्षेस कोट्यानकोटी ।**
**असंभाव्य ते चालिले रामभेटी ।**
**समस्तीं प्रभूला नमस्कार केले ।**
**पुढें सर्व ही हात जोडून ठेले ॥ ४१ ॥**

परवानगी मागूं लागले. त्यांनीं प्रत्यहीं परवानगी मागावी आणि प्रत्यहीं रामानें त्यांना ठेवून घ्यावें. पण परवानगी देण्याचें किती हि लांबणीवर टाकलें, तरी एक दिवस वियोग होणार च होता. तो दिवस पातला. बिभीषणादि राक्षसांसह सर्व वानर हात जोडून रामापुढें उभे राहिले. रामांना गहिंवर आला !

**स्तुतीउत्तरें सर्व लावण्यखाणी ।**
**मुखें बोलिला राम कारुण्यवाणी ।**
**तुम्ही कष्ट केले जिवें सर्व भावें ।**
**तुम्हालागि उत्तीर्ण म्या काय व्हावें ॥ ६२ ॥**

एक एकाचें नांव घेऊन श्रीरामानें सर्वांना गौरविलें आणि शेवटीं सर्वांच्याकडे प्रेमानें पाहात

**म्हणे राम तो लोभ आतां असावा ॥ ६५ ॥**

ही उलटी भाषा ऐकून वानरादिकांच्या अंगावर रोमांच उभे राहिले, त्यांच्या डोळ्यांना पाणी आलें आणि त्यांनीं रामाची स्तुति आरंभिली. त्यांनीं पुष्कळ च स्तुति केली. आपलें हें केवढें भाग्य, असें त्यांना वाटलें, ज्या रामाचें दर्शन नानापरीच्या योगयागानें आणि भोगत्यागानें व्हावयाचें नाहीं, तें आपणांस सहजासहजीं घडलें !

**कपी रीस ते बोलती दैन्यवाणे ।**
**कृपासागरू जीविचा भाव जाणे ॥ ७२ ॥**

दोन्ही बाजूंच्या मंडळींचीं अंतःकरणें, वियोगाच्या कल्पनेनें भरून आलीं. वानरांची जशी अवस्था झाली, तशी च ती रामाची हि झाली. पुनःपुनः स्तुति, पुनःपुनः नमस्कार, अखेरीस वानर परतले, दृष्टीआड झाले आणि राम कष्टी होऊन बसले !

**मनें वीकळें भक्तपाळें भुपाळें ।**
**मनामाजि ते खंति केली दयाळें ।**
**जनीं सेवकांलागि देखोनि ऊणें ।**
**बहू कष्ट घेऊनियां सौख्य देणें ॥ ७६ ॥**

असें श्रीरामाचें ब्रीद सांगून श्रीसमर्थांनीं कथाभाग संपविला आहे.

(१३) रामाचें ब्रीद आठवतांच, अगदीं स्वाभाविकपणें श्रीसमर्थांचें स्वतःकडे लक्ष गेलें, त्यांना आत्मनिरीक्षण घडलें, रामाचें दयालुत्व आठवलें, स्वतःवर झालेल्या उपकारांचें स्मरण झालें आणि कदाचित् त्यांना न कळत, पुढील पंधरा श्लोकांत त्यांच्या हृदयाचें पूर्ण आविष्करण झालें आहे. हे सारे सहजोद्गार आहेत.

या पंधरा श्लोकांपैकीं पहिल्या आठ श्लोकांत त्यांची स्वतःची **प्रचीति** आहे, त्यांच्या पुढच्या दोन श्लोकांत त्यांनीं स्वतः चालविलेली पंचायतनाची **सगुणोपासना** प्रकटली आहे, पुढच्या अडीच श्लोकांत सगुणोपासनेंतून च **निर्गुणोपासना** उद्भवलेली सांगून ती उपासना घडण्याचा मार्ग दाखविला आहे आणि स्वतःला तो मार्ग दिसला नाहीं तर **काय करावें** तें पुढच्या दीड श्लोकांत सांगून शेवटच्या पंधराव्या श्लोकांत **ज्ञानांत परिसमाप्ति** केली आहे.

या पंधरा श्लोकांच्या द्वारें श्रीसमर्थहृदयांत गुपचुप प्रवेश करून दडून बसण्याची चांगली सोय झाली आहे. हे पंधरा श्लोक अखंड कंठीं धारण केल्यास व त्यांचें सतत चिंतन घडल्यास, श्रीसमर्थहृदयांत आपणांस जी जागा मिळाली आहे, तेथून आपणांस कोणी हुसकावून लावूं शकणार नाहीं.

## श्रीसमर्थांना आलेली प्रतीति

**१ मनीं भावना भक्तलोकांसि जैसी।**
**तयासारिखी देवरायासि तैसी।**
**जनीं सेवकांकारणें जन्म घेणें।**
**महद्भाग्य सांडूनियां नीच होणें॥ ७७॥**

**२ पडे सांकडें सर्वदा सेवकांचें।**
**दिनानाथ हें ब्रीद विख्यात साचें।**
**मनामाजि ते जैसजैसी अपेक्षा।**
**करीना कदा राम त्यांची उपेक्षा॥ ७८॥**

**३ असंभाव्य अन्याय तो आठवीना**
**बहू चूकतां देव कांहीं सिणेना।**
**तया मानसीं लागली प्रेममाया।**
**करी सेवकालागि नाना उपाया॥ ७९॥**

**४ सदा सर्वदा देव दासाभिमानी।**
**कृपा भाकितां सीघ्र पावे निदानीं।**
**तया अंतरीं थोर लाहान नाहीं।**
**परी पाहिजे दृढ भावार्थ कांहीं॥ ८०॥**

५ जया अंतरीं भाव होईल जैसा ।
तयालागि तो देव पावेल तैसा ।
यदर्थीं कदा संशयो ही असेना ।
अभावें तरी देव तो पालटेना ॥ ८१ ॥

६ कितीयेक अन्याय कोट्यानकोटी ।
भ्रमें होय नानापरी बुद्धि खोटी ।
तऱ्हीं पाहतां लोभ त्याचा सरेना ।
कृपासागरू तो कदा वोसरेना ॥ ८२ ॥

७ दयाळूपणें देव राजाधिराजें ।
शिरीं वाहिजे सर्व ही भक्तवोझें ।
जनीं दास देखोनियां दैन्यवाणा ।
मनामाजि वोसावतो देवराणा ॥ ८३ ॥

हे श्लोक प्रेमभरें वाचतांना वा ऐकतांना ज्या भक्ताचा कंठ दाटून येणार नाहीं, असा कोणी असेल काय ? थोर लोक याला मनाचें दौर्बल्य म्हणतील, आम्ही लहान माणसें याला भक्तिप्रेम म्हणतों. फार काय बोलावें, जाणते जाणतील.

८ बहूसाल हें बोलणें काय कीती ।
स्वयें जाणती ज्यां असे सप्रचीती ।
अयोध्यापुरीमाजि तो रामराजा ।
कृपाळू सुखें राहिला भक्तकाजा ॥ ८४ ॥

या सर्वांचें तात्पर्य इतकें च नाहीं का, कीं आपण त्यांचे अनन्य भक्त, सेवक किंवा दास व्हावयाचें, म्हणजे आपलें काम संपतें, पुढची सर्व चिंता त्यांची त्यांना लागते, मग कांहीं ते आपले अन्याय पाहात नाहींत, आपली योग्यता विचारांत घेत नाहींत किंवा आपली विपरीत बुद्धि पाहून आपला त्याग करीत नाहींत. त्यांची एक च शर्त — परी पाहिजे दृढ भावार्थ कांहीं ।

## श्रीसमर्थांनीं केलेली सगुणोपासना

९ कपी वीर गेले स्थळें जेथजेथें ।
प्रितीं मारुती राहिला राम तेथें ।
रघूनाथ सीता तये बंधुवर्गीं ।
उभे राहिजे सेवकें पूर्वभागीं ॥ ८५ ॥

सर्व वानर आपआपल्या देशाला गेले, फक्त मारुती रामापाशीं राहिले. राम, सीता, लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न यांच्या पूर्वभागीं म्हणजे समोर मारुती हात जोडून सदैव उभे असतात आणि श्रीसमर्थ म्हणतात, या सर्वांची षोडशोपचारें पूजा करून आपण हि त्यांच्या सेवेंत सर्वदा तत्पर असतों. या च थाटांत आणि या च परिवारासह जांबेस च वयाच्या अकराव्या वर्षीं श्रीसमर्थांना श्रीरामदर्शन घडलें होतें.

१० **समस्तांसि पूजूनि नाना विळासें।**
**नमस्कारिलें सर्वदा सानुदासें।**

सानुदासें म्हणजे दासानुदासें, रामाचे दास जे मारुती त्यांचा दास जो मी त्या म्यां रामदासें.

**उदासीन श्रोतीं कदा हीं न कीजे।**
**बहू भेद भाषा क्षमा सर्व कीजे॥८६॥**

## सगुणांतून च निर्गुणोपासना

११ **मनामाजि ऊपासना राम ध्यानीं।**
**जनीं दास नीवेदनी ब्रह्मज्ञानी।**
**अखंडीत या राघवाच्या प्रतापें।**
**विवेकें विचारें समाधान सोपें॥८७॥**

१२ **पदीं लागतां निर्गुणी भक्त जाले।**

पदीं लागतां म्हणजे सगुणाची उपासना करीत असतां.

**बहूसंग नीसंग होऊन गेले।**
**विवेकें बरें पाहतां ध्येय ध्याता।**
**विचारें बरें शोधितां ज्ञेय ज्ञाता॥८८॥**

१३ **विवंचून तो साधकू साध्य जाला।**
**असंभाव्य तो ब्रह्मबोधें बुडाला।**

यांत सगुणोपासना चालवीत असतां आत्मानात्मविवेक आणि सारासारविचार यांच्या योगें समाधान म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार होणें सुलभ आहे, असें म्हटलें आहे. पण ज्याला स्वतःला विवेक आणि विचार कळणार नाहींत, त्यानें

## काय करावें ? जाणत्याला पुसावें

**पुसावें कळेना तरी सज्जनाला ।**
**धरूनी तजावें विदेहीपणाला ॥ ८९ ॥**

विदेही होऊन विदेहीपण त्यजावें. ज्याला साधेल त्यानें जनकाप्रमाणें विदेही व्हावें, ती विदेही अवस्था शब्दानें सांगतां येणार नाहीं, नित्य अद्वैताचा विचार करावा, केव्हां तरी ती अवस्था प्रत्ययास येईल. याप्रमाणें स्वरूपीं लीन होऊन केवळ कीर्तिरूपानें मागें राहावें.

१४ **असो हे जनीं प्राप्त तेणें धरावें ।**
**अनुर्वाच्य तें वाच्य कैसें म्हणावें ।**
**सदा नित्य नीरूपणीं वीवरावें ।**
**नुरावें परी कीर्तिरूपें उरावें ॥ ९० ॥**

## ज्ञानांत परिसमाप्ति

हें सर्व एक जाणता च जाणूं शकेल, नेणत्याला यांतलें कांहीं च कळणार नाहीं.

१५ **असो जाणत्याला कळे सर्व कांहीं ।**
**जनीं नेणता त्यास कांहीं च नाहीं ।**
**नसे ज्ञान तें सर्व ही वेर्थ गेलें ।**
**जळो पंचभूतीक हें काय केलें ॥ ९१ ॥**

ज्ञानावांचून बाकी सर्व व्यर्थ आहे. ज्ञान नसेल तर हा नुसता पंचभूतिक देह काय जाळावयाचा आहे ?

याप्रमाणें सर्व कांहीं ज्ञानापाशीं येऊन ठेपतें. भाव धरावा, राम कृपाळु आहेत, आपलें दैन्य त्यांना पाहवणार नाहीं, उपासना चालवावी, विवेक पाहावा, विचार करावा, कळणार नाहीं तर सद्गुरूला विचारावें, सर्व कांहीं करावें, पण ज्ञान प्राप्त करून घेतल्यावांचून मात्र राहूं नये. भगवंताच्या शब्दांत विराम पावावयाचें तर

**सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥**

---

## ( २ ) करुणाष्टकें वगैरे

( १ ) करुणाष्टकें म्हणजे काय ? ( २ ) रामाच्या भेटीसाठीं तळमळ, ( ३ ) रामरूप, ( ४ ) रामराज्याचें स्वरूप, ( ५ ) रामोपासना, ( ६ ) श्रीसमर्थांचें देवापाशीं मागणें, ( ७ ) श्रीसमर्थांच्या जिवींचें आर्त, ( ८ ) श्रीसमर्थांची कृतज्ञता, ( ९ ) बाहेगांवचा मारुती, ( १० ) कफाची व्यथा, ( ११ ) उदास क्षण, ( १२ ) शीघ्रकोपी, ( १३ ) धन्यतेचीं लक्षणें, ( १४ ) मुलांची आवड, ( १५ ) पुतण्यांना उपदेश, ( १६ ) तत्कालीन लोकस्थिति, ( १७ ) विपरीत प्रसंग, ( १८ ) जनाचा कंटाळा, वनाची आवड, एकांतप्रियता, ( १९ ) सृष्टिसौंदर्याचे भोक्ते, ( २० ) क्षेत्रें आणि स्थानें, ( २१ ) श्रवण, तर्क आणि सदृढ काया, ( २२ ) लेखनक्रिया, ( २३ ) भले आणि नष्ट, ( २४ ) भजन आणि सज्जन, ( २५ ) रामभक्त आणि कृष्णभक्त, ( २६ ) प्रस्ताविक, ( २७ ) श्रीसमर्थांचा विश्वास, कांहीं मतें, ( २८ ) अवांतर.

## ( १ ) करुणाष्टकें म्हणजे काय ?

करुणाष्टकें म्हणजे करुणाघन दयाळु परमेश्वरास, आपल्या इष्ट उपास्य दैवतास, भक्तवत्सल सद्गुरूस प्रेमभरानें हांका मारणारी किंवा आळविणारी कविता. आपले, आपल्या समाजाचे, आपल्या राष्ट्राचे, किंबहुना मानव जातीचे गुणदोष आठवून, इहपर लोकीं आपलें कल्याण कसें होणार, समाजाला आणि राष्ट्राला बरे दिवस केव्हां लाभणार, यच्चयावत् मानवांत सत्त्वगुणाचा उत्कर्ष कसा होणार, पृथ्वीवर स्वर्ग च केव्हां उतरणार, या भवसागरांतून आपण कसे तरणार, इत्यादि लहानथोर ध्येयाच्या प्राप्तीसाठीं विव्हल झालेल्या अंतःकरणांतून जे छंदोबद्ध उद्गार बाहेर पडतात, तीं करुणाष्टकें होत. करुणाष्टकें म्हणजे काय, हें एका शब्दांत सांगावयाचें झाल्यास करुणाष्टकें म्हणजे रडविणारी कविता, असें म्हणतां येईल. हे रामा, त्रिविध तापानें पुरा पोळून निघालों, कांहीं बाकी उरली नाहीं, आतां अंत पाहूं नका, दया करा, करुणा येऊं द्या, हे सद्गुरो, मनाला नुसत्या आशेवर कोठपर्यंत ताटकळत ठेवूं, कांहीं तरी प्रत्यय येऊं द्या, यापुढें धीर निघणें कठीण आहे. दिवसानुदिवस धैर्य खचत चाललें, किती अंत बघणार, महाराज, एकवार दर्शन द्या, काय करूं तें सांगा, सेवेला लावा, ब्रह्मसुखाची अंधुक तरी कल्पना येऊं

द्या, गुरुदेवा, अजून उपेक्षा कराल तर वृथा विश्वासलों असें म्हणावें लागेल, असा प्रसंग, गुरुराजा, या किंकरावर आणूं नका, मी हीनाहून हीन आणि दीनाहून दीन आहें, पण आपला म्हणवितों, मी पतितांतला पतित आहें, पण आपण पतितपावन आहांत ना, आपण या पतिताची उपेक्षा कराल तर आपल्या नांवाला सार्थकता कशी येणार, पतितपावन हें नाम यापुढें कसें मिरवाल, आपणांस दीनानाथ कोण म्हणेल, आपल्या नादीं कोण लागेल, कोण आपणांवर विसंबून राहील, इत्यादि असंख्य प्रकारांनीं कांहीं खोटें रुसून, कांहीं वरपंगी धाक दाखवून, कांहीं मनधरणी करून गुरुरूप सर्वोत्तमाला द्रव आणणारी कविता, तिचें नांव करुणाष्टकें होय. सर्व प्रकारच्या कवितेंत भक्ताला अत्यंत प्रिय असणारी कविता म्हणजे करुणाष्टकें होत. चित्त होरपळलेलें असावें, अंतःकरण भक्तिप्रेमानें उचंबळून आलेलें असावें, मन निमित्तावर टेकलेलें असावें, वेळ शांत असावी, नितांत एकांत असावा, सन्मुख राम किंवा रामदास असावेत आणि हीं अष्टकें म्हणावीत, स्वर्गीय सुखाचा अनुभव येईल.

रडविणारी कविता म्हणून तिची कोणीं उपेक्षा करूं नये. या रडण्यांत काय आनंद असतो, त्याचा अनुभव अशा रडणाराला असेल ! रडतां सर्वांना येतें, त्यांतलें च हें हि रडणें आहे. रडण्याची तऱ्हा एक च, फक्त कारणें वेगळालीं. आई बाप, बहिण भाऊ, कन्या पुत्र, जामात स्नुषा, स्त्री पति इत्यादिकांसाठीं सर्व जण रडतात, पण देहभान विसरून विव्हल होऊन 'रामा धांव' म्हणून एक च आरोळी ठोकून रामासाठीं रडणारे थोडे ! रडणें तर सर्वांच्या च पाठीमागें लागलेलें आहे. माणसाच्या मागचें रडणें जर टळत नाहीं, तर मग केवळ ऐहिक वस्तूसाठीं च तेवढें कां रडावें, हें समजत नाहीं. रडावयाचें च, तर मग अशासाठीं रडावें कीं, ज्याची प्राप्ति झाली असतां रडणें कायमचें सुटेल ! जी वस्तु, आज ना उद्यां, केव्हां तरी जावयाची च, ती उद्यांची आज गेली म्हणून त्यांत रडण्यासारखें काय आहे ? फार काय, पण उद्यां ठेवावयाचा, तो देह आज ठेवावा लागला, म्हणून तरी त्यांत काय बिघडलें ?

हें जें रामासाठीं किंवा कोणासाठीं आणि कशा हि साठीं रडावयाचें तें एकांतांत रडावें, असें आहे. हें रडणें तिऱ्हाइताच्या नजरेस पडलें म्हणजे

त्याची किंमत गेली, असें समजावें. हें रडणें दुसऱ्या कोणीं पाहिल्याचें आपणांस मागाहून नुसतें कळलें, तरी राम किंवा सद्गुरु विन्मुख होतात, पाठ फिरवितात, भेटण्यासाठीं दोन पाउलें चालून जवळ आलेले चार पाउलें मागें जातात. या रडण्याला दंभाचा किंवा लौकिकाचा लवमात्र स्पर्श होतां कामा नये. अशी कांहीं या रडण्याची विलक्षण तऱ्हा आहे. तें रडणें कसें रडावें, हें हीं करुणाष्टकें शिकवितात. हें रडणें आपल्या कल्याणाचें एक मोठें पण सोपें साधन आहे. याहून सोपें साधन कोणतें असणार ? जो कधीं असा रडला नाहीं, त्याचें कधीं कल्याण झालें नाहीं.

हें रडगाणें मीं माझ्या पदरचें लावलें नाहीं. श्रीसमर्थांचा त्याला आधार आहे.

> **नव्हे धीर नयनीं सदा नीर लोटे ।**
> **उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ५६–३ ॥**
> **हुर हुर हुर वाटे अंतरीं बाष्प दाटे ।**
> **तुजविण रघुराजा लोचनीं नीर लोटे ॥ १५४–१७ ॥**

ही जेथें श्रीसमर्थांची अवस्था, तेथें, वाचक हो, तुमची आमची काय कथा ? हें रडणें म्हणजे तुम्ही काय समजतां ? हें रडणें निरुत्साह, हताश करणारें नव्हे, तें धीर देणारें, रडणाराची चित्तवृत्ति प्रसन्न करणारें, त्याच्या ठिकाणीं आत्मविश्वास उत्पन्न करणारें, त्याला परमार्थाच्या वाटेवर आणून सोडणारें असतें.

नुसत्या रडण्यावर जाऊं नका. हें रडणें वाटतें तितकें सोपें नाहीं. तें कोणाला हि सहज साधेल, असें समजूं नका. त्याचा अभ्यास च केला पाहिजे. तें कदाचित् अभ्यास करूं म्हटल्यानें हि साधावयाचें नाहीं. त्याला पूर्वपुण्याई पाहिजे, पूर्वजन्मींचा अभ्यास पाहिजे, तो अभ्यास वाडवडिलांपासून चालत आलेला पाहिजे. त्या अभ्यासाला प्रत्येकानें केव्हां तरी आरंभ केला पाहिजे. जिवलग नातलग गेला म्हणजे कसें रडावें याचा आपणांस चांगला अभ्यास झालेला असतो, पण त्रेतायुगीं होऊन गेलेल्या रामासाठीं, किंवा या च युगांत तीनशें वर्षांमागें होऊन गेलेल्या त्यांच्या दासासाठीं कसें रडावें याचा अगदीं पहिला धडा म्हणून ६८, ६९, ७० किंवा ५६, ५७, ८७, ११० हीं अष्टकें वाचावीं.

तात्पर्य, करुणाष्टकें म्हणजे देवास आळविणारी कविता, असें जरी त्यांचें मुख्य स्वरूप असलें, तरी त्यांत प्रसंगोपात अनेक गोष्टी आल्या आहेत. त्यांत आपणांस श्रीसमर्थांच्या अंतरंगाच्या कैक खुणा आढळतील, त्यांच्या जीवींचें आर्त पाहावयास मिळेल, रामाच्या भेटीविषयीं त्यांना वाटणारी तळमळ आपल्या प्रत्ययास येईल, त्यांनीं वर्णिलेलीं माहात्म्यें, अवलोकिलेली देशस्थिति, लहानथोरांना केलेला उपदेश, याचा आपणांस परिचय होऊन आपली हि दृष्टि अंतर्मुख होईल, म्हणून आतां आपण प्रत्यक्ष करुणाष्टकांकडे च वळूं, यदृच्छेनें थोडीं टांचणें करूं, उतारे दिल्यावांचून राहवणार च नाहीं तेथें तेवढे उतारे देऊं, बाकी नुसते संदर्भ सांगूं आणि शेवटीं करुणाष्टकांचें सामान्य विवेचन करून मनाचे श्लोक हातीं घेऊं.

## ( २ ) रामाच्या भेटीसाठीं तळमळ

श्रवणमनननिदिध्यास हें च साक्षात्काराचें साधन श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे. त्यांना स्वतःला श्रीरामाच्या भेटीचा किती निदिध्यास लागला होता, याचीं प्रत्यंतरें त्यांच्या सर्व च कवितेंत अनेक आढळतात, मग करुणाष्टकांत तर तीं विशेश च आढळावीं, यांत नवल नाहीं. आपण उतारे तरी किती देणार? तथापि नेमकीं चार उदाहरणें देऊन आपण पुढें जाऊं.

( रा ) ११०

**दुःखानळें मी संतप्त देहीं। तुजवीण रामा विश्रांति नाहीं।**
**आधार तूझा मज मी विदेसी। सर्वोत्तमा कै मज भेटि देसी॥ १॥**

**प्रालब्ध खोटें अभिमान आला। स्वामी समर्था वियोग जाला।**
**तेणें बहू क्षीति वाटे मनासी। सर्वोत्तमा कै मज भेटि देसी॥ २॥**

**तुझिया वियोगें बहु वेदना रे। विवेक नाहीं आम्हा दिना रे।**
**पडिला समंधु या दुर्जनेसीं। सर्वोत्तमा कै मज भेटि देसी॥ ३॥**

**संसारचिंता मज वाटते रे। रामा प्रपंचीं मन जातसे रे।**
**संसर्ग आहे इतरां जनासीं। सर्वोत्तमा कै मज भेटि देसी॥ ४॥**

( म ) १३४

**श्रीरामचंद्रा करुणासमुद्रा। ध्यातों तुझी राजस योगमुद्रा।**
**नेत्रीं न ये रे तुजवीण निद्रा। कै भेटसी बा मजला समुद्रा॥ १३६॥**

(दा) ५६

अवस्था मनीं लागली काय सांगों । गुणीं गुंतला हेत कोण्हासि मागों
बहुसाल भेटावया प्राण फूटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ४ ॥
कृपाळूपणें भेट रे रामराया । वियोगें तुझ्या सर्व व्याकूळ काया ।
जनामाजि लोकीक हा ही न सूटे । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ ५ ॥
म्हणे दास मी वास पाहें दयाळा । रघूनायका भक्तपाळा भुपाळा ।
पहावें तुला हें जिवीं आर्त मोठें । उदासीन हा काळ कोठें न कंठे ॥ १० ॥

(स) १४७

अनुदिन अनुतापें तापलों देवराया ॥ हें अष्टक तर प्रख्यात आहे. त्यांतला एकादा हि श्लोक पुरे होईल!

सबळ जनक माझा राम लावण्यपेटी ।
म्हणउनि मज पोटीं लागली आस मोठी ।
दिवस गणित बोटीं प्राण ठेऊनि कंठीं ।
अवचट मज भेटी होत घालीन मीठी ॥ ८ ॥

इतकी तळमळ लागल्यावर दिनाचा दयाळु आणि मनाचा मवाळु तितक्या च उत्कंठतेनें धांवून येणार नाहीं, असें कसें घडेल ?

## (३) रामरूप

(१) अथपासून इतिपर्यंत करुणाष्टकांत रामरूप भरलेलें आहे. त्यांत दोन गोष्टींवर विशेष भर दिलेला दिसतो. एक रामाचें कोदंडधारी ठाण व त्याचा प्रताप आणि दुसरी, रामनाम म्हणजे केवळ संजीवनी मात्रा च होय. या दोन गोष्टी सिद्ध करण्याला उतारे देण्याची आवश्यकता कोणास भासूं नये, कारण हे दोन मुद्दे करुणाष्टकांत कोणास हि सर्वत्र आढळतील. तथापि आपण एकादा दुसरा श्लोक देऊं.

(एक) राम कसे आहेत ?

धर्माभिमानी क्षत्राभिमानी । विद्याभिमानी विप्राभिमानी ।
ज्ञानाभिमानी सत्याभिमानी । भक्ताभिमानी कोदंडपाणी ॥ $\frac{१३४}{१४२}$ ॥

**आला राजा महीचा दिनकरकुळिचा ख्यात वौंशावळीचा ।**
**आला आत्मा जगाचा मुनिजनऋषिचा प्राण त्या साधकांचा ।**
**आला दाता दिनाचा जप पशुपतिचा ध्यास त्या वाल्मिकाचा ।**
**आला सिंधु सुखाचा सुरवर म्हणती काळ हा राक्षसांचा ॥ २३६/१ ॥**

[दोन] रामनाम कसें आहे ?

**ज्या नामें गणिका विमान चढली मोक्षासनीं बैसली**
**ज्या नामस्मरणें हळाहळकळा क्षीणत्वता पावली ।**
**ज्या नामें जडमूढ पावन शिवें वाराणसी प्रेरिली ।**
**तें हें नाम म्हणा श्रीराम वदनीं संजीवनी फावली ॥ २३५/३ ॥**

(२) ६८ ते ७० हीं तीन अष्टकें रामचरित्रपर आहेत. गणेशशारदेला नमन करून **गितीं गाउं या रामचंद्रासि आतां ।** असा ६८ व्या अष्टकाचा आरंभ केला आहे. यावरून सबंध रामकथा गाण्याचा संकल्प केलेला असतां ७० व्या अष्टकाच्या शेवटीं ती कथा मध्येंच सोडल्यासारखी दिसते. असें कां झालें कोण जाणे. हीं तीन अष्टकें फार प्रेमळ आहेत. त्यांतील प्रसंग विरहाचा च असल्यामुळें डोळ्याला पाणी आल्यावांचून तीं कोणाला वाचतां येतील, असें वाटत नाहीं. सिंहासनीं विराजमान व्हावयाचे ते रामराजे एकाएकीं वैभव सोडून देवकार्यासाठीं योगी बनले ! बरोबर लक्ष्मण निघाले तें ठीक, पण सीता हि निघाली ! तेव्हां कौसल्यामातेनें पृथ्वी, आप, तेज, वायु, वनस्पति, पक्षी यांची केलेली प्रार्थना वाचतांना मातेप्रमाणें वाचकांचीं हि **स्रवतील नीरें नयनारविंदें**, अशी मला खात्री आहे. **मऊ सुमनें सेज खुपे जयाला ।** असा राम तो सीघ्र पाईं निघालेला पाहून त्या वेळच्या लोकांचे कंठ दाटून आले असतील, यांत नवल नाहीं, पण आज हि तो प्रसंग वाचकाच्या अंतःकरणांत चलविचल केल्यावांचून सोडीत नाहीं, याचें नवल वाटतें. प्रसंग हृदयद्रावक तर खरा च, पण त्याचें वर्णन हि फार मार्मिक केलेलें आहे. या तीन अष्टकांत श्रीसमर्थांचें अंतरंग वाचकांच्या चांगलें प्रत्ययास येईल. तीं अष्टकें वाचक स्वतः वाचणार च आहेत, म्हणून मी विस्तार करीत नाहीं.

## ( ४ ) रामराज्याचें स्वरूप

बहु वृष्टि नाहीं अनावृष्टि नाहीं ।
कदा ही भुमी पीक सांडीत नाहीं ।
जना दंड नाहीं तथा मार नाहीं
जरा मृत्य ना व्याधि कांहीं च नाहीं ॥ ९७–३ ॥

पहा बंद निर्बंद कोण्हा असेना ।
जनीं मछरु पाहतां ही दिसेना ।
कुरूपी नसे शब्दकापस्थ कांहीं ।
जनीं पाहतां वादवेवाद नाहीं ॥ ४ ॥

सुखानंद आनंद उल्हास वाटे ।
महा सुकृती लोक धार्मीक मोठे ।
बरा कौल पाळी असा कोण कैचा ।
जगीं धन्य हा राम दाता दिनाचा ॥ ५ ॥

सदा सर्वदा न्याय, अन्याय नाहीं ।
नसे हो भुमी वोस उदास कांहीं ।
जगजन्नकु राम राजा स्वभावें ।
म्हणे दास रायास कल्याण व्हावें ॥ ६ ॥

श्रीशिवछत्रपतीपुढें हा कित्ता होता.

## ( ५ ) रामोपासना

श्रीसमर्थ प्रचीतीवांचून कांहीं बोलले च नाहींत :

बहुविध भजनाचीं दैवतें पाहिलीं हो ।
सकळ तजुनि रामीं वृत्ति हे राहिली हो ।
विमळगुणशिळाची लागली प्रीति मोठी ।
विमळ हृदय होतां उद्धरे कूळ कोटी ॥ १४६–३ ॥

ज्याची सर्व क्रिया चोखडी आहे, असा दुसरा देव नाहीं. राघवाचा पंथ म्हणजे राजपंथ–राजमार्ग. विचारी लोकांनीं नेहमीं राजमार्गानें जावें हें उत्तम.

श्रीसमर्थ नेहमीं आपला अनुभव सांगत असतात :

**नव्हे राजयोगी महद्भागत्यागी।**
**उदासीन जो वीतरागी विरागी।**
**जनस्थानगोदातटीं वास केला।**
**प्रभू देखिला दास संतुष्ट जाला॥ ४-१॥**

तिसरें चरण दोघांना हि लागेल. राम हि जनस्थानगोदातटीं राहिले होते व समर्थांनीं हि तेथें वास केला होता.

हें चवथें अष्टक, न जाणों, वयाच्या बाराव्या वर्षी नारायण जनस्थान-गोदातटीं प्रथम गेले त्या वेळीं आणि त्या स्थळीं रचून प्रभुदर्शनानें झालेला आपला आनंद त्यांनीं व्यक्त केला असावा.

**बहु सुकृताचा बरा काळ आला।**
**प्रभू देखिला दास संतुष्ट जाला॥ ४-३॥**

या आपल्या अनुभवाच्या आधारावर च ते स्वतःच्या मनाला आणि जनाला आश्वासन देतात :

**बहुत सार विचार करीं मना।**
**दृढ धरी रघुनाथउपासना।**
**रघुविरा भजतां चि सुखावसी।**
**परम सुंदर तें पद पावसी॥ ६५-१॥**

इत्यादि. राम तुझी उपेक्षा करणार नाहीं रे नाहीं, अशा द्विरुक्तीनें ते आश्वासन देत आहेत.

**रघूनायकासारिखा स्वामि दाता।**
**असोनी शिरीं वाहसी वेर्थ चिंता।**
**नको वीसरों राघवा भूजकांता।**
**नुपेक्षी नुपेक्षी कदा तूज भ्रांता॥ १३४/१०८॥**

त्यांनीं आणखी किती खात्री द्यावी? आपलें हें परम भाग्य म्हणावयाचें कीं, ते आपला नुसता अनुभव सांगून किंवा आश्वासन देऊन थांबत नाहींत, तर

करुणाष्टकांत मोघम पण पुढें एकवीससमासीच्या पंधराव्या समासांत प्रत्यक्ष च आपणांवर ते मंत्रानुग्रह करीत आहेत.

म्हणे दास हा राम तत्काळ पावे।
करी संकटीं सेवकाचे कुडावे।
प्रतापें चि ब्रह्मादिकां सोडवीले।
महीमंडळालागि आनंदवीले॥ ७४-१६॥

बहू जाड ऊपासना जाड कीर्ती।
प्रतापें बळें आगळा धर्ममूर्ती।
तयाच्या गुणें हें जिणें धन्य जालें।
बहू सेवकांलागि तें येश आलें॥ १७॥

सीता राम सौमित्र शत्रुघ्न बंधु।
मरुत्सूत सुग्रीव बिभीषणादी।
अती नम्र साष्टांग भावें स्वसर्गी।
नमस्कार माझा तया अष्टवर्गी॥ १८॥

तुला सांगतों गूज हा बीजमंत्रु।
जेणें नीरसे थोर संसारशत्रु।
नव्हे मिथ्य हें बोलणें सत्य वाचा।
जपा अंतरीं मंत्र तेराक्षरांचा॥ १९॥

तीं तेरा अक्षरें येथें सांगितलीं नाहींत, तीं एकवीससमासींत प्रत्यक्ष सांगितलीं आहेत. पण तेथें आणि येथें, दोन्ही ठिकाणीं, जप करावयाचा तो अंतरीं च करावा, कोणास कळूं देऊं नये, ही सक्त ताकीद सारखी च दिली आहे. तिचा भंग श्रीसांप्रदायिकांनीं करूं नये.

## ( ६ ) श्रीसमर्थांचें देवापाशीं मागणें

### ( रा ) स्वतःपुरतें

तुज वर्णितों भाट मी देवराया।
सदा सर्वदा गाय ब्रीदें सवाया।
महाराज दे आंगिचें वस्त्र आतां।
बहू जीर्ण जाली देहेबुद्धिकंथा॥ १६-१॥

तुझा भिक्षकू दातया रामचंद्रा।
सदा स्वस्त चिंतीतसे गा महींद्रा।
राजाधीश देशाउर पूर्ण द्यावें।
भवदैन्य हें देशधाडी करावें॥ २॥

तुझा भृत्य मी भार्गवादर्पजीता।
जीवित्व असे अर्पिलें तूज आतां।
भवा जिंकितां जीव देईन पाहे।
तुज सन्मुख पाठिसीं स्थीर राहे॥ ३॥

रघूनायका नीकट दास तूझा।
तुला वीकिलासे स्वयें देह माझा।
सदा सर्वभावें करी दास्य तूझें।
देई आपुलें वेशवेतन माझें॥ ४॥

तुझे मारुतीसारिखे दास देवा।
मज मानवा किंकरा कोण केवा।
दिनानाथ विख्यात हें ब्रीद गाजे।
तेणें मानसीं थोर आनंद माजे॥ ५॥

## ( म ) राष्ट्रापुरतें

रघुनाथदासा कल्याण व्हावें।
अती सौख्य व्हावें आनंदवावें।
उद्वेग नासो वर शत्रु नासो।
नाना विळासें मग तो विळासो॥ १५-३॥

कोडें नको रे कळहो नको रे।
कापट्य कर्मी सहसा नको रे।
निर्वाणचिंता निरसीं अनंता।
शरणागतां दे बहु धातमाता॥ ४॥

अजयो न हो रे जयवंत हो रे।
आपदा नको रे बहु भाग्य हो रे।
श्रीमंतकारी जनहीतकारी।
परऊपकारी हरि दास तारी॥ ५॥

पहिल्या अष्टकांत, श्रीसमर्थांची निष्ठा कोणत्या कोटीला पोचली होती, ती दिसते. ज्यानें स्वतःचा देह परमेश्वराला विकला, ज्यानें गुरुचरणीं देहार्पण केलें, त्याची चिंता देवाला लागावी व देवानें त्याचे सर्व मनोरथ पूर्ण करावे, हें स्वाभाविक होय.

दुसऱ्या अष्टकांत, राष्ट्राच्या कल्याणाची श्रीसमर्थांना किती चिंता वाटे, ती दिसते. आवघे चि सुखी असावे । हें श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानाचें ब्रीदवाक्य होय व त्याला अनुसरून च या अष्टकांतील मागणें आहे.

## ( ७ ) श्रीसमर्थांच्या जिवींचें आर्त

श्रीछत्रपति शिवाजी महाराज उदयाचलावर येण्यापूर्वीं श्रीसमर्थांचें परशुराम क्षेत्रीं आगमन झालें होतें, त्या वेळीं त्यांनीं परशुरामापुढें आपलें हृदय खुलें करून आपल्या अंतरींची व्यथा परशुरामास जाणविली होती. बारा वर्षें तीर्थाटनाच्या निमित्तानें त्यांना देशाटन घडलें होतें. देशाच्या अवनतीची त्यांना पूर्ण कल्पना झाली होती. स्वराज्याशिवाय धर्मरक्षण होणें नाहीं, हा त्यांचा निश्चय झाला होता. धर्मावरील संकटें दूर होऊन देशाच्या अवनत-स्थितीचा शेवट व्हावयाचा म्हणजे स्वधर्मीय राजा पाहिजे.

**ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी ॥ १९ २ै५ ॥**

ही आपली इच्छा विसाव्या अष्टकांत श्रीसमर्थांनीं आपल्या अत्यंत आतुर बोलण्यानें व्यक्त केली आहे. एरवीं श्रीसमर्थ आपल्या हृदयाचा थांग सहसा कोणास लागूं देणारे नाहींत, पण या अष्टकाच्या द्वारें आपणांस त्यांच्या हृदयांत प्रवेश मिळत आहे.

श्रीसमर्थांचें गोत्र जामदग्नि. जमदग्नीचा मुलगा जामदग्नि परशुराम. फक्त दुसरा श्लोक बापाला उद्देशून दिसतो, बाकीचे चार हि मुलाला च उद्देशून आहेत. जमदग्नीला श्रीसमर्थ विनवितात, आपला मुलगा चिपळुणास असतो, मी आपल्या च गोत्रांतला असून तो माझी कांहीं च काळजी किंवा विचारपुस करीत नाहीं तरी मधून मधून माझा परामर्ष घेत जावा, असें त्यास आपण कांहीं कृपा करून सांगा, तो मला अनुकूल होईल, असें कांहीं करा. त्याला अनुकूल करून घेऊन मला काय मिळवावयाचें आहे, असें विचाराल

तर आम्हांस राज्य पाहिजे आहे, असें श्रीसमर्थांनीं अति कळवळ्यानें ध्वनित केलें आहे. श्रीसमर्थहृदयींचें आर्त उघड करून दाखविणारें हें अष्टक सर्वांना मुखोद्गत असावें :

महां कोप अग्नी ऋषी जामदग्नी ।
समर्था तया जाणिजे सर्व सूज्ञीं ।
सदा सर्वदा घेतसे नाम तूझें ।
वरिष्ठा स्वभावें चि हें गोत्र माझें ॥ २०-१ ॥

वसे सागराचे तिरीं सूत तूझा ।
समाचार तो घेत नाहीं च माझा ।
तयाला बहूतांपरी सीकवावें ।
स्वभावें चि वोढेल ऐसें करावें ॥ २ ॥

किती येक मागें बहू युध्य केलें ।
किती वेळ या ब्राह्मणा राज्य दिल्हें ।
अकस्मात सामर्थ्य तें काय जालें ।
युगासारिखें काय नेणों विझालें ॥ ३ ॥

चिरंजीव आहेसि ऐसी वदंती ।
समर्था तुझें चित्त काठिण्य कीती ।
तुझे नामधारी तुला हें कळेना ।
कृपाळूपणें चित्त कैसें वळेना ॥ ४ ॥

नको रे उदासीन हें वाक्य मानीं ।
समर्था असावें बहू साभिमानी ।
करावी दिनानाथ हे सत्य वाचा ।
तुला चिंतितों दास मी राघवाचा ॥ ५ ॥

श्रीसमर्थांना स्वराज्यस्थापनेची तळमळ लागली होती, असा या अष्टकाचा सरळ अर्थ होतो. त्यांत ‘ब्राह्मणा राज्य दिल्हें’ असें आहे, पण त्याचा अर्थ श्रीसमर्थांना ब्राह्मणांचें राज्य हवें होतें, असा नव्हे. अजून श्रीशिवछत्रपतींचा उदय व्हावयाचा होता. शिवाय प्रसंग परशुरामाच्या प्रार्थनेचा होता. ‘किती वेळ या ब्राह्मणा राज्य दिल्हें’ असें म्हटलें आहे. पण त्याचा सरळ अर्थ श्रीसमर्थांना स्वराज्य हवें होतें ; एवढा च होतो. हें आपलें कोड पुरविलें गेल्याबद्दल त्यांनीं नंतर अनेक ठिकाणीं कृतज्ञतेचे उद्गार काढले आहेत.

## (८) श्रीसमर्थांची कृतज्ञता

तिसऱ्या अष्टकाचा मी असा च अर्थ करतों.

**हिणाहून मी हीण जैसे भिकारी।**
**दिनाहून मी दीन नाना विकारी।**
**पतीतासि रे आणि हातीं धरावें।**
**समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ ३-१ ॥**

**जनीं भक्ति नाहीं मनीं भाव नाहीं।**
**मला युक्ति ना बुद्धि कांहीं च नाहीं।**
**कृपाळूपणें राज्य रंकासि द्यावें।**
**समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ २ ॥**

आपण असे असे अपराधी, अन्यायी, अवगुणी असतां श्रीरामानें आपले लळे पाळिले, म्हणून या अष्टकांत श्रीसमर्थ श्रीरामाचें कृतज्ञतापूर्वक स्मरण करीत आहेत, रामानें केलेल्या उपकारांचा पाढा वाचीत आहेत व आपणांस त्या उपकारांची फेड करणें शक्य नव्हे असें म्हणत आहेत, हें लक्षांत घेतलें म्हणजे वरील पहिल्या श्लोकांतील 'धरावें' याचा अर्थ 'धरिलें' व दुसऱ्या श्लोकांतील 'द्यावें' याचा अर्थ 'दिल्हें' असा च आहे, हें वाचकांस सहज पटेल. शिवाय, पुढच्या तीन श्लोकांत क्रियापदांच्या भूतकाळाच्या च रूपांचा उपयोग केलेला आहे हें पाहिलें, म्हणजे आपण करीत असलेल्या अर्थाविषयीं मुळीं च शंका राहत नाहीं.

**बहूसाल अन्याय कोट्यानकोटी।**
**रघूनायकें घातले सर्व पोटीं।**
**किती काय गूणासि म्यां आठवावें।**
**समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ ३ ॥**

**समर्थें दिल्हें सौख्य नानापरीचें।**
**सदा सर्वदा जाणसी अंतरींचें।**

आमच्या हृदयांत काय आहे, आम्हांस तळमळ कसली लागली आहे, आम्हांस काय हवें आहे, हें सर्व कांहीं तुम्ही जाणतां.

**लळे पाळिले तूं कृपाळू स्वभावें ।**
**समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ ४ ॥**

**दिनानाथ हें ब्रीद त्वां साच केलें ।**
**म्हणे दास भक्तासि रे उद्धरीलें ।**

रामा, माझे सर्व कोड पुरले, या जगांत या देहांत आतां मीं राहिलें च पाहिजे अशी कांहीं आवश्यकता उरली नाहीं, मी आतां हा देह सोडून देण्यास तयार आहें !

**सुखें सांडणें या देहाचें करावें ।**
**समर्था तुझें काय उत्तीर्ण व्हावें ॥ ५ ॥**

या प्रकारचे श्रीसमर्थांचे कृतज्ञतेचे उद्गार त्यांच्या करुणाष्टकांत आणि इतर वाङ्मयांत अनेक ठिकाणीं आढळतात.

## ( ९ ) बाहेगांवचा मारुती

हें ५३ वें अष्टक होय. यांत श्रीसमर्थ आपल्या चरित्रांतील एका महत्त्वाच्या अद्भुत प्रसंगाचा उल्लेख करीत आहेत. ही बाहेगांवची कथा कोणत्या रामायणांतील आहे, मला ठाऊक नाहीं. श्रीसमर्थांनीं ऐकलें होतें कीं, रावणवधानंतर श्रीराम, लक्ष्मण व सीता यांसह परत जात असतां, स्नानसंध्येची वेळ झाली म्हणून श्रीराम आणि लक्ष्मण कृष्णातटाकीं बाहेगांवीं मुक्कामाला राहिले. सीतामाई जवळ च सीरटे गांवीं राहिल्या होत्या. कृष्णेच्या वाळवंटांत च श्रीराम ध्यानस्थ बसले असतां कृष्णेला एकाएकीं महापूर आला. श्रीरामाच्या ध्यानांत विघ्न येणार हें पाहून तेथें भीम मारुती प्रकट झाले व कृष्णेचें पाणी अडवून धरावें म्हणून पाण्याचा लोंढा आणि ध्यानस्थ श्रीराम यांच्या मध्यें दोन्ही हात पसरून उभे राहिले. कृष्णेचें पाणी दुभंगून दोन्ही हातांच्या बाजूंनीं गेलें व पुढें पुन्हा एकत्र होऊन वाहूं लागलें. याप्रमाणें श्रीरामाच्या ध्यानांत येणारें विघ्न टळलें. त्या ठिकाणीं पात्रांत एक बेट च बनलें. दोन्ही हातांच्या बाजूंनीं पाणी गेल्यामुळें त्या गांवाचें नांव च बाहे पडलें. अशा प्रसिद्ध ठिकाणीं मारुतिराय असले च पाहिजेत, अशी कल्पना

होऊन श्रीसमर्थ त्या जागीं दर्शनास गेले, तों त्यांना मारुतिराय दिसले नाहींत! मोठा विस्मय वाटला! त्यांनीं मारुतीचा धांवा आरंभिला. मारुतिराय पाठीमागच्या प्रचंड डोहांत होते. तेथून हांक आली. श्रीसमर्थांनीं बुडी मारून त्यांना बाहेर आणलें आणि त्या बेटांत त्यांची स्थापना केली. श्रीसमर्थस्थापित मारुतीच्या प्रख्यात अकरा मूर्तींपैकीं ही एक मूर्ति होय. श्रीसमर्थांनीं धांवा करतां च मारुतिराय धांवून आले. ते चिरंजीव आहेत. श्रीराम वैकुंठाला गेले तेव्हां त्यांनीं आपले सारे भक्त मारुतिरायाच्या आंगीं लाविले होते व त्यास आज्ञा केली होती कीं, कोणत्या हि काळीं आपल्या एकनिष्ठ भक्तानें संकटसमयीं हांक मारली तर तेथें तत्काळ प्रकट होऊन भक्तावरील संकटाचें निवारण केलें पाहिजे. त्या आज्ञेचा श्रीसमर्थांना प्रत्यय आला. त्यांचें अंतकरण भरून आलें! लोकांस हें काय सांगूं? लोक मानतील का? कीं संशय धरतील? अशी शंका वाटून श्रीसमर्थांनीं पुढचे आपले सर्व विचार मनांतल्या मनांत च जिरविले. हा सारा प्रसंग श्रीसमर्थांनीं या अष्टकांत वर्णिला आहे. तें कृपा करून संपूर्ण मुळावरून वाचा.

**हनुमंत पाहावयालागि आलों।**
**दिसेना सखा थोर विस्मीत जालों।**
**तयावीण देवाळयें तीं उदासें।**
**जळांतूनि बोभाइला दास दासें॥ ५३-७॥**

**मनांतील जाणोनि केला कुढावा।**
**दिल्हे भेटिचा जाहला थोर यावा।**
**बळें हाक देतां चि तैसा गडाडी।**
**माहां मेघ गंभीर जैसा घडाडी॥ ८॥**

**रघूराज वैकुंठधामासि गेले।**
**तधीं मारुती दास हे नीरविले।**
**रघुनाथऊपासकाला प्रसंग।**
**सख्या मारुती पाव रे लागवेगें॥ ९॥**

**प्रभूचें माहांवाक्य तां साच केलें।**
**म्हणे दास हें प्रत्यया सद्य आलें।**
परंतु **जनामाजि हें सांगतां पुरवेना।**
**आवस्ता मनीं लागली ते सरेना॥ १०॥**

वरील ९ व्या श्लोकांतील रामाची मारुतीला आज्ञा सर्व च उपासकांपुरती आहे, पण श्रीसमर्थांपुरती खास आज्ञा होती, तिचा संदर्भ एका प्रख्यात अष्टकांत आला आहे, तो आतां आपण पाहूं.

## ( १० ) कफाची व्यथा

श्रीसमर्थांना एकदां कफाची व्यथा झाली होती, तेव्हां त्यांनीं ' फणिवर उठवीला ' हें १४४ वें अष्टक रचून मारुतीचा धांवा केला आणि त्यांची व्यथा दूर झाली, अशी कथा आहे. त्या कथेला या अष्टकांत च पूर्ण आधार मिळतो, हें त्यांतील विशेषतः चौथ्या व अकराव्या श्लोकां-वरून वाचकांस पटणार आहे. या अष्टकाची गणना भीमरूपी स्तोत्रांत करण्यांत आली आहे. पहिले तीन श्लोक पाहिले तरी, प्रसंगाला अनुरूप अशी च या अष्टकाची रचना आहे, हें वाचकांच्या ध्यानांत येईल. व्यथित लोक आपली हि व्यथा दूर व्हावी म्हणून या अष्टकाचा पाठ करीत असतात, पण ते नवव्या श्लोकांत जी पहिली मुख्य शर्त ध्वनित केली आहे ती विसरतात. ज्याच्या अंतरीं करुणेचा जलधर असा श्रीराम अखंड वास करीत असेल, त्यानें या अष्टकाचा उपयोग केल्यास, श्रीसमर्थांप्रमाणें त्यास हि गुण आल्यावांचून राहणार नाहीं.

अष्टक महत्त्वाचें आहे. त्यांत इतिहास आहे. श्रीसमर्थांच्या चरित्रांतील एक प्रसंग आहे. शिवाय, प्रपंचाच्या पायीं सारा च जन्म दुःखांत काढणाऱ्या आम्हां प्रपंची जनांना उपयोगीं पडावें म्हणून तें अकरा श्लोकांचें अष्टक येथें संपूर्ण देणें इष्ट वाटतें.

**फणिवर उठवीला वेग अद्भुत केला।**
**त्रिभुवनजनलोकीं कीर्तिचा घोष गेला।**
**रघुपति उपकारें दाटले थोर भारें।**
**परम धिर उदारें रक्षिलें सौख्यकारें ॥ १ ॥**

**सबळ दळ मिळालें युध्य ऊदंड जालें।**
**कपिकटक निमालें पाहतां येश गेलें।**
**परदळशरघातें कोटिच्या कोटि प्रेतें।**
**अभिनव रणपातें दुःख बीभीषणातें ॥ २ ॥**

कपिरिसघनदाटी जाहली थोर आटी ।
म्हणउनि जगजेठी धांवणो क्यारि कोटी ।
मृत्यविर उठवीले मोकळे सीध जाले ।
सकळ जन निवाले धन्य सामर्थ्य चाले ॥ ३ ॥

बहु प्रिय रघुनाथा मुख्य तूं प्राणनाथा ।
उठवि मज अनाथा दूरि सारूनि वेथा ।
झडकरि भिमराया तूं करी दृढ काया ।
रघुविरभजना या लागवेगें चि जाया ॥ ४ ॥

तुजविण मज पाहे पाहतां कोण आहे ।
म्हणउनि मन माझें रे तुझी वास पाहे ।
मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें ।
सकळिक निजदासांलागि सांभाळवीलें ॥ ५ ॥

उचित हित करावें उधरावें धरावें ।
अनुचित न करावें तां जनीं येश घ्यावें ।
अघटित घडवावें सेवकां सोडवावें ।
हरिभजन घडावें दुःख तें वीघडावें ॥ ६ ॥

प्रभुवर विरराया जाहली वज्रकाया ।
परदळ निवटाया दैत्यकूळें कुटाया ।
गिरिवर उतटाया रम्य वेशें नटाया ।
तुज चि अलगटाया ठेविलें मुख्य ठाया ॥ ७ ॥

बहुत सबळ सांठा मागतों अल्प वांटा ।
न करित हितकांटा थोर होईल तांठा ।
कृपणपण नसावं भव्य लोकीं दिसावें ।
अनुदिन करुणेचें चिन्ह पोटीं वसावें ॥ ८ ॥

जळधर करुणेचा अंतरामाजि राहे ।
तरि तुज करुणा हे कां न ये सांग पाहे ।
कठिण हृदय जालें काय कारुण्य गेलें ।
न पवसि मज कां रे म्यां तुझें काय केलें ॥ ९ ॥

वडिलपण करावें सेवकां सांवरावें ।
अनाहित न करावें तूर्त हातीं धरावें ।
निपट चि हटवादें प्रार्थिला शब्दभेदें ।
कपि घन करुणेचा बोळला रामवेधें ॥ १० ॥

बहुत चि करुणा या लोटली देवराया ।
सहज चि कफकेतें जाहली वज्रकाया ।
परम सुख विळासे सर्व दासानुदासें ।
पवनतनुज तोषें वंदिला सावकाशें ॥ ११ ॥

प्रत्यक्ष श्रीरामानें प्रत्यक्ष मला प्रत्यक्ष तुमच्या स्वाधीन केलें आहे, याची श्रीसमर्थ मारुतीस पांचव्या श्लोकांत आठवण करून देत आहेत !

मज तुज निरवीलें पाहिजे आठवीलें ।

हा प्रसंग कोणता ? स्वानुभवदिनकर या अप्रतिम ग्रन्थाचे कर्ते श्रीसमर्थ-शिष्य दिनकर यांनीं आपल्या ग्रन्थाच्या १६ व्या कलापाच्या ४ थ्या किरणांत तो सहज ओघानें सांगितला नसता, तर तो आपणांस कळण्यास मार्ग नव्हता. वरील चरणांतील, तसें च बाहेगांवच्या मारुतीच्या अष्टकाच्या नवव्या श्लोकांतील ‘ निरविलें ’ शब्द ध्यानांत ठेवला पाहिजे.

आतां आपण दिनकरांनीं केलेलें वर्णन वाचूं :

गौतमीच्या उत्तरतीरीं जांबेसी ।
ग्रामलेखनाधिकार पितयासी ।
पिता गोदेसी गेला स्नानासी ।
तवं नवल वर्तलें मागें ॥ स्वा. दि. १६-४-४६ ॥

निजगृहीं असतां नारायण ।
तवं दूतवेषें आला येक वानरगण ।
तेणें परम क्लेशी करून ।
बाह्य प्रदेशासी नेलें ॥ ४७ ॥

वय तरी वर्षा अकरांचें ।
परंतु पदरीं जन्मांतरपुण्य साचें ।
योगभ्रष्ट तेणें निजवृत्तीचें ।
चळण न घडे कदापि ॥ ४८ ॥

दूतें झोले देत बाह्य प्रदेशीं ।
नेलें तेणें नारायण भयभीत मानसीं ।
होऊनि पाहे तवं दृष्टीसी ।
अपूर्व कौतुक देखिलें ॥ ४९ ॥

मेघश्यामरूप क्षत्रीवेषें ।
सिबिकेमाजीं बैसलीं स्त्रीपुरुषें ।
सभंवतें निजगण यथासंतोषें ।
उभे असती दोहीं भागीं ॥ ५० ॥

तवं यासी नेऊनि पुढें उभें केलें ।
पिता कोठें आहे म्हणौनि पुसिलें ।
रचपुतिभाषा वाक्य बोलिलें ।
आणि वेष हि तैसा चि ॥ ५१ ॥

येणें पितृवर्तमान सांगितलें ।
तवं प्रभूनें जवळीं पाचारिलें ।
मस्तक कुरवाळूनि येक पत्र दिधलें ।
निजकरें नारायणासी ॥ ५२ ॥

निजमुद्रांकित पत्र करीं लाधतां चि ।
अवस्था पालटली नारायणाची ।
थरथरां कांपत तेणें सर्वांगाची ।
वेंगडी वळली ॥ ५३ ॥

वाचा जातसे बेंबळपणें ।
हांसे रडे नाचे सत्राणें ।
शब्द बोलवेना निर्बळपणें ।
उगा चि टकमकां पाहातसे ॥ ५४ ॥

आंग कांपतसे थरथरां ।
विस्मयें दाटलासे सैरा ।
घामेजोनि अति घाबिरा ।
रडे पडे आक्रंदे ॥ ५५ ॥

क्षणें हांसे क्षणें रडे ।
उड्या मारी क्षणें पडे ।
इतुकियामाजीं निजनिवाडें ।
कौतुक देखे निजदृष्टीं ॥ ५६ ॥

तवं मूर्ति देखिली घवघवीत ।
मेघश्याम प्रभा लखलखित ।
वामांगीं जानकी शोभत ।
पाठीसीं सौमित्र भरत ॥ ५७ ॥

तया सेजीं उभा शत्रुघ्न ।
पुढें उभा वीर हनुमान ।
अकस्मात वांहाटुळी येऊन ।
इतुकें देखे तत्काळीं ॥ ५८ ॥

ऐसें देखेना जवं अकस्मात ।
तवं श्रीरामें मस्तकीं ठेऊनि कृपाहस्त ।
महावाक्य उपदेशूनि त्वरित ।
हनुमंतासी निरविलें ॥ ५९ ॥

' निरविलें ' शब्दापाशीं च थांबूं या. कफाच्या अष्टकांत या निरवण्याची आठवण श्रीसमर्थ मारुतीस करून देत आहेत.

ही झाली या युगांतली शक १५४१ तील कथा. पण त्रेतायुगांत च निजधामास जाण्यापूर्वीं श्रीरामांनीं चिरंजीव मारुतीस पहिली आज्ञा देऊन ठेवली होती, ती आपण बाहेगांवच्या अष्टकांत पाहिली च आहे. किंबहुना तेवढ्यासाठीं च मारुतीला चिरंजीव करून मागें ठेवून श्रीराम वैकुंठास गेले. या च अर्थाचा श्रीसमर्थांचा आणखी एक श्लोक आहे :

स्वधामासि जातां महा रामराजा ।
हनुमंत तो ठेविला या च काजा ।
सदा सर्वदा रामदासांसि पावे ।
खळीं गांजितां ध्यान सांडूनि धांवे ॥ $\frac{१३४}{१३१}$ ॥

रामदास्य घडेल तर आपणांस हें केवढें आश्वासन आहे !

## ( ११ ) उदास क्षण

उदास, उदासीन, उदासीनता या शब्दांचे दोन अर्थ होतात.

**उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी ॥ ६७-१ ॥**

यांतील उदासीन हा शब्द, व

**उदासीन हे वृत्ति कोठें न लागे ॥ ७८ ॥**

यांतील उदासीन हा शब्द, एका च अर्थाचे नव्हत. पहिल्यांतील उदासीन शब्दाचा अर्थ अलिप्त, तटस्थ असा आहे व दुसऱ्यांतील दुःखी, कष्टी असा आहे. या दुसऱ्या अर्थानें श्रीसमर्थांसारखे ईश्वरी पुरुष हि केव्हां केव्हां उदास होत, याचें मला कौतुक वाटतें. आमच्यासारख्या प्रापंचिक जनाची दैना पाहून ते उदास होत व त्यांची ती उदासीनता पाहून मला तिचें कौतुक वाटतें. आमची दैन्यावस्था पाहून आणि ऐकून

**ऐकोन हें दास उदास चित्तीं ।**
**सीतापतीवांचुनि कोण अंतीं ।**
**वायां प्रपंचीं वृथा सिणावें ।**
**सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें ॥ ६०-१० ॥**

उदासीनता वाटण्याला एकंदर कारणें कोणतीं होत, तीं ७८ व्या अष्टकांत आलीं आहेत. तीं विचार करण्यासारखीं आहेत. थोडक्यांत तीं अशीं :

( १ ) श्रीरामाचा वियोग, ( २ ) द्रव्य दारा इत्यादि पसारा, ( ३ ) राजभोग, ( ४ ) लोकांच्या नाना तऱ्हा, ( ५ ) एकमेकांची निंदा करणारे लोक, ( ६ ) लोकांचीं वायफळ बोलणीं, ( ७ ) शब्दज्ञानी पण क्रियाशून्य लोक, ( ८ ) सत्य सोडवत नाहीं आणि मिथ्य घेववत नाहीं, त्यामुळें लोकांच्या मनासारखें बोलवत नाहीं, ( ९ ) अहंकाराच्या योगानें वाढणारा वितंडवाद, ( १० ) नाना उपाधी, ज्यांच्या पायीं खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें होतें, कांहीं लोक अनुकूल तर कांहीं प्रतिकूल होतात, कोणता तरी पक्ष स्वीकारावा लागतो व सत्यासत्याकडे न पाहतां त्याची कड घ्यावी लागते, जो पक्ष घ्यावा त्यांत च रंगून जावें लागतें, पराधीनता येते,

स्वार्थबुद्धि बळावते. तात्पर्य, ज्या उपाधीमुळें या गोष्टी घडतात, त्या उपाधीमुळें मनाला उदासीनता वाटते.

उदासीनता वाटण्याला उपाधी विशेष कारणीभूत होतात. त्या उपाधी सुटल्या कीं अहंकार गळतो आणि राम जोडला जातो.

## ( १२ ) शीघ्रकोपी

केवळ माझी आवडनिवड म्हणून नव्हे, पण त्यांचें वाङ्मय आणि त्यांचीं चरित्रें वाचून मी माझ्या मनांत श्रीसमर्थांचें एक प्रकारचें अंतर्बाह्य स्वरूप रेखाटलेलें आहे. त्या स्वरूपांत मी त्यांना – प्रत्यक्ष कोठून ? – मनानें पाहत असतों. अंतःकरणाचे ते अति कोमल होते, पण ते हजारों शिष्यांचे नेते, अनेक मंडळ्यांचे चालक आणि कडक शिस्तीचे भोक्ते असल्यामुळें त्यांच्या स्वभावांत, दिसण्यांत तरी, स्वाभाविकपणें कठोरपणा आला होता. बेदाद, बेकैद कारभार त्यांना मुळीं च खपत नसे. नियमांचा भंग त्यांना सहन होत नसे. सर्वकाळ त्यांची वृत्ति अति मृदु असली, तरी प्रसंगीं ते वज्राहून हि कठोर रूप धारण करीत. भोळारामासारख्यांची गोष्ट वेगळी, पण एकंदर शिष्य मंडळी भिऊन च वागत.

करुणाष्टकांत पुष्कळ ठिकाणीं ते स्वतःविषयीं बोलत आहेत असें भासतें, पण तें खरोखर असतें तुम्हांआम्हांला उद्देशून. त्यांचें बोलणें स्वतःपुरतें कोणतें व श्रोत्यांच्या भूमिकेवरचें कोणतें, हें ओळखण्याला पुष्कळ वेळां कठीण जातें. याचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे माझ्या आवडीचें १०१ वें अष्टक होय.

**नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं ।**
**नसे प्रेम हें रामविश्राम नाहीं ।**
**असा दीन अज्ञान मी दास तूझा ।**
**समर्था जनीं घेतला भार माझा ॥ १०१–१ ॥**

**रघूनायका जन्मजन्मांतरींचा ।**
**अहंभाव छेदूनि टाकी दिनाचा ।**
**जनीं बोलती दास या राघवाचा ।**
**परी अंतरीं लेश नाहीं तयाचा ॥ २ ॥**

दिनाचें उणें दीसतां लाज कोण्हा।
जनीं दास दीसे तुझा दैन्यवाणा।
शिरीं स्वामि तूं राम पूर्णप्रतापी।
तुझा दास पाहे सदा शीघ्रकोपी॥ ३॥

यांतले कोणते गुणदोप त्यांचे आणि कोणते आमचे? श्रीसमर्थांच्या ठिकाणीं भक्ति नव्हती, ज्ञान नव्हतें, ध्यान नव्हतें, प्रेम नव्हतें, ते दीन होते, अज्ञानी होते, असें मानावयाचें काय? एक तर हे सारे लीनतेचे उद्गार आहेत, किंवा तुमच्या आमच्या भूमिकेवरून हें त्यांचें बोलणें आहे. पण या सर्वांतला एक उद्गार मात्र मला त्यांच्यापुरता खरा वाटतो. तो कोणता हें मीं सांगावें, का तें ठरविण्याचें वाचकांवर सोंपवावें? मीं सांगितल्यास श्रीसमर्थ रागावतील का स्मित करतील? कोणती हि अन्यायाची गोष्ट पाहिली किंवा ऐकली, कोणाकडून हि अक्षम्य अपराध घडला, म्हणजे तत्काळ – पहिल्या क्षणीं – त्यांना राग येई, तो लागलीं च दुसऱ्या क्षणीं शांत होई. याचें हि मला प्रेम आणि कौतुक वाटतें. कारण या जन्मांत मला जे गुरु भेटले होते, त्यांच्या हि ठिकाणीं हा गुण होता व त्यांचें मीं कौतुक च करावें.

## (१३) धन्यतेचीं लक्षणें

भक्ति ज्ञान योग ध्यान हें प्रमाण जाणिजे।
धर्मनीति न्यायनीति सर्व नीति मानिजे।
थानमान भेदमान्य लोकमान्य चालणें।
धन्य धन्य ते चि धन्य वेदमान्य बोलणें॥ १५६/१ ॥

गद्य येक पद्य येक शब्द येक सारिखा।
यातिभेद दृश्यभेद अर्थभेद वोळखा।
भाव भिन्न गर्भ भिन्न भिन्न भिन्न सर्व ही।
लोकदास रामदास देवदास तो सही॥ १५७/५ ॥

## (१४) मुलांची आवड

श्रीसमर्थांचें लहान मुलांवर फार प्रेम असे. त्यांच्यांत खेळणें, त्यांच्याशीं बोलणें, त्यांच्या संगतींत राहणें त्यांना फार आवडे. स्वाभाविक आहे. थोर माणसें बनलेलीं, निर्ढावलेलीं असतात. तीं नेहमीं आपल्या घमेंडींत च राहून

यांत काय आणि त्यांत काय अशा संशयांत बुडालेलीं असतात. त्यांच्या ठिकाणीं भाव नसतो. लहान मुलांचें तसें नसतें. त्यांच्यांत श्रद्धा असते. तीं निरहंकार, निष्कपट, निर्मल आणि शुद्ध अंत:करणाचीं असतात. त्यांच्यांत मिळून मिसळून वागून त्यांना वळण लावणें आणि राष्ट्रकार्याकडे वळवणें सुलभ असतें.

**वयें थोर ते चोर भावार्थ नाहीं।**
**विकल्पें बुडाले अहंभावडोहीं।**
**अहंता नसे हो तया लेंकुरांसी।**
**म्हणोनि बहु आवडी रामदासीं॥ १३४/११८ ॥**

## ( १५ ) पुतण्यांना उपदेश

श्रीसमर्थांचे वडील बंधु गंगाधर, ऊर्फ रामीरामदास, ऊर्फ श्रेष्ठ. ते शक १५९७ त परंधामास गेले. त्यांच्या मागें रामजी आणि श्यामजी अशीं त्यांचीं दोन अल्पवयी मुलें होतीं. त्यांना श्रीसमर्थांनीं

**बरें सत्य बोला यथातथ्य चाला।**

इत्यादि उपदेशपर दहा श्लोकांचें पत्र पाठविलें होतें. तें पत्र म्हणजे ५४ वें अष्टक होय. तें मुलांच्यामध्यें सर्वत्र प्रसिद्ध आहे. कोणत्या हि परिस्थितींत त्यांतील उपदेश सर्व मुलांनीं ध्यानीं धरावा, अशा योग्यतेचा आहे. त्या श्लोकांतील कांहीं शब्द भ्रामक समजुतीनें बदलण्याची प्रथा पडत चालली आहे, ती मात्र योग्य नव्हे.

## ( १६ ) तत्कालीन लोकस्थिति

( १ ) तो काळ अंदाधुंदीचा होता. कसला न्याय आणि कसली नीति, असा काळ आला होता. कधींपासून असा काळ आला होता?

**अकस्मात मागें भुमीकंप जाला।**
**नभामाजि तारेसि सेंडा निघाला।**
**तदारभ्य भूमंडळीं धुंदि जाली।**
**नसे न्याय ना नीति सर्वै बुडाली॥ १३४/६ ॥**

श्रीसमर्थांच्या पूर्वीं असा हा सृष्टींतील चमत्कार केव्हां घडला होता, याचा शोध लागला पाहिजे.

(२) अष्टक ७२ त हास्यरस आहे. पण त्यांतील वर्णन सरसकट तत्कालीन देशस्थितीला अनुलक्षून असेल तर, लोकांत दारिद्य किती पसरलें होतें, याची कल्पना होते.

(३) अष्टक ११ वें पाहिलें म्हणजे असें वाटतें कीं, आपआपसांतील भांडणांत आज हि आपण त्या काळच्या लोकांची सहज बरोबरी करूं शकूं.

**कदा देव दैत्या मधें सख्य नाहीं।**
**जिवां मानवां ही मधें सख्य नाहीं।**
**स्वजाती विजाती मधें सख्य नाहीं।**
**महंतां महंतां मधें सख्य नाहीं ॥ ११–२ ॥**

**कळहो लागला पंडितां पंडितांला।**
**कळहो लागला ज्ञानियां ज्ञानियांला।**
**कळहो लागला योगियां योगियांला।**
**कळहो लागला तापसां तापसांला ॥ ३ ॥**

**बहू जाणते बोलती शास्त्रमतें।**
**जनीं दाविती आपुलें व्युत्पतीतें।**
**उणें बोलतां सीघ्र कोपें बहूतें।**
**बळें मारिती येकमेकांसि हातें ॥ ५ ॥**

(४) याप्रमाणें श्रीसमर्थांचें लोकस्थितीचें निरीक्षण होतें. ते हिंडत ते निरीक्षण करीत च हिंडत. त्यांच्या नियोजित कार्यांत या निरीक्षणाची अत्यंत आवश्यकता असे. कोण कसे कोण कसे, पापी कोण पुण्यवान् कोण, अधम कोण उत्तम कोण, लोभी कोण त्यागी कोण, कोण उपयोगी पडेल कोण विरुद्ध जाईल, या सर्व तऱ्हेच्या लोकांची ते परीक्षा करून सोडीत.

**फिरे दास ऊदास लोकांस पाहे।**
**मनामाजि थकीत होऊनि राहे ॥ ३३–५ ॥**

(५) त्या काळीं पर्यटनांत सोयी कोठल्या? गैरसोयी च असणार. पण त्या सर्व ते सहन करीत.

**पथीं चालतां सूखदुःखा शमावें।**
**महीमंडळीं काय कर्ती पहावें।**
**म्हणे दास हें दृश्य नानापरीचें।**
**किती होत जातें कळाकुसरीचें॥** ९९–६॥

## (१७) विपरीत प्रसंग

त्या अंदाधुंदीच्या काळांत सर्व देशभर संचार करीत असतां श्रीसमर्थांवर बरे वाईट कसे घोर प्रसंग येऊन गेले असतील, याची कल्पना करवत नाहीं. त्या काळाची आज नीटशी कल्पना होत नाहीं, मग त्यांतील प्रसंगांची कोठून होणार? ११६ व्या अष्टकांतील प्रसंग मी काल्पनिक मानीत नाहीं.

**न जावें चि तेथें चि लागेल जावें।**
**न खावें चि जें तें चि लागेल खावें।**
**वदावें चि ना तें चि लागे वदावें।**
**स्वभावें चि निर्माण केलें चि देवें॥** ११६–१॥

असे प्रसंग श्रीसमर्थांवर हि येऊन गेले. विपरीत काळ होता. आग्र्याहून श्रीशिवाजीमहाराज मुलासह निसटले, तेव्हां मथुरेस मुलाला ज्या ब्राह्मणकुटुंबाच्या हवालीं करून ते दक्षिणेंत आले होते, त्या ब्राह्मणांवर कारणपरत्वें असा प्रसंग आला च होता कीं नाहीं? तसले च प्रसंग श्रीसमर्थांवर हि आले असणार! करणार काय?

**प्रसंगें घडे तें चि मानून घ्यावें।**
**अहंतागुणें दुःखशोका न घ्यावें।**
**पुढें काय होईल तें तें पहावें।**
**विवेकें चि ज्ञानें चि सुखें रहावें॥** २॥

याप्रमाणें येणारे बरे वाईट प्रसंग निभावून नेले पाहिजेत.

**म्हणे दास उदास कांहीं न व्हावें ।**
**बरें वोखटें सर्व साहोनि न्यावें ॥ ३ ॥**

अशा च प्रसंगाचें वर्णन आपणांस पुढें आणखी एकदां पदपदांतरांत हि आढळणार आहे.

## ( १८ ) जनाचा कंटाळा, वनाची आवड, एकांतप्रियता

केव्हां केव्हां मला असें वाटूं लागतें कीं, श्रीसमर्थ जें जें बोलत तें तें स्वतःच्या चरित्राकडे पाहून च बोलत कीं काय न कळे !

लोकांच्या नाना तऱ्हा पाहून केव्हां केव्हां त्यांना लोकांचा अति कंटाळा यावा

**गजबज मज आतां सर्वथा आवडेना ।**
**बहुत बडबडीतो त्यास आम्हा पडेना ॥ १५४/३ ॥**

व अशा वेळीं त्यांना वाटावें,

**जन वमनपरी तूं टाकि थुंकून चित्ता ।**
**वन विजन धरी तूं ज्ञानवैराग्यवंता ।**
**विसर सकळ दुःखें पावसी शांति रामीं ।**
**पहुडसि सुखसेजे सर्वकल्याणधामीं ॥ १५४/१ ॥**

असें दिसतें, त्यांना स्वभावतः आवड होती वनाची आणि एकांताची, पण कार्य करण्याचा प्रसंग आला होता लोकांमध्यें. तेव्हां ते दोन्ही हि गोष्टी करीत.

भवाचा वीट म्हणून जें ७९ वें अष्टक आहे, तें सबंध त्यांचें च चरित्र आहे, असें मला वाटतें. त्यांची ती स्वाभाविक वृत्ति होय.

**मना चाल ऊठीं वना दुर्गमातें ।**
**न गुंते भवागारदारादिकातें ।**
**विवेकें विचारें विवंचूनि पाहीं ।**
**जनीं पाहतां सर्वथा ऊरि नाहीं ॥ ७९-१ ॥**

**बहू वीट आला भवाचा न सावे ।**
**अटव्यांत देऊनियां हांक जावें ।**
**मनातें दमावें श्रीरामीं रमावें ।**
**दिगांतीं फिरावें जना न स्मरावें ॥ ९ ॥**

असा विचार करून च ते लग्नांतून निसटले काय? पण अरण्यांत निजणार कोठें, पांघरणार काय? त्याची काळजी कशास पाहिजे !

**सुषुप्तीअवस्थेसि भूमीं निजावें ।**
**उसें रामपाद स्मरोनी धरावें ।**
**दिशांचा महा पट्ट तो पांघरावा ।**
आणि **सिताकारणें साह्य वन्ही करावा ॥ १४ ॥**

असे आपले समर्थ होते, असें त्यांचें तीव्र वैराग्य होतें, असे त्यांचे विचार होते. तें सबंध अष्टक च कृपा करून वाचा आणि त्यांत श्रीसमर्थांना पाहा.

## ( १९ ) सृष्टिसौंदर्याचे भोक्ते

सृष्टिसौंदर्याचे ते फार भोक्ते होते. रामांनीं आपला तारुण्याचा काळ अरण्यसेवनांत कंटला व कंद, फळें, मुळें भक्षून ते राहिले, तेव्हां आपण हि त्या च मार्गानें जावें, ही ज्यांची आवड, त्या श्रीसमर्थांच्या मनाचा पहिला ओढा निर्जन वनाकडे असावा, हें स्वाभाविक आहे. त्यांचीं वनश्रीचीं शेंकडों वर्णनें हें च दर्शवितात. प्रस्तुत माझ्या पुढें ३२ व्या अष्टकांतील वर्षाकालीन वनश्रीचें वर्णन आहे. आधुनिक, ज्या काव्याची अपेक्षा करीत असतात, तसलें काव्य त्यांना या अष्टकांत आढळेल, असें वाटतें.

**पसरले सरले गिरि साजरे ।**
**सरवटें धुकटें भरितें भरे ।**
**बहुत वात झडांत झडाडितो ।**
**वर तरू वरता चि कडाडितो ॥ ३२-१ ॥**

वगैरे

**द्रुम लता समता त्रुण मातलें ।**
**सुख मनीं सुमनीं मन रातलें ।**
**परम सुंदर ते खग बोलती ।**
**गमतस वसती कमळापती ॥ ४ ॥**

**विमळ सूसिळ तें स्थळ पाहतां । सुख विशेष घडे पळ राहतां ।**
**वरदराज विराजतसे वनीं । विनटला नटला रत सज्जनीं ॥ ५ ॥**

कोणत्या स्थळाचें हें वर्णन आहे, याची खात्री देतां येत नाहीं. न जाणों, तें शिवतरखोऱ्यांतील हि वनश्रीचें असेल.

## ( २० ) क्षेत्रें आणि स्थानें

कांहीं क्षेत्रांचा आणि स्थानांचा उल्लेख करुणाष्टकांत आला आहे, पण तीं सर्व च स्थलें कोणतीं, तें निश्चयानें सांगतां येत नाहीं. कोणास आणि केव्हां तरी निश्चय करतां येईल म्हणून च केवळ तीं येथें नमूद करून ठेवावयाचीं.

( १ ) १२ व्या अष्टकांतील विश्वमाता भवानी प्रतापगडावरील असावी. त्या काळीं केवढें वैभव होतें !

( २ ) ९२ व्या अष्टकांत तुळजा मातेच्या उपकाराचें स्मरण केलेलें आहे.

( ३ ) **संताई तूळजाई जळथळजखिणी जाखमाता जुगाई ।**
**धानाई पिंपळाई उदिगिरि जळिच्या कुंभजाई विठाई ।**
**वीजाई सोमजाई खडतर करणी तांब्रजाई मळाई ।**
**वागजाई खांडजाई बहुविध जननी नादजाई निनाई ॥ २४/२ १ ॥**

या सर्व देवता बारा मुल्खांतील होत. कौतुकाची गोष्ट अशी कीं, या सर्व देवता श्रीसमर्थांनीं स्मरण करतां च प्रकट होऊन श्रीसमर्थांच्या स्तवनास प्रवर्तल्याचें वर्णन श्रीसमर्थप्रतापाच्या पांचव्या समासांत गिरिधरांनीं केलेलें आहे.

( ४ ) ९८ व्या अष्टकांत जो **समुद्रेश्वरु पाहिला रामदासें ।** तो रामेश्वर असावा, असें पूर्वीं वाटलें होतें, पण अष्टकांतील एकंदर वर्णनावरून गोकर्ण-महाबळेश्वराचें तें वर्णन असावें, असें आतां वाटतें. ठरवावें.

( ५ ) **दरे दर्कुटें झाडखंडें अनेकीं ।**
**कपाटें कडे वीवरें आणि टांकीं ।**
**वनीं पावनीं पांडवीं वास केला ।**
**गिरी देखिला दास संतुष्ट जाला ॥ १३५/६८ ॥**

म्हणजे पांडवगड वाटतो. तो माझ्या पाहण्यांत आलेला नाहीं.

( ६ ) १४५ व्या अष्टकांतील श्रीरामपंचायतनाचें ठिकाण कोणतें ?

## ( २१ ) श्रवण, तर्क आणि सदृढ काया

श्रीसमर्थांनीं जें कार्य शिरावर घेतलें होतें व ज्या कार्याच्या सिद्धीसाठीं त्यांनीं हजारों शिष्य तयार केले होते, त्या कार्यांत यश येण्याला श्रवण, तर्क आणि सदृढ काया यांचें त्यांना विशेष अगत्य वाटे, असें, निरनिराळ्या अष्टकांतील पुढील तीन श्लोक एकत्र करून वाचून मला वाटतें.

श्रवण हें परमार्थाचें मुख्य च साधन होय. त्याला तर्काची म्हणजे कुशाग्र बुद्धीची जोड पाहिजे. आणि दुर्बळाच्या ठिकाणीं हीं दोन्ही असून हि त्यांचा कांहीं उपयोग व्हावयाचा नाहीं, म्हणून सदृढ काया पाहिजे. या तीन साधनांच्या बळावर त्यांनीं प्रपंच-परमार्थांत प्रचंड संघटना घडवून आणली होती.

**मतीमंद रे द्वंद्व त्याचें सरेना ।**
**अती मूढ त्या गूढ माया हरेना ।**
**बहू तर्क या ज्ञानमार्गासि व्हावा ।**
**अती साक्षपू श्रवणाचा करावा ॥ ११७-१ ॥**

**विगळित मन माझें तूं करीं देवराया ।**
**हरिभजन कराया पाहिजे दृढ काया ।**
**निरुपण विवराया तर्कपंथें चि जाया ।**
**रघुपतिगुणछाया चित्त माझें निवाया ॥ १५०-५ ॥**

**स्वजन जन तजावें देश लंघूनि जावें ।**
**कठिण मन करावें झाडखंडीं भरावें ।**
**अनुदिन विवरावें दूरि देशीं भरावें ।**
**निरुपण विवरावें तर्कपंथें चि जावें ॥ १५४/२६ ॥**

निरनिराळ्या ठिकाणच्या या तीन श्लोकांत श्रीसमर्थ, त्यांचा व्याप, त्यांची तळमळ, त्यांचा त्याग, त्यांचा संचार या सर्वांचा वाचकांस प्रत्यय आला पाहिजे.

## ( २२ ) लेखनक्रिया

दुसऱ्या कोणत्या हि सत्पुरुषाच्या ग्रन्थांत लिहावें कसें हें सांगितलेलें आढळावयाचें नाहीं. ती आवश्यकता श्रीसमर्थांना च होती. याचें कारण असें कीं, त्यांच्याइतका व्याप दुसऱ्या कोणीं केला च नाहीं. यांचे शेंकडों मठ आणि हजारों शिष्य आणि त्या हजारों शिष्यांचे अनेक शिष्य आणि प्रशिष्य. ते मठ म्हणजे इतकीं विद्यापीठें होतीं. त्यांत लेखनक्रिया अखंड चाले. त्या काळीं छापखाने नव्हते. ग्रन्थांचा प्रसार लिहून घेऊन च व्हावयाचा. त्यामुळें लिहावें कसें, लेखनाचें साहित्य काय असावें, रेखाटावें कसें येथपासून तों पुस्तकांना जपावें कसें येथपर्यंत श्रीसमर्थांना शिकवण द्यावी लागली. त्या शिकवणीचा स्वतंत्र समास दासबोधांत आहे. करुणाष्टकांत एक श्लोक आढळतो,

**सदट सघन वोळी अक्षरें दाटखेटा।**
**सरळ सगट वाची धाकुटा आणि मोठा।**
**अचुक चुकत नाहीं पुस्तकीं शोध नाहीं।**
**बहुत विवरतां ही वेंग कांहीं च नाहीं ॥ १५४/४० ॥**

आणि मठामठांतील अशीं सुंदर लिहिलेलीं हजारों बाडें आज श्रीसमर्थ-वाग्देवतामंदिरांत येऊन सुखांत बसलीं आहेत.

## ( २३ ) भले आणि नष्ट

अष्टकाचा मुख्य विषय दुसरा असतां, भले आणि नष्ट ओळखण्याच्या खुणा एका अष्टकांत सहज ओघानें येऊन गेल्या आहेत.

**गुरूनें तुला काय निरोपिलें रे।**
**जप ध्यान कीं देखणें सांग पां रे।**
**पहा पूसिलें श्रोतयानें गुमानें।**
**महा थोर गर्वें चि ज्ञानाभिमानें ॥ ७७–१ ॥**

गुरुमार्गावर ज्यांचा विश्वास नसतो व जे स्वत: आपण पूर्ण ज्ञानी आहोंत अशा घमेंडींत असतात, ते गुरुभक्तांची अशी च चेष्टा करीत असतात. त्या घमेंडखोरांची कड घेऊन श्रोता विचारतो, त्यांना तुम्ही घमेंडखोर कां

समजतां, भलेपणानें ते विचारीत नाहींत, हें कशावरून ? भले आणि नष्ट ओळखण्याची तुमच्याजवळ काय खूण आहे? हे प्रश्न आणि त्यांचीं उत्तरें मनन करण्यासारखीं आहेत.

**भले पूसती रे कृपाळुस्वभावें।**
**तया ज्ञानगर्वें चि कैसें म्हणावें।**
**भले नष्ट दोघे कसे वोळखावे।**
**क्रियाभ्रष्ट ते नष्ट जाणोन घ्यावें॥ २॥**

प्रश्न एक च असला तरी विचारण्याविचारण्यांत फरक असतो. कोण जिज्ञासाबुद्धीनें विचारीत आहे व कोण आपल्या शहाणपणाच्या घमेंडीनें विचारीत आहे, हें प्रश्न विचारण्याच्या झोंकावरून च समजतें. एकाची लीनता आणि दुसऱ्याचा उन्मत्तपणा त्यांच्या चेहऱ्यावर च उमटलेला असतो.

**भला तो चि जो मुख्य आचार राखे।**
**गुरु देव लोकीक वेदांसि धाके।**
**करूं ये बरें कर्म जें तें करीतो।**
**महावाक्य तत्त्वादिकें वीवरीतो॥ ३॥**

**सदा सर्वदा बोलणें प्रत्ययाचें।**
**अनुद्वेग तें गौल्य नाना सुखाचें।**
**नव्हे बंड पाषांड मत्तें वेवादें।**
**भले बोलती बोलणें ज्ञानबोधें॥ ४॥**

याच्या उलट गुण नष्टाच्या ठिकाणीं असतात.

**नव्हे बोध जों मत्त उन्मत्त व्हावें।**
**नव्हे बोध जों साधकां भ्रष्टवावें।**
**नव्हे बोध जों निंद्य चोरूनि खावें।**
**नव्हे बोध जों ज्ञानगर्वें बुडावें॥ ५॥**

तात्पर्य—**भला तो चि तो सर्व सत्याभिमानी।**
**नव्हे बाष्कळु भ्रष्ट ज्ञानी गुमानी॥ ८॥**

## ( २४ ) भजन आणि सज्जन

यांच्या प्रसंगानुसार श्रीसमर्थांनीं केलेल्या व्याख्या ऐकण्यासारख्या आणि बोध घेण्यासारख्या आहेत. २१५ व्या मवाईंत त्या व्याख्या आलेल्या आहेत.

**भेटो कोणी येक नर धेड माहार चांभार ।**
**त्याचें राखावें अंतर याचें नांव भजन ॥**
**दुःख नेदावें कोणाला उंच नीच जरी जाला ।**
**अंतरात्मा वोळखिला तो चि जाण सज्जन ॥**

## ( २५ ) रामभक्त आणि कृष्णभक्त

रामभक्त आणि कृष्णभक्त यांच्यांत विरोध कल्पून ७३ व्या अष्टकांत त्यांचा संवाद दिला आहे. पदपदांतरांत हि एका पदांत असा प्रसंग कल्पिला आहे, तो पुढें पाहण्यांत येईल च. त्या पदांत आणि या अष्टकांत शेवट उभयतांच्या ऐक्यांत केला आहे.

**क्षमा सर्वदा ऐक्यरूपें करावी ।**
**पथी आदरें सार्थकाची धरावी ।**
**म्हणे दास द्वैतास हो नातळावें ।**
**जळाचे परी सर्व भूतीं मिळावें ॥ ७३/३८ ॥**

## ( २६ ) प्रस्ताविक

प्रस्ताविक हा श्रीसमर्थांचा शब्द आहे. प्रस्ताविक म्हणजे प्रस्तावा, पस्तावा, पश्चात्ताप यानें युक्त. पस्तावा हा तर करुणाष्टकांचा प्राण होय. त्रिविध तापानें पोळून पश्चात्ताप झाल्यावांचून देवाची करुणा भाकण्याकडे चित्त वळणार च नाहीं. अशीं निवळ प्रस्ताविक अष्टकें फार आहेत. या च दृष्टीनें पूर्वी कोणी तरी निवड करून आठ दहा च अष्टकें विशेष प्रचारांत आणलीं होतीं. पण आतां आपण पाहिलें आहे कीं, करुणाष्टकांची संख्या पुष्कळच आहे आणि त्यांत हि पश्चात्तापयुक्त अशीं थोडींथोडकीं नाहींत. तीं आपण येथें किती देणार ? वाचकांनीं मूळ

ग्रन्थावरून च तीं वाचलीं पाहिजेत. येथें फक्त माझ्या विशेष आवडीचें एक अष्टक व एक स्वतंत्र श्लोक देऊन आपण पुढें जाऊं.

## तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलों

असंख्यात रे भक्त होऊनि गेले ।
तिहीं साधनाचे बहू कष्ट केले ।
नव्हे कार्यकर्ता भुमीभार जालों ।
तुझा दास मी वेर्थ जन्मास आलों ॥ ८७-१ ॥

बहू दास ते तापसी तीर्थवासी ।
गिरीकंदरीं भेटि नाहीं जनासी ।
स्थिती ऐकतां थोर विस्मीत जालों ।
तुझा दास मी वेर्थ जन्मास आलों ॥ २ ॥

सदा प्रेमरासी तया भेटलासी ।
तुझ्या दर्शनें स्पर्शनें सौख्यरासी ।
अहंता मनीं शब्दज्ञानें बुडालों ।
तुझा दास मी वेर्थ जन्मासि आलों ॥ ३ ॥

तुझे प्रीतिचे दास निर्माण जाले ।
असंभाव्य ते कीर्ति बोलोनि गेले ।
बहू धारणा थोर चकीत जालों ।
तुझा दास मी वेर्थ जन्मासि आलों ॥ ४ ॥

बहूसाल देवाळयें हाटकाचीं ।
रसाळा कळा लाघवें नाटकाचीं ।
पुजा देखतां जाड जीवीं गळालों ।
तुझा दास मी वेर्थ जन्मासि आलों ॥ ५ ॥

कितेकीं देहे त्यागिले तूजलागीं ।
पुढें जाहले संगतीचे विभागी ।
देहेदुःख होतां च वेगीं पळालों ।
तुझा दास मी वेर्थ जन्मासि आलों ॥ ६ ॥

सदा सर्वदा राम सांडूनि कामी।
समर्था तुझे दास आम्ही निकामी।
बहू स्वार्थबुद्धीन रे कष्टवीलों।
तुझा दास मा वेर्थ जन्मासि आलों॥ ७॥

किती योगमूर्ती किती पुण्यमूर्ती।
किती धर्मसंस्थापना अन्नशांती।
परस्तावलों कावलों तप्त जालों।
तुझा दास मी वेर्थ जन्मासि आलों॥ ८॥

## स्वतंत्र श्लोक १३४-७७

परम कोमळ राम कठीण कां।
दिनदयाळ दया नुपजे चि कां।
मज बहूत उदासिन वाटलें।
न धरितां नयनीं निर लोटलें॥

'न धरितां' ऐवजीं 'नुधरितां' असें पाठांतर आहे. नुधरितां म्हणजे न उद्धरितां.

## (२७) श्रीसमर्थांचा विश्वास, कांहीं मतें

(१) जनीं धुंडितां देव नाना परीचे।
बहू धातु पाषाण कां मृत्तिकेचे।
जया खेव तो देव कैसा म्हणावा।
खरा देव तो आदरें वोळखावा॥ ७-२॥

खेव म्हणजे अपाय, नाश.

(२) तो खरा देव

जगीं धुंडितां धुंडितां आडळेना।
कदा सद्गुरूविण ठाईं पडेना॥ ७-४॥

(३) बहू देव त्याला बहू बाप जाणा।
म्हणोनी मना वोळखे देवराणा॥ २५-४॥

(४) दिसे सर्व आत्मा म्हणे तो दुरात्मा।
निराकार आत्मा बुझे तो महात्मा॥ २५-५॥

(५) जनीं संचितें पिंड निर्माण जाला।
मनीं तें चि भोगावया जीव आला।
शुभाशूभ होणार कांहीं कळेना।
पुढें प्राप्त ब्रह्मादिकां ही टळेना॥ २४-१॥

(६) श्रीसमर्थ सुकृत मानतात– अष्टक ६१ वें.

(७) मुखानें अद्वैतचर्चा करावी आणि पोटीं ज्ञानगर्वाचा फुगारा असावा, असलें दृश्य पाहून च श्रीसमर्थ म्हणतात

अद्वैतचर्चा कंटाळवाणी।
रहणी पहातां सकळैक घाणी।
तेणें गुणें मानस लाजताहे।
होऊनियां सावध तूं चि पाहें॥ ६२-३॥

तेव्हां, खरें म्हणजे

सगूणभक्ती विषई विरक्ती।
स्वधर्म रक्षी येथानशक्ती।
सर्वांपरी दुल्लभ तो चि ज्ञाता।
वाचाळता माइक तत्त्वचिंता॥ ६२-६॥

असें असावें.

(८) स्त्रियांची निंदा करणारा खरा खर

बहुतां दिसांच्या वयोवृध मूला।
जनीं बायकोच्या गुणें जन्म तूला।
तये जन्ननीच्या कुळा निंदितोसी।

जन्ननीच्या कुळा म्हणजे स्त्रीजातीला

वृथापुष्ट तूं मानवांमाजि होसी॥ ६३-१॥

किती दीस तें वाइलें पोटवोझें।
पुढें जन्मतां खंडिलें नाळ तूझें।
जिवीं दीस मागील ते आठवावे।
जनीं कष्ट कुश्चीळ कैसे करावे॥ २॥

मळीं लोळतां घोळतां कष्टलासी।
किती हागसी मूतसी वोकिलासी।
खतें खांडकें दुःख उदंड जालें।
बहुतां प्रकारें तुला वाढवीलें ॥ ३ ॥

बहू जन्ननीनें तुझे कष्ट केले।
बरें वोखटें सर्व साहोनि नेलें।
मनामाजि मागील कां आठवेना।
देहे पुष्ट हा वेर्थ तुझा झिजेना ॥ ४ ॥

मुढा वोंगळा वोंगळीं जन्मलासी।
तुझी जन्ननी ते तुझे कष्ट सोसी।
जनीं पाळिती सर्व नारी नराला।
तया निंदिती शुद्धि नाहीं खराला ॥ ५ ॥

( ९ ) बोलण्यांत पटाईत, पण क्रियाशून्य, असें नसावें.

क्रियेवीण पाषांड तें नोबलावें।
क्रियेवीण थोतांड तें ही तजावें।
सदा सर्वदा भक्तिपंथें चि जावें।
सुपुत्रें बळें पूर्वजां उद्धरावें ॥ ११८-१ ॥

( १० ) कोठें तरी एका ठिकाणीं भाव असावा.

अनेक शास्त्रीं पाहातां पडेना।
आयुष्य थोडें पाहाणें घडेना।
विश्वास येके वचनीं धरावा।
संसार हा दुस्तर नीरसावा ॥ १३४-७ ॥

( ११ ) पात्रापात्र पाहिलें पाहिजे.

बरें दुग्ध तें मद्यपात्रीं कुपात्रीं।
पुढें देखतां तजावें चि श्रोत्रीं।
जरी ज्ञान जालें जनीं नीच याती।
तरी ते नव्हे वंद्य कांहीं महंती ॥ १३४-८७ ॥

( १२ ) सदा मागता दास देवा न साहे।
न मागे तयाची रमा दासि होये।
असे आस तो दास जाला जगाचा।
नसे आस तो ईशु ब्रह्मादिकांचा ॥ १३४–१३० ॥

( १३ ) सदा वायोरूपें सुरवर मुनी देश फिरती।
बहू देवी देव्या कळत चि जनामाजि थिरती।
भुतें केतें मुंजे प्रगट चि किती येक वचना।
कितेकां लोकांला प्रचित चि घडे स्वप्नसुचना ॥ १७६–३ ॥

( १४ ) अष्टक २४६ चे चार श्लोक आहेत. त्यांत एकंदर सत्तेचाळीस उदाहरणें देऊन **जैशासि तैसा बरा** हा सिद्धान्त प्रस्थापित केला आहे. उदाहरणार्थ एक श्लोक :

मैंदा मैंद बरा ठका ठक बरा भोंदूसि भोंदू बरा।
चोरा चोर बरा खटा खट बरा सिंन्र्यासि सिंन्रू बरा।
लौंदा लौंद बरा धटा धट बरा हुंब्यासि हुंबा बरा।
मूर्खा मूर्ख बरा खळा खळ बरा पाप्यासि पापी बरा ॥ २ ॥

( १५ ) लौकिक बरा संपादिला, पण निश्चयपूर्वक जप, ध्यान, मानसपूजा या साधनांनीं देव आपुलासा केला नाहीं, तर जन्म व्यर्थ गेला असें समजावें.

जनाचार संपादितां जन्म गेला।
यथासांग रे सर्व लोकीक केला।
परंतु जप ध्यान पूजा मनामाजि नाहीं।
वृथा निश्चयेंवीण तें सर्व कांहीं ॥ १३४–५० ॥

( १६ ) पुढील साधनें क्षत्रियांचेसाठीं असावींत, असें वाटतें.

ठसा हेमधातूवरी वातसूतु।
तथा ताइताची बरी रौप्यधातु।
तयाची पुजा मंदवारीं करावी।
बरी आवडी आर्त पोटीं धरावी ॥ १३४–५६ ॥

हें च साधन आणखी एका श्लोकांत सांगितलें आहे.

**लघूसी परी मूर्ति हे हाटकाची ।**
**करावी तथा मारुती नाटकाची ।**
**असावी सदा ताइतामाजि दंडीं ।**
**समरंगणीं पाठि दीजे उदंडीं ॥ १३४-११५ ॥**

(१७) संसार करावा कां न करावा, याविषयीं त्यांचें अनेक ठिकाणीं प्रतिपादन आलें आहे. तीं सर्व स्थळें पाहून, मला असें म्हणतां येतें कीं, संसार करण्याविषयीं त्यांनीं नाइलाजानें च संमति दिलेली आहे. त्यांच्या पोटांतला भाव निराळा आहे. संसार टाकवत नाहीं, तर नका टाकूं, पण मग तो धड तरी करा, रडका करूं नका, असा

**वृथा सीण संसार कर्ता रडाया ॥**

या २१ व्या अष्टकाचा भावार्थ दिसतो आणि

**सेखीं जिवें सांडुनि सर्व जावें ॥**

हें ६० व्या अष्टकांतील पालुपद ओळखून तो अनासक्त राहून करावा, असें सुचविण्याचा त्यांचा हेतु दिसतो.

( १८ ) प्रयत्न आणि विचार या साधनांवर श्रीसमर्थांचा विलक्षण भर असे, हें आपण अष्टाक्षरी स्फुट प्रकरणांत पाहिलें च आहे. येथें तें च आहे व त्यांच्या सर्व वाङ्मयांत कोठें हि तें च आढळणार.

**(रा) महा येत्न देखोनियां काळ धाके ।**
**प्रतापें बळें गाजवावे तडाखे ॥ १३४-१४६ ॥**
**(म) नव्हे योगें यागें जपतपव्रतें प्राप्त कवणा ।**
**विचारानें होतें सहज चि, नसे त्यास तुळणा ॥१८३-३॥**

स्वतःच्या आचरणानें हीं मतें लोकांच्या प्रत्ययास आणून देणारा महापुरुष किती बलशाली आणि विचारवंत असला पाहिजे ! आपल्या ऐहिक आणि पारलौकिक कल्याणासाठीं त्याच्या चरणांचा आश्रय करावा, असें कोणास वाटणार नाहीं ?

## ( २८ ) अवांतर

( १ ) सभेनें प्रकाशित केलेल्या करुणाष्टकांच्या पुस्तकांतील सारी च कविता करुणापर आहे, असें नव्हे. अष्टक म्हणजे हटकून आठ च असें हि नव्हे. उदाहरणार्थ १३४ व्या अष्टकांत १४६ श्लोक असून ते सारे श्लोक स्वतंत्र आहेत, म्हणजे एकाचा दुसऱ्याशीं कांहीं संबंध नाहीं.

पण ते सारे श्लोक सहेतुक एका च वेळीं रचले गेले असले पाहिजेत, असें मानावें लागतें, कारण ते अ पासून ज्ञ पर्यंत वर्णानुक्रमानें रचलेले आहेत.

( २ ) कित्येक अष्टकांत शब्दांवर कोट्या केलेल्या आहेत, शब्द खेळविले आहेत. उदाहरणार्थ, ४४ ते ५२ हीं अष्टकें पाहावीं. तसें च अष्टक १५७ वें, अष्टक १५४ पैकीं ४१ वा श्लोक वगैरे पाहावीं. कांहीं अष्टकें समजण्याला हि कठीण जातात. हें उघड आहे कीं, या अष्टकांची रचना त्यांच्या लहान वयापासून तों शेवटपर्यंत होत गेलेली असावी. त्यामुळें भाषा हि प्रगल्भ होत होत गेली असावी. स्वतःचा कवि म्हणून जेव्हां ते उल्लेख करितात, तेव्हां ती रचना त्यांच्या अल्पवयांतील असावी, अशी जी माझी कल्पना मीं मागें प्रकट केली आहे, तिला या अष्टकांत हि आधार सांपडतो. अष्टक २ मध्यें त्यांनीं स्वतःला ‘ लघुसा कवि ’ म्हटलें आहे. अष्टकें १६४ ते १८३ यांत महिम्नधाटीचे श्लोक आहेत. ती सारी रचना त्यांच्या अल्पवयांतील दिसते. अष्टक १६९ त त्यांनीं आपल्या अल्पवयाचा उल्लेख च केला आहे. त्याच्या पुढच्या च म्हणजे १७० व्या अष्टकाच्या पहिल्या श्लोकांत हि तो च भाव आहे.

( ३ ) एकंदर वृत्तांत भुजंगप्रयात वृत्त श्रीसमर्थांचें आवडतें दिसतें. मनाचे श्लोक त्या वृत्तांत आहेत, त्यांचें रामायण हि त्या च वृत्तांत आहे व बऱ्याचशा करुणाष्टकांचें वृत्त हि तें च आहे. तथापि करुणाष्टकांत त्यांनीं इतर हि अनेक वृत्तें योजिलीं आहेत. उदाहरणार्थ, इंद्रवज्रा ( देवें भुपाळें सुरलोकपाळें ॥ ३० ), उपेन्द्रवज्रा ( चला चला रे हरि तो निघाला ॥ ४८ ), मालिनी ( रघुपतिपदयुग्मीं लीन भावें असावें ॥१३८ ), शालिनी ( येका पोटाकारणें सर्व कांहीं ॥ ८ ), शिखरिणी ( गणाधीशा ईशा परम रमणीयां कमणियां ॥ १६४ ), शार्दूलविक्रीडित ( दासां मंडण पाश खंडण करी वागेश्वरी सुंदरी ॥ २३१ ), हरिणप्लुता ( रघुनाथ सनाथ करीतसे ॥ १४ ), द्रुतविलंबित ( गणपती मति दे मज लाघवी ॥ २ ), दोधक ( तो शुक कौतुक बोलत आहे ॥ ३४ ) इत्यादि वृत्तांत हि कांहीं कांहीं अष्टकें आढळतात. सवाई हा हि एक त्यांचा आवडता छंद आहे. सवाया म्हणण्याची तऱ्हा मोठी जोरदार असते व त्यांची भाषा हि त्या तऱ्हेला साजेशी च असते. एक उदाहरण :

**वंदिला गजवदन। सुख सुखाचें सदन।**
**जेणें जाळिला मदन। त्याचें अंतर धरा॥**
**राम राम राम। जनसज्जनविश्राम।**
**साधकांचें निजधाम। हित आपुलें करा॥**
**अखंडीत निजध्यास। धरा अंतरीं अभ्यास।**
**बोले भागवत व्यास। हरिभजनें तरा॥**
**धीर उदार सुंदर। कीर्ती जाणतसे हर।**
**सोडविले सुरवर। वरदायक खरा॥ २१४-१॥**

(४) करुणाष्टकांतील कांहीं श्लोक आणि बरींचशीं चरणें यांचें मनाच्या आणि रामायणांतील श्लोकांशीं आणि चरणांशीं साम्य आढळतें. तीं स्थळें वाचकांच्या सहज लक्षांत येण्यासारखीं आहेत. ते श्लोक किंवा तीं चरणें मूळचीं कोठील, हें निश्चित सांगणें कठीण आहे. उदाहरणार्थ १७ व्या अष्टकांतील ४ था श्लोक

**लपावें अती आदरें रामरूपीं।**
**भयातीत निश्चीत ये स्वस्वरूपीं।**
**कदा तो जनीं पाहतां ही दिसेना।**
**सदा ऐक्य तो भिन्न भावें वसेना॥**

हा मनाच्या श्लोकांपैकीं शब्दशः १८५ वा श्लोक होय. तसें च करुणाष्टक ७६ पैकीं ४ था श्लोक व ८८ पैकीं ८ वा श्लोक हे दोन श्लोक म्हणजे फार च थोड्या फरकानें मनाच्या श्लोकांपैकीं अनुक्रमें १३५ वा आणि १४४ वा श्लोक होत. तेव्हां हे श्लोक मूळचे कोठले आणि कोणीं कोणापासून उसने घेतले? संदर्भ वगैरे पाहतां मनांत असें येतें कीं, हे मूळचे करुणाष्टकांतील असावेत; असो.

(५) करुणाष्टकांच्या संगतींत आपला बरा च काळ आनंदांत गेला. आतां आपण मनाचे श्लोक हातीं घेऊं.

---

# ( ३ ) श्रीश्लोक मनाचे

( १ ) प्रस्ताव, ( २ ) जगाच्या कल्याणाकरितां, ( ३ ) श्लोकांचा अखंड प्रवाह, ( ४ ) त्यांची लोकप्रियता, ( ५ ) त्या लोकप्रियतेचीं कारणें, ( ६ ) श्लोकांचा विषय, ( ७ ) त्यांची फलश्रुति, ( ८ ) एकंदर श्लोकांचा तात्पर्यार्थ व ( ९ ) उपसंहार.

( १ ) सामान्य भाषणांत आपण यांना **मनाचे श्लोक** म्हणतों, त्यांची आरती करणारे, एका काळचे शिरगांवमठपति यशवंत यांनीं त्यांना **मनबोध** म्हणून संबोधिलें आहे, स्वतः श्रीसमर्थ त्यांना **मनाचीं शतें** म्हणतात. तीं दोन शतें २०५ श्लोकांचीं आहेत. तीं श्रीसमर्थांच्या आवडीच्या भुजंगप्रयात वृत्तांत आहेत. गांवोगांवीं संचार करीत असतां, हे श्लोक खड्या आवाजानें म्हटल्यास, लोकांचीं मनें वेधून घेण्याला हें वृत्त त्या काळीं फार उपयोगीं पडलें असावें.

( २ ) महाराष्ट्रांत स्वराज्याची स्थापना झाल्यानंतर या श्लोकांची रचना झालेली असल्यामुळें, त्या वेळीं श्रीसमर्थांच्या मनश्चक्षूंपुढें राजकारणाचा विशिष्ट प्रश्न नव्हता. हे श्लोक मराठी भाषेंत आहेत, म्हणून ते महाराष्ट्रापुरते समजावयाचे, पण खरें पाहूं गेल्यास ते जगासाठीं आहेत, असें मानावयास हरकत नाहीं. जन्माचें ध्येय गाठल्यानंतर कृतार्थतेमुळें जें समाधान प्राप्त झालेलें असतें, त्या समाधानाच्या वृत्तींत असतां, साऱ्या जगाला कल्याणाचा मार्ग दाखवावा म्हणून अत्यंत कारुणिक भावनेनें श्रीसमर्थांनीं या श्लोकांची रचना केलेली आहे.

( ३ ) सर्व श्लोकांची परस्परसंगति स्वतःसिद्ध आहे. नदीच्या पाण्याचा प्रवाह एकसारखा वाहात चालला असतां त्या पाण्याची मागचीपुढची संगति लावण्याची कल्पना जशी मनांत उद्भवत नाहीं, तद्वत् या श्लोकांची स्थिति आहे. एकापुढें एक असा या श्लोकांचा अखंड प्रवाह चालला आहे. प्रत्येक श्लोकांतून च त्या त्या श्लोकाच्या पुढचा श्लोक निघाला आहे. मी असें म्हणूं इच्छितों कीं, एका प्रशांत दिवशीं, चित्ताची अतीव प्रसन्नता असतां, एका च बैठकींत, एकापुढें एक असे श्लोक श्रीसमर्थ

सांगत गेले आणि श्रीकल्याण लिहीत गेले, ते हे मनाचे २०५ श्लोक होत ! इतका त्यांचा ओघ स्वाभाविक आहे.

( ४ ) मोरोपंतांनीं दुसरें कोणतें हि काव्य केलें नसतें आणि नुसते केकावलीचे श्लोक रचले असते, तरी कवि या पदवीला ते पात्र झाले असते, अशा अर्थाचा केकावलीविषयीं आपला अभिप्राय मराठी भाषेचे शिवाजी यांनीं कोठें तरी प्रकट केलेला वाचल्याचें स्मरतें, तद्वत् आपणांस म्हणतां येईल कीं, श्रीसमर्थांनीं दुसरी कोणती च ग्रन्थरचना केली नसती आणि हे नुसते मनाचे २०५ श्लोक आपल्यामागें ठेवले असते, तरी तेवढ्यावरून अद्वितीय राष्ट्रगुरु, असामान्य कवि, अलौकिक भगवद्भक्त आणि अपूर्व तत्त्वज्ञानी म्हणून त्यांचा लौकिक झाला असता. महाराष्ट्रांत मनाच्या श्लोकांइतकी लोकप्रियता दुसऱ्या कोणाच्या कोणत्या हि काव्याला प्राप्त झालेली नाहीं, हें च माझ्या वरील विधानाला प्रमाण होय. महाराष्ट्रांत असें सुसंस्कृत घर, खरोखर च, एक हि आढळणार नाहीं, कीं ज्या घरांत मनाच्या श्लोकांचा प्रवेश झाला नाहीं.

( ५ ) श्रीसमर्थांच्या पूर्वी मनाला उद्देशून कोणीं श्लोक रचले असतील व नंतर रचलेले आहेत, पण त्यांच्याकडे महाराष्ट्रांत किती जणांचें लक्ष जातें ? श्रीसमर्थांच्या श्लोकांच्या ठिकाणीं इतकी आकर्षकता येण्याचीं दहा पांच कारणें माझ्या मनांत येतात. या श्लोकांत कृत्रिमतेचा गंध नाहीं. त्यांचा प्रवाह स्वाभाविकपणें, शांतपणें, श्रोत्यांचीं मनें वेधून घेत सारखा चाललेला आहे. त्यांत जीवांच्या कल्याणाची अतोनात कळकळ भरली आहे.

**मना सज्जना हीत माझें करावें ॥ २२ ॥**
**मना प्रार्थना तूजला थेक आहे ॥ ३८ ॥**

असले काकुळतीचे उद्गार कळकळीवांचून निघणार नाहींत. मी उदाहरणें देण्याच्या भरीस पडण्याचें कारण नाहीं. माझ्या म्हणण्याचा पाठपुरावा प्रत्येक वाचक करील कीं, हे श्लोक एकांतांत शांत चित्तानें वाचल्यास ते थेट वाचकाच्या हृदयांत शिरून त्याला विचार करण्यास लावतात इतके ते हृदयस्पर्शी आहेत. ते स्फूर्तिदायक, प्रोत्साहक, धीर देणारे आहेत. शिष्याला आपल्या विश्वासांत घेऊन व आपला भरंवसा त्यास देऊन

श्रीसमर्थ आत्मप्रत्ययानें बोलत असल्यामुळें वाचकांच्या वृत्ति आपोआप तल्लीन होतात.

( ६ ) प्रत्येक विचारी माणसानें ज्याचा विचार केला पाहिजे असा च महत्त्वाचा विषय या श्लोकांत प्रतिपादिला आहे. ग्रन्थाचा उपक्रम आणि उपसंहार म्हणजे आरंभ आणि शेवट हीं पाहून त्याचा मुख्य विषय ठरवावा लागतो, या न्यायानें पाहिल्यास पहिल्या च श्लोकांत

**गमूं पंथ आनंत या राघवाचा ॥**

राघवाचा अनादि अनंत पंथ मला कळो, राघवाच्या स्वरूपाचा मला साक्षात्कार होवो, असा हेतु दर्शविला असून, २०० व्या श्लोकांत

**तो गे तो चि तो राम सर्वत्र पाहे ॥**

असें दुसऱ्यास बजावून २०१ व्या श्लोकांत

**कदा वोळखीमाजि दूजें दिसेना ।**
**मनीं मानसीं द्वैत कांहीं वसेना ।**
**बहूतां दिसां आपुली भेटि जाली ।**
**विदेहीपणें सर्व काया निवाली ॥**

असा आत्मप्रत्यय येऊन तो हेतु सफल झाल्याची ग्वाही दिली आहे. तात्पर्य, ज्ञानप्राप्ति करून देण्यासाठीं हे श्लोक प्रवृत्त झाले आहेत. त्यामुळें त्यांचे स्वाभाविक त्रिकांडात्मक विभाग पडतात. प्रत्येक विभागांत इतर दोन विभागांचा हि मधून मधून किंचित् स्पर्श झालेला दिसत असला, तरी स्थूल मानानें असें म्हणतां येईल कीं, १ ते ६६ श्लोक कर्मपर, ६७ ते १३१ उपासनापर व १३२ ते २०१ ज्ञानपर आहेत आणि २०२, २०३, २०४ या तीन श्लोकांत, झालेलें ज्ञान दृढ होण्याचा मार्ग दाखवून शेवटच्या म्हणजे २०५ व्या श्लोकांत फलश्रुति सांगितली आहे, म्हणजे राघवाच्या स्वरूपाचा साक्षात्कार झाल्याचें फळ काय, तें दर्शविलें आहे.

( ७ ) तें फळ फार मोठें आहे. तें फळ म्हणजे

**ज्ञान, वैराग्य आणि सामर्थ्य**

या तीन गुणांची प्राप्ती आणि तद्द्वारा मुक्तिसुखाचा उपभोग.

**मनाचीं शतें ऐकतां दोष जाती।**
**मतीमंद ते साधना योग्य होती।**
**चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य आंगीं।**
**म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी॥ २०५॥**

आपणांवर विश्वास टाकून आपण दर्शविलेल्या साधनमार्गानें गेल्यास साधकाच्या पदरीं वरील फळ पडल्याशिवाय राहणार नाहीं, असें श्रीसमर्थ सांगत आहेत.

या फलश्रुतींत श्रीसमर्थहृदयाचा पूर्ण आविष्कार झालेला मला दिसत आहे. स्वतःच्या प्रत्ययास आलेली च फलश्रुति त्यांनीं सांगितली आहे. मनाच्या श्लोकांत प्रतिपादिलेलीं सर्व साधनें त्यांनीं स्वतः केलीं, ते स्वतः ज्ञानवैराग्यसामर्थ्यसंपन्न झाले, त्या गुणांच्या बळावर स्वतंत्र झाले आणि त्या स्वातंत्र्यसुखांत अखंड मग्न होऊन राहिले! जें त्यांनीं स्वतः केलें, साधलें, उपभोगिलें, तें च त्यांनीं या फलश्रुतींत सांगितलें आहे. जे अभागी असतील ते च तेवढे हें मानणार नाहींत.

प्रत्यंतराला त्यांनीं इतरांचीं हि उदाहरणें दिलीं आहेत. त्यांत प्रमुख उदाहरण म्हणजे शंकराचें होय. त्यांच्याइतका रामाचा ध्यास दुसऱ्या कोणीं घेतला नव्हता.

**विषा औषध घेतलें पार्वतीशें।**
**जिवा मानवा किंकरा कोण पूसे॥ ८२॥**

**विठोनें शिरीं वाहिला देवराणा।**
**तया अंतरीं ध्यास रे त्यासि नेणा।**
**निवाला स्वयें तापसी चंद्रमौळी।**
**जिवां सोडवी राम हा अंतकाळीं॥ ८४॥**

**तिन्ही लोक जाळूं शके कोप येतां।**
**निवाला हरु तो मुखें नाम घेतां।**
**जपे आदरें पार्वती विश्वमाता।**
**म्हणोनी म्हणा तें चि हें नाम आतां॥ ९४॥**

**जगीं धन्य वाराणसी पुण्यरासी ।**
**तयेमाजि जातां गती पूर्वजांसी ।**
**मुखें रामनामावळी नित्यकाळीं ।**
**जिवा हीत सांगे सदा चंद्रमौळी ।। ९९ ।।**

इतकें च काय, पण फलश्रुतींत सांगितलेले ज्ञान – वैराग्य – सामर्थ्य हे तीन गुण मूळचे शंकराचे च होत, हें ८३ व्या श्लोकावरून स्पष्ट कळतें.

**जेणें जाळिला काम तो राम ध्यातो ।**
**उमेसीं अती आदरें गूण गातो ।**
**बहू ज्ञान वैराग्य सामर्थ्य जेथें ।**
**परी अंतरीं नामविश्वास तेथें ।। ८३ ।।**

शंकराच्या या तीन गुणांचा उल्लेख ‘अंतर्भाव’ आणि ‘पंचसमासी’ या दोन लघु काव्यांत हि करण्यांत आलेला आहे, तो आपल्या निदर्शनास पुढें येईल च.

तात्पर्य, विश्वासानें आचरणांत आणल्यास शंकराचें किंवा श्रीसमर्थांचें पद प्राप्त करून देण्याची ज्या श्लोकांतील शिकवणीची पात्रता, त्या श्लोकांनीं महाराष्ट्रीयांच्या मनावर कायमची छाप बसवावी, हें स्वाभाविक होय.

( ८ ) आतां आपण या श्लोकांत श्रीसमर्थांचीं उमटलेलीं पाउलें पाहात पाहात सर्व श्लोकांवरून नजर फिरवीत फलश्रुति गांठूं.

पुरुषप्रकृतीला नमन करून परब्रह्मस्वरूपाचा बोध व्हावा अशी प्रार्थना करून श्रीसमर्थ म्हणतात :

१

( १ ते १८ ) भक्तिपंथ धरावा, निंद्य असेल तें सोडावें, वंद्य असेल तें मनोभावें करावें, प्रभाते मनीं राम चिंतीत जावा, नंतर मंत्र जपावा, दुष्ट वासना नसावी, पापबुद्धि नसावी, धर्मनीति सोडूं नये, मन सदा विचारारूढ असावें, पापसंकल्प सोडावा, सत्यसंकल्प धरावा, विषयांचें चिंतन नसावें, षड्रिपु जिंकावे, धैर्य धरावें, दुसऱ्याचें नीच बोलणें सोसावें, पण आपण स्वतः नम्र बोलावें, सर्वांचा संतोष राखावा, मरणोत्तर हि भला होता असें लोक म्हणतील अशी क्रिया करावी, लोकसेवेंत चंदनाप्रमाणें देह झिजवावा,

कोणीकडून तरी सज्जनांचा संतोष होईल असें वागावें, परद्रव्याचा अभिलाष नसावा, पापाला कारणीभूत होणारी स्वार्थबुद्धि नसावी, पाप वाट्याला येईल तें कर्म खोटें, तें मनांत हि आणूं नये, रामाच्या ठिकाणीं अखंड प्रेम असावें, दुःख करूं नये, उलट देहदुःख तें सुख च मानावें, विवेक करून रामस्वरूपीं सदा निमग्न असावें, नेहमीं सुखी असा जगांत कोणी नसतो, पूर्वसंचित असेल तसें प्रत्येकास भोगावें लागतें, म्हणून कधीं दुःख वा शोक करूं नये, चिंता नसावी, विवेकानें देहममत्व सोडून विदेही व्हावें, तो च मोक्ष, दुष्ट वासना धरल्यामुळें रावण प्राण आणि राज्य यांना मुकला च कीं नाहीं ? म्हणून कुडी वासना नसावी, मरण कोणाला टळलें आहे ? कर्मानुसार जन्माला यावें आणि मरावें, लहान असोत थोर असोत, मरण सर्वांना आहे, आजवर किती जन्मले आणि मेले याची कोणीं गणती केली आहे ? हा मुळीं मृत्युलोक आहे, पण असें असतां जिवंतपणीं मनुष्य काय घमेंडींत असतो, जसा कांहीं हा अमर च आहे ! पण पहावें तों एकादे दिवशीं पट्कन मरून जातो, घमेंड येथल्या येथेंच राहते, एक मेला म्हणून दुसरा शोक करतो, तों त्याची जाण्याची पाळी येते, मग कोणीं कोणासाठीं शोक करावा ? लोभ पुन्हा जन्माला कारण होतो, होणार तें होतें आणि हा उगीच चिंता करीत असतो ! कर्मानुसार भोग भोगावे लागतात, तेव्हां कोणी मेला म्हणून दुःख करणें हें अज्ञानाचें लक्षण होय, हें सारें जाणून, मनुष्याचा लोभ सोडून, वेदशास्त्रपुराणांनीं ज्याची कीर्ति गायिली आहे त्या रामाला शरण जाणें, हें च युक्त ठरत नाहीं काय ?

( १९–२४ ) सत्याची कांस धरावी, मिथ्याचार मांडूं नये, सत्य तें सत्य, तें च बोलावें, मिथ्य तें मिथ्य, तें सोडावें, जन्माचा विचार करून पाहा, आईच्या उदरांत किती आणि कशा यातना असतील, त्या मनांत आणा, वासनांच्या योगानें आणि द्रव्यदारादिकांच्या लोभानें हें जन्ममरणाचें चक्र पाठीमागें लागतें, तेव्हां त्या वासना आणि कामना सोडाव्या आणि गर्भवास चुकवावा, श्रीरामचरणीं चित्त ठेवावें, वायुसुताचा स्वामी आणि त्रैलोक्याचा नाथ जो राम, त्याला हृदयांत सांठवावें, रामावांचून कांहीं बोलणें नको, वायफळ बोलण्यांत काय सुख आहे ? क्षणाक्षणाला मरण जवळ येत

चाललें आहे, त्या अंतकाळीं रामावांचून दुसरा कोण सोडविणार आहे ? मग रामाला सोडून वृथा कां कष्टी व्हावें आणि सामान्य लोकांप्रमाणें बरळत सुटावें ? मुखांत नेहमीं रामनाम असावें म्हणजे हृदयांत प्रवेश करण्याला अहंतेला अवसर मिळणार नाहीं,

( २५–२७ ) मी हें जें सांगत आहें त्याचा वीट मानून त्याकडे दुर्लक्ष कराल, तर रामाची कृपा होणार नाहीं, सुखाची चालू घडी निघून जाईल आणि मग रडत बसाल, देहरक्षणाचा किती हि यत्न केला तरी अखेरीस त्यावर काळाची झडप पडणार च, म्हणून म्हणतों रामाची भक्ति करा म्हणजे तुम्हांस संसाराची चिंता करणें नको, या संसाराला कां भितां ? धीर धरा, धाक सोडा, तुमच्या शिरावर रामासारखा स्वामी आहे, तो तुमचें रक्षण करील, कृतांत काळ कोपला तरी राम तुमची उपेक्षा करणार नाहीं,

( २८–३७ ) आपल्या दासाचा रामाला मोठा अभिमान वाटत असतो, ते दासाची कधीं उपेक्षा करणार नाहींत, या रामाचा महिमा किती सांगावा, ऐका

**दिनानाथ हा राम कोदंडधारी ।**
**पुढें देखतां काळ पोटीं थरारी ।**
**जना वाक्य नेमस्त हें सत्य मानी ।**

जन हो, श्रीसमर्थ म्हणतात, मी जें आतां पुढें वाक्य उच्चारीत आहें, तें निरपवाद सत्य आहे, असें निश्चित समजून चाला, माझा तसा अनुभव आहे, तुम्हांस हें कितीदां सांगूं म्हणजे तुम्ही तें मानाल, दहादां सांगतों, विश्वास ठेवा कीं

**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ २८ ॥**

दासाभिमानी राम भक्ताची कधीं उपेक्षा करीत नाहींत !

**पदीं राघवाचें सदा ब्रीद गाजे ।**
**बळें भक्तरीपूशिरीं कांबि वाजे ।**
**पुरी वाहिली सर्व जेणें विमानीं ।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ २९ ॥**

अरे, **समर्थाचिया सेवका वक्र पाहे ।**
**असा सर्व भूमंडळीं कोण आहे ।**

मग तुम्हीं घाबरतां कां रे? रामाचे अनन्य सेवक व्हा, मग तुमच्याकडे वाकड्या नजरेनें पाहाण्याची कोणाची प्राज्ञा आहे?

**जयाची लिळा वर्णिती लोक तीन्ही।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥ ३०॥**

ज्यानें रावणाच्या बंदिशाळेंतून देवांना सोडविलें, शंकरपार्वती ज्याचें चिंतन करितात, ज्यानें अहल्येचा उद्धार केला, ज्याचें वर्णन करतां करतां वेद हि थकले, असा राम तुमची केव्हां हि उपेक्षा करणार नाहीं. (३१–३२) ज्यानें

**वसे मेरुमांदार हे सृष्टिलीळा।**
**शशी सूर्य तारांगणें मेघमाळा।**
**चिरंजीव केले जनीं दास दोन्ही।**

जोंवर मेरुमंदार पर्वत आहेत, जोंवर ही सृष्टि आहे, जोंवर आकाशांत चंद्र, सूर्य, तारा, मेघ आहेत, तोंवर ज्यानें मारुती आणि बिभीषण या आपल्या दोघां भक्तांना चिरंजीव केलें, तो

**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥ ३३॥**

मारुतीबिभीषणांप्रमाणें तुम्ही रामाचें दास्य कराल, तर तुम्ही हि त्यांच्या च प्रमाणें चिरंजीव व्हाल! मग तुम्हांस दुसऱ्या कोणाचें दास्य पतकरावें लागणार नाहीं! आपल्या भक्ताची उपेक्षा राम कालत्रयीं करणार नाहींत, एवढा विश्वास ठेवा! असा तुमचा विश्वास बसत नाहीं आणि निश्चय होत नाहीं, म्हणून हाल भोगीत आहां,

**उपेक्षा कदा रामरूपीं असेना।**
**परंतु जिवां मानवां निश्चये तो वसेना।**

तो निश्चय करा आणि अनुभव घ्या

**शिरीं भार वाहेन बोले पुराणीं।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥ ३४॥**

जसा भाव ठेवाल तसें फळ पावाल,

**अनन्यास रक्षीतसे चापपाणी।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी॥ ३५॥**

त्या रामाला शोधावयास कोठें दूर जावयास नको, जरा मनाचा हिय्या करून पाहा,

**सदा सर्वदा देव सन्नीध आहे ।**
**कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे ॥ ३६ ॥**

त्या परीक्षेंत एकदां उत्तीर्ण झाल म्हणजे मग

**सदा चक्रवाकासि मार्तंड जैसा ।**
**उडी घालितो संकटीं स्वामि तैसा ।**

तुमच्यासाठीं राम धांवून येतील ! कारण जो रामाला शरण गेला त्याची रामानें कधीं उपेक्षा केलेली नाहीं, असा सारखा डंका पिटला जात आहे,

**हरीभक्तिचा घाव गाजे निशाणीं ।**
**नुपेक्षी कदा राम दासाभिमानी ॥ ३७ ॥**

( ३८–४६ ) म्हणून आतां प्रार्थना इतकी च कीं, चकित होऊन रामाकडे लक्ष लावा, मन दुसरीकडे जाऊं देऊं नका, रामाचा सारखा निदिध्यास घ्या ; मनाचें चांचल्य रामपदीं अर्पण करा : रामचरणीं लक्ष ठेवलेंत, म्हणजे नाहीं नाहीं त्या कल्पना ज्या मनांत येत आहेत, त्या नाहींशा होतील ; वणवण करीत हिंडण्यांत कांहीं सुख नाहीं, नुसता शीण आहे, अंतर्यामींच शोधून पाहा, विचार करा, आपण च आपल्या मनाला हिताच्या गोष्टी सांगा ; मुख्य म्हणजे हरएक प्रयत्नानें **रघूनायका आपुलेंसें करावें ।** यांत च आपलें कल्याण आहे, रामावांचून दुसरें कांहीं बोलूं नका, बोलावयाचें च तर श्रीरामाच्या गोष्टी बोलाव्या, नाहींपेक्षां मौन धारण करून असावें : घरीं दारीं, गांवांत प्रांतांत, देशांत राम असेल तर तेथें राहण्याची शोभा, नाहीं पेक्षां अरण्यवास पतकरावा ; ज्यांच्या संगतींत राहून समाधान भंग पावतें, अहंता अंगीं जडते, रामावरील प्रेम उडतें, अशा संगतींत काय गोडी आहे ? रामावांचून एक क्षण गेला म्हणजे तो फुकट गेला, तेवढा आयुष्याचा नाश झाला, स्वहिताविषयीं जो दक्ष असेल त्याला आमचें हें म्हणणें पटण्यासारखें आहे,

( ४७–५६ ) या दहा श्लोकांत श्रीसमर्थ आत्मचरित्र च सांगत आहेत, स्वतःकडे पाहून च बोलत आहेत, असें मला भासतें. त्यांच्या मनांत हि तें

आलें नसेल, पण त्यांना न कळत, त्यांच्या मुखावाटे आत्मचरित्र च बाहेर पडत आहे! अलीकडच्या काळांत श्रीरामाचा असा दुसरा कोणता दास होऊन गेला?

**मनीं लोचनीं श्रीहरी तो चि पाहे।**
**जनीं जाणता भक्त होऊनि राहे।**
**गुणीं प्रीति राखे क्रमू साधनाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ४७॥**

**सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा।**
**सदा रामनामें वदे नित्य वाचा।**
**स्वधर्मे चि चाले सदा उत्तमाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ४८॥**

हें दुसऱ्या कोणाचें चरित्र आहे?

**सदा बोलण्यासारिखें चालताहे।**
**अनेकीं सदा येक देवासि पाहे।**
**सगूणीं भजे लेश नाहीं भ्रमाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ४९॥**

**नसे अंतरीं कामकारी विकारी।**
**उदासीन जो तापसी ब्रह्मचारी।**
**निवाला मनीं लेश नाहीं तमाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ५०॥**

असा दुसरा कोणता ब्रह्मचारी आपल्या ऐकण्यांत आलेला आहे?

**मदें मत्सरें सांडिला स्वार्थबुद्धी।**
**प्रपंचीक नाहीं जयातें उपाधी।**
**सदा बोलणें नम्र वाचा सुवाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ५१॥**

**क्रमी वेळ जो तत्त्वचिंतानुवादें**
**न लिंपे कदा दंभवादें वेवादें।**
**करी सूखसंवाद जो ऊगमाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ५२॥**

हें दुसऱ्या कोणाचें वर्णन चाललें आहे ?

**सदा आर्जवी प्रीय जो सर्व लोकीं।**
**सदा सर्वदा सत्यवादी विवेकी।**
**न बोले कदा मिथ्य वाचा त्रिवाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ५३ ॥**

**सदा सेवि आरण्य तारुण्यकाळीं।**
**मिळेना कदा कल्पनेचेन मेळीं।**
**चळेना मनीं निश्चयो दृढ ज्याचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ५४ ॥**

न कळत, श्रीसमर्थांच्या मुखांतून आत्मचरित्र च बाहेर पडत आहे, याविषयीं कांहीं शंका आहे काय ?

**नसे मानसीं नष्ट आशा दुराशा।**
**वसे अंतरीं प्रेमपाशा पिपाशा।**
**ऋणी देव हा भक्तिभावें जयाचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ५५ ॥**

हें निर्विवाद त्यांचें च चरित्र होय. **पडों नेदी शब्द त्यांचा भूमिवरी।** इतका देव त्यांचा ऋणी झालेला होता, हें आपणांस ठाऊक झालेलें आहे.

**दिनाचा दयाळु मनाचा मवाळु।**
**स्नेहाळु कृपाळु जनीं दासपाळु।**
**तया अंतरीं क्रोध संताप कैचा।**
**जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा ॥ ५६ ॥**

अशा दीनदयाळ सद्गुरूपुढें उभें राहून हे दहा श्लोक आपण नित्य म्हणत गेल्यास त्यांना आपली दया येईल, नाहीं ?

( ५७–६६ ) नित्यनियमानें रामनामस्मरण, स्नानसंध्यादि कर्म, भक्ति, उपासना इत्यादि करीत गेल्यास अशी धन्यता प्राप्त होते ; वृत्ति मोकळी

असावी, कशांत लिप्त होऊन राहूं नये; उदासीनता तत्त्वतः सार आहे! विषयांची वासना नसावी, पूर्वकर्माच्या योगानें वासना उत्पन्न होतात, म्हणून आतां तरी या जन्मांत निष्कामबुद्धीनें श्रीरामाचें चिंतन करावें; अनेक आशा करावयाच्या आणि रामाच्या भेटीची इच्छा असावयाची! दोन्ही गोष्टी कशा साधणार? एक कांहीं तरी होईल, ज्याच्या ठिकाणीं कामना आहे त्याच्या अंतःकरणांत निर्व्याज रामप्रेम असूं शकत नाहीं; रामकृपा झाली म्हणजे कामधेनु घरीं आली, कल्पवृक्षाचा आश्रय मिळाला, चिंतामणी हातीं लागला, असें समजावें; रामकृपेची योग्यता दुसऱ्या कशांत नाहीं; असें असतां अभागी जनाची स्थिति पहा—

**उभा कल्पवृक्षातळीं दुःख वाहे।**
**तया अंतरीं सर्वदा तें चि आहे।**
**जनीं सज्जनीं वाद हा वाढवावा।**
**पुढें मागुता शोक जीवीं धरावा॥ ६१॥**

**निजध्यास तो सर्व तुटोनि गेला।**
**बळें अंतरीं शोक संताप ठेला।**
**सुखानंद आनंद भेदें बुडाला।**
**मनीं निश्चयो सर्व खेदें उडाला॥ ६२॥**

**घरीं कामधेनु पुढें ताक मागे।**
**हरीबोध सांडूनि वेवाद लागे।**
**करीं सार चिंतामणी काचखंडें।**
**तया मागतां देत आहे उदंडें॥ ६३॥**

तेव्हां रामावर दृढ विश्वास टाकावा, वासना सोडाव्या, लोभ क्षोभाला च कारण होणार, विषयाची हांव असणें म्हणजे दैन्यवाणें जिणें होय; असलें दुःखदायक दैन्यवाणें जिणें काय कामाचें? हें उमजून

**धरीं रे मना आदरें प्रीति रामीं।**
**नको वासना हेमधामीं विरामीं॥ ६५॥**

घरदार, शेतीवाडी यांत कांहीं सार आहे काय? छंद बायकापोरांचा आणि इच्छा रामदर्शनाची! सेवन करावयाचें विषाचें आणि आशा असावयाची

चिरंतन सुखाची ! कसें साधावें ? रामदर्शन घडावें, चिरंतन सुख मिळावें, अशी इच्छा असेल तर,

**करी रे मना ध्यान या राघवाचें ॥ ६६ ॥**

आणि सद्गुरुकृपेसाठीं भुकेला असशील तर,

**करी रे मना ध्यान त्या पाउलांचें ॥**

२

यापुढें श्रीसमर्थ सारखे रामाच्या गुणकथा च गात चालले आहेत.

( ६७–७६ ) राम लावण्यरूपी आहेत, धीर, गंभीर, पूर्णप्रतापी आहेत, ते संकटकाळीं भक्तांचें रक्षण करितात, कोदंडधारी रामापुढें काळ हि चळचळ कांपतो, तेथें मनुष्याचा पाड किती ? राम भयाचें निवारण करितात, म्हणून भक्तिभावानें त्यांचें भजन करावें, विचारानें अनाचाराची आवड टाकावी; रामनामस्मरणानें आपदांचा अपहार होतो, म्हणून मदालस्य सोडून रामाचें चिंतन करावें; नामस्मरणानें महादोषांचें दहन होतें, सद्गति प्राप्त होते, पुण्यसंचय होतो; नामस्मरण करण्यांत कांहीं कष्ट हि करावे लागत नाहींत किंवा पदरचें कांहीं खर्च होत नाहीं, उलट संसाररूपी महावैरी जिंकला जातो; उपास-तापास करण्यांत दुःख आहे, तें दुःख नामस्मरणापुढें रहात नाहीं. यासाठीं महादेव रामाचें चिंतन करीत असतात; इतर साधनें कष्टाचीं आहेत, व्रतें दान उद्यापनें यांना द्रव्य पाहिजे, नामस्मरणांत कांहीं संकट हि नाहीं व त्याला पैसा हि लागत नाहीं; तात्पर्य सर्व साधनांत नामस्मरण हें श्रेष्ठ साधन आहे, विचार करून पाहा, अकारण संशय मनांत आणूं नका, घड कर्म होत नाहीं, घड धर्म घडत नाहीं, योग साधत नाहीं, नाहीं भोग, नाहीं त्याग, नाहीं कांहीं, असें पाहून श्रीसमर्थ मोठ्या कळवळ्यानें सांगतात.

**म्हणे दास विश्वास नामीं धरावा ।**
**प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ ७६ ॥**

( ७७–८५ ) रामाची कृपा व्हावी एवढी एक च इच्छा असली कीं, बाकीच्या कामना नाहींशा होतात, रामाचा सारखा ध्यास लागला कीं, तद्रूपता प्राप्त होते, रामाचा छंद घेतला कीं, द्वैत मावळतें, विश्वास मात्र

पाहिजे; रामावर ज्याचा विश्वास नाहीं, त्याच्या पाठीमागें सर्व पीडा लागतात, कैवल्यदाता राम मस्तकीं असतां देहाची आणि संसाराची चिंता वाहणें वेडेपणा नव्हे ? एका राघवाची आशा करावी आणि भवाची चिंता सोडावी, भ्रमांत पडूं नये, रामाचा निदिध्यास कधीं वायां गेला नाहीं, शंकराला ज्याचा ध्यास त्याची कास धरून आपण दुस्तर असा भवसागर तरून जावें, पोटाची काळजी कशास पाहिजे ? मत्सराचा नायनाट करावा; सारखा ध्यास घ्यावा, नामस्मरणासारखें दुसरें साधन आहे कोणतें ? अभाग्याला तें कळणार नाहीं, पण रामनाम अनुपम आहे, शंकरानें या औषधाचें सेवन केल्यानें त्यांची विषबाधा हरली, तेथें इतरांची कथा काय ? कामारि शंकर रामाचें ध्यान करितात, पार्वतीपुढें रामाचें गुणगान करितात, स्वतः ज्ञानवैराग्यसामर्थ्यसंपन्न असून हि रामनामीं विश्वास ठेवतात, आणि तुम्ही काय करतां ? तुम्ही विठ्ठलाची उपासना करतां ना ? त्या विठ्ठलानें ज्या शंकराची पिंडी मस्तकीं धारण केली आहे, त्या शंकरांनीं ज्या रामाचा ध्यास घेऊन शांतिसुख मिळविलें त्या रामास तुम्ही विसरतां ? काय म्हणावें ? शंकर रामनामाचा जप करून शांत झाले, तुम्ही हि तो च जप करा, विश्वास ठेवा,

**तुम्हां सोडावी राम हा अंतकाळीं ॥ ८५ ॥**

( ८६–१०१ ) पुन्हांपुन्हां श्रीरामनामाचा महिमा वर्णन करून सांगतांना श्रीसमर्थांना कंटाळा नाहीं, रामनामाचें महत्त्व परोपरीनें बिंबवीत ते चालले आहेत, आम्ही मात्र किती पापी म्हणावयाचे कीं, अनुभव न घेतां, क्रिया न करतां, नसते तर्क कुतर्क काढीत बसतों ! ज्याला चिरशांतीची आणि सदानंदाची अपेक्षा असेल, त्यानें जिव्हाग्रीं रामनाम सारखें खेळवावें ! मारुतीला पुढें करून श्रीसमर्थ आपला च अनुभव सांगत आहेत, तो ऐका :

**मुखीं राम त्या काम बाधूं शकेना ।**
**गुणें इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना ।**
**हरीभक्त तो शक्त कामास मारी ।**
**जगीं धन्य तो मारुती ब्रह्मचारी ॥ ८७ ॥**

मारुतीच्या जागीं आपण निःशंकपणें सद्गुरूस नेऊन बसवावें, कारण दोघे एक च, ' तो मारुती ' ऐवजीं ' ते सद्गुरु ' म्हणावें !

**बहू चांगलें नाम या राघवाचें ।**
**अती साजिरें स्वल्प सोपें फुकाचें ।**
**करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें ।**
**जिवां मानवां हें चि कैवल्य साचें । ८८ ॥**

हें काय श्रीसमर्थ कांहीं तरी म्हणत आहेत, असें कोणास म्हणतां येईल काय ? नामस्मरण अखंड करावें, भोजन करतांना केल्यानें श्रीहरीची कृपा होते, आणखी काय सांगावें ? मुखांत रामनाम नसणें अपायकारक होय, वेद शास्त्रें पुराणें ज्या नामाची महती गातात, त्या नामीं प्रेम नसेल तर जन्म व्यर्थ गेला, असें समजावें ; नामस्मरणाचा कंटाळा करूं नका, आदर-पूर्वक नाम घ्या, त्याला कांहीं खर्च येत नाहीं, **जय जय रघुवीर समर्थ** असा नामाचा घोष करा; तो घोष ऐकून दोष पळ काढतील, राम आनंदानें जवळ येतील, म्हणून तर शंकराला रामनामाचें इतकें वेड लागलें होतें ; प्राणिमात्राची चिंता करणारे श्रीराम, त्याचें नुसतें फुकटचें नाम घेण्यांत आपलें काय खर्च होतें ? कोप आल्यास तिन्ही लोक भस्म करून टाकतील, इतकें ज्या शंकरांचें सामर्थ्य, ते हि नामस्मरणानें शांत होतात, त्यांचें ऐकून जगज्जननी पार्वती जप करूं लागते, तेव्हां आपण हि आतां तो च छंद घेतला पाहिजे. नामस्मरणानें ज्यांचें कल्याण झालें अशीं, दुराचारी अजामिल, पापिणी कुंटणी आणि दैत्यकुळांत जन्मास आलेले भक्त प्रल्हाद, यांचीं उदाहरणें आपल्यापुढें आहेत ; त्यांच्यापासून बोध घ्यावा, मुखीं नाम नाहीं तर सद्गति नाहीं, अहंकारानें फुकट दुःखाचे वाटेकरी होऊं नका, अंतकाळीं जाणवेल

**म्हणोनी म्हणा रे म्हणा देवराणा ॥ ९७ ॥**

त्या रामनामानें पाषाण तारले, तेथें मानव तरतील यांत काय शंका ? ज्या नामस्मरणानें असंख्य मानव तरले, त्या नामाविषयीं शंका घेणें पाप होय ; काशीस राहून विश्वेश्वर अहोरात्र स्वतः रामनामाचा जप करीत इतरांस स्वहिताचा मार्ग दाखवीत आहेत ! आपल्या हातून यथासांग कर्म घडत नाहीं, कांहीं धर्म करावा तर हटकून पुण्य पदरीं पडतें च असें नाहीं, आंगीं भूतदया नाहीं आणि मुखीं फुकटचें नाम हि येत नाहीं, याला काय म्हणावें ? नामाविषयीं ज्याला प्रेम वाटत नाहीं त्याला यमाचा जाच सहन

करावा लागेल, जो तर्क कुतर्क काढीत बसेल तो नरकाचा धनी होईल, म्हणून तरी रामनामाचा जप करा, म्हणजे सर्व दोषांपासून आपोआप मुक्त व्हाल!

(१०२–११५) या श्लोकांत कोणते गुण संपादन करून व कोणती क्रिया करून भक्तिपंथाला लागावें, तें श्रीसमर्थ शिकवीत आहेत.

आंगीं लीनता असावी, सज्जनांना संतोषवावें, देह परोपकारार्थ झिजवावा, सगुणोपासना करावी; रामाविषयीं प्रेम असावें, निरूपण करतांना आणि ऐकतांना देहाचा विसर पडावा, परद्रव्य आणि परकांता यांच्याकडे लक्ष हि जाऊं देऊं नये; क्रिया न करतां नुसतें बोलणें लाजिरवाणें होय, पाखांडानें देवाची भेट होत नसते; विचार करून आपल्या आचरणांत फरक पडत गेला पाहिजे, आचार शुद्ध असावा, बोलावें तसें चालावें, संसाराची चिंता न करावी; स्नानसंध्या मनापासून घडावी, मनाला आवरून धरून, ठिकाणावर ठेवावें, भूतमात्राविषयीं दया असावी, भक्तिप्रेमांत काय आनंद आहे त्याचा उपभोग घ्यावा; कोप नसावा, साधूच्या संगतींत असावें, नष्टांची आणि चांडाळांची संगति टाळावी, ही च मोक्षाची वाट आहे, त्या वाटेला लागावें; सज्जनसंगतींत आपली क्रिया पालटून आपल्या ठिकाणीं भक्तिभाव उत्पन्न होतो, केल्यावांचून बोलूं नये, कोठें वाद घालूं नये; वितंडवाद टाळावा, सुखसंवाद करावा, तर च आनंद आहे; अहंकार अपायकारक असतो तो जिंकावा; विचार करून पाहा, आम्ही सत्य तें च सांगत आहोंत, पाखांडी बनूं नका; वितंडवाद कधीं संपत नाहीं, वितंडवादानें संशय आणि दंभ उत्पन्न होतात; आजवर अनेक पंडित अहंकारामुळें ब्रह्मराक्षस होऊन बसल्याचें आपण ऐकतों, अशा पंडितांपेक्षां तर आपण विद्वान् नाहीं ना, मग अकारण शहाणपणाची घमेंड कां असावी? नुसतें बोलून काय उपयोग, गर्व नष्ट झाला पाहिजे, विचार करा, अहंकार सोडा, बोलण्या-वें आचरण ठेवा, हळुहळु कां होईना पण आपल्या वर्तनांत इष्ट ना फरक पडूं द्या, येथवर सांगितलें तें ध्यानीं आणा आणि भक्तिमार्गाला लागा.

(११६–१३१) या भक्तिमार्गानें जाऊन आजवर ज्यांनीं आपलें कल्याण करून घेतलें अशा अंबरीष, उपमन्यु, ध्रुव, गजेंद्र, अजामिल, विधी, प्रल्हाद, वज्रपाणी, द्विज, अहिल्या, रावणाच्या बंदिशाळेंतील देव, द्रौपदी,

इत्यादिकांचीं उदाहरणें, द्विरुक्ति होत आहे, तरी तें वैगुण्य पतकरून हि श्रीसमर्थांनीं सांगितलीं आहेत, हेतु हा कीं,

**नुपेक्षी कदा देव भक्ताभिमानी ॥**

या सिद्धान्तावर श्रोत्यांचा विश्वास बसून त्यांनीं भक्तिमार्गाला लागावें. भक्तांच्या साहाय्यार्थ व अनाथांच्या रक्षणार्थ देवानें आजवर अनेक अवतार घेतले व पुढें हि तो घेईल, अशा परमात्म्याला

**नया नेणती ते जन पापरूपी।**
**दुरात्मे महा नष्ट चांडाळ पापी ॥ १२९ ॥**

परंतु, रामचरित्र ऐकतांना ज्यांना आनंद होतो, जे स्वतःला विसरतात. ज्यांची देहबुद्धि नष्ट होते आणि ज्यांच्या सर्व वासना रामरूपांत लय पावतात, ते धन्य होत: इतर वासना सोडून द्याव्या, रामकृपेची तेवढी इच्छा करावी, विषयवासना नसावी; सज्जनांची संगति असली म्हणजे आपल्या मतींत पालट होऊन या गोष्टी साधतात, उन्मनी अवस्था प्राप्त करून घ्यावी म्हणजे मनोविकारांची बाधा होण्याचा प्रश्न राहणार नाहीं: मन हें संकल्पविकल्पात्मक आहे, तें मन च ताब्यांत आल्यावर संकल्प कोठला आणि विकल्प हि कोठला, संकल्प करावयाचा च तर तो सत्य संकल्प असावा, यासाठीं

**रमाकांत येकांत काळीं भजावा ॥ १३० ॥**

**भजाया जनीं पाहतां राम येकु।**
**करीं बाण येकु मुखीं शब्द येकु।**
**क्रिया पाहतां उद्धरे सर्व लोकु।**
**धरा जानकीनायकाचा विवेकु ॥ १३१ ॥** ज्या

ा:

३

( १३२–१४५ ) हा विवेक उमगायाला सज्जनाची संगति लाभली पाहिजे. सज्जन कसा ओळखावा? त्याचीं लक्षणें कोणतीं? जीं श्रीसमर्थांचीं तीं च त्याचीं!

विचारूनि बोले विवंचूनि चाले ।
तयाचेनि संतप्त ते ही निवाले ।
बरें शोधिल्यावीण बोलों नको हो ।
जनीं चालणें शुद्ध नेमस्त राहो ॥ १३२ ॥

हरीभक्त वीरक्त विज्ञानरासी ।
जेणें मानसीं स्थापिलें निश्चयासी ।
तया दर्शनें स्पर्शनें पुण्य जोडे ।
तया भाषणें नष्ट संदेह मोडे ॥ १३३ ॥

नसे गर्व आंगीं सदा वीतरागी ।
क्षमा शांति भोगी दया दक्ष योगी ।
नसे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा ।
यहीं लक्षणीं जाणिजे योगिराणा ॥ १३४ ॥

अशा लक्षणांनीं युक्त असलेल्या सज्जनाची संगति धरावी, म्हणजे मतींत पालट होईल, सद्बुद्धि सुचेल, सन्मार्ग लागेल आणि मग त्रिकाळ काळ हि आपल्यापुढें हात जोडून उभा राहील; सर्व ब्रह्मांड भयानें व्याप्त असलें तरी तें भय संतांना नसतें, भय द्वैतापासून असतें, तें द्वैत च संतांच्या ठिकाणीं नसल्यावर त्यांना भय कोठलें? या सर्व गोष्टी सत्पुरुषांनीं स्पष्टपणें सांगितल्या आहेत, परंतु आमचें अज्ञान कायम च आहे, कां, तर आमची देहबुद्धि सुटत नाहीं आणि सिद्धान्त तर असा आहे

जुनें ठेवणें मीपणें आकळेना ॥ १३७ ॥

हा देहबुद्धि बळकट धरून बसल्यामुळें भ्रमांत पडला आहे आणि याचें आत्मरूपी धन याच्या अगदीं जवळ असून हि यास ठाऊक नसल्यामुळें हा जन्ममरणरूपी दारिद्र्य भोगीत आहे; तें रूप सर्वत्र भरलेलें असतां हा अभागी समोर पाहातो तों त्याला पाषाण भासतो, देव भासत नाहीं! कोठून भासेल? भाव नाहीं; तें रूप जवळ असून त्याला दुरावलें आहे! या मायेंत गुरफटला असून दुःख भोगीत आहे; आपलें स्वरूप आपल्याला कळावें म्हणून जाणत्याला शरण गेलें पाहिजे, त्याची सेवा केली पाहिजे, एरव्हीं तें कळणार नाहीं; जोंवर संशय नाहींसा झाला नाहीं आणि अहंता

गळाली नाहीं, तोंवर त्याची प्राप्ति होणें नाहीं; विषयामध्यें मग्न होऊन राहणाराला तें कळावें कसें? मायेनें पछाडला गेल्यामुळें खरें आणि खोटें याला कळेनासें होऊन हा खोटें नाणेंच खरें मानून चालला आहे, पण जगांत काय काय आहे याचा हा विचार करील व एक एक असत्य बाजूस सारीत जाईल, तर अखेरीस याला सत्यस्वरूप देवाचा शोध लागून याच्या ठिकाणचीं भ्रम, भ्रांति आणि अज्ञान हीं नाहींशीं होतील; विषयाच्या चिंतनांत च याचा काळ सारखा जात असल्यामुळें अहंभाव आणि अज्ञान हीं च याच्या वांट्याला जन्मोजन्मीं येणार! परंतु हा स्वरूपाचा विचार करून पाहील तर आपण स्वभावतः मुक्त च आहोंत, असा त्याला प्रत्यय येईल;

( १४६–१५१ ) स्वरूपाचा विचार कसा करावा? असें पहा, जें जें दिसत असतें, ज्याला ज्याला आकार आहे, तें सर्व केव्हां ना केव्हां नाश पावणार च आणि स्वरूप तर फुटत नाहीं, तुटत नाहीं, चळत नाहीं, ढळत नाहीं, तें अखंड संचलेलें आहे, त्याला दृष्टांत तरी कशाचा द्यावा? त्याच्यासारखें तें च; त्याचें वर्णन करतां करतां वेद हि थकले; विचारानें आपण च तद्रूप होऊन रहावें, तें डोळ्यांना दिसत नाहीं, बुद्धीला कळत नाहीं; त्याला रंगरूप नाहीं, आकार नाहीं, कांहीं नाहीं, मग तें प्रत्ययास यावें तरी कसें? शोधीत रहावें, मनाशीं विचार करीत रहावें, सद्गुरूला शरण जावें, त्यांची कृपा झाली म्हणजे प्रत्यय येईल.

( १५२–१५६ ) पंचीकरण समजलें पण अंतःकरणांत उमज पडला नाहीं तर कांहीं उपयोग नाहीं; पिंडज्ञान, तत्त्वज्ञान, तानमान, योगायोग, भोगत्याग हीं सर्व झालीं तरी कांहीं समाधान प्राप्त होणार नाहीं, सज्जनाची कृपा होईल, तर च समाधान होईल; एकाद्यास चंद्र दाखवायचा झाला तर जशी झाडाच्या फांदीची खूण सांगतां येते, तद्वत् महावाक्यें, पंचतत्त्वें, पंचीकरण इत्यादि, स्वरूपाचा बोध करून देणाऱ्या खुणा आहेत व या खुणांच्या द्वारें च सज्जन स्वरूपाची ओळख करून देतात; तें स्वरूप सर्वत्र कोंदाटलें असून दिसत नाहीं, हातांत येत नाहीं, मला तें समजलें असें कोणी म्हणेल तर त्याला समजलें नाहीं, असें समजावें, कारण समजलें असें म्हणणारा त्याहून कोणी निराळा असेल तेव्हां ना?

( १५७-१६७ ) शास्त्रें फार आहेत व त्यांच्यांत एकवाक्यता आढळत नाहीं, त्यामुळें उगीं च भांडणें मात्र लागतात व निश्चय कांहीं च होत नाहीं; श्रुति, स्मृति, न्याय, मीमांसा, तर्कशास्त्र, वेदांत यांच्यांत भिन्न भिन्न वाक्यें आढळतात, म्हणजे त्यांना हि नीट वर्णन करून सांगतां येत नाहीं, स्वतः शेष कुंठित होऊन मौन धारण करून बसला, तेथें इतरांची काय कथा? तात्पर्य, स्वरूपाचा बोध व्हावयाचा तर सर्व जाणीव म्हणजे अहंभाव गळाला पाहिजे; पोटांत माशी गेली म्हणजे जसें अन्न जिरत नाहीं, तद्वत् जाणीवरूपी मक्षिका ज्ञानरूपी अन्न पचूं देणार नाहीं; अहंभाव पूर्ण नष्ट झाला पाहिजे, अहंकार आणि द्वैत हीं वादाला कारण होतात, तीं सोडा, आपणामध्यें जोंपर्यंत अहंकार आहे तोंपर्यंत दुसऱ्यास ज्ञानाच्या गोष्टी सांगण्याच्या भरीस शहाण्यानें पडूं नये; अहंकार दुःखाचें मूळ आहे, अहंकारी माणसाच्या ज्ञानगोष्टी पोकळ होत, आपल्या ठिकाणीं अहंकार आहे किंवा नाहीं, हें दुसऱ्या कोणीं सांगावयास नको, तें आपलें आपल्याला समजतें, अहंकार गेला कीं सुख च आहे; अहंकारामुळें नीति सुटते व अनीतीच्या जोरावर लोकांत जरी प्रतिष्ठा झाली, तरी विचारी माणसाचें मन त्याचें त्याला खात च असतें, परंतु सरळ विचार सोडून कांहीं तरी प्रमाणें शोधून काढून मनुष्य स्वतःची कशी तरी समजूत करून घेत असतो; तात्पर्य, अहंकारामुळें देहातीत जें हित तें होत नाहीं, म्हणून देहबुद्धि टाकून तिच्या जागीं आत्मबुद्धीची स्थापना केली पाहिजे, याचा अर्थ, देहाला च आपण आपण समजत असतों, त्याऐवजीं अहं ब्रह्मास्मि हा बोध झाला पाहिजे, सज्जनांच्या कृपेवांचून हें होणार नाहीं; सज्जन च आपणांस विषयांपासून सोडवितील, निर्गुण देवाची ओळख करून देतील, मनांत होणारी कल्पनांची गर्दी मोडतील; देह म्हणजे च मी असें हा मानूं लागल्यामुळें, स्त्रियापुत्रमित्रादिकें हा त्या देहाचा च पसारा असल्यामुळें तीं हि सर्व माझीं च, अशा लोभांत आणि मोहांत जो हा गुरफटला गेला आहे, त्यांतून त्याला सज्जन च सोडवूं शकतील, म्हणून

**सदा संगती सज्जनाची धरावी ॥**

त्यांच्या संगतींत शाश्वत काय आहे, याचा निवाडा करावा, संदेहाला पार घालवून द्यावें, आणि घडीनें घडी आपल्या जन्माचें सार्थक करावें;

( १६८–१७० ) संत ओळखण्याची एक सोपी युक्ति आहे—

**करी वृत्ति जो संत तो संत जाणा।**
**दुराशागुणें जो नव्हे दैन्यवाणा ॥ १६८ ॥**

कोणी याचा अर्थ, जो दुसऱ्याची वृत्ति शांत करतो, तो संत, असा करतात : मी तसा करीत नाहीं, जो स्वतःची वृत्ति शांत ठेवतो, ज्याला कसली च दुराशा नसते आणि त्यामुळें मग ज्याच्या ठिकाणीं कसलें च दैन्य नसतें, तो संत म्हणावा : आपल्यासारख्यांनीं उपाधी मागें लावून घेतल्या तर आपली देहबुद्धि वाढत च जाते, पण संतांनीं कितीं हि उपाधी केल्या तरी त्यांना त्या उपाधींची बाधा होऊं शकत नाहीं : श्रीसमर्थांच्याइतक्या उपाधी दुसऱ्या कोणीं केल्या होत्या ? अशा संतांना शरण जाऊन ' राघवाचा पंथ ' आम्हांस सांगा, असें त्यांना विचारावें, ते सांगतील : देहाचा जो अहंकारविस्तार वर सांगितला त्याची बाधा होऊं देऊं नका, देहबुद्धि विसरून निर्गुणाचें चिंतन करा, ज्ञानानें देहबुद्धि जिंका, म्हणजे तुम्हांस त्या स्वरूपाचा बोध होईल, तुमची वृत्ति स्वभावतः तदाकार नसल्यामुळें अखंड चिंतनावांचून तुम्हांस गत्यंतर नाहीं :

( १७१–१७४ ) जगांत तें च एक स्वरूप सत्य असून हि तें आपणांस अगम्य झालें आहे, या डोळ्यांनीं तें दिसत नाहीं, तें निराभास असल्यामुळें बुद्धीला त्याचें आकलन होत नाहीं, आपली अहंता आपणांस नडत आहे, अहंतेच्या योगानें त्या स्वरूपाची कल्पना होत नाहीं ; अहंतेची तऱ्हा एक च – विषयांकडे तिचें लक्ष गेलें म्हणजे तिला अविद्या म्हणतात, ती ब्रह्माकडे वळली म्हणजे तिला च मूळमाया म्हणतात : द्वैतभाव नाहींसा होऊन ब्रह्मस्वरूपांत लीन होऊन गेलें पाहिजे : या अहंकाररूपी राहूनें स्वरूपाचा ग्रास करून सर्वत्र अज्ञानरूपी अंधकार पसरविला आहे, विचार करून पाहा ; तें स्वरूप डोळ्यांना दिसत नाहीं, डोळ्यांना जें दिसतें तें सारें नाशिवंत आहे, स्वरूप अविनाशी आहे, तद्रूपता म्हणजे च मोक्ष, जे सावध साक्षपी आणि दक्ष असतात, त्यांना च तो प्राप्त होतो :

( १७५–१७९ )साधक विचारतो–प्राणिमात्राच्या कपाळीं ब्रह्मा लिहितो, असें म्हणतात, त्या ब्रह्माचे कपाळीं कोण लिहितो ? प्रळयकाळ आला कीं

शंकर विश्वाला जाळून त्याचें भस्म करितात, असें म्हणतात, पण त्या शंकराला शेवटीं कोण जाळतो? जगांत बारा सूर्य, अकरा रुद्र आणि असंख्य शक्र आहेत, असें म्हणतात, तेव्हां आतां या सर्वांत मुख्य देव कोणाला मानावें? कांहीं कळत नाहीं: या प्रश्नाचें तात्पुरतें उत्तर असें – तो देव या सर्वांहून निर्विवाद निराळा आहे, पण त्याचा शोध कोणी च करीत नाहींत! जो तो आपल्या मनाला येईल त्या देवाची पूजा करीत आहे, पण असे देव कोट्यवधी आहेत! ज्यानें तिन्ही लोक निर्माण केले त्या देवाचा छंद कोणी च घेत नाहीं! तो देव न तुटणारा, न फुटणारा, न चळणारा, न ढळणारा असा आहे, तो या डोळ्यांनीं दिसत नाहीं, अहंता आहे तोंवर तो कळणार नाहीं! याप्रमाणें तो थोरला देव सर्वांपासून चोरून राहिला आहे! मग तो आम्हांस कळावा कसा?

**गुरूवीण तो सर्वथा ही न दीसे ॥ १७९ ॥**

(१८०–१८५) साधक विचारतो-त्या सद्गुरूची आम्हांस ओळख करून द्या; जगांत जसे सावध आणि साबडे लोक असावयाचे, त्याप्रमाणें साधु आणि भोंदु हि असणार च: ते आतां आहेत आणि पूर्वीं नव्हते, असें कांहीं नाहीं; ते सर्व काळीं असणार! कोणी किती हि सावध आणि दक्ष असला तरी त्याला आपण युक्तिप्रयुक्तीनें आपल्या जाळ्यांत गुरफटून घेऊं, अशी भोंदु, लबाड, पापी आणि समाजकंटक पण स्वतःस गुरु म्हणवून घेणाऱ्यांची महत्त्वाकांक्षा असते, यासाठीं खऱ्या आणि खोट्या गुरूचीं लक्षणें कृपा करून आम्हांस सांगा, कारण, गुरु आमची परीक्षा पाहाणार, तर तत्पूर्वीं आधीं आम्हीं त्याची परीक्षा केली पाहिजे! ऐका –

**गुरु पाहतां पाहतां लक्ष कोटी।**
**बहूसाल मंत्रावळी शक्ति मोठी।**
**मनीं कामना चेटकें धातमाता।**
**जनीं वेर्थ रे तो नव्हे मुक्तिदाता ॥ १८० ॥**

**नव्हे चेटकी चाळकु द्रव्यभोंदु।**
**नव्हे निंदकु मछरु भक्तिमंदु।**
**नव्हे उन्मतु वेसनी संगबाधु।**
**जनीं ज्ञानिया तो चि साधु अगाधु ॥ १८१ ॥**

**नव्हे वाउगी चाहुटी काम पोटीं।**
**क्रियेवीण वाचाळता ते चि मोठी।**
**मुखें बोलिल्यासारिखें चालताहे।**
**मना सद्गुरु तो चि शोधूनि पाहें॥ १८२॥**

शोधूनि पाहें! श्रीसमर्थ हि सद्गुरूची परीक्षा पाहण्यास सांगत आहेत; ऐका सद्गुरूचीं लक्षणें —

**जनीं भक्त ज्ञानी विवेकी विरागी।**
**कृपाळू मनस्वी क्षमावंत योगी।**
**प्रभु दक्ष वित्पन्न चातुर्य जाणे।**
**तयाचेन योगें समाधान बाणे॥ १८३॥**

भक्त, ज्ञानी, विवेकी, विरागी, कृपाळू, मनस्वी म्हणजे मन स्वाधीन ठेवणारे, क्षमावंत, योगी, प्रभु म्हणजे समर्थ, दक्ष, व्युत्पन्न आणि चतुर, या द्वादश लक्षणांनीं युक्त अशा सद्गुरूच्या कृपेनें

**नव्हे तें चि जालें नसे तें चि आलें।**
**कळों लागलें सज्जनाचेनि बोलें॥**

याहून स्पष्ट अशा शब्दांनीं तें सद्गुरूपद सांगतां येण्यासारखें नाहीं; अशा अनिर्वाच्य स्वरूपीं आपण निर्भयपणें इतकें गुप्त होऊन जावें कीं, निराळें असें आपण कोणास सांपडूं च नये!

(१८६–१९०) वास्तविक श्रीराम आपणापासून केव्हां हि दूर नसतात, ते नेहमीं अति निकट असतात, आपण केव्हां हि त्यांच्या दृष्टीच्या आड नसतों च मुळीं, पण केवळ मीपणाच्या योगानें आपणांस याचें भान नसतें; पंचभूतात्मक पिंड आहे आणि पंचभूतात्मक च ब्रह्मांड आहे, या दृष्टीनें त्या दोहोंत ऐक्य आहे, स्वरूप त्यांच्या पलीकडचें आहे, पिंडब्रह्मांडाचा संग सोडून पलीकडे जावें, तेव्हां निरपेक्ष सुखाची प्राप्ति होणार आहे; ज्ञानशास्त्र हातीं येईल तर च देहबुद्धीचा निःपात होईल, देहबुद्धि सोडावी, भक्तिमार्गाला लागावें, वैराग्याच्या जोरावर सर्वस्वाचा त्याग करून समाधान प्राप्त करून घ्यावें; ज्यानें हें ब्रह्मांड निर्माण केलें तो देव ओळखावा, त्याची ओळख

म्हणजे च मोक्ष! सर्वत्र त्याला पाहावें, पण सर्वांचा संग सोडून समाधानानें असावें; तो देव कांहीं करीत नाहीं, सृष्टि चालवीत नाहीं, तो सर्वांच्या पलीकडचा आहे, तो कशांत गुंतून पडत नाहीं, तो निर्विकल्प आहे, तरी पण त्याची कल्पना केली च पाहिजे! असें च ग्रन्थराजांत हि सांगितलें आहे :

**निर्विकल्पास कल्पावें। कल्पना मोडे स्वभावें।**
**मन नसोनि असावें। कल्पकोटीं ॥ ७-३-४९ ॥**

नसोनि असावें = संग सोडूनि सुखें राहावें.

( १९१–१९३ ) देह तो च मी, ही भावना नष्ट झाल्याशिवाय स्वरूपाचें ज्ञान होणार नाहीं, अहंभाव आहे तोंवर अज्ञानांधकार असणार, तोंवर परब्रह्माचें आकलन होणार नाहीं; जोंवर द्वैतभाव आहे तोंवर तें स्वरूप कळणार नाहीं: तें स्वरूप कसें आहे, हें दृष्टान्त देऊन सांगतां येणार नाहीं, त्याच्या ठिकाणीं संग नाहीं आणि निःसंग हि नाहीं, मग तें स्वरूप आहे तरी कसें?

**नव्हे जाणता नेणता देवराणा।**
**न ये वर्णितां वेदशास्त्रा पुराणां।**
**नव्हे दृश्य अदृश्य साक्षी तयाचा।**
**श्रुती नेणती नेणती अंत त्याचा ॥ १९३ ॥**

नव्हे जाणता नेणता देवराणा। या चरणाचा अर्थ, अन्यदेव तद्विदितादथो अविदितादधि। या केनोपनिषदांतील वचनाधारें, ब्रह्म जाणलें जात नाहीं व जाणलें जात नाहीं असें हि नाहीं, असा करावयाचा;

( १९४–१९५ ) बरें; प्रत्येकाच्या हृदयांत देव आहे म्हणतात, तर तो कसा आणि केवढा आहे आणि देह पडल्यावर तो देव कोठें जातो; असे दोन प्रश्न १९४ व्या श्लोकांत विचारून १९५ व्यांत त्यांचीं उत्तरें दिलीं आहेत; तीं उत्तरें अशीं — तो देव अंतःकरणांत आहे म्हणजे तो कांहीं एखाद्या लहानशा मोहरीएवढा आहे, असें नव्हे, तर तो आकाशाप्रमाणें व्यापक आहे व देह जरी पडला तरी तो सर्वव्यापी देव कोठें जात नाहीं; जाणार कोठें? तो सर्वत्र भरलेला च आहे, त्याला येणें जाणें कांहीं नाहीं; हुबेहूब हीं च प्रश्नोत्तरें छांदोग्योपनिषदांत आलीं आहेत.

प्रश्न—**यदिदमस्मिन्ब्रह्मपुरे दहरं पुण्डरीकं ।**
**वेश्म दहरोऽस्मिन्नन्तराकाशः किं तदत्र विद्यते ॥**
**यदैतंज्जरा वाऽऽप्नोति प्रध्वंसते वा किं ततोऽतिशिष्यते ॥**

( छांदोग्य ८ × १ × २ व ४ )

उत्तर—**यावान्वा अयमाकाशस्तावानेषोऽन्तर्हृदय आकाशः ॥**
**न चास्य जरयैतज्जीर्यति न वधेनास्य हन्यते ॥**

( ८ × १ × ३ व ५ )

( १९८ – २०१ ) सद्गुरूपुढें उभे राहून हात जोडून शिष्य नम्र भावानें विचारतो – आतां मला थोडक्यांत तें रामरूप कसें आहे तें कृपा करून सांगा, म्हणजे मी अखंड त्याचें च चिंतन करीत राहीन : श्रीसमर्थ सांगतात :

**नभीं वावरे जो अनुरेणु कांहीं ।**
**रिता ठाव या राघवेंवीण नाहीं ।**
**तया पाहतां पाहतां तें चि जालें ।**
**तेथें लक्ष आलक्ष सर्वै बुडालें ॥ १९८ ॥**

तात्पर्य, राघवाचें रूप नभासारिखें आहे, त्याचें ज्ञान झालें म्हणजे भवपाश तुटतात व देहबुद्धि मावळते ; त्याला खरोखर नभाचा हि दृष्टांत शोभत नाहीं, त्यावांचून दुसरें कांहीं नाहीं च आहे, तेव्हां त्याला दृष्टांत कोठून द्यावा, त्यानें व्यापावें असें दुसरें कांहीं नसतां त्याला व्यापक हें विशेषण तरी कसें लावावें ! तें रूप

**अती जीर्ण विस्तीर्ण तें रूप आहे ।**
**तेथें तर्कसंपर्क तो ही न साहे ।**
**अती गूढ तें दृढ तत्काळ सोपें ।**
**दुजेवीण जे खूण स्वामीप्रतापें ॥ १९९ ॥**

इतकें तें गूढ असलें तरी सद्गुरु कृपा करतील तर तें अति सोपें, तत्काळ प्राप्त होणारें आहे

**कळे आकळे रूप तें ज्ञान होतां ।**
**तेथें आटली सर्वसाक्षी अवस्था ।**
**मना उन्मनीं शब्द कुंठीत राहे ।**
**तो रे तो चि तो राम सर्वत्र पाहे ॥ २०० ॥**

याप्रमाणें, ज्या रामाच्या शोधाला आपण निघालों, तो शोध लागला! आतां दुसरें कांहीं उरलें नाहीं, द्वैतभाव समूळ नष्ट होऊन फारां दिवसांनीं म्हणजे अनेक जन्मजन्मांतरांनीं आज भाग्य उदयास आलें, सद्गुरूची भेट झाली, त्यांची कृपा झाली आणि माझी च मला ओळख पटून

**विदेहीपणें सर्व काया निवाली ॥ २०१ ॥**

(२०२ – २०४) समारोप करतांना श्रीसमर्थ म्हणतात—२०१ श्लोक ऐकून स्वरूपाची ओळख पटून तूं कृतार्थ झालास, तरी तुझी ही वृत्ति कायम टिकण्यासाठीं तुला भगीरथ प्रयत्न केला पाहिजे; प्रयत्न कोणता करावा? दोन गोष्टी कराव्या, (१) अखंड श्रवण करून, झालेला निश्चय ढळूं द्यावयाचा नाहीं व (२) सज्जनांची संगति सोडावयाची नाहीं; सज्जनसंगतींत महादुःख भंग पावेल व साधनावांचून सन्मार्ग लागेल; महादुःख तुला ठाऊक च आहे! या संसारदुःखाऐसें दुःख। आणीक नाहीं ॥ २–१०–४० ॥; सत्संगाचा महिमा हा असा आहे, त्या योगें सर्व उपाधी सुटतात, द्वैतभाव नाहींसा होऊन तत्काळ मोक्षाची प्राप्ति होते, पुनरपि जननं पुनरपि मरणं या फेऱ्या चुकतात!

(२०५ फलश्रुति) असे हे मनाचे श्लोक एकांतांत बसून, अंतर्मुख होऊन, मननपूर्वक स्वतः वाचीत गेल्यास किंवा दुसऱ्यानें वाचलेले श्रवण करीत गेल्यास, किती हि मूढ मनुष्य असला तरी त्याला पश्चात्ताप होईल, त्याचें मन हळुवार होईल, चित्त श्रीसद्गुरुचरणीं जडेल, त्याच्या ठिकाणचे दोष हळु हळु झडतील, तो साधनें करूं लागेल आणि अखेरीस शंकराप्रमाणें ज्ञानवैराग्यसामर्थ्यसंपन्न होऊन मोक्षाचा अधिकारी होईल! असें होण्याला श्रीसमर्थांची एक च शर्त आहे—श्रीसद्गुरुवचनीं पूर्ण विश्वास पाहिजे!

(९) आत्मकल्याणाचा मार्ग दाखविणाऱ्या या दोन शतें पांच श्लोकांचा, महाराष्ट्रांतील यच्चयावत् बाल वृद्ध नर नारी, सकल भक्त कुमार कुमारी यांनीं सारखा छंद घ्यावा, याचें मला नवल वाटत नाहीं! जन्मदुःख, जरादुःख, संसाराची असारता, कर्मोपासनेचें अगत्य, राममहिमा, सद्गुरुप्रताप, नाममाहात्म्य, सज्जनसंगति, स्वरूपसाक्षात्कार

इत्यादि अनेक महत्त्वाचे विषय, इतक्या सुलभ रीतीनें आणि इतक्या थोड्या अवकाशांत प्रतिपादिलेले माझ्या पाहाण्यांत अन्यत्र आलेले नाहींत! वाचकांची क्षमा मागून मी पुनरपि हेंच म्हणेन कीं, श्रीसमर्थांनीं आपल्या मागें आमच्यासाठीं इतर कोणती हि ग्रन्थसंपत्ति न ठेवतां ही २०५ रत्नांची नुसती माला ठेवली असती, तरी आम्हीं जन्मोजन्मीं त्यांच्या चरणाचे दास होऊन त्यांच्या सेवेंत देह झिजविले असते! मग आम्हां मराठी भाषा बोलणारांचें आणि जाणणारांचें हें केवढें परम भाग्य म्हणावयाचें कीं, हीं नुसतीं मनाचीं शतें च नव्हत, तर त्यांच्या कवितेचा प्रचंड अर्णव महाराष्ट्रास पावन करण्यासाठीं आज उपलब्ध आहे!

[ ५ ]

# ओवीबद्ध अकरा लघु काव्यें

( १ ) पूर्वारंभ

( २ ) जुनाट पुरुष

( ३ ) अंतर्भाव

( ४ ) आत्माराम

( ५ ) पंचसमासी

( ६ ) सप्तसमासी

( ७ ) सगुणध्यान

( ८ ) निर्गुणध्यान

( ९ ) मानसपूजा

( १० ) एकवीससमासी

—परिशिष्ट

( ११ ) जनस्वभाव

# सामान्य विचार

श्रीसमर्थांचीं हीं रुद्रसंख्या लघु काव्यें एकाद्याला वेड लावतील इतकीं उद्बोधक आणि प्रेमळ आहेत. श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाला कमी लेखील इतका वेडा कोण आहे, पण या लघु काव्यांत विलक्षण गोडी भरलेली आहे, इतकें खरें. ही गोडी कोठून, कशानें आलेली असावी ? काव्यांतील कांहीं कांहीं भाग हृदयांत सारखा भरून राहिला आहे, त्यावरून थोडीं कारणें सुचतात, तीं सांगतों.

( १ ) हीं बहुतेक प्रकरणें गुरुशिष्यसंवादात्मक आहेत. संवादात्मक प्रकरणें साहजिक जास्त चित्ताकर्षक असतात. श्रीसमर्थवाङ्मयांत गुरूची भूमिका प्रत्यक्ष श्रीसमर्थांनीं आपणांकडे घेतलेली आहे. शिष्य मात्र निरनिराळे आहेत, किंबहुना पुष्कळदां काल्पनिक हि असूं शकतील. प्रत्येक वाचक श्रीसमर्थांचें शिष्यत्व पतकरून च वाचावयास सुरुवात करतो. यामुळें वाचकाचें हृदय आदरानें आधीं च भरून गेलेलें असतें. शिष्यांनीं विचारलेले प्रश्न आपले च आहेत कीं काय, असें वाचकास पुष्कळदां भासतें. या प्रकरणांना गोडी येण्याला हें एक कारण झालें असावें. याचें ठळक उदाहरण म्हणून पहिलें च **पूर्वारंभ** प्रकरण सांगतां येईल.

( २ ) या लघु काव्यांत गुरु आणि शिष्य, या उभयतांचा संबंध फार लडिवाळपणाचा आहे. लडिवाळपणावांचून कोणता गुरु शिष्याला प्राणसखया, बाळा, बापा म्हणून संबोधील ? या प्रेमाचें उत्कृष्ट उदाहरण **अंतर्भाव** प्रकरणाच्या पांचव्या समासांत पाहावयास मिळतें :

**स्वामी म्हणती शिष्यासी । आतां संदेह धरिसी ।**
**तरी श्रीमुखावरी खासी । निश्चयेंसीं ॥ १५ ॥**

किती लडिवाळपणाची ही भाषा आहे ? प्रेमावांचून, चिंतेवांचून, आत्मौपम्य बुद्धीवांचून असली भाषा कोणाच्या मुखांतून बाहेर पडणार नाहीं ! असला लडिवाळपणा श्रीमत् दासबोधांत नाहीं, असें नाहीं, पण त्यांत क्वचित् आहे, तर या काव्यांत सर्वत्र भरलेला आहे.

( ३ ) या काव्यांत श्रीसमर्थांनीं शिष्याचा सर्व भार आपणांवर घेऊन त्याला निर्भय केलें आहे. मग या काव्यांत गोडी कां न येईल ? जातिवंत सिंह असतां लहानपणापासून मेंढरांच्या कळपांत वाढल्यामुळें स्वरूपाला विसरलेल्या सिंहाला दुसऱ्या सिंहानें त्याच्या स्वरूपाची ओळख पटवून दिल्यावर तो भय कां बाळगील ? आपण सिंहाचे बच्चे आहोंत, असा विश्वास शिष्याच्या ठिकाणीं बाणल्यावर त्याला डर कसली वाटणार ? शिष्याला आत्मस्वरूपाचें हें ज्ञान श्रीसमर्थांनीं या काव्यांत करून दिलें आहे.

**तूं मज सिंहाचें पिलुं** ॥ ए. वी. स. १४–५२

( ४ ) श्रीमत् दासबोधाचा ५ × ६ माझ्या लक्षांत आहे, तरी मी म्हणतों कीं, दासबोधापेक्षां हि या काव्यांत श्रीसमर्थांनीं आपल्या पोटांतील पुष्कळ गोष्टी मोकळ्या मनानें शिष्यास सांगितल्या आहेत. दासबोधांत श्रीसमर्थांनीं शिष्याला आपल्या समोर बसवून घेतलें आहे, तर या प्रकरणांत त्याला आपल्या मांडीवर घेऊन हृदयाशीं धरलें आहे. दासबोधांत श्रीसमर्थ संकेतें बोलिले आहेत, तर या प्रकरणांत उघड बोलिले आहेत. भाविक, सावड्या भक्तांना उघड बोललेलें जास्त प्रिय वाटतें.

( ५ ) या प्रकरणांत एक विशेष गोष्ट अशी पाहिली कीं, साधनांवर श्रीसमर्थांनीं वारंवार भर दिला आहे. या प्रकरणांत त्यांनीं साधनमार्ग जितका खुलासेवार आणि पुनः पुनः सांगितला आहे, तितका तो दासबोधांत कोठें आहे ?

( ६ ) या प्रकरणांत श्रीरामनाममहिमा पदोपदीं वर्णिला असून वाचकांस त्याचा अतिशय चटका लागतो.

( ७ ) कारण काय असेल तें असो, पण या काव्यांची भाषा जास्त जिव्हाळ्याची भासते, ओवी कानाला मधुर लागते आणि ती वाचकास मंत्रमुग्ध करून जागच्या जागीं खिळून टाकते. क्षणोक्षणीं वाचक देहभान विसरून तटस्थ होऊन आनंदांत मग्न होऊन बसतो.

( ८ ) आपणासारख्या सामान्य माणसांच्या आटोक्यांत येणारा उपदेश या काव्यांत फार आहे.

( ९ ) पण, ह्या अकरा हि प्रकरणांत जो आनंद भरला आहे, त्याचा मूळ कंद म्हणून एकवीस समासीच्या पंधराव्या समासाचा उल्लेख करावासा वाटतो. त्या समासांत श्रीसमर्थांनीं आपला सारा जीव घातला आहे, हृदय खुलें केलें आहे ! कोण हे उपकार ? त्या एका समासांत जें प्रेम भरलें आहे, तें या अकरा हि काव्यांना पुरून उरलें आहे. त्या समासांत श्रीसमर्थांनीं गुरुकृपेची किल्ली महाराष्ट्राच्या हवालीं केली आहे. यापुढें दुसऱ्या कोणाच्या हि तोंडाकडे मुमुक्षूला आशाळभूतपणानें पाहावयास नको. महाराष्ट्राच्या राष्ट्रगुरूनें महाराष्ट्रावर मंत्रानुग्रह करून ठेवला आहे.

अशीं हीं कांहीं थोडीं कारणें मला सुचतात, वाचकांस आणखी कांहीं सुचतील. आतां आपण एक एक काव्य हातीं घेऊन प्रत्यंतर पाहूं च.

# ( १ ) पूर्वारंभ

गुरुशिष्यसंवादात्मक काव्याचा, पूर्वारंभ हें लहानसें साठ ओव्यांचें प्रकरण, उत्कृष्ट नमुना होय. या प्रश्नोत्तरांनीं या काव्याला विलक्षण गोडी आली आहे. मला हा जन्म कां झाला व मी या जन्मदुःखापासून कसा सुटेन, या शिष्याच्या प्रश्नापासून प्रकरणाचा आरंभ होऊन, शिष्याला स्वरूपज्ञान करून देण्यांत त्याचा शेवट झाला आहे. श्रीसमर्थांच्या वाणींतील गोडीचा एक सहस्रांश मला माझ्या शब्दांत उतरवितां येणार नाहीं. म्हणून त्या भरीस न पडतां मी कांहीं मूळ च प्रश्नोत्तरें वाचकास सादर करितों.

**शिष्य**—**शिष्य बोले लडिवाळपणें । म्यां संसार घेतला कोण्या गुणें ।**
**मज हें दुःख भोगणें । किंनिमित्य घडलें ॥ २ ॥**

**गुरु**— **विषयलोभें भगवंता । नेणोनि जालासी दुश्चिता ।**
**तेणें गुणें मागुता । आलासी जन्मा ॥ ३ ॥**

**शिष्य**—**तरी हा जन्म कैसा तुटे । मज भगवंत कैसा भेटे ।**
**भवसागरु वोहटे । कोण्या गुणें दातारा ॥ ४ ॥**

**गुरु**— **जन्म तुटे संतसंगें । देव भेटे अंतरंगें ।**
**दृढ भक्तिचेनि योगें । भवसिंधु आटे ॥ ५ ॥**

**शिष्य**—**दृढ भक्ति करूं कैसी । काये धरावें मानसीं ।**
**सांगा स्वामी अज्ञानासी । मार्ग कांहीं ॥ ६ ॥**

**गुरु**— **सद्गुरूसी जावें शरण । मनीं धरावें तें वचन ।**
**तेणें तुझें अज्ञान । जाईल बापा ॥ ७ ॥**

तें वचन म्हणजे कोणतें, तें न सांगतां नुसतें त्याचें स्मरण करून दिलें आहे. यावरून तें वचन सर्व शिष्य मंडळींना व इतरांना ख्यात होतें, असें दिसतें. तें वचन म्हणजे दासबोधाच्या ५×६ त सांगितलेलें,

**जें अत्यंत गहन । माझ्या स्वामीचें वचन ।**
**जेणें माझें समाधान । अत्यंत जालें ॥ ५-६-४१ ॥**

तें वचन म्हणजे ‘ अहं ब्रह्मास्मि ’ हें महावाक्य होय.

**शिष्य—सद्गुरु कैसा ओळखावा। तो मज दातारें सांगावा।**
**कवण उपदेश घ्यावा। तयापासीं॥ ८॥**

**गुरु— ऐक सद्गुरूची खूण। क्रियेसहित ब्रह्मज्ञान।**
**आशारहित निराभिमान। तयासी मोक्ष मागावा॥ ९॥**

गुरूचा धंदा करणारे या ओवीकडे न पाहोत, पण गुरु करणारांनीं आपल्या भावी गुरूच्या ठिकाणीं हीं लक्षणें आहेत, नाहींत, पाहिल्यावांचून कोणाचे पाय धरूं नयेत! आणि गुरूपासीं प्रापंचिक कांहीं मागावयाचें नसतें. तयासी मोक्ष मागावा. श्रीसमर्थांच्या तोंडचें हें वाक्य ऐकून शिष्य तत्काळ त्यांच्यापाशीं मोक्ष मागूं च लागला!

**शिष्य—मोक्ष कवणासी म्हणावें। हें मज स्वामीनें सांगावें।**
**दयासिंधु देवाधिदेवें। मज उपेक्षूं नये॥ १०॥**

**गुरु**—अरे वेड्या, तूं तर अगदीं खणपटीस च बसला आहेस, पण ऐक,

**अधिकारेंवीण सांगणें। अलभ्य होये तेणें गुणें।**

एकाद्याचा अधिकार नसतां त्यास सांगितलें तर त्याला तें कळणार हि नाहीं व प्राप्त हि होणार नाहीं,

**म्हणोनियां आधीं शाहाणे। अधिकार पाहाती॥ ११॥**

एवढ्यानें शिष्य दबला नाहीं. तो म्हणतो, ठीक आहे, सांगा अधिकार कशानें येतो तें.

**शिष्य—तरी त्या अधिकाराची खूण। जी मज करावी श्रवण।**
**गुरु— ऐक बापा लक्षण। तया अधिकाराचें॥ १२॥**

**जेथें विश्वास आणि विरक्ति। नाहीं संसारीं आसक्ति।**
**जया आवडे गुरुभक्ति। अंतरापासुनि॥ १३॥**

**तें चि अधिकाराचें स्थळ। ज्ञान उपतिष्ठे प्रबळ।**
**फिटे भ्रांतीचें पडळ। सद्गुरुबोधें॥ १४॥**

हें ऐकून मात्र शिष्य थबकला, आपल्यांत हे गुण नाहींत असें मनांत येऊन विरमला, तेव्हां काकुळतीस येऊन विनविता झाला—

**शिष्य—स्वामी पतितपावन। ऐकोनि आलों जी शरण।**
**न विचारितां दोष गुण। मज बोध करावा॥ १५॥**

कसा प्रेमळ संवाद चालला आहे! इतका हृदयस्पर्शी संवाद वाचकांच्या वाचण्यांत अन्यत्र कोठें आलेला आहे काय? माझ्या आलेला नाहीं, म्हणून विचारतों; असो.

शिष्याची अनन्य शरणागति पाहून श्रीसमर्थांनीं त्याची उपेक्षा न करतां त्यास बोध केला आहे, तो वाचकांनीं मुळावरून च वाचणें इष्ट होईल.

**अरे जें जालें चि नाहीं। त्याची वार्ता पुससी काई॥**

या सर्वतोमुखी झालेल्या चरणांवर श्रीसमर्थांनीं प्रकाश पाडला आहे. तरी हि त्या प्रकाशांत आपणांस न दिसेल, तर तो दोष निरूपणाचा नसून आपल्या अपात्रतेचा समजावा. श्रीसमर्थ जणूं मेरुपर्वताच्या शिखरावरून बोलत आहेत आणि आपण मात्र त्यांच्याजवळ जाण्याचा प्रयत्न हि न करतां पर्वताच्या पायथ्याशीं च बसून ऐकण्याची हांव धरली आहे!

**गुरु— माया सत्य जयासी वाटे। त्याचें ज्ञान परम खोटें।**
**माइक दृष्टांनें भेटे। परमात्मा केवी॥ २८॥**

**शिष्य—माया मिथ्या कैसी म्हणावी। प्राणीमात्रासी वेढा लावी।**
**सकळ रूप आपुलें दावी। प्रत्यक्ष आतां॥ २९॥**

**गुरु— प्रत्यक्षासी प्रत्यक्ष दिसे। अप्रत्यक्षा कोठें असे।**
**अप्रत्यक्षेंविण नसे। पूर्ण समाधान॥ ३०॥**

**शिष्य—पूर्ण समाधान तें कोण। मायेचें कैसें लक्षण।**
**ऐसें हें मज निरूपण। केलें पाहिजे॥ ३१॥**

**गुरु— अभिन्न तें चि समाधान। मायेचें मिथ्या लक्षण।**
**आत्मनिवेदनीं खूण। पावसील बापा॥ ३२॥**

**सद्गुरुवचन अंजन त्याला। माया भयानक न दिसे त्याला।**
**अभिन्नपणें आतमयाला। सर्वत्र देखे॥ ३३॥**

देव कांहीं आपणाहून निराळा नाहीं, तथापि त्याची ओळखण आपल्या अंतर्यामीं न पाहतां त्याच्या शोधार्थ शिष्य – अर्थात् मनानें – अष्टदिशा फिरला, वर अंतराळांत गेला, खालीं पाताळांत गेला, पुन्हा वर आला, अति शिणला, पण स्वरूपाचा कांहीं अंत लागला नाहीं, तेव्हां कष्टी होऊन बसला असतां श्रीसद्गुरुकृपेनें अकस्मात स्फूर्ति झाली !

**गेलें होतें ज्याचे शुद्धीसी । पाहे तव तें आपणा चि पासीं ।**
**मग तें विस्मीत मानसीं । आश्चीर्य करी ॥ ५३ ॥**
**जयासी इतुकें धुंडाळिलें । तें जवळि च देखिलें ।**
**आपणाकडे पाहों गेलें । तव तें चि आपण ॥ ५४ ॥**
**लवण अवघें सिंधु जालें । तैसें स्वरूपीं विरालें ।**
**तेणें गुणें जोडलें । धनासी धन ॥ ५५ ॥**
**ऐसी ही स्वरूपाची स्थिती । स्वानुभवी ते जाणती ।**
**पेसिये वस्तूची प्राप्ती । सद्गुरुबोधें ॥ ५६ ॥**

मुखोद्गत करून बोध होई तों ज्याचें अखंड चिंतन करावें, असें हें अवघ्या साठ ओव्यांचें गोड प्रकरण आहे.

## ( २ ) जुनाट पुरुष

ही जुनाट पुरुषाची कथा सांगण्याचें श्रीसमर्थांशिवाय कोणाचें सामर्थ्य आहे ? मागील प्रकरणांतील ब्रह्मज्ञान च, या हि प्रकरणांत, एक भव्य कल्पना करून, समजावून सांगितलें आहे.

सर्वसत्ताधारी, चालक, सूत्रधार असून हि ज्याचा एकान्त कधीं मोडला नाहीं, असें जें ब्रह्म, तो च जुनाट पुरुष होय. माया ही त्या पुरुषाची कन्या व काळ हा त्या कन्येचा पुत्र होय. कन्या आपल्या च नादांत खेळत असते, अनंतकोटी ब्रह्मांडांच्या उतरंडी रचीत असते आणि दमत असते. दमून जरा कोठें आंग टाकते तों तिचा पुत्र येऊन साऱ्या उतरंडी पाडीत आणि फोडीत असतो. कन्या जागी होऊन पाहाते तों सारा खेळ बाळानें उद्ध्वस्त करून टाकलेला तिच्या नजरेस पडतो. ती पुन्हा खेळ मांडीत बसते. तिला ना आई, ना पति. खेळतां खेळतां मध्यें च बापाची आठवण होऊन त्याच्याकडे जाते, तों इकडे काळ मोडण्याफोडण्याचें आपलें काम करीत च असतो. असा हा विलक्षण खेळ सारखा चालला आहे. आपल्याला हें जें ब्रह्मांड दिसत आहे, तें तिनें प्रस्तुत रचलेल्या उतरंडींतील एक बोळकें आहे व त्या बोळक्यांत तिनें कोट्यनुकोटी जीव सांठविले आहेत. त्या बोळक्यांतून ती

**प्राणी जावों नेदी बाहेरी । जीवऊन मागुतें मारी ।**
**चुकों नेदी येरझारी । वासनासूत्रें ॥ ३७ ॥**

**बहुत प्राणी केले गोळा । लाविला विषयटकळा ।**
**तेणें येती पूर्वस्थळा । स्वइच्छा प्राणी ॥ ३८ ॥**

**ऐसे गोविले चि गोवी । मारूनि मागुता जन्म दावी ।**
**तयेपासूनि सोडवी । ऐसा तो विरळा ॥ ३९ ॥**

या मायेच्या तडाख्यांतून केवळ विद्वत्तेच्या जोरावर किंवा बुद्धीच्या बळावर आपण सुटूं, अशी कोणीं घमेंड बाळगूं नये.

**बहुसाल वित्पत्ति आली । कां तें बुद्धि तीक्ष्ण जाली ।**
**परी समाधानाची किल्ली । ते वेगळी च आहे ॥ १६ ॥**

ती किल्ली कोणती ?

**समूळ अहंता विराली । हे चि समाधानाची किल्ली ।**
**जेथें वित्पत्तीसी निमाली । तीक्ष्ण बुद्धी ॥ १७ ॥**

ती किल्ली आपल्या हातीं कशी यावी ? पूर्वजांची पुण्याई पाहिजे, आपण साधनें केलीं पाहिजेत, सद्गुरुकृपा झाली पाहिजे !

पूर्वजांची पुण्याई पूर्वजांना ठाऊक, कृपा केव्हां करावयाची तें सद्गुरूला ठाऊक, साधनें करणें तेवढें आपल्या हातीं आहे, तीं आपण केलीं पाहिजेत. पुढच्या च प्रकरणांत तीं साधनें सांगण्यांत आलीं आहेत.

# ( ३ ) अंतर्भाव

या प्रकरणाचे सहा समास आहेत. त्यांत श्रीसमर्थांनीं नित्य नेम सांगितला आहे. मन मोकळें करून इतक्या खुलाशानें त्यांनीं दुसरीकडे कोठें साधनमार्ग आंखून दिल्याचें मला ठाऊक नाहीं. श्रीसमर्थांचे म्हणविणारांनीं हा नित्य नेम अक्षरशः पाळला पाहिजे.

**समास १ ला**—महाराज, संसारानें पीडलों आहें, काय केल्यानें मी या तापांतून सुटेन

**हें मज दातारें सांगावें । कृपा करूनी ॥ १० ॥**

**समास २ रा**—वेड्या, समाधान कांहीं कोठें दूर नाहीं, बसल्या जागीं तें सिद्ध च आहे, पण तूं देहबुद्धि उराशीं बाळगून बसला आहेस, म्हणून तूं त्रासला आहेस. साधनावांचून देहबुद्धि नष्ट होणार नाहीं. महाराज, सांगा.

**साधन तरी काय करूं ॥ १३ ॥**

**समास ३ रा**—ऐक, आधीं स्वधर्मरक्षण, पुढें अद्वैतश्रवण करून नित्य नेम चालवीत जा, म्हणजे तुझी चित्तशुद्धि होऊन तुजवर भगवत्कृपा होईल. महाराज, नित्य नेम कोणता करूं? ऐक,

**मानसपूजा जप ध्यान । येकाग्र करूनिया मन ।**
**त्रिकाळ घ्यावें दर्शन । मारुतीसूर्याचें ॥ ११ ॥**
**हरिकथानिरूपण । प्रत्यहीं करावें श्रवण ।**
**निरूपणीं ऊणखूण । केली पाहिजे ॥ १२ ॥**

( ऊणखूण = मनाशीं विचार किंवा इतरांशीं चर्चा ). शिष्य म्हणतो, महाराज, ऐकलें, पण हीं साधनें करतां करतां माझा जन्म चालला आहे, कोठवर आतां तीं करीत राहूं? समाधान होऊन माझ्या मागचीं हीं साधनें केव्हां सुटणार? मी सिद्ध केव्हां होणार?

**शिष्य म्हणे जी ताता । जन्म गेला साधन करितां ।**
**कोणे वेळे आतां । पावों समाधान ॥ १६ ॥**

**समास ४ था**—वेडा आहेस खरा च, अरे, साधनें केव्हां च सोडूं नयेत. सिद्ध होणें म्हणजे तूं काय समजतोस ? सिद्धाला खावें, प्यावें, निजावें लागत नाहीं का ? मग साधनांनीं च काय केलें आहे ? अरे,

**जो सिध्दांचा मस्तकमणी । माहां तापसी शूळपाणी ।**
**तो हि आसक्त श्रवणीं । जपध्यानपूजेसी ॥ ३ ॥**

**अखंड वाचे रामनाम । अनुष्ठाता हि परम ।**
**ज्ञानवैराग्यसंपन्न । सामर्थ्यसिंधु ॥ ४ ॥**

मनाच्या श्लोकांत पाहिलेंस ना ? असा ज्ञानवैराग्यसामर्थ्यसंपन्न महादेव

**तो हि म्हणे मी साधक ॥**

तेथें तुझ्यासारख्याची रे कथा काय ? म्हणून साधन कधीं सोडूं नये आणि नित्य नेमावांचून असूं नये, नाहींपेक्षां अंतीं निश्चित धोका आहे ! ‘ अंतीं धोका आहे ’ हे गुरूच्या मुखांतले शब्द ऐकून शिष्य दचकला, त्याला स्वतःचा च अंतकाळ दिसूं लागला आणि ‘ अंतीं मति ते चि गति ’ हा जनप्रवाद आठवून तो विचारिता झाला, महाराज, अंतीं हि अनुसंधान ढळणार नाहीं, हें कसें साधेल ?

या प्रश्नाचें उत्तर श्रीसमर्थांनीं उरलेल्या दोन समासांत दिलें आहे.

**समास ५ वा**—प्रथम त्यांचें सांगणें हें कीं, जन्म आणि मृत्यु हीं मुदलांत नाहींत च.

**जन्मला चि नाहीं अनंत । तयासी कैंचा येईल अंत ।**
**आदिअंतीं निवांत । तो चि तूं आवघा ॥ १४ ॥**

**जें जन्मलें चि नाहीं । त्यासी मृत्य चिंतिसी काई ।**
**मृगजळाच्या डोहीं । बुडों चि नको ॥ १९ ॥**

महाराज, आपण सांगत असतां तेव्हां समजत असतें, पण

**उठोनि जातां सर्वें चि मावळे । वृत्त मागुती ॥ २६ ॥**
**सांगा यासी काय करूं । मज सर्वथा न धरे धीरु ॥**

शिष्याची आतुरता पाहून, भक्तवत्सल श्रीसमर्थ, कंटाळा न करतां पुन्हा सांगतात.

**समास ६ वा**—याला उपाय एक च, जो पूर्वीं सांगितला तो च नित्य नेम लावून ध्यावा,

**पूर्वीं पडला जो अभ्यास। तो चि अंतीं निजध्यास॥**

म्हणून नित्य नेम जीवें भावें सांभाळावा, त्याची हेळसांड करूं नये, ऐक पुन्हा सांगतों :

**येकाग्र करूनियां मन। अंतरीं करावें ध्यान।**
**सर्व सांग पूजाविधान। प्रत्यहीं करावें॥ १९॥**

**नित्य नेमिला जो जप। त्रिकाळ दर्शनीं साक्षेप।**
**आदित्यमारुतीचें रूप। अवलोकावें॥ २०॥**

**हरिकथानिरूपण। प्रत्यईं करावें श्रवण।**
**हे चि जाणावी खूण। नित्य नेमाची॥ २१॥**

ध्यान, मानसपूजा, जप, आदित्यमारुतीचें त्रिकाळ दर्शन आणि ग्रन्थावलोकन अशीं हीं नित्य नेमाचीं पंचविध अंगें होत !

# ( ४ ) आत्माराम

श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेल्या प्रत्येक च शब्दांत श्रीसमर्थभक्ताला यांचें स्वरूप प्रतीत झालें पाहिजे, मग त्यांतल्या त्यांत आत्माराम आणि दासबोध या दोन ग्रन्थांविषयीं तर बोलावयास च नको, कारण हे दोन ग्रन्थ म्हणजे साक्षात् आपलें च स्वरूप होय, असें त्यांनीं स्वतः म्हटलेलें प्रसिद्ध आहे. त्या दोन ग्रन्थांपैकीं प्रस्तुतचें काव्य हा एक ग्रन्थ होय. एकवीससमासी दासबोधानंतर आत्माराम ग्रन्थ निर्माण झाला.

**दासबोधींचे समासीं। निर्मूळ केलें मीपणासी ॥ १–२० ॥**

हा या काव्यांतील उल्लेख एकवीससमासीला अनुलक्षून आहे. एकवीस-समासींतील तेरावा समास 'मीपणाचा समास' होय व त्याला उद्देशून वरील उल्लेख आहे. एकवीससमासी म्हणजे आरंभींचा दासबोध ग्रन्थ होय, हें हि यावरून सिद्ध होतें ; असो.

शिष्यानें विचारिलें नसतां त्याच्या कल्याणाची चिंता वाटून श्रीसमर्थ 'आत्माराम' या काव्यांत त्यास गुह्य ज्ञान सांगण्यास आपण होऊन प्रवृत्त झाले आहेत.

**तुवां आशंका नाहीं घेतली। परंतु मज तुझी चिंता लागली।**
**कां जे तुझी भ्रांती फिटली। नाहीं च अद्यापि ॥ १–१९ ॥**

असें म्हणून एकदम आरंभ करतात :

**अरे तूं कोण कोणाचा। कोठून आलासी कैंचा।**
**ऐसा विवेक पूर्वींचा। घेई बापा ॥ १–२५ ॥**
**अरे तां जन्मांतर घेतलें। काय मानितोसी आपुलें।**
**ऐसें तुवां विचारिलें। पाहिजे आतां ॥ २६ ॥**
**येथें तुझे कोणी च नाहीं। भुलला आहेस काई।**
**चुकोनी आलासी जाई। जेथींचा तेथें ॥ २७ ॥**

कशी निरपवाद विचारसरणी आणि एकदम श्रोत्याच्या हृदयांत प्रवेश करणारी ही भाषा आहे !

**तूं समर्थाचें लेंकरु । अभिमानें घेतला संसारु ।**
**अभिमान टाकितां पैलपारु । पावसील बापा ॥ २८ ॥**
**ईश्वरापासून जालासी । परी तूं तयासी चुकलासी ।**
**म्हणोनी हें दुःख भोगिसी । वेगळेपणें उत्कट ॥ २९ ॥**

तेव्हां तुझें जें मूळचें ठिकाण तेथें गेल्यावांचून तुला सुख लागणार नाहीं ! श्रीसमर्थ म्हणतात, मी तुला त्या ठिकाणीं नेऊन पोंचवीन, पण त्याबद्दल तूं मला काय देणार ? मला फार नको आहे—

**जितुकें कांहीं नासोन जाईल । जें अशाश्वत असेल ।**
**तुज समागमें न येल । तितुकें च द्यावें मज ॥ ३२ ॥**

या एका ओवीचा दूरवर पोंचणारा अर्थ समजेल आणि त्याप्रमाणें वागण्याची मनाची तयारी होईल, तर गुह्य ज्ञान व्हावयाचें कोठें शिल्लक राहणार आहे ? श्रीसमर्थ पुढें म्हणतात, अरे, तें तुझ्यापासून घेऊन मला तरी तें काय करावयाचें आहे, तुझ्यापासून तें टाकवावें, एवढा च माझा हेतु आहे.

श्रीसमर्थ काय मागत आहेत याचा फारसा विचार न करतां, शिष्यानें एकदम उत्तर केलें, देतों, दिलें. त्याचा अविचार पाहून स्वामी हि तितक्या च तत्परतेनें म्हणाले, बरें तर, तुझें पद हि तुला प्राप्त झालें, असें समज. आपल्यांत कांहीं फरक पडला नाहीं, आपण होतों तसे च आहोंत, हें पाहून, जरा शुद्धीवर येऊन शिष्यानें नम्रपणें म्हटलें, महाराज, काय देऊं, काय टाकूं, तें मला कृपा करून उलगडून सांगावें. दृष्टान्त देऊन श्रीसमर्थ सांगतात :

**अग्निसंगें लोहो पिटे । पिटतां तयाचा मळ तुटे ।**
**मग परिसेसीं झगटतां पालटे । लोखंडपण तयाचें ॥ ७ ॥**
**तयाचा मळ जळेना । आणि अभ्यांतर कळेना ।**
**तरी तें सहसा पालटेना । मृत्तिकारूपें ॥८ ॥**
**म्हणउनि नाशिवंत तितुका मळ । तुवां तजावा अमंगळ ।**
**तो गेलिया तूंच सकळ । आहेस बापा॥ ९ ॥**

असें म्हणून 'अहं' या प्रथम स्फुरणापासून तों स्वतः शिष्यापर्यंत सारा मायेचा च विस्तार कसा आहे, तो श्रीसमर्थांनीं समजावून सांगितला आहे. दृश्य आणि अदृश्य, सारी माया.

**नाशिवंत तें तूं जाण माया ॥**

शिष्या, तूं हि त्या मायेंत च आलास. तेव्हां आतां कशाची आशा न ठेवतां सर्वस्व मदर्पण कर आणि नंगनिःसंगातीत होऊन राहा. हें कसें राहतां यावें, तें समजावें म्हणून श्रवणमननादि साधनें केलीं पाहिजेत! कांहीं न करतां शिष्यांना एकदम ज्ञानी व्हावयास पाहिजे असतें. साधनांचें नांव काढलें म्हणजे त्यांचें डोकें उठतें. अंतर्भावांत आपण पाहिलेंच. येथें हि श्रीसमर्थांनीं साधनें करावयास सांगतां च शिष्य म्हणतो, महाराज, सर्व नाशिवंताचा मजकडून त्याग करविलात आणि फिरून साधनें च करावयास सांगतां ? असें शिष्य म्हणतां च एका शब्दानें स्वामींनीं त्याचें तोंड बंद केलें. सर्व नाशिवंत मदर्पण केलेंस, मग मला हा उलट प्रश्न विचारणारा तूं निराळा कोण चोरून राहिलास ? शिष्य उमगला, श्रीसमर्थांच्या मुखानें झालेला मायाब्रह्माचा उलगडा त्यानें ऐकला. तेव्हां शेवटच्या समासांत कबुली देता झाला :

**मी संसारींहून सुटलों । मी पैलपार पावलों ।**
**मी च सकळ विस्तारलों । सर्वा भूतीं ॥ ५-४ ॥**

**मी करून अकर्ता । मी परेहून पर्ता ॥**
**मजमध्यें वार्ता । मीपणाची नाहीं ॥ ५ ॥**

याप्रमाणें

**जें स्वामीच्या हृदयीं होतें । तें शिष्यासी बाणलें अवचितें ॥ ६ ॥**

असा हा श्रीसमर्थहृदयाचा कणवाळुपणा आहे !

# ( ५ ) पंचसमासी

श्रीसमर्थकृत सारीं च लघु काव्यें सारखीं च गोड आणि महत्त्वाचीं असल्यामुळें हें गोड आणि तें गोड असें वारंवार आणि वेगळें वेगळें म्हणण्याची आवश्यकता नाहीं.

**क्षय चि नाहीं कल्पांतीं । येक चि स्वयें आदिअंतीं ।**
**ऐसें सुख कृपामूर्ती । प्रगट कीजे जी ॥ १–१५ ॥**

अशी शिष्याची प्रार्थना. तें सुख, तो आनंद, तें शुद्ध ज्ञान, श्रीसमर्थहृदयींचें परम गुह्य श्रीसमर्थांनीं या काव्यांत प्रकट केलें आहे.

आरंभीं त्यांनीं पाषांडाचा धिक्कार केला आहे. पाषांड हें दिसण्यांत ज्ञानासारखें च दिसतें, म्हणून पुष्कळ शहाणे या पाषांडाच्या पायीं स्वतःची फसवणूक करून घेत असतात व इतरांस भुरळ पाडीत असतात.

**जें शास्त्रबाह्य घडलें । संतमहंतासी विघडलें ।**
**तें ज्ञान चि परी पडिलें । पाषांडमतीं ॥ १–२२ ॥**

ही पाषांडाची व्याख्या लक्षांत ठेवण्यासारखी आहे. याप्रमाणें पाषांडाचा निषेध करून श्रीसमर्थांनीं

**सस्वरूपीं सावधपण । हें चि ज्ञानाचें लक्षण ॥ २–४ ॥**

सांगितलें आहे. तें सावधपण ढळलें म्हणजे मोह, ममता, अहंता, यांचा मनावर पगडा बसून जन्मभर ' माझें माझें ' सुरू होतें. ती विषयासक्ति नाहींशी होऊन

**आपण आत्मा चि तत्वता ॥ २–२२ ॥**

ही खूण बाणली पाहिजे.

ती कशी बाणावी ? शिष्याला किती हि अवघड वाटत असलें तरी साधनावांचून अन्य मार्ग नाहीं. साधनें केल्यावांचून नुसत्या बोलण्यानें कधीं हि ज्ञान होणार नाहीं. झालेंसें वाटलें तर ती केवळ फसवणूक होय.

चांगले थोर थोर लोक याप्रमाणें आपली फसवणूक करून घेत असल्याचें आपण पाहात असतों.

**म्हणोनि जाणते पुरुषीं । सोडूं नये साधनासी ।**
**नाडूं नये आपणासी । सिद्धपणें सर्वथा ॥ ३–१६ ॥**

असले शाब्दिक सिद्ध म्हणजे पाषांड आपल्या स्वतःचा आणि इतरांचा कसा घात करतात, हें समजण्यासाठीं

**तैसा मी सिद्ध ऐसें कल्पुनी । नित्य नेम न धरी मनीं ।**
**तत्पर होये अशनीं शयनीं । आत्महत्यारा ॥ ३–२१ ॥**

इत्यादि ओव्या अवश्य पाहाव्या. त्यांची शाब्दिक ज्ञानाची घमेंड अगदीं सीगेला पोंचलेली असते !

**जप कोणाचा करावा । नेम कोणाचा धरावा ।**
**आवघा आत्मा च, भजावा । कोण सद्गुरु ॥ ३–२३ ॥**

अशा अहंकारांत ते बुडालेले असतात.

तात्पर्य, साधनें कधीं सोडूं नयेत.

**व्हावया ज्ञानाची प्राप्ती । आधीं केली पाहिजे भक्ती ॥ ४/२ ॥**

ती नवविधा आहे. ती घडली म्हणजे शुद्धज्ञान होतें. शुद्धज्ञान झालें म्हणजे वैराग्य प्राप्त होतें आणि वैराग्याच्या योगानें वासनात्मक लिंगदेहाचें निरसन होतें.

हें सारें श्रवण होत असतां शिष्याच्या वृत्ति तल्लीन होऊन त्याच्या मुखांतून उद्गार निघतात

**वाटे येकांतासी जावें । पुन्हां हें चि अनुभवावें ।**
**उगें चि निवांत असावें । कल्पकोडी ॥ ४–२६ ॥**

**नको वक्तृत्व उपाधी । स्वरूपीं पांगुळली बुद्धी ।**
**लागली सहज समाधी । हेतुरहित ॥ २७ ॥**

**गुरु शिष्य येक चि जाले । अनुभवबोधीं बुडाले ।**
**तयाचे शुद्धीस जे गेले । तयासी ते चि गती ॥ २८ ॥**

अशा पुरुपाला सर्वत्र राम च कसे दिसतात, हें पाहावयाचें असल्यास पांचवा समास संपूर्ण वाचावा. या सर्वांचें मूळ श्रीसद्गुरुचरण आणि सत्संग होय. श्रीसमर्थ इषारा देतात :

**सद्गुरूसी जातां शरण । सीघ्र चि तुटे जन्ममरण ।**
**सर्व मनोरथ पूर्ण । होती वचनमात्रें ॥ ५-२७ ॥**

**सकळ श्रोतीं सावध होणें । अंतीं येकलें लागेल जाणें ।**
**येथील येथें राहिलीं स्वजणें । आणि संपत्ती ॥ ३१ ॥**

**बहुतां जन्माचा शेवटीं । नरदेह आला पुण्य कोटी ।**
**येथें भगवंतांची भेटी । होत आहे सत्संगें ॥ ३२ ॥**

**ऐसी खूण सकळांस । सांगोन गेला ( ले ) रामदास ।**
**सत्संगें जगदीश । नेमस्त भेटे ॥ ३३ ॥**

## ( ६ ) सप्तसमासी

या समासीचे सात हि समास स्फुट आहेत, म्हणजे एका समासाचा दुसऱ्या समासाशीं कांहीं संबंध नाहीं. सात हि समास स्वतंत्र आहेत. हे सात समास घेऊन, त्यांत आणखी तीन समासांची भर घालून त्यांचा 'एकविसावा दशक' बनवून कोणा प्रकाशकानें प्रसिद्ध केला होता. पण असा एकविसावा दशक श्रीसमर्थांनीं कधीं लिहिला च नव्हता. या सात समासांचे विषय पुढीलप्रमाणें आहेत.

( १ ) यांत दीपप्रकाश आणि मतिप्रकाश यांचें वर्णन आहे. दीपप्रकाशाला पदार्थप्रकाश म्हटलें आहे व मतिप्रकाशाला अंतरात्म्याचा ज्ञानप्रकाश म्हटलें आहे. पदार्थप्रकाश दृष्टीला दिसतो, आत्मप्रकाश मनाला भासतो. आत्मप्रकाश म्हणजे ज्ञानस्फूर्ति. त्याला जगज्जोती म्हटलें जातें, म्हणून त्यांत कांहीं ज्योत आहे, असा अर्थ नव्हे. हें समजावून सांगतांना श्रीसमर्थांनीं एक दृष्टान्त दिला आहे, तो त्यांच्या स्वतःच्या चरित्रांतील च आहे. त्यामुळें त्याकडे मन वेधतें.

**पर्वत कोरून स्थळ काढिलें । तेथें नाना प्रकाशा ठेविलें ।**
**आणि द्वार बोढून घेतलें । मग बाहेरी प्रकाश कैचा ॥ २७ ॥**

श्रीसमर्थांना घर सुचलें नाहीं, पर्वत कोरून स्थळ काढलेलें म्हणजे डोंगरांतील घळ सुचली, कारण त्यांचें वास्तव्य बहुधा घळींत च होई व घळींत च लेखनक्रिया हि चाले. अशा घळींत

**तेथें जरी ठेविलें पुरुषा । तरी प्रकाश जातो दाही दिशा ।**
**द्वार आत्म्याच्या प्रकाशा । लागत नाहीं ॥ २८ ॥**

असा हा घळींत बसून दाही दिशांना आपल्या मतीचा प्रकाश पाडणारा महापुरुष श्रीसमर्थांशिवाय दुसरा कोणता ?

ब्रह्म या सर्वांहून विशेष आहे, तेथें प्रकाश वगैरे कांहीं नाहीं.

( २ ) या समासांत, देह कशाच्या बळावर चालतो, हें सांगण्यास सुरुवात करून, ब्रह्मांडाच्या उत्पत्तीकडे श्रीसमर्थ वळले आहेत. संकल्प म्हणजे इच्छा ही त्यांनीं महान शक्ति ठरविली आहे. सर्व सामर्थ्याचें मूळ

संकल्पांत आढळतें. जगदीशाचें सामर्थ्य, रामकृष्णादि अवतारांचें सामर्थ्य अगस्त्यादि ऋषींचें सामर्थ्य वेगवेगळें व कमी अधिक आढळतें, याचें हि कारण संकल्प च होय, असें प्रतिपादन करीत असतां

**आतां हि उदंड होतें ।**

असें म्हणतांना ते स्वतःचें च सामर्थ्य सांगत आहेत, असें मला स्पष्ट भासतें.

**आतां हि उदंड होतें । कल्पिल्यासारिखें घडतें ।**
**काळ साहे होत जातें । इच्छेसारिखें ॥ ३३ ॥**

**रंकाचे होती राजे । सामर्थ्य भूमंडळीं गाजे ।**
**अद्भुत कीर्ती उदंड माजे । देखत देखतां ॥ ३४ ॥**

( ३ ) या समासांत बंद म्हणजे नियम, शिस्त, मर्यादा, नियंत्रण याचें वर्णन आहे. स्मरणाचा बंद गेला म्हणजे मनुष्याला वेड लागतें, राजा बंद राखेनासा झाला म्हणजे देशाचा नाश होतो, घराचा दरवाजा बंद केला नाहीं तर चोर आंत शिरतात, मुंजिबंधन नाहीं केलें तर ब्राह्मण्य भ्रष्ट होतें, शरीराचा बंद ढळला म्हणजे फजिती होते, तद्वत् च साधन हें च परमार्थाचें बंधन होय, तें सुटलें कीं परमार्थ हि कोठला, इत्यादि उदाहरणें देऊन सामाजिक आणि धार्मिक बंधनें झुगारून देण्यांत घात आहे, असें श्रीसमर्थ बजावीत आहेत.

**शास्त्राधार अवघा सोडिला । म्हणिजे प्राणी पाषांडी जाला ।**
**मग कोण गती तयाला । कळत चि आहे ॥ १३ ॥**

समाज निर्नायक होऊन स्वेच्छाचारी बनला म्हणजे त्याला कोण वाचवूं शकणार ! कालमहिमा म्हणावयाचा !

**कैसी आली पापकळी । पतिव्रतेसी हासे मोकळी ।**
**भल्या मनुष्याची टवाळी । नष्ट लोक करिती ॥ १८ ॥**

**जो कर्मापासून चेवला । तो चि हासे सुशीलाला ।**
**कित्येक लोक भरंगळला । अधर्माकडे ॥ १९ ॥**

राष्ट्राचा घात टळावा असें वाटत असेल, तर जाणत्यानें पवित्रपणाचा, कर्माचरणाचा, धार्मिक बंधनांचा कंटाळा करूं नये !

**हें किती म्हणोनि सांगावें । ज्यासी जें रुचेल तें बरवें ।**
**परी केल्या कर्माचें फळ भोगावें । लागेल पुढें ॥ १६ ॥**

(४) अनादि ब्रह्म आणि अनादि च परंतु मिथ्या अशी माया, यांचें स्वरूप या समासांत वर्णिलें आहे.

**शाश्वतपणें अनादि ब्रह्म । नासिवंतपणें अनादि भ्रम ।**
**अवघें चि अनादि वर्म । कळलें पाहिजे ॥ ८ ॥**

(५) या समासांत संग आणि निःसंग, विकार आणि निर्विकार, सार अणि असार यांचें विवेचन जसें थोडक्यांत अत्यन्त सुलभ रीतीनें केलें आहे, तसें दुसरीकडे आढळावयाचें नाहीं. त्यांचा विचार एकांतांत करावा.

**जयास येकांताची आवडी । येकांत सेवी घडीनें घडी ।**
**येकांतीं परमार्थ उघडी । विवेकाचा ॥ ९ ॥**

**उपाधी करितां योग । घडत नाहीं येथासांग ।**
**म्हणोनि करिती त्याग । उपाधीचा ॥ १० ॥**

परंतु एकवार विचाराची बैठक दृढ झाली म्हणजे मग उपाधी बाधक होण्याचा संभव नसतो. किंबहुना मग,

**उपाधीमध्यें चि असावें । परी विवेकें निघोनि जावें ।**
**मनापासून नसावें । उपाधीमध्यें ॥ १८ ॥**

**मनोगत अवघें परब्रह्मीं । शरीर वर्ते मायाभ्रमीं ।**
**तयास संसार उर्मी । बाधूं न सकती ॥ १९ ॥**

याला दृष्टांत देऊन समजावून सांगतात :

**ठेवणें अवघें वांचलें । वरील वरदळेनें गेलें ।**
**तरी तयाचें काये गेलें । कांहीं च नाहीं ॥ २० ॥**

जमिनींत पुरलेलें द्रव्य कायम राहून वर किती हि वरदळ झाली, तरी द्रव्य कांहीं कमी होत नाहीं.

**तैसी वरदाळ हे उपाधी । परमार्थाची सदृढ बुद्धी ।**
**त्याची जाली कार्यसिद्धी । सकळ कांहीं ॥ २१ ॥**

( ६ ) इतरत्र अनेकदां केलेला आणि सोडविलेला प्रश्न

**निर्गुण निर्विकार संचलें । कदापि नाहीं विकारलें ।**
**तरी हें येवढें उभारलें । कासयाचें ॥ १ ॥**

असा प्रश्न करून

**मूळ संकल्पीं अवघें आलें । त्या अवघ्याचें अवघें जालें ।**
**अष्टधा प्रकृतीचें बळावलें । सचराचर ॥ ३ ॥**

असें त्याचें उत्तर देऊन

**जाणिवेचा मूळ संकल्प ॥ ४ ॥**

च कसा परिणत होत गेला व त्यानें पिंड आणि ब्रह्मांड हीं कशीं व्यापिलीं आहेत, याचें सुलभ विवेचन या समासांत वाचावयास मिळतें.

**ब्रह्मा विष्णु आणि हर । तेतिस कोटी सुरवर ।**
**अठ्याशी सहस्र ऋषेश्वर । सामर्थ्यरूपी ॥ ११ ॥**

**देहे धरायास मोडायास । तयास न लगती सायास ।**
**वायोरूपें सावकास । विचरती सदां ॥ १२ ॥**

**देव देवता देवतें भूतें । वायोचक्रीं असंख्यातें ॥ १५ ॥**

ह्या आपल्या विश्वासाच्या गोष्टी सूक्ष्मदृष्टीनें पाहण्यास सांगून

**मुळींची जाणीव चालिली । ब्रह्मांडींची पिंडास आली ।**
**नाना काया वर्तली । जाणीवरूपें ॥ १९ ॥**

**जे जे प्राणी मरोन जाती । वायोमध्यें वासना फिरती ।**
**गती आणि अवगती । कर्मानुसार ॥ २२ ॥**

हे सिद्धान्त श्रीसमर्थांनीं प्रस्थापित केले आहेत.

( ७ ) पाट बांधून काढून नदीचें पाणी तळीं आणि कालवे यांच्याकडे वळवून आणून त्यापासून नाना तऱ्हेचीं पिकें जर काढलीं नाहींत तर तें पाणी जसें निरर्थक वाहात जातें, तद्वत्

**तैसें हें आपुलें वय । विवेकेंविण वेर्थ चि जाये ।**
**विवेकी ते येथान्वयें । स्वहित साधिती ॥ ४ ॥**

याप्रमाणें श्रीसमर्थांना उपदेश करण्याची त्या काळीं काय आवश्यकता भासली, सांगतां येत नाहीं. पण सांप्रत काळीं महाराष्ट्रांतील शिक्षित तरुण मंडळी श्रीसमर्थांच्या या उपदेशाकडे लक्ष पुरवितील तर त्यांचें तर हित होईल च, पण राष्ट्रावर त्यांचे केवढे उपकार होतील.

तरुणांनीं कोणता विवेक करावा, म्हणून श्रीसमर्थांचें सांगणें आहे ?

**येहलोक आणि परलोक । उभयलोकीं सार्थक ।**
**शुद्ध ज्ञान शुद्ध विवेक । यासी म्हणावें ॥ ८ ॥**

**इहलोक म्हणिजे संसार करावा । नाना येत्नें आटोपावा ।**
**लोकांमध्यें मिरवावा । पुरुषार्थ आपुला ॥**

त्याला श्रीसमर्थांची ना नाहीं.

**कन्यापुत्र योग्य जाले । समर्थ सोईरे पाहिले ।**

पण त्याबरोबर च

**ब्राह्मण्य विधियुक्त चाले । स्वहा स्वधा ॥ ९ ॥**
**लोक म्हणती भला भला । इतुकेन येहलोक साधला ।**

लोकांकडून भले म्हणवून घेतलें म्हणजे इहलोक साधला, असें म्हणतां येईल, पण

**आतां परलोक तो हि आणिला । पाहिजे मनां ॥ ११ ॥**
**जेणें सकळ निर्माण केलें । त्यास पाहिजे वोळखिलें ।**
**मुख्य देवास चुकले । त्या परलोक कैंचा ॥ १२ ॥**
**पुनरागमन नाहीं चुकलें । तरी जन्मास येउनी काये केलें ।**
**पुढें लिगाड लांबलें । जन्ममृत्याचें ॥ २० ॥**
**ऐसें जालें न पाहिजे । कोण्ही येकें स्वहित कीजे ।**
**मुख्य परमेश्वरासी पाविजे । म्हणिजे बरें ॥ २३ ॥**

असा बहुमोल उपदेश या समासांत केलेला मीं संक्षेपानें सांगितला, तो कृपा करून सर्वांनीं मुळावरून पाहावा.

सप्तसमासीचे सात हि समास स्वतंत्र असून महत्त्वाचे आहेत. ते सर्व च मुळावरून मननपूर्वक वाचण्याची बुद्धि वाचकांस झाल्यास मला उपकार वाटतील.

---

## ( ७ ) सगुणध्यान

या ११९ ओव्यांच्या प्रकरणाचे तीन भाग पडतात. पहिला भाग १ ते ४० ओव्यांचा, त्यांत श्रीरामाच्या सगुणमूर्तीचें साद्यंत आणि विस्तृत वर्णन आहे. या च तऱ्हेचें वर्णन स्फुट ओव्यांत, रामायणांत व इतरत्र आलेलें आहे. जांब, चाफळ, सज्जनगड येथें ज्या मूर्ती आहेत, त्यांना हें वर्णन लागू पडत नाहीं. मग हें वर्णन कोणत्या मूर्तीचें ? याचें माझें उत्तर असें आहे, श्रीसमर्थांना वयाच्या अकराव्या वर्षीं जांबेस च ज्या स्वरूपांत श्रीरामानें दर्शन दिलें, त्या स्वरूपाचें हें वर्णन होय. त्या प्रसंगाचें जें वर्णन स्वानुभवदिनकरांत आलें आहे, त्याच्याशीं हें वर्णन बहुतांशीं जुळतें.

दुसरा भाग ४१ ते १०४ ओव्यांचा, त्यांत श्रीराम सिंहासनाधिष्ठित असतां जें वैभव होतें त्याचें वर्णन आहे. त्यांत हि ४१ ते ५० मंडपाचें वर्णन आहे, ५१ ते ७८ थाटमाटाचें व जमलेल्या मंडळीचें आणि त्यांच्या कार्यक्रमाचें वर्णन आहे व ७९ ते १०४ कीर्तन, सभा, आरती यांचें वर्णन आहे. यांत हि मला एक कल्पना सुचवावयाची आहे. ५१ ते ७८ जें वैभव वर्णिलें आहे, तें श्रीसमर्थ कोठें पाहावयास गेले होते ? मला वाटतें, १५९६ च्या ज्येष्ठ शु. १३ ला जो थाट रायगडावर जगाच्या नजरेस पडला त्याचें च हें वर्णन असावें.

तिसरा शेवटचा, पण तितक्या च महत्त्वाचा भाग १०५ ते ११९ ओव्यांचा, यांत श्रीरामनामाची अपूर्व महती श्रीसमर्थांनीं वर्णिली आहे. त्यांतील रामाचें गुणवर्णन इतकें प्रेमभरानें केलेलें आहे व नाममाहात्म्य इतकें निक्षून सांगितलें आहे कीं, या पंधरा ओव्या पाठ करून नित्य म्हणाव्या, असें मला वाटतें. पैकीं श्रीसमर्थांचें प्रतिज्ञापूर्वक निक्षून जें बोलणें आहे, तें वाचकांच्या नजरेस या क्षणीं च पडलें पाहिजे, असें मनांत आल्यामुळें येथें सादर करतों. उधार कशास ठेवूं ? तुम्ही कोणी हि असा, मोठे ज्ञानसंपन्न असा, वैराग्यशील असा, महान् भगवद्भक्त असा, जीवन्मुक्त साधु असा, किंवा बिचारे भोळे भावडे भक्त असा, तुम्ही कोणी हि आणि किती हि लहान मोटे असा, तुम्हां सर्वांस श्रीसमर्थ निश्चयपूर्वक बजावीत आहेत :

हो कां ज्ञाते विरक्त भक्त । हो कां साधु जीवन्मुक्त ।
हो कां भाविक साबडे भक्त । नामेंवीण वृथा ॥ ११३ ॥
सकळांमध्यें थोर । तो नाम जपे शंकर ।
तेथें मानव ते किंकर । बापुडे किती ॥ ११४ ॥

त्या नामस्मरणाची फलश्रुति श्रीसमर्थ स्वानुभवानें सांगतात, ती ऐका—

नामें होय चित्तशुद्धी । नामें तुटे देहबुद्धी ।
नामें होय कार्यसिद्धी । निजध्यासें ॥ ११५ ॥
नामें स्वहित फावे । नामें निश्चयो दृढावे ।
नामस्मरणें सीघ्र पावे । देवाधिदेव ॥ ११६ ॥
ऐसें हें रामनाम । परम गुह्य विश्रामधाम ।
मथून काढिलें वर्म । शतकोटीचें ॥ ११७ ॥

अजून तरी सावध व्हा आणि श्रीसमर्थ आपल्या हृदयांतील परम गुह्य सांगत आहेत, तें ऐका :

सावध ऐका श्रोते जन । परम गुह्य माहां गहन ।
नाममात्रें होती दहन । पापरासी ॥ ११८ ॥

इतक्या उपर हि संशय आमचा पिच्छा सोडणार नाहीं, तर आपल्या कर्माचे आपण च धनी होऊं !

येदर्थी संशयो धरी । तो माहां पापी दुराचारी ।
तयास प्राप्त येमपुरी । विकल्पें होये ॥ ११९ ॥

---

## ( ८ ) निर्गुणध्यान

श्रीरामाच्या सगुणरूपावर निर्गुणध्यान रूपक आहे. त्याचा शेवट ऐक्यांत केला आहे.

**रामलक्ष्मण सीता । भरत शत्रुघ्न हनुमंता ।**
**सकळ भक्तांसी ऐक्यता । भेटी जाली ॥ १७० ॥**
**मागा जाले आतां होती । होउनी नाहीं पुनरावृत्ती ।**
**ऐसी अभंग ऐक्यस्थिती । वर्तत्यासहित जाली ॥ १७१ ॥**
**सकळ हि भक्त मिळाले । हरिहर ब्रह्मादिक आले ।**
**ऐक्यरूपें राम चि जाले । रामेंसहित ॥ १७२ ॥**

प्रकरण काव्य या दृष्टीनें आधुनिकांनीं हि अवलोकन करण्यासारखें आहे. तें समजण्याला कठीण नाहीं, पण जगदाद्यकारणाशीं एकरूप झालेला अनुभवी महापुरुष ब्रह्मज्ञानविषयक जे बोल काढतो ते समजले तरी प्रत्ययास येणें अति दुर्घट होय. तथापि, हें नुसतें शब्दज्ञान घेऊन काय करावयाचें आहे, असें हि म्हणूं नये. शब्दज्ञान हवें च, पण त्याबरोबर क्रिया हवी, श्रवण-मननादि साधनें हवींत, आचारविचार हवा, सद्गुरुकृपेनें बोध व्हावयाचा तेव्हां होईल, हा विश्वास असावा. दुसरा मार्ग नाहीं.

**श्रवण मनन निजध्यास । साक्षात्कारें जडे विश्वास ।**
**परमानंद सावकास । होइजे स्वयें ॥ १५५ ॥**
**मुमुक्ष साधक सिद्ध जाले । ते हि येणें चि मार्गें गेले ।**
**निखळ सुखें सुखावले । महानुभाव ॥ १५६ ॥**
**योगी वीतरागी उदास । चतुर्थाश्रम जो संन्यास ।**
**दिगंबर नाना तापस । येणें चि मार्गें ॥ १५७ ॥**
**जोगी जंगम आणि सोपी । फकीर कलंदर नानारूपी ।**
**येणें चि मार्गें स्वरूपीं । पावन होती ॥ १५८ ॥**
**ऋषी मुनी आणि सुरवर । आदिकरूनिया हरिहर ।**
**येणें चि मार्गें पैलपार । पावती सकळ ॥ १५९ ॥**

त्या च मार्गानें, विश्वास ठेवून, आपण हि जावें. तो मार्ग सोडून, भोंदूंच्या किंवा पाखंड्यांच्या नादीं लागून, आडमार्गानें जाण्यानें आपलें कल्याण होणार नाहीं !

# ( ९ ) मानसपूजा

या काव्याचे लहान लहान तेरा समास आहेत. त्यांत मानसपूजा वर्णिली आहे. पण मला वाटतें, कोणाच्या मनांत कधीं हि न आलेली व न येणारी अशी ही भव्य आणि व्यापक मानसपूजा आहे. ताम्हनांत स्नान करणाऱ्या किंवा कांचेच्या आड चौकटींत बसणाऱ्या देवाची ही पूजा नसून एकाद्या सिंहासनाधिष्ठित राजाचें वैभव जसें असावें त्याहून शतपट वैभवशाली अशा ब्रह्मांडनायकाची ही पूजा होय. या काव्यांत ती मनानें केलेली असेल, पण मला वाटतें, तशी पूजा, श्रीसमर्थकालीं चाफळास श्रीरामाची प्रत्यक्ष होत असावी. पहिल्या समासांतील वर्णन त्या वेळच्या चाफळचें असावें ! तें वाचा आणि आजचें चाफळ जाऊन पाहा ! ज्या शहरीं देवाचें वास्तव्य तें शहर कसें असावें व त्या काळीं चाफळ कसें होतें, याची कल्पना या समासावरून होते. या एकंदर काव्यावरून च श्रीसमर्थांच्या व्यापकपणाची, चौकसपणाची, प्रगल्भ बुद्धीची, महत्त्वाकांक्षेची, दक्षतेची, शिस्तीची इत्यादि त्यांच्या आंगच्या अनेक गुणांची आपणांस कल्पना होते.

कांहीं बाडांतून या तेरा समासांचीं नांवें आढळतात. समासांतील वर्णनावरून तीं कोणीं तरी ठेवलेलीं असावींत. तीं उद्बोधक आहेत. तीं अशीं – १ स्थळ, २ पारपत्य, ३ स्वयंपाकिणी, ४ सामग्री, ५ पात्रें, ६ फलाहार, ७ स्वयंपाक, ८ देवार्चन, ९ वाढणें, १० भोजन, ११ समारंभ, १२ सायंकाळपूजा आणि १३ विसर्जन. सकाळपासून पहिल्या सात गोष्टी व्हाव्या तेव्हां आठव्यांत दुपारीं देवार्चनाची वेळ येते व तेराव्यांतील विसर्जनाला मध्यरात्र उलटून जाते ! या तेरा समासांत कांहीं बाबी इतक्या सूक्ष्म आहेत कीं, त्या हि श्रीसमर्थांना ठाऊक असाव्यात व त्यांच्या नजरेंतून त्या निसटूं नयेत, याचें नवल वाटतें. त्या मी येथें देत नाहीं. त्यासाठीं वाचकांनीं च मूळ प्रकरण अवलोकावें, अशी विनंति करतों. पहिल्या तीन समासांत मला थोडासा इतिहास भासतो, म्हणून तेवढ्यापुरता त्या तीन समासांचा विचार करतों.

पहिल्या समासांतील वर्णन मी चाफळचें मानतों. असें मनोहर स्वरूप श्रीसमर्थांनीं चाफळला प्राप्त करून दिलें होतें.

**ऐसीं स्थळें परोपरीं । नाना युक्ती कळाकुसरी ।**
**निष्काम बुद्धीनें करी । धन्य तो साधु ॥ ११ ॥**

मठामठांत जे पारपत्याधिकारी असतात त्यांच्या ठिकाणीं कोणते गुण असावेत ते दुसऱ्या समासांत सांगितले आहेत. श्रीसमर्थांच्या वेळीं त्यांच्या मठांचा पारपत्याधिकार महाबळेश्वरचे दिवाकर गोसावी यांच्याकडे असे. दिवाकर हे जसे महाबळेश्वरचे राहणारे आहेत, तशी त्यांची बुद्धि हि महाबळ आहे, असा त्यांचा गुणगौरव प्रत्यक्ष श्रीसमर्थांनीं केला होता. म्हणून मी म्हणतों, दिवाकरांकडे पाहून च या समासांतील पारपत्याधिकाऱ्याचें गुणवर्णन श्रीसमर्थांनीं केलेलें असावें.

**अगाध अवेग्र धारणा । मिळोन जाती राजकारणा ।**
**कार्यभागाची विचारणा । येथायोग्य योजिती ॥ ६ ॥**

या ओवीवरून माझ्या कल्पनेविषयीं मला शंका वाटत नाहीं. श्रीशिवछत्र-पतीकडे राजकारणपरत्वें जाण्यायेण्याचें काम श्रीसमर्थांनीं दिवाकरांकडे सोंपविलें होतें, हें श्रीरामदासी मालेंतील नवव्या भागांत आलेल्या कागदपत्रांवरून आपणा सर्वांच्या लक्षांत आलेलें च असेल. त्याचा च संदर्भ वरील ओवींत आला आहे आणि म्हणून मी म्हणतों कीं, या प्रकरणाचा रचनाकाल आपणांस निश्चित ठरवितां येईल, तर श्रीशिवसमर्थांच्या भेटीचा जो काल आपण मानतों, तो विरोधकांच्या हि गळीं उतरून देण्याला आपणांस मोठा आधार सांपडेल.

तिसऱ्या समासांतील वर्णन उमा, रमा हीं नांवें घेऊन असलें तरी तें श्री वेणाबाई व श्री आका महाराज इत्यादि स्त्रियांना उद्देशून आहे, असें म्हणतां येतें. श्री वेणाबाई यांच्याकडे स्वयंपाकगृहाचा अधिकार होता, त्या स्वयंपाक करण्यांत फार सुगरण होत्या, त्यांचा स्वयंपाक श्रीसमर्थांना फार आवडे, हें आपणांस ठाऊक आहे. या समासांतील

**रोगी अत्यंत खंगलें । तेणें तें अन्न पाहिजे भक्षिलें ।**
**भोजनरुचीनें गेलें । दुखणें तयाचें ॥ ७ ॥**

इत्यादि ओव्या श्री वेणाबाईंच्या च पाकसिद्धीला लागतात.

---

## ( १० ) एकवीससमासी म्हणजे च जुना दासबोध

सर्व लघु काव्यांत हें काव्य मोठें आहे व तितकें च महत्त्वाचें हि आहे. या काव्याचें मूळचें नांव काय, असा प्रश्न आहे. नवव्या समासाच्या पहिल्या तीन ओव्या अशा :

**वंदीन सद्गुरूचीं पाउलें । मज आपणा ऐसें केलें ।**
**उदारें नाम तें हि दिधलें । रामदास ऐसें ॥ १ ॥**
**रामदास ऐसें नांव । तरी मज कैचा ठाव ।**
**मीपणाचा अभाव । सहज ची जाला ॥ २ ॥**
**आतां कर्ता अकर्ता रामदास । इच्छा उद्भवली तयास ।**
**नांव दिधलें ग्रन्थास । आपण नांवरूपावेगळा ॥ ३ ॥**

या तीन ओव्यांच्या आधारें कोणी कोणी असें प्रतिपादन करितात कीं या काव्यास श्रीसमर्थांनीं 'रामदास' हें च नांव दिलें होतें. ही कल्पना हि आजकालची नव्हे. शके १७१९ त बाडांक १५८ चा पोथा लिहिला गेला, त्यांत या ग्रन्थाचें नांव 'श्री रामदास ग्रन्थ' असें दिलेलें आहे व त्याचे शेवटीं मर्देमठाचे एका काळचे अधिपति अमृतेश्वर यांनीं ज्या पांच ओव्या जोडल्या आहेत, त्यांत हि 'ग्रंथा नाम श्रीरामदास' असें च म्हटलें आहे. अमृतेश्वरांचा समाधीशक १६९२ होय ; तेव्हां या काव्याचें नांव च 'रामदास ग्रंथ' होय, ही कल्पना बरी च जुनी आहे.

ही कल्पना करणारांनीं वरील तीन ओव्यांचा जो अर्थ लावला, तो मला तितकासा पटत नाहीं. मी त्यांचा अर्थ इतका च करतों कीं, रामानें माझें नांव रामदास ठेवलें, तेव्हां मी आतां निराळा उरलोंच नाहीं, त्यांचा झालों, त्या मला ग्रन्थ करण्याची इच्छा होतां च मजकडे त्या ग्रन्थाचें कर्तृत्व येत नाहीं, मी रामदास झालों म्हणजे मी रामांत मिसळलों, तेव्हां रामदासबोध हा मीं केलेला बोध नसून रामानें च केलेला बोध होय, असें म्हणण्याचा श्रीसमर्थांचा हेतु दिसतो. दहाव्या समासाच्या पहिल्या ओवींतून हि हा च अर्थ निघतो :

**रामदास येणें नामें । ग्रंथ केला आत्मयारामें ॥**

म्हणजे माझ्या नांवावर रामानें च हा ग्रन्थ केला.

मला सुचत असलेला हा अर्थ बरोबर असेल तर, दुसरें एक कोडें आपोआप उलगडेल. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत जी वाल्मीकिरामायणाची प्रत आहे, ती **रामेण रामदासेन लिखितम्** आहे. रामेण रामदासेन लिखितम् याचा अर्थ असा होतो कीं, रामदासांना निमित्त करून रामानें लिहिलेलें रामायण; असो.

एकवीससमासी या नांवापेक्षां जुना दासबोध हें च या काव्याचें नांव मला जास्त अन्वर्थक वाटतें. खुद्द श्रीसमर्थांनीं या एकवीससमासीचा उल्लेख 'दासबोध' या नांवानें केल्याचें आपण 'आत्माराम' ग्रन्थांत पाहिलें च आहे, तेव्हां या प्रकरणाच्या नांवाविषयीं वाद नसावा.

श्रीसमर्थ जो जो स्फुट समास लिहीत, त्याचा शेवट 'इति श्रीदासबोधे...' असा च करीत. ते जें जें सांगत, जो जो उपदेश करीत, तो सारा दासबोध च होता. पण त्यांतल्या त्यांत, 'दासबोध' नांवाचे त्यांच्या हयातींत च चार ग्रन्थ निर्माण झाले. वाटल्यास असें म्हणावें कीं, त्यांच्या हयातींत च दासबोधाच्या चार आवृत्त्या निघाल्या. या अर्थानें एकवीससमासी ही दासबोधाची पहिली आवृत्ति होय. शेवटचा दोनशें समासांचा दासबोध तयार झाल्यावर या एकवीससमासी दासबोधाला 'जुना दासबोध' म्हणून संबोधूं लागले. इतर आवृत्तींचा विचार आपण पुढें करूं. एकवीससमासी ही दासबोधाची अगदीं पहिली आवृत्ति होय, असें मानण्याला दोन तीन कारणें पट्कन् सांगतां येतील. अगदीं आरंभीं म्हणजे जगविख्यात होण्यापूर्वीं श्रीसमर्थांची वृत्ति गूढ होती. हा पुरुष कोण असावा, असा लोकांना प्रश्न पडे. अकराव्या दशकाच्या दहाव्या समासांत वर्णन केल्याप्रमाणें आरंभीं आरंभीं त्यांचें वर्तन असावें. या वृत्तीला त्यांनीं पिसाटाची वृत्ति म्हटलें आहे. या आपल्या वृत्तीचा उल्लेख त्यांनीं एकवीससमासींत दोनदां केला आहे : एकदां दुसऱ्या च समासांत आणि दुसऱ्यांदां नवव्या समासांत.

**तैसा मी हि येक पिसाट । उगी च करितों वटवट ॥ ९-८ ॥**

असें नवव्या समासांत आहे. पण दुसऱ्या समासांत जो उल्लेख आहे, त्यावरून आणखी असें हि दिसतें कीं, ते घर सोडून नुकतेच पंचवटीस आले असावेत.

**ऐसा सर्वात्मा राजाधीश । सकळ पाहाती सावकाश ।**
**तेथें पिसाट रामदास । उभा असे दीनरूप ॥** ए. वी. स. २/१ ॥
**रामचंद्रा तुझा वियोग । ऐसा नको रे प्रसंग ।**
**तुजकारणें सर्व संग । त्यक्त केला ॥ २ ॥**
**रामा तुझिया स्वामीपणें । मी हें ब्रह्मांड मानी ठेंगणें ।**
**स्वामी तुजविण कोण जाणे । अंतर आमुचें ॥ ३ ॥**
**तुजविण मज माया । कांहीं नाहीं रे रामराया ।**
**आम्हां अनाथा कासया । उपेक्षिसी ॥ ४ ॥**
**तुज समुदाव दासांचा । परी आम्हांसी स्वामी आणिक कैचा ।**
**तुजकारणें जिवलगांचा । संग सोडिला ॥ ५ ॥**
**सगुण रघुनाथ मुदल । माझें इतुकें चि भांडवल ।**
**कास धरूनि टाकीन पैल- । पार या भवाचा ॥ ६ ॥**

जगविख्यात झाल्यावर, ते पिसाटासारखे कोणाला भासणार? व त्यांना दीनरूपानें कोण उभे राहूं देणार? जिवलगांचा संग सोडण्यास थोडे च दिवस झाले असावेत. आपल्या हृदयांतील गुह्य विचार या ओव्यांत ते रामास कळवीत आहेत. 'रामा, तुझ्यासाठीं रे मीं घर सोडलें, तुझी कृपा व्हावी म्हणून मातुःश्रीला, बंधूला आणि इतरांना टाकून आलों, रामचंद्रा, आतां तुमचे चरण मी सोडणार नाहीं, तुमच्या कृपेपुढें त्रिभुवनाची काय किंमत आहे, आपण माझा अंगिकार केला म्हणजे हें सारें ब्रह्मांड तुच्छ समजून मी पायाखालीं तुडवीन, मला दुसरें कांहीं नको, आपल्या चरणांशिवाय मला दुसऱ्या कशाची आशा नाहीं, तेव्हां आतां माझी उपेक्षा करून कसें चालेल, आपल्याशिवाय मला आतां कोण आहे, आपले चरण हें च माझें सारें भांडवल आहे व त्या भांडवलाच्या बळावर भवसागर ओलांडून पार होण्याची मी उमेद बाळगीत आहें.' आपणांस येथें इतकें च पाहावयाचें होतें कीं, एकवीससमासी ही श्रीसमर्थांच्या पूर्व वयांतील असावी, पण तसें करीत असतां आपणांस त्यांच्या हृदयांत हि डोकावून पाहाण्याची संधि मिळाली, हा लाभ अचानक झाला!

त्या एकवीससमासींतील चार समास वीसदशकी दासबोधांत आढळतात. एकवीससमासी हें प्रकरण जर दासबोधाची पहिली आवृत्ति, तर ते चार समास मूळचे एकवीससमासींतील असून वीस दशकी दासबोधांत त्यांचा नंतर समावेश करण्यांत आला असला पाहिजे. तसें च घडलें, हें सिद्ध करण्याला एक गमक उपलब्ध आहे. एकवीससमासींतील सहावा समास हा च तिसऱ्या दशकाचा दहावा समास होय. त्यांतील दोन ओव्यांवरून स्पष्ट होतें कीं, हा समास मूळचा एकवीससमासींतील. विषयसुख दुःखाला च कारण होतें, तें

**ऐकोनि बोले भाविक। कैसेनि घडे जी सार्थक।**
**सांगा स्वामी येम लोक। चुके जेणें ॥ ६८ ॥**

**देखोन शिष्याची अनन्यता। भावें बोळला सद्गुरु दाता।**
**स्वानंद तुंबळेल आतां। पुढिले समासीं ॥ ६९ ॥**

हा समास मूळचा वीसदशकी दासबोधांतला असता, तर 'पुढिले समासीं' ऐवजीं 'पुढिले दशकीं' असतें. पण या हि पेक्षां बलवत्तर प्रमाण म्हणजे या समासांत भाविकानें केलेल्या प्रश्नाचें उत्तर म्हणून एकवीससमासीच्या सातव्या समासाचा आरंभ

**ऐकोनि भाविकाचा प्रश्न। स्वामी देती प्रतिवचन।**
**ते चि आतां श्रोते जन। परिसोत कां ॥ ७–१ ॥**

या ओवीनें करण्यांत आला आहे. तेव्हां निर्विवाद सिद्ध होतें कीं, सहावा समास मूळचा एकवीससमासींतील असून तो वीसदशकी दासबोधांत घेण्यांत आला आहे; असो.

या दोन चार प्रमाणांवरून सिद्ध होतें कीं, एकवीससमासी हें काव्य दासबोध ग्रन्थाचा पहिला अवतार होय. हा पहिला अवतार तारुण्यांत झाला आणि तो चौथा अवतार पोक्त वयांत झाला. दोन्ही अवतारांची भाषा, विषय आणि प्रतिपादनशैली पाहून मला असें म्हणावेंसें वाटतें कीं, पहिल्या अवतारांत तारुण्याची सहजसुलभता आणि जोम हीं आहेत, तर शेवटच्या अवतारांत प्रौढ वयाची प्रगल्भता आणि गांभीर्य हीं उतरलीं आहेत.

परमार्थ हा च एकवीससमासीचा हि मुख्य विषय आहे. तदनुरोधानें त्यांत इतर लहान मोठे अनेक विषय आले आहेत. आत्मज्ञान ही कांहीं सोपी गोष्ट नव्हे, कीं पूर्वतयारीवांचून, दीर्घ प्रयत्नावांचून, अनेक साधनें केल्याशिवाय ती सहज प्राप्त व्हावी ! म्हणून या ग्रन्थाचा प्रतिपाद्य विषय आत्मज्ञान असला तरी त्याच्या प्राप्तीसाठीं तळमळणाऱ्या जीवानें कोणते गुण आपल्या आंगीं आणावे, प्रयत्न कसकसा करावा, साधनें कोणतीं अवलंबावीं, इत्यादि शिकवण अवश्य असल्यामुळें या सर्व प्रश्नांचा विचार श्रीसमर्थांनीं एकवीससमासींत केला आहे. नुसते ते व इतर आनुषंगिक विषय नमूद करावे, असें म्हटलें, तरी ते शेंकडों भरतील. तेव्हां उदाहरणार्थ थोड्या च विषयांची नोंद येथें करावी व बाकीचा उद्योग साक्षपी वाचकांवर च सोंपवावा, असें म्हणतों. श्रीसमर्थांचीं वचनें सुभाषितवजा असतात. त्यांची वाणी सहजस्फूर्तीची असल्यामुळें व तिला कृत्रिमतेचा स्पर्श हि झालेला नसल्यामुळें त्यांच्या ओव्यांत आणि ओव्यांतील शब्दांत जादु भरलेली असते, असें वाटतें. हे सारे मंत्र च आहेत कीं काय, असें भासतें. त्यांच्यांत यत्किंचित् बदल केला तर त्या मंत्रांतील सामर्थ्य निघून जाईल कीं काय, अशी मला भीति वांटत असते.

(१) **आत्मज्ञानाच्या** दृष्टीनें एक च समास वाचावयाचा असेल, तर चौदावा समास शंभरदां वाचावा आणि कृतार्थ व्हावें ! मायेच्या भयानक पसाऱ्याचें वर्णन ऐकून शिष्य कावराबावरा झालेला पाहून श्रीसमर्थ त्यास धीर देऊन म्हणतात :

**अरे शिष्या माया कैची । हे कन्या वंध्यापुत्राची ।**
**पुत्र चि नाहीं मा त्या कन्येची । वार्ता कोठें ॥ १४–३३ ॥**
**अरे ऐक, घाबिरा कां जालासी । अंतरूं नको विवेकासी ।**
**उतावळी करूं नको, आम्हासी । बोलों दे क्षणभरी ॥ ३४ ॥**
**जरी आम्ही तुझे जीवींचें । जाणोनि सांगितलें अंतरींचें ।**
**तरी मग तुझ्या बोलाव्याचें । कोण काज आहे ॥ ३५ ॥**
**किंचित धीरत्व धरावें । तुवा सादर होउनी ऐकावें ।**
**तुझी आशंका स्वभावें । निरसोन जाईल ॥ ३६ ॥**

**माया माईक आभासे । तुझिये कल्पनेसी च दिसे ।**
**देहीं देहबुद्धि वसे । म्हणोनियां ॥ ३७ ॥**

**तुज जें कांहीं सांगितलें । तें तुज इतुकें च कळलें ।**
**क्षणामधें डगमगिलें । चीत तुझें ॥ ३८ ॥**

तरी, शिष्या, ऐक, घाबरूं नकोस, मी तुला निदानींचा विचार सांगतों.

**अरे आधीं आपणासी जाळावें । मग रघुनाथीं मिळावें ।**
**आपणासी राखतां जीवें । राम कैचा जोडे ॥ ३९ ॥**

इतकें जीवावर उदार व्हावें. अभिमान, अहंकार, मीपण, देहबुद्धि जळून खाक झाली पाहिजे ! या अभिमानाचे हास्यास्पद प्रकार किती असतात, ते पाहावयाचे असल्यास विसाव्या समासाच्या ३२ ते ५२ ओव्या अवश्य पाहाव्या. शिष्या, तूं एवढा भितो आहेस कशाला ?

**मोठें भय या स्थूळासी । तरी तूं काये स्थूळ होसी ।**
**क्षणक्षणा भ्रांत होतोसी । अविवेकसंगती ॥ ४९ ॥**

**तुज कैचें रे लिंगदेहे । मा ते विघडोनि नव जाये ।**
**हें तूं विचारूनियां पाहे । खरें किंवा खोटें ॥ ५० ॥**

**संग न साहे जेथें । मन बापुडें कैचें तेथें ।**
**तुज पाहावया काळातें । शक्ती कैची रे ॥ ५१ ॥**

**अरे तूं निःसंग आणि निर्मळ । तेथें काये रे बापुडें काळ ॥५९॥**

**काळ मायेचें अंगभूत । आणि तुझें स्वरूप मायातीत ॥ ६० ॥**

असा संवाद चालतां चालतां दोघे हि गुरु आणि शिष्य एकरूप होऊन ब्रह्मानंदांत मग्न होऊन निवांत राहिले !

**नेत्रीं टकमकां पाहाती । परंतु कांहीं च न बोलती ।**
**देहेबुद्धीची भ्रांति । पडोनि गेली ॥ ७६ ॥**

**पातीयासी पातें न लगे । तेणें जळ वाहों लागे ।**
**मंद वायुचेनि संगें । गळती अश्रुपात ॥ ७७ ॥**

**देहाचें स्मरण नाहीं । निचेष्टित जाले विदेही ।**
**स्वरूपावभास तो हि । मोडोनि गेला ॥ ७८ ॥**

**ते आनंदजळीं बुडाले । गुरुशिष्यपणावेगळे जाले ।**
**प्रपंच सांडुनी मुकले । परमार्थासी येकसरे ॥ ७९ ॥**

**ऐसे ते तटस्त घटिका च्यारी । उपरी आले देहावरी ॥**
**परी स्वसुखाची अंतरीं । कळा बाणोनि गेली ॥ ८० ॥**

**दोघें येक रूपें चालती । ब्रह्मानंदेंकरूनि डुलती ।**
**ते खूण स्वानुभवी जाणती । येरां अतर्क्य ॥ ८१ ॥**

(२) **उपासनेच्या** दृष्टीनें एक च समास वाचावयाचा असेल, तर पंधरावा वाचावा, वाटल्यास एकदां च वाचावा, पण विश्वास ठेवून वाचावा, त्याप्रमाणें वागावें आणि जन्माचें सार्थक करून घ्यावें ! या समासांत श्रीसमर्थांनीं त्रयोदशाक्षरी मंत्र उघडा करून सांगितला आहे. मंत्र उघडा आहे, पण जपणारानें तो कोणास च न कळत जपावयाचा असतो, तर च त्याचें फळ पदरांत पडतें. फळ पदरांत पडल्यावर हि तें आळकेपणें ज्याच्यात्याच्यापुढें मांडून प्रौढी मिरवावयाची नसते, तसें केल्यास दृष्ट लागून तें फळ नासतें. याचें तात्पर्य इतकें च कीं, कांहीं साक्षात्कार झाला तर लोकांनीं बरें म्हणावें म्हणून त्याची दवंडी पिटूं नये, तसें केल्यास पुन्हा साक्षात्कार होत नसतो. असा श्रीसमर्थ आपल्या जीवींचा अनुभव सांगत आहेत. हा समास अथपासून इतिपर्यंत पाठ करण्यासारखा आहे. त्यांत सगुणनिर्गुणाची व्यवस्था लावली आहे, श्रीरामनाममहिमा वर्णिला आहे आणि विशेष म्हणजे श्रीसमर्थांनीं आपल्या शिष्याला आजोबाच्या म्हणजे श्रीरामाच्या मांडीवर नेऊन बसविलें आहे. श्रीसमर्थांचे गुरु प्रत्यक्ष राम कशावरून, असा प्रश्न शंकेखोर विचारीत असतात, त्याचा निकाल श्रीसमर्थांच्या च मुखानें येथें लागत आहे.

**राम स्वामी जाण माझा । तरी तो तुज होये आजा ।**
**तुझें लडिवाळपण वोजा । चालवील आत्मारामु ॥ ५३ ॥**

**राम दासासी भिन्नत्व नाहीं । तरी राम होये मी हि ।**
**तूं त्याचा दास तरी तूं हि । राम चि होसी ॥ ५४ ॥**

**शिष्या शब्दज्ञान सोडी। श्रीरामा ऐसी धुर जोडी।**
**मग राम चि हा तडातोडी। करील तुझिया भेदाची ॥ ५५ ॥**
**समर्थें ज्याचा अंगिकार केला। कोण बोलों शके तयाला।**
**माझ्या रामासी जो शरण गेला। तो कळीकाळासी वंद्य ॥ ५६ ॥**

इतकें निश्चयपूर्वक श्रीसमर्थ बोलत असतां आपण संशयांत च राहून मरणें योग्य होईल काय? श्रीसमर्थ सांगतात :

**आतां हि जयासी वाटे भेटावें। रामें मज सांभाळीत जावें।**
**ऐसें दृढ घेतलें जीवें। तरी ऐका मी सांगेन ॥ ३७ ॥**

**श्री राम जय राम जय जय राम।**
**ऐसा कांहीं येक धरूनि नेम।**
**जप कीजे तेणें आत्माराम।**
**जोडेल नेमें ॥ ३८ ॥**

**जयासी राम चि व्हावा। तेणें लोकिक सोडावा।**
**राम कैवारी करावा। जो संकटीं नुपेक्षी ॥ ५० ॥**

तेव्हां आपणा सर्वांस श्रीसमर्थांची शेवटची आज्ञा आहे कीं, आतां नुसतें शब्दज्ञान पुरें झालें, आतां प्रत्यक्ष क्रिया करण्यास सुरुवात केली पाहिजे.

**शब्दज्ञान उदंड बोलती। परी क्रिया कोण्हीच न करिती।**
**तैशा तूं हि गा व्युत्पत्ती। करूं नको ॥ ५७ ॥**

( ३ ) **सगुणसाक्षात्कार** केव्हां होतो?

**देहे पडे कां देव जोडे। ऐसी हांव आंगीं जडे।**
**तेणें गुणें वैराग्य चढे। माहा प्रबळ ॥ ७-१७ ॥**

**देहपांग निःशेष भंगे। तेव्हां प्राप्तीसी वेळ न लगे।**
**देव भक्तां पाठीं लागे। नाभि नाभि म्हणोनि ॥ १८ ॥**

**बाळक आपणासी रक्षूं नेणे। म्हणोनि मातेसी लागे रक्षणें।**
**तें चि बाळक शाहाणें। होतां माता विसंबे ॥ १९ ॥**

**तैसा भक्त भगवंतीं प्रेमा। लाऊनि उलंघी देहसीमा।**
**तयाचा सांभाळ आत्मयारामा। करणें घडे नेमस्त ॥ २० ॥**

सर्वस्वाची आस सुटे । तरी च सगुणमूर्ती प्रगटे ।
सगुण लाभ होतां तुटे । दुःख संसारींचें ॥ २१ ॥

( ४ ) **वस्तूची प्राप्ति** केव्हां होते? स्वतःची आहुती द्यावी तेव्हां! सर्वांचा अर्थ एक च, देहबुद्धि समूळ नष्ट झाली पाहिजे.

**व्हावया वस्तूची प्राप्ती । साधक साधनें करिती ।**
**तंव ते वस्तु आहुती । साधकाची मागे ॥ २१-४४ ॥**

**जेहीं विवेकें आपुली । वस्तूसी आहुती दिधली ।**
**तयासी च वस्तु लाधली । येरां अप्राप्त ॥ ४५ ॥**

**येथीचा विपरीत विचार । करितां आपुला संव्हार ।**
**तेणें अक्षई अपार । सुख लाभे ॥ ४६ ॥**

**जेणें जीवावरी उठावें । तेणें चि आनंदासी लुटावें ।**
**आनंद भोगुनी असावें । कल्पकोटी ॥ ४७ ॥**

**जो कां आपुली कुर्वंडी । वोवाळुनी परती सांडी ।**
**तयासी च वस्तूची जोडी । इतरां न घडे ॥ ४८ ॥**

## ( ५ ) राम आणि रामदास यांचें साम्य,

किंबहुना रामदासांचा वरचढपणा. श्रीसमर्थ रामासी कसें धिटाईनें बोलत आहेत, पाहा. हें धैर्य त्यांना कोठून आलें? त्यांनीं केलेल्या सर्वस्वाच्या त्यागामुळें, त्यांच्या निस्पृहतेमुळें, त्यांच्या उदासीनतेमुळें. ज्यानें सारें वैभव तृणतुच्छ केलें, त्याच्या धैर्याला मर्यादा कोण घालणार? श्रीसमर्थ म्हणतात, हे रामा!

**तूं राज्य सांडुनी जालासी उदास । तरी आम्ही हि तुझे चि दास ।**
**तां काये बरें केलें बापास । तैसें आम्ही हि तुज करूं ॥ १६-४ ॥**

**तुवां पाषाण तारिले । तरी आम्ही जडजीव उद्धरिले ।**
**तुवां देव मुक्त केले । बंधनापासुनी ॥ ५ ॥**

**तरी आम्ही हि भाविकांसी । सोडउनियां मोक्षपदासी ।**
**पाठविलें तयांसी । मागुता जन्म नाहीं ॥ ६ ॥**

**तुवां जरामरण केलें दुरी । तें मुळींच नाहीं आमुचा घरीं ।**
**तूं राजा अक्रा सहस्त्रवरी । तरी आम्हांसी संख्या चि नाहीं ॥ ७ ॥**
**तुवां पुरी नेली वैकुंठा । तरी आम्ही वैकुंठीच्या बारा वाटा ।**
**करूनि मांडिला चोहटा । तया वैकुंठाचा ॥ ८ ॥**
**ऐसें बोलती रामदास । निधडे सर्वस्वें उदास ।**
**वैभव वाटे जयास । कसपट जैसें ॥ ९ ॥**

आधीं केलें मग सांगितलें । या त्यांच्या तत्त्वाला अनुसरून, त्यांनीं इतरांस केलेल्या उपदेशावरून त्यांच्या चरित्राची कल्पना करणें, हें वेगळें, पण जेथें ते प्रत्यक्ष च आपण काय काय केलें तें सांगत आहेत, तेथें तें त्यांचें खरें च आत्मचरित्र होय व त्याचें महत्त्व विशेष आहे. त्यांच्या वाङ्मयांत अशीं जीं कांहीं थोडीं स्थळें आहेत, त्यांपैकीं प्रस्तुतचें एक स्थळ होय. ते रामाशीं लडिवाळपणानें बोलूं गेले, पण त्यांत च त्यांचें चरित्र त्यांच्या च तोंडून आपणांस ऐकावयास मिळत आहे, हें आपलें भाग्य होय ! " रामा, तुझ्यांत आणि माझ्यांत काय फरक आहे रे, किंबहुना माझी बाजू तुझ्यापेक्षां थोडी सरस च नाहीं काय ? तूं राज्य सोडून वनवास पत्करलास, आम्ही तरी तुझे दास च आहोंत, आम्ही काय कमी आहोंत, आम्ही हि घरदार, शेती, वतनवाडी सोडून घराबाहेर पडलों, तूं म्हणे पाषाण तारलेस, आम्हीं पाषाणवत् जड जीवांचा उद्धार केला; तूं देवांना बंदिवासांतून मुक्त केलेस, तर आम्हीं हि भाविक जनास जन्मापासून कायमचे सोडवून मोक्षपदवीस चढविले; तुझ्या राज्यांतून तूं वृद्धपण आणि मरण यांना हद्दपार केलेंस, आमच्या राज्यांत तीं कधीं नव्हतीं च मुळीं; तूं सारें अकरा हजार वर्षें च राज्य केलेंस, आम्हीं राज्य करण्याला केव्हां आरंभ केला हें कोणास ठाऊक नाहीं व त्याला अंत नाहीं; तूं सारी एक अयोध्यानगरी वैकुंठाला नेलीस, तर आम्हीं तुझ्या त्या वैकुंठाच्या बारा वाटा मोकळ्या करून त्याचा बाजार करून सोडला आहे ! आम्ही तुझे म्हणवितों, ते मागें कसे राहूं ! " हें श्रीसमर्थांचें आत्मचरित्र तुम्हां आम्हांला गोड वाटावें व तें ऐकतांना आपलीं हृदयें प्रेमानें भरून यावींत यांत काय नवल आहे, पण तें ऐकून रामानें मंदहास्य केलें आणि

**धांवोनियां हृदईं धरिलें । आपुल्या निजदासा ॥ १० ॥**

**ऐसा भक्ताचा वेळाईत । दासां भोवतां भोवत ।**
**येक क्षण हि न विसंभत । भावार्थ देखोनि भुलला ॥ ११ ॥**

प्रिय श्रीसमर्थभक्तांनो, हें आपण श्रीसमर्थांच्या तोंडून त्यांचें चरित्र ऐकत आहोंत, हें ध्यानीं आणा, त्याचें महत्त्व जाणा आणि स्वत: आपण काय करावें तें ठरवा, मी काय सांगणार ! ‘आपण पाषाणवत् जड जीव उद्धरिले’ हें श्रीसमर्थांच्या च तोंडून तुम्हीं ऐकलेंत ना? आतां याला प्रत्यंतराची अपेक्षा नाहीं ना ? असल्यास, बाडांक ४५ तील या च शब्दांनीं उद्धवस्वामींनीं दिलेली कबुली तुमच्या स्मरणांत आहे ना?

**पाषाणीं अवेव नाना कमावीले । तैसे लोक केले समर्थाहीं ॥ १ ॥**
**काष्ठीं हि अवेव नाना कमावीले । तैसे लोक केले समर्थाहीं ॥ २ ॥**
**धातुला अवेव नाना कमावीले । तैसे लोक केले समर्थाहीं ॥ ३ ॥**
**लोक हि पाषाण जड जीव जाण । कमाऊनि पूर्ण नीट केले ॥ ४ ॥**
**आम्ही हि पाषाण श्रीनें कमावीलों । शिवराम जालों पावन चि ॥ ५ ॥**

( ६ ) **प्रपंच आणि परमार्थ, विवेक आणि वैराग्य, भेद आणि अभेद** यांची मोठी सांगड आहे व तिचा उलगडा अठराव्या समासांत, आपणां सर्वांस समजेल असा श्रीसमर्थांनीं करून दाखविला आहे. प्रपंच करावा कां न करावा, प्रपंच करीत असतां हि परमार्थ साधेल किंवा नाहीं, वैराग्यावांचून परमार्थ होईल काय, विवेकाच्या वांचून वैराग्य शोभेल काय, विवेकाचें स्वरूप काय, जगांत भेद मानावा कां न मानावा, भेद आहे कां नाहीं, इत्यादि महत्त्वाचे प्रश्न उपस्थित करून त्यांचीं श्रीसमर्थांनीं या समासांत उत्तरें दिलीं आहेत.

( श्री ) प्रपंचपरमार्थांत एक कोणतें तरी साधेल, दोन्ही साधणें दुर्घट आहे.

**अरे जयासी परमार्थ व्हावा । तेणें प्रपंच हा त्यजावा ।**
**प्रपंचीं परमार्थ करावा । तो ठाकेना सर्वथा ॥ १८ ॥**

या दोघांचा परस्पर विरोध च आहे.

**प्रपंच म्हणिजे उदास नागवणा । आणि परमार्थ म्हणिजे प्रपंचबुडवणा ।**
**परस्परें या दोघां जणां । सर्वथा न पडे ॥ २१ ॥**

प्रपंच परमार्थाला नागवितो आणि परमार्थ प्रपंचाला बुडवितो. एकदां मनुष्याला परमार्थ कळला, आपण कोण याची त्यास ओळख पटली, जगांत कोणी कोणाचें नाहीं, इतकें समजलें, तरी फिरून प्रपंचांत च तो गुरफटून राहात असेल, तर त्याची पढतमूर्खांत च गणना केली पाहिजे.

**आपण आपणिया वोळखिलें । कोण्ही कोण्हाचें नव्हेसें कळलें ।**
**आणि प्रपंच करितां चि मेले। ते पढतमूर्ख जाणावे ॥ २५ ॥**

पण मग एकाद्यास प्रपंच सोडवत नसला तर त्यानें परमार्थाचें नांव हि काढूं नये काय ? तसें करूं नये. तशा स्थितींत हि त्यानें

**प्रपंचीं असोनि वासना । परमार्थाकडे वोढावी ॥ ४७ ॥**

त्यानें निदान दोन गोष्टींना तरी जपावें :

**जेणें प्रपंचीं असावें । तेणें दों विषयां वेगळें व्हावें ।**
**काये म्हणाल तरी चित्त द्यावें । कनक आणि कांता ॥ ५० ॥**

पण प्रपंच च म्हणजे कनक आणि कांता, तेव्हां या ठिकाणीं कनक आणि कांता यांचा अर्थ

**परद्रव्य आणीक कांता परावी ॥**

असा करावयाचा व तसा च श्रीसमर्थांनीं या ठिकाणीं केला हि आहे. तेव्हां प्रपंच सुटत च नसेल, तर असा प्रपंच करावा, पण, श्रीसमर्थ म्हणतात, माझ्या पोटांतील इच्छा विचाराल तर मी स्पष्ट सांगेन

**नाहीं तरी नेमस्त त्यजावा । हे चि आज्ञा पोटस्ते ॥ ५४ ॥**

असें पहा,

**असतां सुखमये संसार । तरी कां टाकिते थोर थोर ॥ २०-८ ॥**

(रा) प्रपंचाची आसक्ती सुटल्यावांचून आणि वैराग्य आंगीं बाणल्यावांचून परमार्थ होणें नाहीं. श्रीसमर्थांसारखे

**उपजत चि वैराग्य जोडे । ऐसे परमार्थी थोडे ॥ १८-२८ ॥**

विचारानें च आंगीं वैराग्य बाणून घेतलें पाहिजे. देशासाठीं वा धर्मासाठीं वैराग्य धारण करावें असें पुष्कळ तरुणांच्या मनांत येऊन ते थोर

कार्यकर्त्यांना विचारीत सुटतात. ते विचारीत सुटतात, याचा च अर्थ त्यांचा निश्चय झालेला नसतो. इतरांना काय विचारतां, श्रीसमर्थांना विचारा. त्यांचा सल्ला असा आहे :

**जयासी वाटे वैराग्य करावें । तेणें कांहीं च न विचारावें ।**
**उठोनि वाटा चि लागावें । दिगांतराप्रती ॥ २४ ॥**

हें वैराग्य विवेकयुक्त असावें. विवेकयुक्त वैराग्यशील मनुष्याची जगांत प्रतिष्ठा होणार च. अशा वेळीं प्रतिष्ठेच्या नादीं लागून पुष्कळांचा विवेक सुटतो आणि वैराग्य डळमळतें. पण अशा च वेळीं प्रतिष्ठेची प्रतिष्ठा न ठेवण्यांत च खरें वैराग्य प्रकट होत असतें. चवरेचाळीसावी ओवी मोठी महत्त्वाची आहे. तिच्यांत वैराग्य आणि विवेक यांच्या, जणूं, व्याख्या दिल्या आहेत.

**प्रतिष्ठा जालिया लालुची न करी । ते चि जाणावी वैराग्यसामग्री ।**
**आणि स्वधर्माचा सांभाळ करी । तो विवेक जाणावा ॥ ४४ ॥**

या ओवींत विवेक आणि वैराग्य यांच्या श्रीसमर्थांनीं मर्यादा घालून दिल्या आहेत. परमार्थाला वैराग्य पाहिजे आणि वैराग्याच्या पाठीशीं विवेक पाहिजे. विवेक म्हणजे स्वधर्मरक्षण. नाहींपेक्षां तें पाखंड मत होईल.

(म) पाखंडी लोकांना आचारविचार, भेदाभेद कांहीं नसतो. त्यांचें तत्त्वज्ञान भ्रामक आणि विपरीत असतें. ते ज्ञानाच्या च गोष्टी बोलत असतात, पण त्या समाजाच्या नाशाला कारणीभूत होत असतात.

**शब्दीं सव आत्मा म्हणावें । आणि आचार सांडुनी भलतें चि करावें ।**
**तें पाषांड मत जाणावें । विवेकी असेल तेणें ॥ ५८ ॥**

एका परब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं भेद नाहीं, तेथून खालीं उतरतां च भेद आला. तो मग कोणाच्या बापाला टळत नाहीं.

**भेद आणि प्रपंचीं मोडे । ऐसें हें कहीं च न घडे ।**
**डोळे झांकिती ते रोकडे । नागवले स्वहितासी ॥ ५२ ॥**

एकंकारप्रवर्तक पाषांड मतानें आत्मनाश कसा होतो, तें अनेक दृष्टान्त देऊन श्रीसमर्थ सिद्ध करीत आहेत.

**रासभीं सोहोळे भोगावे। आणि मनुष्यीं उकरडे भुरकसावे।**
**ऐसें घडेल तरी च फावे। अभेद प्रपंचीं ॥ ६० ॥**

**कां सुरी हातीं घ्यावी। आंगोळीची लेखणी करावी।**
**करितां प्रशस्त वाटे जीवीं। तरी प्रपंचीं भेद नाहीं ॥ ६१ ॥**

**कां युक्षदंड जैसा खावा। तैसा चि नेत्रीं खोवावा।**
**कां कपाळमोक्ष करावा। नारीकेळ म्हणोनी ॥ ६२ ॥**

हीं उदाहरणें देऊन श्रीसमर्थ विचारतात, असें करणें योग्य होणार नाहीं, हें जर तुम्हांस पटतें, तर मग केवळ

**शब्दज्ञानें चि भेद तुटे। हें काये बरें ? ॥ ६३ ॥**

**अरे या शरीराकारणें। ठायाठायें विचारणें।**
**आणि परमार्थाची च भाल्य करणें। हें बरें नव्हे हो ॥ ६४ ॥**

सिद्धान्त सांगतात—

**भेद तुटायाचें स्थळ। तें येक स्वरूप निर्मळ।**
**तेथें हा मायेचा खेळ। समूळ मिथ्या ॥ ६५ ॥**

( ७ ) **स्वधर्म** कोणीं टाकूं नये. समाजांत शहाणे म्हणून मान्यता पावलेले थोर लोक च जेव्हां अविचारानें पाखंडांत शिरतात, तेव्हां भाविकांची दिशाभूल होते.

**जाणते चि पुरुष अविचार। धरूनि घेती मतांतर।**
**तेणें संगें इतर। भाविक चळती ॥ २०-२४ ॥**

म्हणून स्वधर्मरक्षणाची जबाबदारी अशा जाणत्या लोकांवर च पडते. त्यांनीं स्वधर्म उडवूं नये.

**स्वधर्मकर्म उडवणें। या नांव परमार्थ बुडवणें।**
**म्हणोनी स्वधर्म करणें। अगत्य आधीं ॥ २०-१८ ॥**

**आदरें भोगावा भोग। आणि स्वधर्माचा कीजे त्याग।**
**या नांव शरीरपांग। केवळ विषई ॥ २१ ॥**

कोणत्या हि काळीं विषयासक्त पाखंडी शहाणे च स्वधर्म बुडविण्यास कारणीभूत होत असतात. परंतु शुद्ध क्रियेवांचून आणि स्वधर्माचरणावांचून परमार्थ साधावयाचा नाहीं, हा सिद्धांत समजावा.

**असो शुद्ध क्रियेवीण । परमार्थी तरला कोण ।**
**देहेपांगें नागवण । नेमस्त आहे ॥ २७ ॥**
**सत्क्रिया नसतां परमार्थ । शब्दज्ञान सांगणें व्यर्थ ।**
**असत्क्रियेनें अनर्थ । वोढवेल पुढें ॥ २८ ॥**

(८) **करावें** आणि मग **सांगावें**

**आपण करूनि दाखवावें । तरी च दुसऱ्यासी सांगावें ।**
**ठाकेना तरी राहावें । मेलेंसें आपुले ठाईं ॥ १७-६८ ॥**
**झांकावें आपणासी । आणि शिकवावें पुढिलांसी ।**
**ऐसा हा सकळ सृष्टीसी । दंडक चि आहे ॥ ६९ ॥**

तो च दंडक आपण पुढें चालवूं नये.

**अभिमान तुजपासीं जागतो । तुझें कोण मानूं पाहातो ।**
**जन हि सकळ जाणतो । तुझ अंतरींचें ॥ ७३ ॥**
**म्हणोनि जें कांहीं दुसऱ्यासी सांगावें । तें तुवां स्वयें चि करावें ।**
**ऐसें केलिया स्वभावें । समाधान सकळिकां ॥ ७४ ॥**

तात्पर्य, क्रिया पाहिजे, नुसते शब्द नकोत. ज्याला स्वतःच्या समाधानापेक्षां केवळ लौकिकाची च चाड असेल, त्यानें च तेवढें शब्दज्ञानाच्या पाठीमागें लागावें.

**तुज समाधान व्हावें । किंवा लोकीं बरें म्हणावें ।**
**लोकिक पाहिजे तेणें शिकावें । पुस्तकींचें शाब्दिक ॥ १९-४८ ॥**

(९) **वक्ते** आणि **श्रोते** मुख्यतः कसे असावेत आणि कसे नसावेत

**वक्ता पाहिजे अनुभवाचा । ज्ञाता नसावा पुस्तकींचा ।**
**पुस्तकज्ञानें श्रोतयाचा । भ्रम तुटेना सर्वथा ॥ ३-२९ ॥**
**जे अत्यंत विषयासक्त । जे कुटुंबाचे निजभक्त ।**
**जयांपासीं पाषांड मत । निरंतर वसे ॥ ८७ ॥**

**जे वैराग्यें कनिष्ठ । जे शब्दज्ञानें वरिष्ठ ।**
**ऐसे श्रोते परम नष्ट । सर्वथा नको ॥ ८८ ॥**

(१०) पण **कलियुगाचा मामला** कसा आहे, तो पाहा —

**ये कलयुगीं आत्मबोध । तयाचा मांडला विनोद ।**
**चबढब जाली उदंड । वर्णसंकर आरंभिला ॥ ११–२० ॥**

**सत्त्वगुण निःशेष बुडाला । आणि अभिमान प्रगट जाला ।**
**शांति क्षमा सद्वृत्तीला । कोण्ही च आपंगिना ॥ २१ ॥**

**दुष्काळ पडिला भावार्थाचा । विश्वास सदृढ कैंचा ।**
**विवेक आणि वैराग्याचा । फड मोडोनि गेला ॥ २२ ॥**

**स्वधर्माचा लोप जाला । अधर्मीं जन प्रवर्तला ।**
**स्वइच्छा गोंदळ घातला । कळोनें सावकाश ॥ २३ ॥**

* * *

**शब्दज्ञान उदंड जालें । कवित्व घरोघरीं केलें ।**
**समाधान निःशेष गेलें । हारपोनियां ॥ २७ ॥**

**ज्ञानियासी जाली वादशक्ति । राहिली सप्रेम भक्ति ।**
**भक्ति च नाहीं मां मुक्ति । कैची असेल तेथें ॥ २९ ॥**

* * *

**भक्त भाविक तितुके निमाले । सत्वाचे सज्जन विश्रांति पावले ।**
**ईश्वरें हि डोळे झांकिले । बौध्य होउनी बैसला ॥ ३१ ॥**

**स्त्रिया भर्तारेसीं सदा । सेवा न करूनि पेटती द्वंदा ।**
**पुत्रीं टाकिली मर्यादा । मायेबापांची ॥ ३२ ॥**

वाचकांना कांहीं पडताळा येतो का ? हें कांहीं च नाहीं, अजून पुष्कळ व्हावयाचें आहे !

**ऐसें अवघें चि पालटलें । पूर्व वर्तमान तितुकें राहिलें ।**
**पुढें या हि हूनि होईल, जालें । नाहीं च अद्यापि ॥ ३४ ॥**

तथापि, हें ऐकून घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. अशा परिस्थितीला हि उलथून पाडून स्वधर्माची संस्थापना करणारे संत त्या त्या काळीं अवतार घेत च असतात.

( ११ ) त्या **संतांचा महिमा** सांगून आपण शेवटचें लघु काव्य हातीं घेऊं. मीं आरंभीं च म्हटलें होतें कीं, परमार्थदृष्टीनें आवश्यक वाटतील असे कैक विषय एकवीससमासींत आले आहेत. पण माझी मति ती किती! मी फार च थोड्या विषयांकडे पाहूं शकलों. वाचकांची दृष्टि श्रीसमर्थवाङ्मयाकडे वळून ते स्वतः त्यांत श्रीसमर्थांना धुंडूं लागले म्हणजे माझें काम संपलें. एवढी च माझी अल्प आकांक्षा आहे. संतांचा महिमा—

**संत विश्वाचे मायबाप । संतासी नाहीं परिखे आप ।**
**रूप आणि अरूप । या हि वेगळे जे ॥ १२–१४ ॥**
**संतासी गर्व नाहीं । संत निंदा न करिती कांहीं ।**
**संत निष्ठुर कधीं हि । प्राकृतासारिखें नव्हेती ॥ १५ ॥**
**संत वेदशास्त्रसंपन्न । तयांपुढें बोलतां अज्ञान ।**
**श्रवण होतां धरिती मौन्य । आदरें सादर ऐकती ॥ १६ ॥**

ही ओवी वाचतांना मला मंद हंसूं आलें, कां कोण जाणे.

**संत दोष आच्छादिती । आपण स्वयें न करिती ।**
**मर्यादा उलंघितां न येती । देहबुद्धीसी सर्वथा ॥ १७ ॥**
**संत शांतीचे सागर । संत सर्वस्वें उदार ।**
**ज्ञानवरुषते जळधर । सर्वस्वावरी ॥ १८ ॥**
**संत अभावाचे काळ । संत वैराग्याचे वडवानळ ।**
**संतासी हा भवमळ । स्वप्नीं हि लागों न शके ॥ १९ ॥**
**अहंकारगज डुलती । जोंवरी संतसिंहाचे चपेटे न येती ॥**
**थाप हाणोनि विदारिती । गंडस्थळें त्यांचीं ॥ २० ॥**

अहंकारी पाखांड्यांना म्हणावें, तोंवर तुमचा धिंगाणा चालूं द्या. हें वर्णन करतांना श्रीसमर्थांच्या मनश्चक्षूपुढें कोणकोणाच्या मूर्ति येऊन गेल्या असतील, सांगतां येत नाहीं. पण आज आपणांस त्यांत श्रीसमर्थ च पाहावयास मिळत आहेत.

या प्रकरणाच्या शेवटीं जे चार समास परिशिष्ट म्हणून दिले आहेत, ते चतु:समासी अशा स्वतंत्र नांवाखालीं मोडतात.

## ( ११ ) जनस्वभाव किंवा बहुधा गोसावी

प्रत्ययज्ञानशून्य आचरट गुरु आणि त्यांचे बावळट शिष्य यांवर या प्रकरणांत श्रीसमर्थांनीं निर्भीडपणें कोरडे ओढले आहेत. स्वार्थ साधण्यासाठीं ढोंगी गुरूंची सांथ त्या काळीं होती, आतां आहे आणि या देशांत नेहमीं च असणार असें दिसतें. लोकांत जोंवर अज्ञान आणि चिकित्सेचा अभाव आहे तोंवर त्यांच्या भोळेपणाचा फायदा घेणाऱ्या भोंदु गुरूंचें पीक नेहमीं च येत जाणार. श्रीसमर्थांच्या वेळीं हि

**जिकडे तिकडे ज्ञानी जाले । उदंड गोसावी उतले ।**
**तयाचे संगतीनें जाले । बाष्कळ प्राणी ॥ ७ ॥**
**काशापासुनी काय जालें । ब्रह्मांड कोणें निर्मिलें ।**
**कांहीं न कळतां चि भुंकिलें । गाढव जैसें ॥ १० ॥**
**वेदशास्त्रांसी मिळेना । अध्यात्म कांहीं च कळेना ।**
**माजला बोका वळेना । रेडा जैसा ॥ ११ ॥**
**कोण दीक्षा आहे कैसी । विवेकाची स्थिति कैसी ।**
**न पाहातां चि वसवसी । श्वान जैसें ॥ १२ ॥**
**ऐसे प्रकारीचे जन । अंतरीं अवघा चि अनुमान ।**
**प्रचीतीविण बाष्कळ ज्ञान । उगें चि बोले ॥ १३ ॥**

इतकी कठोर भाषा श्रीसमर्थांनीं अन्यत्र क्वचित् च काढली असेल. लबाड गुरु आणि सात लबाड शिष्य यांची जोडी जमली म्हणजे किती श्रद्धाळु जनांना खड्ड्यांत नेऊन घालून ते आपली तुंबडी भरीत असतील, याची कल्पना करवत नाहीं. केवढें पाप हें ! शिष्य श्रद्धेच्या जोरावर कदाचित् सद्गतीला जात असेल, पण ढोंगी गुरूच्या कपाळची निरयगति मात्र टळत नसेल ! धर्माच्या नांवावर चाललेलें असलें पापाचरण पाहून श्रीसमर्थांच्या मुखांतून या प्रकरणांत सात्त्विक संतापाचे शब्द निघाले आहेत.

**अनीति अविवेकी अन्याई । अभक्त अधर्म लंडाई ।**
**वेदशास्त्र करील काई । तया मूर्खाला ॥ १ ॥**

असला मूर्ख गुरु असला म्हणजे तो शिष्याला कोणतें वळण लावील आणि कोणतें नाहीं, याचा नेम च नाहीं.

**येक लोक उपदेश घेती। देवार्चन टाकूनि देती।**
**धर्म नीति बुडविती। महापाषांडी ॥ १५ ॥**
**येक म्हणती आमुचा गुरु। तयाचा अगाध विचारु।**
**तेथें अवघा येकंकारु। भेद् चि नाहीं ॥ १६ ॥**

असलीं पाखंडी मतें पढविलीं जावयाचीं. गुरु भ्रमिष्ट च असला, तर त्या वेड्याचें आचरण च शिष्यांच्या कौतुकाचा विषय होऊन बसतें.

**येक म्हणती गुरु आमुचा। करी अंगिकार विष्ठेचा ॥ १७ ॥**
**येक म्हणतो येक चि तो। अखंड वोक वर्पतो ॥ १८ ॥**
**पाहा गोसावी आमुचा। गोहाडींत लोळे ॥ १९ ॥**

इत्यादि वेड्यांचीं घाणेरडीं कृत्यें साधुत्वाचीं लक्षणें म्हणून गणलीं जातात. परंतु असल्या

**वोंगळपणाची स्तुति। स्वयें वोंगळ चि करिती।**
**शुचिष्मंत महापंडितीं। यासी मानिजेना ॥ २१ ॥**

चेडें चेटकें करणारा गुरु असला, तर त्याच्या त्या च कृत्यांची प्रतिष्ठा गायिली जाते.

गुरूची स्तुति करण्याचा एक तिसरा प्रकार आढळतो, तो म्हणजे असंभाव्य, अस्वाभाविक, अनैसर्गिक गोष्टी गुरूच्या माथीं मारल्या जातात.

**आमुचा गुरु गैब चि होतो। पुन्हा दुसरे दिसीं उमटतो।**
**अचेतनें चालवितो। मोठा ज्ञानी ॥ ३३ ॥**
**व्याघ्रावरी बैसे निशंक। हातीं सर्पाचा चाबुक।**
**वांचले होते सहस्र येक। सामर्थ्यबळें ॥ ३४ ॥**

ह्या असल्या चमत्काराच्या गोष्टी घडत असतील किंवा नसतील, पण त्यांचा आणि शुद्ध ज्ञानाचा अर्थाअर्थीं संबंध नसतो, म्हणून असल्या प्रकारांची श्रीसमर्थांनीं किंचित् चेष्टा च केली आहे.

**आमुचे गुरु भविष्य सांगती । रेड्याकरवीं वेद म्हणविती ।**
**गधड्याकरवीं पुराण सांगविती । सामर्थ्यबळें ॥ ४३ ॥**
**कुतऱ्याकरवीं रागोद्धार । कोंबड्याकरवीं तत्त्वविचार ।**

इत्यादि. या असल्या अस्वाभाविक चमत्काराच्या गोष्टींत, खुद्द श्रीसमर्थांच्या चरित्रांत त्यांच्यासंबंधानें प्रचलित केलेल्या गोष्टींचा हि श्रीसमर्थांनीं समावेश केला आहे. उदाहरणार्थ

**लोकां देखतां फुलें करिती । मद्यमांसाचीं ॥ ६१ ॥**
**येक गोसावी महा भला । पोरीं वाळवंटीं पुरिला ॥ ६३ ॥**
**थोड्या द्रव्याचें उदंड करिती ॥ ६६ ॥**
**थोडें अन्न पुरवावें । बहुत जनासी ॥ ६७ ॥**

म्हणजे इतकें खरें कीं, श्रीसमर्थांनीं स्वतःसकट कोणाची च पत्राज ठेवली नाहीं.

त्यांचें म्हणणें असें कीं, या साऱ्या गौण गोष्टी होत. त्यांवर च आपली दृष्टि खिळून राहिली तर आपण शुद्ध ज्ञानाला मुकूं. म्हणून त्यांचा सर्वांना शेवटचा इषारा आहे कीं,

**ऐसें उदंड वर्तलें लोकिकीं । परी येणें सार्थक नव्हे कीं ।**
**अध्यात्मविद्या विवेकीं । जाणिजेते ॥ ६८ ॥**

असें हें सत्तर ओव्यांचें लहानसें चटका लावणारें प्रकरण म्हणजे

**माझे उपासनेचा वडिवार । ज्ञान सांगावें साचार ॥ १०-८-२७॥**

ही जी श्रीसमर्थांची प्रतिज्ञा, तिचें उत्कृष्ट उदाहरण होय.

# श्रीसमर्थहृदयाचा पूर्वार्ध

येथें संपला. आपण श्रीसमर्थवाङ्मयोदधीच्या बरोबर मध्यावर येऊन पोंचलों आहोंत. चौफेर नजर फेंकून पाहा, येथें आतां श्रीसमर्थांच्या शिवाय दुसरे कोणी च दृष्टीस पडणार नाहीं. त्यांनीं च आपणांस येथवर सुरक्षित आणलें व ते च शेवटपर्यंत नेऊन पोहोंचवितील, हा विश्वास असूं द्या. त्यांच्या चरणावर अचल दृष्टि ठेवून आपण पुढें जाऊं या. श्रीसमर्थांचा प्राणभूत ग्रन्थ – श्रीमत् ग्रन्थराज दासबोध – त्यांत आतां पोहावयास लागावयाचें. एकीकडे आनंद होत आहे, तर दुसरीकडे मनांत किंचित् भय हि उभें राहात आहे. अशी मनाची विलक्षण अवस्था झाली आहे. थोडा वेळ त्यांच्या चरणापाशीं विश्रांति घेऊन मग आपण पुढें मार्ग आक्रमण्यास सुरुवात करूं. श्रीसमर्थांच्या च शब्दांत थोडा फेरफार करून म्हणतों, वाचकांपैकीं

**कंटाळले तेहीं पुरें करावें । उरले तेहीं पुढें चलावें ।**
**आतां यथून यथेच्छ लुटावें । गुरुकृपेचें भांडार ॥**

[ ६ ]

## श्रीमत् ग्रन्थराज दासबोध

( १ ) पूर्वार्ध—दशक १ ते ८

( २ ) उत्तरार्ध—दशक ९ ते २०

## ( १ ) पूर्वार्ध – दशक १ ते ८

सामान्य विचार, ग्रन्थाचें स्थूल स्वरूप, दशक पहिला, दशक दुसरा, दशक तिसरा, दशक चौथा, दशक पांचवा, दशक सहावा, दशक सातवा, दशक आठवा

### सामान्य विचार

**श्रीमत् ग्रन्थराज दासबोध** म्हणजे प्रत्यक्ष श्रीसमर्थांचें च स्वरूप होय. प्रस्तुतचें वीस दशकी स्वरूप सिद्ध होण्यापूर्वी त्याचे तीन अवतार झाले. पहिला अवतार एकवीससमासीचा, त्याचा विचार लघुकाव्यांत आपण नुकता च संपविला. त्यानंतरचा दुसरा अवतार म्हणजे ग्रन्थराजाचे पहिले सहा च दशक होत. या सहा दशकांची जन्मभूमि शिवतरची घळ होय. त्या घळींत शके १५७६ ते १५८६ ग्रन्थलेखनार्थ जाऊन राहण्याचा श्रीसमर्थांचा विचार झाला होता. नंतर हि जाऊन येऊन ते त्या घळींत असत. सहाव्या दशकाच्या चवथ्या समासांत गतकली

**च्यारि सहस्र सातसें साठी ।**

असा उल्लेख आहे. गतकली ४७६० म्हणजे शके १५८१ होय. त्या वेळीं श्रीसमर्थ शिवतरच्या घळींत होते. हे सहा दशक त्या घळींत रचले गेले, याला आणखी एक लहानसें प्रमाण आहे. श्रीसांप्रदायिक विविध विषय – लेखांक ८२ – यांत हें सिद्ध करून दाखविण्यांत आलें आहे कीं, शिवतरची घळ म्हणजे च श्रीसमर्थांचा सुंदरमठ होय. श्रीसमर्थप्रतापाच्या आठव्या समासांतील

**समर्थें सुंदरमठीं गणपति केला । दोनी पुरुष सिंधुरवर्ण अर्चिला ॥**

या ओवीवरून असें दिसतें कीं, सुंदरमठीं म्हणजे शिवतरच्या घळींत श्रीसमर्थांनीं दोन पुरुष उंचीची सिंदूरचर्चित अशी गणपतीची भव्य आणि प्रचंड मूर्ति स्थापन केली होती. मला असें दिसतें कीं, दासबोधांत ग्रन्थारंभीं दुसऱ्या समासांत जें गणेशस्तवन केलें आहे, तें करतांना श्रीसमर्थांच्या पुढें ही च गणेशाची मूर्ति होती.

**भव्यरूप वितंड । भीममूर्ति माहा प्रचंड ।**
**विस्तीर्ण मस्तकीं उदंड । सिंधूर चर्चिला ॥ १–२–१० ॥**

दासबोधांतील या वर्णनांत आणि प्रतापांतील मूर्तीच्या वर्णनांत कितीतरी पूर्ण साम्य आहे ! शंका वाटत नाहीं कीं, पहिले सहा दशक शिवतरच्या घळींत लिहिले गेले. सुंदरमठ हें नांव ठाऊक नव्हतें, अशा वेळीं ती घळ मीं प्रथम पाहिली तेव्हां च मला ती स्वर्गतुल्य भासून 'पृथ्वीवरील स्वर्ग' असें मीं तिचें वर्णन केलें; आणि आतां तर आपण जाणतों कीं, श्रीसमर्थांच्या वास्तव्यानें त्या घळीला पवित्रपणा येऊन दासबोधाच्या पहिल्या सहा दशकांची निर्मिती त्या घळींत झाली ! दासबोधाचे हे पहिले सहा दशक म्हणजे दासबोधाचा दुसरा अवतार होय. या दुसऱ्या अवतारांत पहिल्या अवतारांतील तीन समास जसेच्या तसे घेण्यांत आल्याचें आपण पाहिलें च आहे.

दासबोधाचा तिसरा अवतार म्हणजे एकटा सातवा दशक होय. हा दशक पाहिला असतां तो स्वयंपूर्ण दिसतो. त्यांत आरंभीं स्वतंत्र विस्तृत **नमन** असून पहिला समास मंगलाचरणाचा च आहे. त्यांत प्राकृतभाषेची तरफदारी आहे, प्रमाणग्रन्थांचा उल्लेख केला आहे, सद्गुरुकृपेची महती आहे, ब्रह्मनिरूपण आहे, साधनमार्ग दाखविला आहे, मुक्तावस्था वर्णिली आहे आणि शेवटीं परमार्थाला आरंभ सद्गुरुभजनापासून च होतो, असें सांगून

**म्हणौन सद्गुरूचें भजन । जयासी घडे तो चि धन्य ।**
**सद्गुरुविण समाधान । आणीक नाहीं ॥ ७–१०–४१ ॥**
**सरली शब्दाची खटपट । आला ग्रंथाचा शेवट ॥**

असा ग्रन्थाचा शेवट केला आहे. याप्रमाणें श्रीसमर्थांनीं सातवा दशक हा स्वतंत्र ग्रन्थ च कल्पिला आहे व तशी त्याची स्वयंपूर्ण रचना हि आहे.

या दशकाचें मूळचें नांव 'दासबोध' असें च होतें, असें दिसतें. कुबडीकारांनीं त्याचें नांव दासबोध असें च मानलें आहे. कुबडीकारांना होऊन शंभर वर्षे होऊन गेलीं. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ३८४ यांत एका स्वतंत्र प्रकरणांत सातव्या आणि आठव्या दशकांचा अनुक्रमें दासबोध आणि ज्ञानदशक अशा नांवांनीं निर्देश करून त्यांतील प्रत्येक

समासांतील विषयांचीं नांवें दिलीं आहेत. नेमक्या सातव्या आणि आठव्या दशकांतील च समासांचा संकेत दिला जावा, यावरून हि हे दोन दशक स्वतंत्र असावेत, या आपल्या अनुमानाला बळकटी येते.

याप्रमाणें सातवा दशक एके काळीं स्वतंत्र ग्रन्थ मानला गेला असला आणि त्याचें नांव दासबोध असलें, तरी तो ग्रन्थ सहादशकी दासबोधानंतर रचला गेला असला पाहिजे, असें अंत:प्रमाणावरून म्हणतां येतें. सातव्याच्या पहिल्या समासांतील विषयाचे धागे सहाव्याच्या शेवटच्या समासांत आढळतात, यावरून निश्चित वाटतें कीं, सातव्या दशकाची रचना सहाव्या दशकानंतर च झाली असली पाहिजे. सहाव्याच्या दहाव्यांत

**मुक्यानें गूळ खादला । गोडी न ये सांगाव्याला ॥**

असें आहे, तर तो च धागा सातव्याच्या पहिल्यांत

**मुकेपणाचें बोलणें । हें जयाचें तो चि जाणे ॥**

असा पुढें ओढला आहे. एवढेंचसें काय, पण ६×१० तील च कथानुसंधान ७×१ त पुढें चालविलेलें आहे.

**स्वप्नीं स्वप्नाचा विचार । तो तूं जाण हा संसार ॥**

असा विषय ६×१० त आला आहे, तो च विषय

**संसार हा चि दीर्घ स्वप्न ॥**

असें सांगून ७×१ त पुढें चालविला आहे.

आठव्या स्थानीं स्थापिलेला ज्ञानदशक हा मध्यंतरीं च केव्हां तरी स्वतंत्रपणें रचला गेलेला दिसतो. तो सहा दशकांच्या पूर्वीं च रचला असावा.

**मुळीं ब्रह्म निराकार । तेथें स्फूर्तिरूप अहंकार ।**
**तो पंचभूतांचा विचार । ज्ञानदशकीं बोलिला ॥** ४-१०-१ ॥

असा ज्ञानदशकाचा उल्लेख चवथ्या दशकांत करण्यांत आला आहे. पण या हि पेक्षां ५×१० त सिद्धांचीं लक्षणें सांगतांना

**तथापि ज्ञानदशकीं बोलिलें । म्हणौनि वक्तृत्व आटोपिलें ॥**

'ज्ञानदशकांत विस्तारपूर्वक बोललों च आहें, म्हणून येथें आटोपतें घेतों' असा त्या समासाचा शेवट करीत आहेत, तो पाहून माझी खात्री होते कीं, सहा दशकांच्या आधीं च ज्ञानदशक तयार होता.

अखेरीस, कोणीं सांगावें, तंजावरमठपति भीमस्वामी यांनीं श्रीसमर्थांच्या निर्याणाच्या वर्णनांत (श्री सांप्रदायिक विविध विषयांक २५ वा) म्हटल्याप्रमाणें १६०३ च्या मार्गशीर्षांत, पहिले सहा दशक, नंतर सातवा दशक, नंतर आठवा ज्ञानदशक व नंतर, सांचलेले अनेक स्फुट समास एकत्र करून, त्यांत च एकवीससमासींतील आठवा समास सामील करून, त्यांची विल्हे लावून व दशक पाडून, नऊ ते वीस असे दशक जोडले व याप्रमाणें एकंदर वीस दशक दोनशें समासांचा ग्रन्थराज दासबोध, श्रीसमर्थांनीं महाराष्ट्राच्या हवालीं केला! आणि नंतर दोन च महिन्यांनीं माघ वद्य ९ स

**माझी काया आणि वाणी। गेली म्हणाल अंतःकर्णी।**
**परी मी आहे जगज्जीवनीं। निरंतर॥ १॥**
**आत्माराम दासबोध। माझें स्वरूप स्वतःसिद्ध।**
**असतां न करावा हो खेद। भक्तजनीं॥ २॥**

याप्रमाणें भक्तजनांना प्रेमपूर्वक आश्वासन देऊन आणि आपली वाङ्मयमूर्ति मागें ठेवून श्रीसमर्थांनीं आपल्या स्थूल देहाचा त्याग केला!

श्रीमत् ग्रन्थराज दासबोध म्हणजे आपण च स्वतः, असें त्यांनीं शेवटीं सांगून भक्तांचें समाधान केलें, तसें पूर्वीं हि एकदां सांगितलें होतें. श्रीवेणाबाईंनीं एकदां श्रीसमर्थांस प्रेमानें विचारिलें, महाराज, श्रीरामापुढें आम्ही केव्हां केव्हां आपलें हितगुज सांगतों व श्रीराम हि आमच्या जीवींच्या गोष्टी ऐकून घेऊन आम्हांस धीर देतात, पण महाराज, याप्रमाणें आम्हीं आमचीं सुखदुःखें श्रीसमर्थग्रन्थार्चनीं निवेदन केलीं, तर त्यापासून कांहीं साक्षात्कार होतील काय? त्यावर श्रीसमर्थांनीं वेणाबाईस म्हटलें, आम्ही जाणतों तुम्हांला हें सर्व माहीत आहे व तुम्ही हा प्रश्न स्वतःसाठीं करीत नसून लोकसंग्रहार्थ करीत आहां, तथापि तुमच्या प्रश्नाचें उत्तर इतकें च कीं, याविषयीं कोणी हि लवमात्र शंका बाळगण्याचें कारण नाहीं!

**श्रीरामदेवार्चन सिद्ध चि आहे।**
**श्रीग्रंथराजदासबोधसामर्थ्य सिद्ध चि पाहे।**
**जो जो महंत येथें निश्चयें राहे।**
**तो तो लाहे साक्षात्कारु॥ स. प्र. ९-३८॥**

श्रीमत् ग्रन्थराज दासबोध म्हणजे श्रीसमर्थ च या भावनेनें जो जो कोणी दासबोध मस्तकीं धारण करील, त्याला हृदयाशीं धरील, त्यांतील शिकवण पाहील, ती आचरणांत आणील, त्याला त्याला आपल्या स्वरूपाचा साक्षात्कार झाल्यावांचून राहणार नाहीं ! असें ग्रन्थराजाचें सामर्थ्य प्रत्यक्ष श्रीसमर्थांनीं वेणाबाईस सांगितलें, तें वेणाबाईनीं आपल्या सांप्रदायिकांना निवेदन केलें, तें गिरिधरांनीं ऐकलें आणि श्रीसमर्थप्रतापांत लिहून ठेवलें, तें तुम्हांआम्हांपर्यंत येऊन पोंचलें आहे ! कोण अविश्वास धरील ? गिरिधर हे वेणाबाईच्या परंपरेंतील खरे, पण ते कैक वर्षे श्रीसमर्थांच्या सहवासांत होते, ते याप्रमाणें सांगत आहेत, हें लक्षांत घ्या. वरील ओवींत श्रीसमर्थमुखींचीं वचनें नमूद केलेलीं आहेत, तीं कोण खोटीं करील ? उणीव असेल तर ती केवळ आपल्या निष्ठेची आहे ! गिरिधर म्हणतात, श्रीसमर्थवचनांची प्रतीति आजपर्यंत अनेक निष्ठावंत गुरुभक्तांना आलेली आहे.

**समर्थसद्गुरुनिजबोध।**
**दासबोधरूपें सर्वत्र प्रसिद्ध।**
**नाना साक्षात्कार होती विविध।**
**येकनिष्ठ गुरुभक्तांसी ॥ स. प्र. २०-३३॥**

कांहीं वेळ येथें च थांबूं या. पुढें सरकण्याला एकदम धैर्य होत नाहीं.

## ग्रन्थाचें स्थूल स्वरूप

प्रसंगानुसार वेळोवेळीं लिहिल्या गेलेल्या समासांचे ९ ते २० पर्यंतचे दशक पाडण्यांत आल्यामुळें एकंदर ग्रन्थाचे सरळ दोन भाग होतात. पहिल्या आठ दशकांचा पूर्वार्ध व पुढच्या बारा दशकांचा उत्तरार्ध होय. पहिल्या आठ दशकांची ओवीसंख्या क्रमशः ३२६, ४७०, ५८१, २९५, ५७३, ४१३, ५६४ व ६४४ एकूण ३८६६ आहे व पुढच्या बारांची ४२७, ३५४, २८७, २९४, ३००, ४०६, ३३७, ३०२,

२९७, २८८, २८५ व ३०८ एकूण ३८८५ आहे व पूर्वार्ध उत्तरार्ध मिळून संपूर्ण ग्रन्थराजाची ओवीसंख्या ७७५१ भरते.

एकंदर ग्रन्थाचा मुख्य विषय अध्यात्म होय. पहिल्या आठ दशकांचा तर तो एक च विषय सर्वस्वीं आहे, पण पुढचे बारा दशक, निरनिराळ्या प्रसंगीं सांगितलेल्या समासांचे बनलेले असल्यामुळें त्यांत अध्यात्माबरोबर च राजकारण, समाजकारण, व्यवहार, महंतलक्षणें, चातुर्यलक्षणें, कवित्वलक्षणें, कीर्तनलक्षणें, निस्पृहवर्तणूक, लेखनक्रिया, बुद्धिवाद, यत्नवाद इत्यादि राष्ट्रधारणेला आवश्यक असे अनेक विषय आले आहेत.

पहिल्या आठ दशकांचे हि विषयप्रतिपादनाच्या धोरणानें मी दोन भाग मानतों. पहिल्या आठ दशकांचा, पहिले चार दशक हा पूर्वार्ध व पुढचे चार दशक हा उत्तरार्ध होय.

पूर्वार्धाच्या पूर्वार्धानें पूर्वार्धाच्या उत्तरार्धाचा जो विषय, त्यांत साधकाचा प्रवेश व्हावा म्हणून पूर्वतयारी केली आहे.

पूर्वार्धाच्या उत्तरार्धाचा विषय कोणता ? राजकारण ? नव्हे. परमार्थाच्या तुलनेनें राजकारण ही अति लहान बाब आहे. राजकारण तुच्छ मानावयाचें नाहीं. तसें करणें हि चूक होईल. पण तें च सर्वस्व मानणें योग्य नव्हे. राजकारणाच्या अनंत पटीनें परमार्थाचें महत्त्व आहे. राजकारण एकपट कठीण आणि आवश्यक असेल तर खरा परमार्थ त्याच्या सहस्रपट कठीण आणि आवश्यक आहे. ज्याला परमार्थ साधला, त्यानें राजकारण च काय, सर्व कांहीं साधलें. राजकारण हा, जो परमार्थी आहे, त्याच्या हातचा मळ आहे. तो त्याचा खेळ आहे. तो जसा श्रीसमर्थ खेळले, तसा तो, ज्ञानेश्वर-एकनाथ-तुकारामादि संतांनीं मनांत आणलें असतें तर त्यांना हि खेळतां आला असता. आपण आपल्या हल्लींच्या परिस्थितींत राजकारणाला विशेष महत्त्व देऊन श्रीसमर्थांकडे सर्वस्वीं ओढले जातों, हें ठीक च आहे, पण राजकारणाच्या पायीं परमार्थ अवघा च विसरला जावा, हें विहित नव्हे. श्रीसमर्थांकडे केवळ राजकारणाच्या दृष्टीनें पाहणें, हें एकांगी पाहणें होय. तसें च त्यांची केवळ परमार्थाची च बाजू घेऊन बसणें, तें हि चूक होईल. श्रीसमर्थ एकदेशी नव्हते. त्यांच्या नुसत्या

राजकारणावर च लुब्ध होणें, किंवा नुसती पारमार्थिक च शिकवण पाहणें, हें त्यांचें एकांगी दर्शन होईल.

माझ्या म्हणण्याचा आशय इतका च कीं, त्यांनीं राजकारणाचा हि पुष्कळ उपदेश केलेला आहे, पण तो सारा प्रसंगोपात आहे. प्रपंचांत राजकारणाचें स्थान कोणतें तें त्यांनीं दर्शविलें आहे. त्याची आवश्यकता हि पटविली आहे, पण राजकारण हें त्यांच्या जीविताचें सर्वस्व नव्हतें. ईश्वरी संकेतानुसार ती त्यांच्या हातून सहज घडलेली गोष्ट होय. परमार्थाच्या सिंहासनावरून बोलतांना राजकारण त्यांच्या दृष्टिपथांत येऊं च शकलें नाहीं.

तात्पर्य, पूर्वार्धाच्या उत्तरार्धाचा विषय राजकारण नसून अध्यात्मविद्येचा परमार्थ हा आहे. ग्रन्थारंभीं च

**बहुधा अध्यात्मनिरोपण । निरोपिलें ॥ १-१-३ ॥**

अशी त्यांनीं प्रतिज्ञा केली आहे,

**वांछ्या धरून चित्तीं । परमार्थाची ॥ १-२-३० ॥**

गणेशस्तवन केलें आहे, आणि पुन्हा परमार्थाचें साधन सांगण्यास सुरुवात करतांना

**अध्यात्मविद्येच्या परमार्था । मज बोलवावें ॥ ४-१-१ ॥**

अशी गणेशाची प्रार्थना केली आहे.

तेव्हां, इतकें खरें कीं, ग्रन्थराजाच्या पूर्वार्धाचा विषय निवळ परमार्थ होय, याविषयीं शंका नाहीं. त्या परमार्थाकडे सर्वांची प्रवृत्ति व्हावी, म्हणून पूर्वार्धाच्या पूर्वार्धातील दुसऱ्या आणि तिसऱ्या दशकांत प्रपंचाची करुण काहाणी सांगून श्रीसमर्थांनीं आपल्या श्रोत्यांना अगदीं विव्हल करून सोडलें आहे. ग्रन्थराजाच्या पूर्वार्धाचें हें असें स्थूल स्वरूप आहे. आतां आपण त्याचा दशकवार विचार करूं.

## दशक पहिला

निवळ स्तवनाचा दिसतो, पण अति महत्त्वाचा आहे.

**प्रथम प्रास्ताविक समास । त्यांत करिती विषयोपन्यास ।**
**आणि सांगती आधारग्रन्थांस । फलश्रुतीसहित ॥ १ ॥**

**मुख्य आधार आत्मप्रचीतीचा । श्रीसद्गुरुसमर्थचरित्राचा ।**
**चरित्रानुरोधें अर्थाचा । निवाडा करावा ॥ २ ॥**

पहिला समास प्रस्तावनारूप आहे. या ग्रन्थाचा विषय कोणता, त्याला आधार कोणते आणि त्याची फलश्रुति कोणती, अशा तीन प्रश्नांचीं उत्तरें या समासांत दिलीं आहेत.

बहुधा अध्यात्मनिरूपण हा या ग्रन्थाचा **विषय** असून त्यांत

**भक्तिचेन योगें देव । निश्चयें पावती मानव ॥ १-१-४ ॥**

हा सिद्धान्त प्रस्थापित केला आहे.

त्याला **आधार**

**शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता ।**
**उत्तरगीता अवधूतगीता । वेद आणि वेदांत ॥ १-१-१८ ॥**
**भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पांडवगीता ।**
**गणेशगीता यमगीता । उपनिषदें भागवत ॥ १९ ॥**

इत्यादि नाना ग्रन्थांचा असला, तरी त्याचा भार आत्मप्रचीतीवर आहे.

यावर कोणी कोणी एक आक्षेप असा घेत असतात किंवा मनांत आणीत असतात कीं, मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ, दासोपंत इत्यादिकांचे ग्रन्थ श्रीसमर्थांनीं अवलोकिले असतां, इतकें च नव्हे, तर ते आधारास हि घेतले असतां चुकून सुद्धां ते कोठें त्या ग्रन्थकारांचा किंवा त्यांच्या ग्रन्थांचा उल्लेख करीत नाहींत किंवा त्यांच्या ग्रन्थांतील वचनें आधारासाठीं उद्धृत करीत नाहींत, हें कसें ? याचें उत्तर सरळ आणि सोपें आहे. तें असें कीं, त्या काळीं परमार्थांत संस्कृत ग्रन्थ हेच प्रमाणग्रन्थ मानले जात. संस्कृत ग्रन्थांच्या आधारें प्राकृतांत ग्रन्थरचना होऊं लागली होती. प्रश्न असे, प्राकृत ग्रन्थाला आधार काय ? एका प्राकृत ग्रन्थाला दुसऱ्या प्राकृत ग्रन्थाचा च आधार दाखविल्यानें प्रश्न सोडविला जात नाहीं. त्या दुसऱ्या प्राकृत ग्रन्थाला आधार कोणता, असा प्रश्न उद्भवतो च. आधार संस्कृत ग्रन्थापर्यंत नेऊन भिडविला तर च तो आधार. प्राकृताला प्राकृताचा च आधार काय होय ? आधार संस्कृताचा पाहिजे. ती

देववाणी आहे. भगवंत त्या वाणींत बोलले. तींत भगवद्वाक्यें आहेत. तिचा आधार पाहिजे, म्हणून प्राकृत ग्रन्थांचा उल्लेख करण्यांत आला नाहीं.

ग्रन्थाची **फलश्रुति** २८ ते ३७ या दहा ओव्यांत सांगितली आहे. त्या दहा ओव्यांकडे पाहून माझी जी कल्पना होते, ती समजण्यासाठीं त्या ओव्या उद्धृत करणें अगत्याचें वाटतें.

**आतां श्रवण केलियाचें फळ । क्रिया पालटे तत्काळ ।**
**तुटे संशयाचें मूळ । येकसरां ॥ १-१-२८ ॥**

**मार्ग सांपडे सुगम । न लगे साधन दुर्गम ।**
**सायोज्यमुक्तीचें वर्म । ठाईं पडे ॥ २९ ॥**

**नासे अज्ञान दुःख भ्रांती । शीघ्र चि येथें ज्ञानप्राप्ती ।**
**ऐसी आहे फळश्रुती । ईये ग्रंथीं ॥ ३० ॥**

**योगियांचें परमभाग्य । आंगीं बाणे तें वैराग्य ।**
**चातुर्य कळे यथायोग्य । विवेकेंसहित ॥ ३१ ॥**

**भ्रांत अवगुणी अवलक्षण । ते चि होती सुलक्षण ।**
**धूर्त तार्किक विचक्षण । समयो जाणती ॥ ३२ ॥**

**आळसी ते चि साक्षपी होती । पापी ते चि प्रस्तावती ।**
**निंदक ते चि वंदूं लागती । भक्तिमार्गासी ॥ ३३ ॥**

**बद्ध चि होती मुमुक्ष । मूर्ख होती अति दक्ष ।**
**अभक्त चि पावती मोक्ष । भक्तिमार्गें ॥ ३४ ॥**

**नाना दोष ते नासती । पतित ते चि पावन होती ।**
**प्राणी पावे उत्तम गती । श्रवणमात्रें ॥ ३५ ॥**

**नाना धोके देहबुद्धीचे । नाना किंत संदेहाचे ।**
**नाना उद्वेग संसाराचे । नासती श्रवणें ॥ ३६ ॥**

**ऐसी याची फलश्रुती । श्रवणें चुके अधोगती ।**
**मनास होय विश्रांती । समाधान ॥ ३७ ॥**

फलश्रुतीचे दोन भाग पडतात. एकदां ३० व्या ओवींत फलश्रुति पुरी केली असतां पुन्हां ३१ व्या ओवीपासून सुरू करून ३७ व्या ओवींत ती संपविली

आहे. यावरून माझ्या मनांत कल्पना येते कीं, या प्रस्तावनेच्या समासावरून श्रीसमर्थांनीं दोनदां हात फिरविला असावा. पहिली सहा दशकांची आवृत्ति तयार झाली तेव्हां २८ ते ३० ओव्यांची, एवढी च फलश्रुति सांगितली असावी, पण पुढें सातवा आणि आठवा दशक जोडून आणि विशेषत: अनेक स्फुट समास घेऊन नऊ ते वीस दशक जोडून संपूर्ण ग्रन्थाची रचना झाली तेव्हां ३१ ते ३७ अशा फलश्रुतीच्या ओव्या समासांत अंतर्भूत केल्या असाव्यात. त्या च वेळीं, ग्रन्थांत कोणते विषय आले आहेत याविषयीं ज्या ३ ते १२ ओव्या आहेत, त्यांत हि इष्ट तो फेरफार केला असावा, असें विशेषत: १० ते १२ या ओव्या पाहून मला वाटतें.

ग्रन्थाला मुख्य आधार जसा आत्मप्रचीतीचा, तशी फलश्रुतींत मुख्य फलश्रुति म्हणजे

**मनास होय विश्रांती । समाधान ॥**

ही फलश्रुति आपल्या पदरांत पडली नाहीं, तर दासबोध वाचून हि तो जसा वाचावा तसा आपण वाचला नाहीं, तो आपणांस समजला नाहीं, समजलासा वाटला तरी उमगला नाहीं, असें समजावें. नोकरी लागेल, लग्न होईल, अपत्यें होतील, पैसा मिळेल या कोटींतील ही फलश्रुति नाहीं. ही फलश्रुति म्हणजे आशीर्वाद नव्हे. हा प्रत्ययाचा ग्रन्थ आहे व त्याचा प्रत्यय च आला पाहिजे !

दोन ते दहा या नऊ समासांत क्रमश:

**गणेश शारदा सद्गुरु । सज्जन श्रोते कवेश्वरु ।**
**सभा परमार्थ नरदेह थोरु । स्तवन त्यांचें ॥ १ ॥**

या नवांचें स्तवन आहे. गणेशस्तवनांतील दहाव्या ओवीवरून सुचलेली कल्पना वर सामान्य विचारांत साधार निवेदन केली च आहे. तिसऱ्या समासांत शारदेला नमन आहे. शारदा म्हणजे माया च.

**ऐसी बहुवेषें नटली । माया शारदा येकली ॥ १३ ॥**

तिच्या संपूर्ण स्वरूपाचें वर्णन चोविसाव्या ओवींत आलें आहे.

**जें जें दृष्टीनें देखिलें । जें जें शब्दें बोळखिलें ।**
**जें जें मनास भासलें । तितुकें रूप जयेचें ॥ २४ ॥**

चवथ्यांत सद्गुरुस्तवन आहे. तें सगुणाचें नसून अविनाशी अशा सद्गुरुपदाचें आहे.

**आतां सद्गुरु वर्णवेना । जेथें माया स्पर्शों शकेना ।**
**तें स्वरूप मज अज्ञाना । काय कळे ॥ १-४-१ ॥**

ते दिसतात, बोलतात, आपली चिंता करितात, पण त्यांचें स्वरूप अगम्य आहे.

**न कळे न कळे नेति नेति । ऐसें बोलतसे श्रुती ।**
**तेथें मज मूर्खाची मती । पवाडेल कोठें ॥ २ ॥**

दिसून दिसत नाहींत, कळून कळत नाहींत, बोलून बोलत नाहींत, असें हें जगाच्या विरहित स्वरूप आहे, त्यांना नमन तरी कसें करावें? दुरून करावें, त्यांना पावेल!

**मज न कळे हा विचारु । दुरूनि माझा नमस्कारु ॥ ३ ॥**

असें म्हणून मायायोगें सद्गुरूचा महिमा वर्णन करण्यास श्रीसमर्थ प्रवृत्त झालें आहेत. सद्गुरुस्वरूप कशासारखें आहे म्हणून एक एक दृष्टान्त देऊन पाहिला पण साऱ्या उपमा फिक्या पडल्या, असें पाहून शेवटीं म्हणतात

**म्हणौनि सद्गुरु वर्णवेना । हे गे हे चि माझी वर्णना ॥**

ज्याचें वर्णन होत नाहीं, हें च ज्याचें वर्णन, असलें हें विचित्र वर्णन समजेल तरी कोणाला?

**अंतरस्थितीचिया खुणा । अंतर्निष्ठ जाणती ॥ ३१ ॥**

न बोलतां, न ऐकतां, न पाहतां तें स्वरूप नुसतें जाणावयाचें आहे.

श्रीसमर्थांच्या अध्यात्माला येथून च सुरुवात झाली, म्हणावयाचें. पांचव्या समासांत संतसज्जनांचें हि वर्णन या च प्रकारचें आहे.

**वस्तूसी वर्णिलें नवचे । तें चि स्वरूप संतांचें ।**
**या कारणें वचनाचें । कार्य नाहीं ॥ १-५-१५ ॥**

सहाव्यांत श्रोत्यांना नमन असून आठव्यांत पुन्हां सभेला नमन आहे, त्यांत फरक इतका च, सहाव्यांतील नमन व्यक्तिशः आहे व आठव्यांतील सामुदायिक रीतीनें आहे.

**वेद श्रुती बोलों म्हणती । ज्यांच्या मुखें ॥ १-७-२६ ॥**

अशा कवींचें सातव्या समासांत वर्णन आहे. आणि नवव्यांतील परमार्थस्तवन म्हणजे पुढील साऱ्या तत्त्वज्ञानाचा आणि अध्यात्माचा पाया च होय, असें मला वाटतें. हा नववा एक समास समजेल तरी जन्माचें सार्थक होईल. हा नववा एक समास समजला, तर संपूर्ण दासबोध च काय, सकल वेदांतग्रन्थ समजले असें म्हणतां येईल. हा एकटा नववा समास हृदयांत भिनला, म्हणजे येथें च दासबोध ग्रन्थ बाजूस ठेवला तरी चालेल, त्यापुढें वाचावयाचें कांहीं उरत च नाहीं. असा हा महत्त्वाचा, अवघ्या २७ ओव्यांचा समास आहे.

**आतां स्तऊं हा परमार्थ । जो साधकांचा निजस्वार्थ ।**
**नांतरी समर्थामध्यें समर्थ । योग हा ॥ १-९-१ ॥**
**मागा योगिये समर्थ । त्यांचा हि निजस्वार्थ ।**
**यासी बोलिजे परमार्थ । परम गुह्य म्हणौनि ॥ ११ ॥**

असा हा साधकांचा आणि महान् योग्यांचा निजस्वार्थ असलेला परमार्थ जो जो करील त्याचा त्याचा स्वार्थ साधेल, तेव्हां त्याचें महत्त्व किती सांगावें ?

**ऐसा हा परमार्थ । जो करी त्याचा निजस्वार्थ ।**
**आतां या समर्थास समर्थ । किती म्हणौनि म्हणावें ॥ १८ ॥**

असा हा स्वार्थ साधून देणारा आणि जन्माचें सार्थक करणारा परमार्थ असतां तो न साधतां परार्धावधि जीव पुनःपुनः जन्माला येतात आणि मरतात पण परमार्थाकडे वळून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून आपली सुटका करून घेत नाहींत, यावरून असें वाटतें, परमार्थ हा अति कठीण असला पाहिजे, अशी शिष्यास शंका येतांच श्रीसमर्थ म्हणतात, नव्हे रे, तो अति सुगम आहे, पण सत्समागमाचें, गुरुकृपेचें, शोधनाचें, सत्संगाचें वर्म न समजल्यामुळें अनंत जीव आपला सत्यानास करून घेत आले, घेत आहेत, आणि घेत राहतील, याला काय करावें !

**आहे तरी परम सुगम । परी जनासी जाला दुर्गम ।**
**कां जयाचें चुकलें वर्म । सत्समागमाकडे ॥ २ ॥**
**नातरी पाहातां दिसेना । गुरुअंजनेंविण ॥ १० ॥**

**जेहीं शोधून पाहिला । त्यासी अर्थ सांपडला ।**
**येरां असोनि अलभ्य जाला । जन्मोजन्मीं ॥ १२ ॥**

म्हणून श्रीसमर्थ म्हणतात, सद्गुरूस शरण जावें, त्यांची संगति धरावी, त्यांची सेवा करावी, कृपा संपादन करावी आणि परमार्थ साधावा.

**परमार्थ सकळांस विसावा । सिद्ध साधु माहानुभावां ।**
**सेखीं सात्विक जड जीवां । सत्संगेंकरूनि ॥ २० ॥**

अशा या परमार्थाची अपूर्वता किती सांगावी, आणि योग्यता किती वर्णावी !

**अपूर्वता या परमार्थाची । वार्ता नाहीं जन्ममृत्याची ।**
**आणि पद्वी सायोज्यतेची । सन्निध चि लाभे ॥ १३ ॥**
**परमार्थी तो राज्यधारी । परमार्थ नाहीं तो भिकारी ।**
**या परमार्थाची सरी । कोणास द्यावी ॥ २३ ॥**
**जेणें परमार्थ वोळखिला । तेणें जन्म सार्थक केला ।**
**येर तो पापी जन्मला । कुलक्षयाकारणें ॥ २५ ॥**

असें पाप तुमच्या आमच्या हातून घडूं नये, म्हणून दहाव्या समासांत श्रीसमर्थ नरदेहाची अपूर्वता सांगून देहाचें सार्थक करून घेण्याविषयीं आग्रहपूर्वक बजावीत आहेत.

या नरदेहांत अनेकांनीं अनेक साधनें करून आपलें हित साधल्याचीं श्रीसमर्थांनीं उदाहरणें दिलीं आहेत. त्यांत तुम्हांआम्हांला साधेल असा सोपा मार्ग म्हणजे निष्ठापूर्वक नामस्मरणाचा होय.

**येक अखंड नामस्मरणें । निष्ठावंत राहिले ॥ १-१०-३ ॥**
**येकीं देव ठाईं पाडिला । भावार्थबळें ॥ ५ ॥**

हा मार्ग आपण आक्रमावा. हा नवविधा भक्तीचा राजमार्ग होय. त्या मार्गानें जाऊन आपण आपलें सार्थक करून घ्यावें.

**येक नवविधा भक्तिराज पंथें । गेले तरले परलोकींच्या निजस्वार्थें ॥ १३ ॥**

याप्रमाणें

**देह परमार्थीं लाविलें । तरी च याचें सार्थक जालें ।**
**नाहीं तरी हें वेर्थ चि गेलें । नाना आघातें मृत्यपंथें ॥ ६१ ॥**

असा हा स्तवनाचा दशक आहे, पण स्तवनाचें मिष करून श्रीसमर्थांनीं सांगावयाचें काय शिल्लक ठेवलें आहे? मला तर दासबोध ग्रन्थाचा, पहिला दशक हा पाया वाटतो व पुढील एकूणवीस दशक हे त्यावरील एकूणवीस मजले होत !

श्रीसमर्थचरण घट्ट हृदयाशीं धरून आपण एकएक मजला चढत जाऊं. निदान आठव्या मजल्यापर्यंत एक एक मजला पाहत जाऊं व मग ९ ते २० दशकांचे मजले विहंगमदृष्टीनें अवलोकूं.

## दशक दुसरा

हा मूर्खांच्या लक्षणांचा आहे. क्षणभर विचार केला तर असें दिसून येईल कीं, हा काय चमत्कार म्हणावा कीं, पहिला दशक बोलून चालून स्तवनाचा होता, तो वगळला तर दासबोध ग्रन्थाला खरा आरंभ दुसऱ्या दशकापासून होतो आणि तो कशापासून होतो, तर मूर्खांचीं लक्षणें सांगण्यापासून ! ठीक च आहे म्हणावयाचें ! राष्ट्रगुरूंनीं चौफेर नजर फिरविली तर त्यांना राष्ट्रांत मूर्खांचा बाजार भरलेला दिसला ! त्यांना शहाणे करून सोडण्याचा त्यांनीं निश्चय केला आणि म्हणून आरंभीं मूर्खांना त्यांचीं लक्षणें पटवून देण्याचा त्यांनीं उद्योग आरंभिला. दुसऱ्या दशकाचा पहिला समास केवळ मूर्खलक्षणांचा आहे.

मूर्ख कोण ? याचें उत्तर पहिला दशक संपवितांना

**असो जे प्रपंचिक मूर्ख । ते काये जाणती परमार्थसुख ॥**

असें ध्वनित केलें होतें, तें या दशकाला आरंभ करतांना स्पष्ट केलें आहे :

**जे प्रपंचिक जन । जयांस नाहीं आत्मज्ञान ।**
**जे केवळ अज्ञान । त्यांचीं लक्षणें ॥ २–१–७ ॥**

आत्मज्ञानशून्य आणि अज्ञानसंपन्न अशा अवस्थेंत केवळ प्रपंचांत गर्क होऊन राहणारे, ते श्रीसमर्थांच्या या व्याख्येप्रमाणें मूर्ख होत ! आणि माझ्या मनांत कुतूहल उत्पन्न झालें कीं, अशा मूर्खांतला पहिला कोणता मूर्ख श्रीसमर्थांच्या मनांत प्रथम आला ! तो पहिला मूर्ख ऐका.

**जन्मला ज्यांचे उदरीं। त्यांसी जो विरोध करी।**
**सखी मानिली अंतुरी। तो येक मूर्ख ॥ २-१-८ ॥**

हा पहिला मूर्ख आणि त्याच्यानंतर अनेक मूर्खांची रांग श्रीसमर्थांनीं उभी केली आहे. ते एकंदर १५२ भरतात! ही या एका समासाची कथा झाली. पुढें त्यांनीं एकएका समासांत कुविद्येचीं लक्षणें सांगितलीं आहेत, पढतमूर्खांचीं सांगितलीं आहेत, रजोगुणाचीं आणि तमोगुणाचीं सांगितलीं आहेत, हीं मूर्खांचीं प्रत्यक्ष च लक्षणें होत, पण कांहीं समासांत उत्तमलक्षणें, सद्विद्येचीं लक्षणें, सत्त्वगुणाचीं लक्षणें, विरक्ताचीं लक्षणें सांगितलीं आहेत, तीं आंगीं नसणारा मनुष्य मूर्खांत च मोडतो, या दृष्टीनें पाहतां या दशकांत आलेलीं सरसकट मूर्खलक्षणें मीं एकदां आंकडे घालून मोजून पाहिलीं, तर तीं ११०० भरलीं! आणि मग मीं मजकडे पाहिलें! तर मला असें दिसून आलें कीं, शेंकडा ६० हून जास्त लक्षणें मजमध्यें असून मी सहज पहिल्या वर्गांत येऊं शकेन! वाचकांनीं आपआपला क्रम लावावा! ३० हून कमी गुण मिळाल्यामुळें हिरमुसले होऊन बसण्याइतके अभागी हल्लींच्या काळीं आम्हा सुशिक्षित म्हणविणाऱ्या महाराष्ट्रीयांत किती निघतील, कोण जाणे!

मजकडे पाहून मला हा सुचलेला विनोद बाजूस सारून दुसरा दशक वाचून पाहिला म्हणजे श्रीसमर्थांचें समाजनिरीक्षण किती सूक्ष्म होतें आणि कोणत्या अंतिम ध्येयासाठीं होतें याची वाचकांस बरोबर कल्पना होईल.

पहिल्या समासांतील १५२ मूर्खलक्षणें, दुसऱ्या समासांतील ११९ उत्तम लक्षणांचा अभाव आणि विशेषतः तिसऱ्या समासांतील कुविद्येचीं २५३ कुलक्षणें सांगितल्यावर स्वतः श्रीसमर्थांचें हृदय इतकें कळवळलें कीं, तो त्यांचा कळवळा चवथ्या समासाच्या रूपानें त्यांच्या मुखांतून बाहेर पडला आहे. त्यांना वाटलें, मोठ्या भाग्यानें एकाद्यास नरदेह लाभावा, त्यांत हि ब्राह्मणकुळांत त्याचा जन्म व्हावा आणि केवळ अविचारामुळें, भ्रामक समजुतीमुळें, पाखंड मतांना बळी पडून किंवा परिस्थितीपुढें मान वांकवून त्यानें तो फुकट दवडावा, याला काय म्हणावें! म्हणून मोठ्या कळवळ्यानें

**नरदेहीं आलियां येक। कांहीं करावें सार्थक ॥ ५ ॥**

**जन्मा आलियाचें फळ । कांहीं करावें सफळ ॥ १२ ॥**
**नरदेहाचें उचित । कांहीं करावें आत्महित ॥ १३ ॥**

असें तीनतीनदां विनवून, कांहीं तरी करा रे कीं जेणेंकरून जन्माचें सार्थक होईल, स्नानसंध्यादि ब्रह्मकर्म करा, भगवंताचें नुसतें भजन तरी करा, सत्संग धरा, शास्त्रें पाहा, तीर्थें करा, पुरश्चरण करा, परोपकारांत देह झिजवा, दीन जनांची दया येऊं द्या, कांहीं तरी करा रे, एकांतांत नुसता विचार कां करा ना, हें नाहीं तर तें, जें साधेल तें, पण कांहीं तरी देहाचें चीज करा, पण

**हें कांहीं च न धरी जो मनीं । तो मृत्यप्राय वर्ते जनीं ।**
**जन्मा येऊन तेणें जननी । वायां च कष्टविली ॥ २–४–१४ ॥**

असें म्हणून हजारों जीव यांतलें कांहीं च न करतां आपला अमोल जन्म निरर्थक दवडीत असतात, हें पाहून श्रीसमर्थांनीं १५ ते २५ या अकरा ओव्यांत अत्यंत दु:खाचे उद्गार काढले आहेत.

या चवथ्या समासाशिवाय या दशकांतील सत्त्वगुणाचा सातवा समास व विरक्तलक्षणांचा नववा समास मला फार आवडतात व वारंवार वाचावेसे वाटतात, कारण त्यांत मला

**येका भगवंताकारणें । सर्व सुख सोडिलें जेणें ॥ ४–७–२८ ॥**

त्या श्रीसमर्थांचें प्रकट स्वरूप दिसतें व तें कोणाला हि दिसेल. पांचवा, सहावा, सातवा, या समासांत क्रमानें रजोगुण, तमोगुण आणि सत्त्वगुण यांचें वर्णन आहे. वाचून पाहा म्हणजे पटेल कीं, स्वत: श्रीसमर्थांचें हि चित्त सत्त्वगुणाच्या वर्णनांत विशेष रमलेलें दिसतें.

**बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें ।**
**दुसऱ्याचें अभिळाषावें । तो रजोगुण ॥ २–५–७ ॥**

यावरून असें दिसतें, रजोगुणाचें मूळ आसक्तींत, लोभांत आहे.

**उगें चि खावें उगें चि असावें । स्तब्ध होऊन बैसावें ।**
**कांहीं च स्मरेना स्वभावें । तो तमोगुण ॥ २–६–२७ ॥**

यावरून म्हणतां येतें कीं, अज्ञान, अविचार, दुश्चित्तपण हें तमोगुणाचें मूळ होय.

**कांहीं करावा उपाये। संसारीं गुंतोन काये।**
**उकलवी ऐसें हृदये। तो सत्त्वगुण ॥ २-७-४३ ॥**

यावरून अनुमान करतां येतें कीं, अनुताप हा सत्त्वगुणाचा पाया आहे.

रजोगुणाच्या ४२, तमोगुणाच्या ४१, तर एकट्या सत्त्वगुणाच्या ८८ ओव्या आहेत. कोणाला अन्य कोणत्या ओवींत वाटेल, मला

**अंतरीं देवाचें ध्यान। तेणें निडारले नयन।**
**पडे देहाचें विस्मरण। तो सत्त्वगुण ॥ २-७-३९ ॥**

या ओवींत सत्त्वगुणाचा कडेलोट झालेला वाटतो.

विरक्तलक्षणांचा तर संपूर्ण समास म्हणजे श्रीसमर्थांचें आत्मचरित्र च होय. या समासाच्या पहिल्या सहा ओव्यांत विरक्ताचा म्हणजे माझ्या म्हणण्याप्रमाणें श्रीसमर्थांचा च प्रताप वर्णिला आहे, तो असा :

**ऐका विरक्ताचीं लक्षणें। विरक्तें असावें कोण्या गुणें।**
**जेणें आंगीं सामर्थ्य बाणे। योगियाचें ॥ २-९-१ ॥**

**जेणें सद्‌कीर्ति वाढे। जेणें सार्थकता घडे।**
**जेणें करितां महिमा चढे। विरक्तासी ॥ २ ॥**

**जेणें परमार्थ फावे। जेणें आनंद हेलावे।**
**जेणें विरक्ती दुणावे। विवेकेंसहित ॥ ३ ॥**

**जेणें सुख उचंबळे। जेणें सद्विद्या वोळे।**
**जेणें भाग्यश्री प्रबळे। मोक्षेंसहित ॥ ४ ॥**

**मनोरथ पूर्ण होती। सकळ कामना पुरती।**
**मुखीं राहे सरस्वती। मधुर बोलावया ॥ ५ ॥**

**हे लक्षणें श्रवण कीजे। आणी सदृढ जीवीं धरिजे।**
**तरी मग विख्यात होईजे। भूमंडळीं ॥ ६ ॥**

हें सर्व स्वतःस घडलें, स्वतःच्या अनुभवास आलें तें च श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे. हा च अनुभव जो कोणी विरक्त असेल त्यास येईल, असें श्रीसमर्थांचें आश्वासन आहे. फक्त विरक्तानें, या समासांत ७ ते ३९ ओव्यांत सांगितलेलीं १०९ लक्षणें आपल्या आंगीं बाणून घेतलीं पाहिजेत ! त्यांत एका ठिकाणीं 'संसार सुखाचा करावा' असें म्हटलें आहे, तेथें संसार म्हणजे केवळ बायकापोरांचा लोळ, असें न मानतां राष्ट्रप्रपंच असा अर्थ केला म्हणजे हीं १०९ च्या १०९ लक्षणें श्रीसमर्थांच्या आंगीं विलसत होतीं, असें वाचकांच्या प्रत्ययास येईल. मी किती सांगणार ?

**विरक्तें करावीं पुरश्चरणें । विरक्तें फिरावीं तीर्थाटणें ॥**

हें दुसऱ्या कोणीं आपल्या आचरणांत आणलें होतें ? कडकडीत वैराग्य हें आमच्या समर्थांचें भाग्य होतें व त्या भाग्यांत या १०९ गोष्टी येतात. हे सर्वच्या सर्व १०९ गुण कोण उचलील, अशी शंका वाटून श्रीसमर्थ म्हणतात :

**इतुकें बोलिलें स्वभावें । त्यांत मानेल तितुकें घ्यावें ।**
**श्रोतीं उदास न करावें । बहु बोलिलें म्हणौनि ॥ ४१ ॥**

असा हा महत्त्वाचा, श्रीसमर्थांच्या आत्मचरित्राचा समास मुळावरून च प्रत्येकानें वाचला पाहिजे व त्यापासून अधिकारपरत्वें बोध हि घेतला पाहिजे. असें आपण न करूं तर ?

**परंतु लक्षणें नेघतां । अवलक्षणें बाष्कळता ।**
**तेणें त्यास पढतमूर्खता । येवों पाहे ॥ ४२ ॥**

'शाहाणे असोनि मूर्ख' अशी पढतमूर्खाची व्याख्या करून शेवटच्या समासांत त्याचीं लक्षणें सांगून हा मूर्खलक्षणांचा दशक संपविण्यांत आला आहे. पुढचा दशक स्वगुणपरीक्षेचा म्हणजे संसाराचा, त्याची प्रस्तावना करून ठेवावी म्हणून मूर्खांतला हि मूर्ख कोण तो सांगतात :

**परम मूर्खांमाजी मूर्ख । जो संसारीं मानी सुख ।**
**या संसारदुःखाऐसें दुःख । आणीक नाहीं ॥ २–१०–४० ॥**

## दशक तिसरा

स्वगुणपरीक्षेचा. याच्या पहिल्या पांच समासांत श्रीसमर्थांनीं संसाराची एक काहाणी रंगविली आहे. ती रंगविण्यांत त्यांचा हेतु, संसार कसा दुःखमूळ आहे, हें दाखविण्याचा होता. स्वतः श्रीसमर्थ लग्नसमारंभांतून निसटले, पण या काहाणींत एका मूर्खाला हातीं धरून त्याचीं त्यांनीं तीन लग्नें करून सोडलीं आहेत. काहाणीला आरंभ त्याच्या जन्माच्या हि पूर्वींपासून केला आहे. तो क्रम असा—गर्भवासाच्या विपत्ती, जन्मदुःख, बाळपण, खेळाचा लोभ, तारुण्य, भार्येचा छंद (३–२–४८ ते ५७).

**येके स्त्रियेचेनि गुणें । ब्रह्मांड मानिलें ठेंगणें ।**
**जिवलगें तीं पिसुणें । ऐसीं वाटलीं ॥ ३–२–५७ ॥**

भार्येचा मृत्यु, शोक, द्वितीय संबंध, परद्वार, दरवडा, अनपत्यत्वदुःख, नवस, उदंड लेंकुरें, दारिद्र्य, ऋण, परदेशगमन, तेव्हां मातेचें स्मरण,

**ते समईं माता आठवली । म्हणे धन्य धन्य ते माउली ।**
**मजकारणें बहुत कष्टली । परी मी नेणे चि मूर्ख ॥ ३–४–३५ ॥**

**आजी जरी ते असती । तरी मजला कदा न विसंभती ।**
**वियोग होतां आक्रंदती । ते पोटागी वेगळी च ॥ ३६ ॥**

**पुत्र वैभवहीन भिकारी । माता तैसा चि अंगिकारी ।**
**दगदला देखोनि अंतरीं । त्याच्या दुःखें दुःखवे ॥ ३७ ॥**

**प्रपंच विचारें पाहातां । हें सकळ जोडे न जोडे माता ।**
**हें शरीर जयेकरितां । निर्माण जालें ॥ ३८ ॥**

**लांव तरी ते माया । काय करावियां सहस्र जाया ।**
**परी भुलोन गेलों वायां । मकरध्वजाचेनी ॥ ३९ ॥**

**या येका कामाकारणें । जिवलगांसीं द्वंद्व घेणें ।**
**सखीं तीं च पिसुणें । ऐसीं वाटतीं ॥ ४० ॥**

मातेची ही केवढी थोरवी ! पण चांडाळाला आई मेल्यावर ती सुचली ! आईबापें प्रत्यक्ष होतीं, तेव्हां भार्येचा कैवार घेऊन आईबापांना दुरुत्तरें

करून त्यांच्यापासून वेगळा निघाला होता ! ( ३–२–४९ ) आणि आतां आईचें स्मरण होऊन दुःख करीत आहे ! म्हणून श्रीसमर्थ म्हणतात, सर्वांनीं बोध घ्यावा,

**म्हणौन धन्य धन्य ते प्रपंची जन । जे मायेबापाचें भजन ।**
**करिती, न करिती मन । निष्ठुर जिवलगांसीं ॥ ४१ ॥**

आवर्षण, द्वितीयभार्यामरण, तृतीय संबंध, बापलेकांचें भांडण, परचक्र

**अकस्मात धाडी आली । कांता बंदीं धरून नेली ॥ २८ ॥**
**तव तिची वार्ता आली । तुमची कांता भ्रष्टली ॥ ३० ॥**

खंगत चालला, पश्चात्ताप वाटला,

**द्रव्य नाहीं कांता नाहीं । ठाव नाहीं शक्ति नाहीं ।**
**देव मज कोणी च नाहीं । तुजवेगळें ॥ ३४ ॥**

पण आतां काय उपयोग, उशीर झाला,

**पूर्वीं देव नाहीं पूजिला । वैभव देखोन भुलला ।**
**सेखीं प्राणी प्रस्तावला । वृद्धपणीं ॥ ३५ ॥**

वृद्धावस्थेचे हाल कपाळीं आले ( ३६ ते ५१ ), पुन्हा, पुनरपि जननं पुनरपि मरणं, हें रहाटगाडगें सुरू झालें.

तत्कालीन देशाची आणि समाजाची स्थिति सामान्यपणें कशी होती, त्याची निदर्शक ही काहाणी आहे. सर्वांचीं च तीन तीन लग्नें नसतील होत, पण आवर्षण, दारिद्र्य, धाडी, स्त्रीहरण आणि वित्तहरण या नेहमींच्या गोष्टी होऊन बसल्या होत्या.

पहिल्या पांच समासांत संसाराची ही काहाणी सांगितल्यावर पुढच्या तीन समासांत आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक या त्रिविध तापांचें निरूपण केलें आहे ; हेतु हा कीं, संसाराचें दुःखदायक स्वरूप व त्रिविध ताप पाहून साधकाचें चित्त परमार्थाकडे वळावें.

**देह इंद्रिय आणि प्राण । यांचेनि योगें आपण ।**
**सुखदुःखें शिणे जाण । या नांव आध्यात्मिक ॥ ३–६–१३ ॥**

**सर्व भूतांचेनि संयोगें । सुख दुःख उपजों लागे ।**
**ताप होतां मन भंगे । या नांव आदिभूतिक ॥ ३-७-२ ॥**
**शुभाशुभ कर्मानें जना । देहांतीं येमयातना ।**
**स्वर्ग नर्क भोग नाना । या नांव आदिदैविक ॥ ३-८-२ ॥**

अशा श्रीसमर्थांनीं संस्कृताधारें त्रिविध तापांच्या केलेल्या व्याख्या आहेत. श्रीसमर्थांच्या लेखनांतला एक गुण त्यांच्या सर्व काव्यांतून आढळतो, तो वाचकांच्या लक्षांत आलेला च असणार कीं, कोणत्या हि शारीरिक वा मानसिक, भौतिक किंवा दैविक, मनबुद्धीला गोचर किंवा अगोचर अशा कोणत्या हि वस्तूचें किंवा प्रसंगाचें वर्णन श्रीसमर्थ करूं लागले म्हणजे तें वर्णन विस्तृत, व्यापक आणि संपूर्ण असावयाचें. त्यांच्या वाङ्मयांतून याचीं खरोखर च शेंकडों उदाहरणें देतां येतील. प्रस्तुतचें त्रिविध तापांचें च वर्णन पाहा. त्यांत आणखी कांहीं सांगावयाचें त्यांनीं शिल्लक ठेवलेलें नाहीं. श्रीसमर्थ हे स्वतः च शब्दसृष्टीचे ईश्वर, नाना शब्दरत्नांचे वैरागर किंवा सागर होते. या त्रिविध तापांच्या समासांतील कांहीं कांहीं शब्द तर आपणांस लागत हि नाहींत. पण ते लागोत न लागोत, हे त्रिविध ताप ऐकून आणि वाचून आपल्या अंगावर शहारे आले पाहिजेत. आधिभौतिक तापाच्या समासांत ६३ ते ७८ ओव्यांत राजदंडाचे जे अनन्वित प्रकार वर्णिले आहेत ते पाहिले म्हणजे तत्कालीन शिक्षेच्या तऱ्हा किती अमानुष होत्या याची बरोबर कल्पना होईल !

पहिल्या पांच समासांतील काहाणीनें श्रीसमर्थांनीं संसाराची असारता दर्शविली, पुढच्या त्रिविधतापाच्या तीन समासांत संसाराचें तापदायक स्वरूप प्रकट केलें आणि आतां नवव्या समासांत त्याची क्षणभंगुरता पटवीत आहेत.

**संसार म्हणिजे सवेंच स्वार । नाहीं मरणास उधार ।**
**मापीं लागलें शरीर । घडीनें घडी ॥ ३-१-९ ॥**

मागें, पुढें, पण

**जन्मा आले तितुके प्राणी । मृत्य पावती ॥ ३७ ॥**

तुम्ही कोणी हि असा, उदाहरणार्थ, राव असा रंक असा, बलाढ्य असा धनाढ्य असा, धूर्त असा पंडित असा, शास्त्री असा वैदिक असा, योगी

असा संन्यासी असा, संत असा महंत असा, लोकमान्य असा राजमान्य असा, कोणी हि असा, लहान असा वा मोठे असा, मृत्यु कोणास ओळखीत नाहीं, त्याच्यापाशीं कोणाची प्रतिष्ठा चालत नाहीं,

**सरतां संचिताचें शेष । नाहीं क्षणाचा अवकाश ।**
**भरतां न भरतां निमिष्य । जाणें लागे ॥ ३ ॥**

चालले च आहेत सर्व जग, मार्गाला लागलेले च आहेत, कोणी प्रवासास नुकता च आरंभ केला आहे, कोणाची अर्धी वाट चालून झाली, कोणी शेवटाच्या जवळ जवळ गेले आहेत. सर्वांचीं पाउलें पुढें च पडत आहेत, थांबण्याची सोय नाहीं, मागें परतण्याची गोष्ट च नको. असें आहे, तर मग केव्हां तरी याचा विचार करून शुद्धीवर यावयास नको काय ? इतर सर्व जण चाललेले, गेलेले आपण पाहतों आणि ऐकतों, असें असतां आपण कशाच्या घमेंडींत असतों, कोण जाणे ! घमेंड या संसाराची, अहंकाराची, अहंपणाची !

**संसार म्हणिजे माहापूर । माजीं जळचरें अपार ।**
**डंखूं धावती विखार । काळसर्प ॥ ३–१०–१ ॥**

**आशा ममता देहीं बेडी । सुसरी करिताती तडातोडी ।**
**नेऊन दुःखाचे सांकडी– । माजीं घालिती ॥ २ ॥**

**अहंकारनक्रें उडविलें । नेऊन पाताळीं बुडविलें ।**
**तेथुनियां सोडविलें । नवचे प्राणी ॥ ३ ॥**

**काममगरमिठी सुटेना । तिरस्कार लागला तुटेना ।**
**मद मत्सर वोहटेना । भूलि पडिली ॥ ४ ॥**

**वासनाधामिणी पडिली गळां । घालून वेंटाळें वमी गरळा ।**
**जिव्हा लाळी वेळोवेळां । भयानक ॥ ५ ॥**

तात्पर्य **माथां प्रपंचाचें वोझें । घेऊन म्हणे माझें माझें ।**
**बुडतां हि न सोडी, फुंजे । कुळाभिमानें ॥ ६ ॥**

अशी अवस्था होऊन वहात चालला आहे, बुडतो आहे, मरतो आहे, पण डोक्यावरचें गांठोडें दूर झुगारून देऊन ‘रामा धांव’ म्हणून

कळवळून एक आरोळी ठोकीत नाहीं! केवढी ही प्रपंचाची भूल म्हणावयाची! कोट्यवधी जीवांची ही च गती! पण

**जेहीं भगवंतासी बोभाईलें। भावार्थबळें॥ ८॥**

**देवें आपण घालूनि उडी। तयांसी नेलें पैलथडी।**
**येर तें अभाविकें बापुडीं। वाहात चि गेलीं॥ ९॥**

या भावाचें सामर्थ्य केवढें आहे, पण कपाळकरंट्याला कळेल तेव्हां खरें! कृपा करून हा गोड समास सर्वंच वाचा. या एका समासावरून त्रिभुवन ओवाळून टाकण्यास मी सिद्ध आहें! हा एक समास जन्मोजन्मीं वाचावयास मिळावा म्हणून मी अनेक जन्म घेण्यास तयार आहें! पण, या एका समासांत वर्णिलेली स्थिति, तुमची आणि माझी होईल तर आपणांस पुन्हा जन्म च घ्यावा लागणार नाहीं. या समासाचा शेवट पाहा. आपण श्रीसमर्थांचे चरण च घट्ट धरून बसूं! मग पुन्हा जन्म कोठला? एक भाव पाहिजे, आणखी कांहीं नको. भगवंत आणि समर्थ एक च.

**भगवंत भावाचा भुकेला। भावार्थ देखोन भुलला।**
**संकटीं पावे भाविकाला। रक्षितसे॥ १०॥**

**भावें भजनीं जे लागले। ते ईश्वरीं पावन जाले।**
**भावार्थबळें उद्धरिले। पूर्वज तेहीं॥ २१॥**

परंतु आपली बहुतेकांची काय अवस्था होत आहे!

**बहुतां जन्माचे सेवटीं। जेणें चुके आटाटी।**
**तो हा नरदेह भेटी। करी भगवंतीं॥ २५॥**

**आवचटें निधान जोडलें। तें कवडीच्या बदल नेलें।**
**तैसें आयुष्य निघोनी गेलें। अभाविकाचें॥ ३४॥**

अभाविकाचा प्रचंड संसार, त्याचा अफाट पसारा आणि त्याचें डोळे दिपविणारें वैभव, श्रीसमर्थ कवडीच्या मोलाचें ठरवीत आहेत. तो माझें माझें करीत च मरणार!

**जयास वाटे सीण व्हावा। तेणें विषयो चिंतीत जावा॥ ६१॥**
आणि **जयास वाटे सुख चि असावें। तेणें रघुनाथभजनीं लागावें।**

आणि खरें म्हणजे श्रीसमर्थांप्रमाणें

**स्वजन सकळ हि त्यागावे । दुःखमूळ जे ॥ ६३॥**

हें सर्व निरूपण ऐकून भाविक शिष्याचें हृदय प्रेमानें आणि नेत्र पाण्यानें भरून आले.

**ऐकोनि बोले भाविक । कैसेनि घडे जी सार्थक ।**
**सांगा स्वामी येमलोक । चुके जेणें ॥ ६८ ॥**

**घडपुडी भगवत्प्राप्ती । होऊन चुके अधोगती ।**
**ऐसा उपाये कृपामूर्ती । मज दीनास करावा ॥ ७० ॥**

**कैसें करावें भगवद्भजन । कोठें ठेवावें हें मन ।**
**भगवद्भजनाचें लक्षण । मज निरोपावें ॥ ७२ ॥**

**ऐसा म्लानवदनें बोले । धरिले सदृढ पाउलें ।**
**कंठ सद्गदित गळाले । अश्रुपात दुःखें ॥ ७३ ॥**

शिष्याची अशी अनन्यता पाहून दयाळ गुरुरायाचें चित्त कळवळलें, त्यांनीं कृपा केली आणि त्या कृपेचेंच फळ म्हणून येथून पुढें सारखा आनंद च तुंबळणार आहे !

## दशक चवथा

नवविधा भक्तीचा होय. ज्यांचा आपल्या पूर्वजांवर विश्वास नसेल, सत्पुरुष स्वानुभवानें जें सांगतात, तें हि ज्यांना मानावयाचें नसेल, अशा स्वच्छंदी लोकांना चार हि वाटा मोकळ्या आहेत, पण ज्यांचा आपल्या थोर पूर्वजांवर आणि सद्गुरुवचनावर विश्वास असून ज्यांना जन्माचें सार्थक व्हावें असें वाटत असेल, त्यांनीं भक्तीच्या या नऊ पायऱ्या चढत जाऊन श्रीरामदर्शन घ्यावें, रामरूपांत मिळून जावें, आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घ्यावा. निष्काम बुद्धीनें साधक पहिल्या आठ पायऱ्या चढून गेला कीं, शेवटची नववी पायरी चढणें सुलभ होतें. आत्मनिवेदन ही जी नववी भक्ति ती च खरी भक्ति होय. इतर भक्तींत भक्त आणि देव निरनिराळे असतात, समोरासमोर असतात, एकमेकांकडे पाहातात, एकमेकांशीं

बोलतात, पण आत्मनिवेदन भक्ति घडली म्हणजे ते दोघे एकरूप होतात! त्या नवव्या भक्तींत सांगितल्याप्रमाणें

**भक्त म्हणजे विभक्त नव्हे।**

त्या उभयतांतील विभक्तपणा नाहींसा होऊन भक्त निराळा राहात नाहीं.

**श्रवणं कीर्तनं विष्णोःस्मरणं पादसेवनम्।**
**अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम्॥**

हा श्लोक मूळचा श्रीमत् भागवतांतील, पण संस्कृतप्राकृतज्ञ पंडित असें सांगतात कीं, या नवविधा भक्तीचें विवरण श्रीसमर्थांनीं जसें व्यापक आणि प्रांजळ केलें आहे, तसें अन्य कोणत्या हि संस्कृतप्राकृत ग्रन्थांत केल्याचें आढळत नाहीं!

श्रीसमर्थांचें हें विवरण विशिष्ट प्रकारचें आहे, हें खरें आहे. श्रीसमर्थांची दृष्टि विशाल, दूरवर पोंचणारी, सर्व दिशांकडे पाहणारी होती. स्थल आणि काळ त्यांच्या दृष्टीला प्रतिबंध करूं शकले नाहींत. म्हणून त्यांचें बोलणें नेहमीं सर्वग्राही असे. या च प्रसंगीं असें नव्हे, त्यांच्या लेखनांत आपणांस सर्वत्र असा च व्यापकपणा पाहावयास मिळतो. त्यांच्या वाङ्मयाचा जेवढा प्रांत आपण आतांपर्यंत पाहात आलों, त्यांत श्रीसमर्थांच्या दृष्टीचा व्यापकपणा पदोपदीं आपल्या प्रत्ययास आला आहे आणि तसा तो शेवटपर्यंत येईल. या त्यांच्या सहजगुणाला अनुसरून च त्यांचें नवविधा भक्तीचें विवेचन आहे.

**पहिली** च श्रवणभक्ति घेतली तरी तींत त्यांनीं काय वगळलें आहे, हें सांगणें कठीण आहे. प्राचीन आणि अर्वाचीन सर्व च शास्त्रें पाहावीं आणि ऐकावीं, असें त्यांच्या श्रवणभक्तीचें लक्षण दिसतें. कर्ममार्ग उपासनामार्ग, ज्ञानमार्ग सिद्धान्तमार्ग, योगमार्ग वैराग्यमार्ग इत्यादि नाना मार्ग, व्रतें तीर्थें दानें, नाना महात्में, देहदंडाचे नाना प्रकार, भूगर्भ आणि आकाशवास, योगाच्या तऱ्हा, पिंडब्रह्मांडाची रचना, आकाशांतील चंद्रसूर्यतारामंडळें, नाना स्थानें, संगीताचे प्रकार, काळवेळ, सामुद्रिक लक्षणें, मंत्र तंत्र यंत्र, तोडगे, रसायन, नाडीज्ञान, नाना औषधी, वेद शास्त्रें पुराणें, नाना मतें, इत्यादि सर्व—सर्व कांहीं—पाहावें, ऐकावें, शोधावें, याला श्रीसमर्थ श्रवणभक्ति च म्हणतात. मला तर असें दिसतें, त्यांच्या श्रवणभक्तींत हरिकथापुराणश्रवण

आणि अध्यात्मनिरूपण येतात, यांत कांहीं च नवल नाहीं, पण तींत भूत भविष्य वर्तमान सर्व शास्त्रें, चौदा विद्या आणि चौसष्ट कळाचशा काय, त्याहून हि आणखी असतील किंवा उदयास येतील त्या सर्व विद्या आणि कला यांचा अंतर्भाव होतो.

**ऐसें हें अवघें चि ऐकावें। परंतु सार शोधून घ्यावें।**
**असार तें जाणोनि त्यागावें। या नांव श्रवणभक्ती॥ ४–१–२९॥**

**दुसरी** भक्ति कीर्तन. या समासांत, कीर्तन कोणीं करावें, कसें करावें आणि कीर्तनकारानें मुख्य कोणत्या गोष्टी सांभाळाव्या, याविषयीं केलेल्या सूचना सदैव लक्षांत बाळगणें आवश्यक होय. कीर्तनकार कसा असावा?

**वक्ता पाहिजे साचार। अनुभवाचा॥ ४–२–२४॥**

ही त्यांची पहिली महत्त्वाची सूचना होय. नुसतें पाठ केलेलें म्हणून दाखविणारा कीर्तनकार काय कामाचा? अनुभवाच्या नांवानें ज्याच्यापाशीं शून्य आहे अशा कीर्तनकाराचा किंवा वक्त्याचा श्रोत्यांच्या मनावर काय परिणाम घडणार आहे? अनुभवावांचून उपदेशकाचें बोलणें आणि कुत्र्याचें हवेंत भुंकणें, या दोहोंत काय फरक आहे?

कीर्तन कसें करावें?

**करुणाकीर्तनाच्या लोटें। कथा करावी घडघडाटें।**
**श्रोतयांचीं श्रवणपुटें। आनंदें भरावीं॥ ४–२–१२॥**

हें मुख्य धोरण असावें

**बहुधा बोलणें अव्यावेस्त। बोलों चि नये॥ १८॥**

कीर्तनकारानें पथ्यें कोणतीं सांभाळावीं?

**ब्राह्मण्य रक्षावें आदरें। उपासनेचीं भजनद्वारें।**
**गुरुपरंपरा निर्धारें। चळों च नेदावी॥ २०॥**

**करावें वैराग्यरक्षण। रक्षावें ज्ञानाचें लक्षण।**
**परम दक्ष विचक्षण। सर्व हि सांभाळी॥ २१॥**

सर्व च सदाचाराच्या गोष्टींना जपावें, पण त्यांतल्या त्यांत ब्राह्मण्यरक्षण, उपासनेची पद्धति, गुरुपरंपरा, वैराग्यरक्षण आणि ज्ञानाचें लक्षण या पांच गोष्टींना फार जपावें, कारण त्या श्रीसमर्थांना फार जिव्हाळ्याच्या वाटत. या च पांच गोष्टी, या च क्रमांत नसल्या, तरी बरोबर त्या च, श्रीसमर्थांनीं पंचवटीच्या पुजाऱ्यांस कृष्णातटाकाहून पाठविलेल्या पत्रांत आल्या आहेत व त्यांना त्या पत्रांत त्यांनीं पंचविध शुद्ध मार्ग म्हणून म्हटलें आहे :

**शुद्ध उपासना विमल ज्ञान । वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण ।**
**गुरुपरंपरेचें लक्षण । शुद्ध मार्ग ॥**

**तिसरी** भक्ति नामस्मरणाची. तिचें वर्णन तिसऱ्या समासांत आहे. तो समास इतका गोड, सुलभ, प्रेमळ, हृदयभेदक आहे कीं, महाराष्ट्रांतील सदाचारसंपन्न धार्मिक प्रवृत्तीच्या वाळबोध घराण्यांतील हजारों स्त्रीपुरुषांच्या तो पाठांत असतो. सर्व काळीं, सर्व स्थळीं, सर्व स्थितींत नामस्मरण करतां येतें—नव्हे—केलें पाहिजे. त्याचें फळ फार मोठें आहे.

**कांहीं च न करूनि प्राणी । रामनाम जपे वाणी ।**
**तेणें संतुष्ट चक्रपाणी । भक्तांलागीं सांभाळी ॥ २१ ॥**

**चहुं वर्णां नामाधिकार । नामीं नाहीं लाहानथोर ।**
**जड मूढ पैलपार । पावती नाम ॥ २४ ॥**

असें हें दिसण्यांत अति सोपें, पण आचरणांत आणण्यास अति कठीण, पण रावापासून रंकापर्यंत सर्वांना खुलें आणि साध्य होण्यासारखें साधन आहे. त्याची उपेक्षा करणारे अकारण आत्मघात करून घेत असतात.

**चवथी** भक्ति पादसेवन ही होय. या भक्तीच्या पूर्वीच्या तीन व पुढच्या चार मिळून सात हि प्रकारच्या भक्तीवर ताण करणारी अशी ही भक्ति आहे.

**पादसेवन चौथी भक्ती । पावन करितसे त्रिजगती ।**
**जयेकरितां सायोज्यमुक्ती । साधकास होये ॥ २५ ॥**

**म्हणौनि थोराहूनि थोर । चौथे भक्तीचा निर्धार ।**
**जयेकरितां पैलपार । बहुत प्राणी पावती ॥ २६ ॥**

अशी ही भक्ति सर्व भक्तींत श्रेष्ठ होय.

**पादसेवन तें चि जाणावें । कायावाचामनोभावें ।**
**सद्गुरूचे पाय सेवावे । सद्गतिकारणें ॥ २ ॥**

**सद्गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाव तो नाहीं ।**
**याकारणें लवलाहीं । सद्गुरुपाय सेवावे ॥ ४ ॥**

इतर भक्ति घडल्या आणि ही भक्ति न घडली तर सार्थकता होणार नाहीं.

**संगत्याग आणि निवेदन । विदेहस्थिती अलिप्तपण ।**
**सहजस्थिती उन्मनी विज्ञान । हे सप्त हि येकरूप ॥ ८ ॥**

ती स्थिति सद्गुरुकृपेवांचून प्राप्त होणें सर्वथैव अशक्य.

**नाना समाधानें पाहातां । बाणती सद्गुरु करितां ।**
**सद्गुरुविण सर्वथा । सन्मार्ग नसे ॥ १८ ॥**

**प्रयोग साधनें सायास । नाना साक्षेपें विद्याअभ्यास ।**
**अभ्यासें कांहीं गुरुगम्यास । पाविजेत नाहीं ॥ १९ ॥**

**याकारणें ज्ञानमार्ग । कळाया धरावा सत्संग ।**
**सत्संगेंविण प्रसंग । बोलों चि नये ॥ २१ ॥**

अतएव **सेवावे सद्गुरूचे चरण ॥ २२ ॥**

त्या चरणांची अखंड सेवा करावी, कृपा झाल्यावांचून राहणार नाहीं.

**पांचवी** अर्चन भक्ति होय.

**पांचवी भक्ति तें अर्चन । अर्चन म्हणिजे देवतार्चन ।**
**शास्त्रोक्त पूजाविधान । केलें पाहिजे ॥ ४–५–२ ॥**

त्या च प्रमाणें सर्वांनीं आपआपले कुळधर्म हि पाळावे, ते सोडूं नयेत. ती अर्चन भक्ती च होय.

**या हि वेगळे कुळधर्म । सोडूं नये अनुक्रम ।**
**उत्तम अथवा मध्यम । करीत जावे ॥ १५ ॥**

**जाखमाता मायराणी । बाळा बगुळा मानविणी ।**
**पूजा मांगिणी जोगिणी । कुळधर्में करावीं ॥ १६ ॥**

कुळाचार, कुळधर्म जे चालत आले असतील, ते कसे हि असले, तरी ते पुढें चालविले पाहिजेत, अशी श्रीसमर्थांची आज्ञा आहे. परंपरेचा ते एवढा बोज ठेवतात. याप्रमाणें

**काया वाचा आणि मनें । चित्तें वित्तें जीवें प्राणें ।**
**सद्भावें भगवंत अर्चणें । या नांव अर्चनभक्ति ॥ २९ ॥**

आणि ही जशी देवाची पूजा करावयाची, तशी च सद्गुरूची हि करावी.

**ऐसें चि सद्गुरूचें भजन । करून असावें अनन्य ॥ ३० ॥**

पण प्रश्न असा, मी पडलों धुळ्यास आणि माझें कुलदैवत कोल्हापुरास आणि इष्टदैवत चाफळास आणि सद्गुरु सज्जनगडावर शेवटचे राहिले आणि दृष्टीच्या आड झाले, तर मीं पूजा कशी करावी ?

**ऐसी** ( म्हणजे प्रत्यक्ष ) **पूजा न घडे बरवी । तरी मानसपूजा करावी ।**
**मानसपूजा अगत्य व्हावी । परमेश्वरासी ॥ ३१ ॥**

**मनें भगवंतास पूजावें । कल्पून सर्व हि समर्पावें ।**
**मानसपूजेचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ ३२ ॥**

**जें जें आपणास पाहिजे । तें तें कल्पून वाहिजे ।**
**येणें प्रकारें कीजे । मानसपूजा ॥ ३३ ॥**

**सहावी** भक्ति वंदन. ती हि या च प्रमाणें.

**सहावी भक्ति तें वंदन । करावें देवासी नमन ।**
**संत साधु आणि सज्जन । नमस्कारीत जावे ॥ ४-६-२ ॥**

**सूर्यासी करावे नमस्कार । देवासी करावे नमस्कार ।**
**सद्गुरूस करावे नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३ ॥**

**पशुपति श्रीपति आणि गभस्ति । यांच्या दर्शनें दोष जाती ।**
**तैसा चि नमावा मारुती । नित्य नेमें विशेष ॥ ६ ॥**

पण सद्गुरु प्रत्यक्ष समोर नाहींत, असें आपण मानून चाललों आहोंत, मग नमस्कार कोणास करावा? मुख्य जसा एक भगवंत आणि इतर तेहतीस कोटी देव हीं त्या भगवंताचीं अधिष्ठानें, तद्वत् मुख्य एक आपले सद्गुरु आणि अन्य ज्यांच्या ज्यांच्या ठिकाणीं कांहीं हि विशेष गुण आढळतील तीं सर्व सद्गुरूचीं अधिष्ठानें मानून त्यांना नमन करावें.

**जेथें दिसती विशेष गुण। तें सद्गुरूचें अधिष्ठान।**
**याकारणें तयासी नमन। अत्यादरें करावें ॥ ९ ॥**

ज्याप्रमाणें, सर्व देवांस नमस्कारिलें। तें येका भगवंतास पावलें॥ तद्वत च, विशेष गुणवंतांना केलेला नमस्कार आणि त्यांचा राखलेला आदर सद्गुरूस पावतो. तात्पर्य,

**देव देवाचीं अधिष्ठानें। सत्पात्रें सद्गुरूचीं स्थानें।**
**याकारणें नमस्कार करणें। उभय मार्गीं ॥ १३ ॥**

शेवटीं इतकें च म्हणावयाचें कीं, प्रपंचाचें ओझें मस्तकीं असतां व अनेक उपाधींनीं मन व्याप्त असतां, एकवार मनाचा धडा करून सद्गुरुपदापुढें एकदां च देहानें असें लोटांगण घालावें कीं, उठून पाहावें तों तें ओझें आणि त्या उपाधी सर्व नाहींशा होऊन सद्गुरुपदाशिवाय डोळ्यांना कांहीं दिसूं नये आणि कानांना कांहीं ऐकूं येऊं नये, सर्व च कर्मेंद्रियें आणि ज्ञानेंद्रियें त्या चरणीं लीन होऊन जावींत–नव्हे–अष्ट हि देहांचें निरसन व्हावें! जन्मांत केव्हां तरी असा एकदां च एक नमस्कार घालतां यावा, घालावा! मग आपलें काम संपलें, पुढची सर्व चिंता त्यांची त्यांना, आपण निश्चिंत व्हावें!

**साधक भावें नमस्कार घाली। त्याची चिंता साधूस लागली।**
**सुगम पंथें नेऊन घाली। जेथील तेथें ॥ २४ ॥**

या च एका ओवीवर, लघु काव्यांपैकीं **आत्माराम** प्रकरण, जणूं भाष्यरूपानें आहे. वाटल्यास पुन्हा वाचून पाहा.

**सातवी** भक्ति दास्य. असें वाटतें, एक एका भक्तीचा विचार चालला आहे तों आपण एक एक पायरी खरोखर च वर चढून जात आहोंत कीं

काय, न कळे! देवाचें आणि सद्गुरूचें सर्वतोपरी दास्य करण्याला तत्पर होऊं या.

**सातवें भजन तें दास्य जाणावें। पडिलें कार्य तितुकें करावें।**
**सदा सन्निध चि असावें। देवद्वारीं ॥ ४-७-२ ॥**
**देवाचें वैभव सांभाळावें। न्यूनपूर्ण पडों चि नेदावें।**
**चढतें वाढतें वाढवावें। भजन देवाचें ॥ ३ ॥**

शके १५८१ च्या पूर्वीं, चाफळच्या श्रीरामाला अनुलक्षून आणि सर्व शिष्यांना—विशेषतः—श्रीशिवरायाला उद्देशून श्रीसमर्थांनीं हे उद्गार काढले आहेत, असें निश्चित समजा. हें वाक्य मी लिहीत नसून माझ्या हातून लिहिलें जात आहे, असें हि कृपा करून माना.

**चढतें वाढतें वाढवावें। भजन देवाचें ॥**

या श्रीसमर्थांच्या आज्ञेंत रामराज्याच्या त्यांच्या सर्व इच्छा सांठविलेल्या आहेत. ही त्यांची आज्ञा आशीर्वादरूपानें फलद्रूप झाल्याचा प्रत्यय महाराष्ट्रास लवकर च आला. ती आज्ञा झाल्यापासून तिचें स्मरण पुढें चाळीस पन्नास वर्षें तरी महाराष्ट्रानें ठेवलें होतें, असें दिसतें. आज हि आपण ती समजून घेऊन पाळूं, तर आपला भविष्यकाळ उज्ज्वल करूं. या आज्ञेंतील गूढार्थ श्रीशिवरायांना समजला होता. या आज्ञापालनाचें सामर्थ्य श्री छत्रपति राजाराम महाराज, रामचंद्र नीळकंठ अमात्य वगैरेंच्या प्रत्ययास आलें होतें.

**चढतें वाढतें वाढवावें। भजन देवाचें ॥**

या १५८१ च्या पूर्वीं केलेल्या आज्ञेला पुढें ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झालें. **श्री रामदास** आणि **रामदासी** ग्रन्थमालेंतील नववा भाग **श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें** असा आहे. त्यांतील लेखांक २६ चें पत्र शक १५९९ च्या सुमारास दत्ताजी त्रिमल वाकनीस यांनीं दिवाकरभटास लिहिलेलें आहे. त्यांत “ श्री स्वामीची तों उदासीन स्थिती परंतु त्यांची आज्ञा पूर्वी च आपणासी आहे कीं ( चाफळ येथील ) श्री रघुनाथ देवाचा समारंभ उतरोतर वृधीतें पावावा तैसें च राज्य हि उतरोतर अभीवृधीतें पावले ” असें राजश्री छत्रपति यजमान श्री शिवराय आपणाजवळ बोलल्याचें

दत्ताजी त्रिमल दिवाकरभटास कळवीत आहेत. या आशीर्वादाचें स्मरण श्री राजाराम छत्रपति, रामचंद्र नीळकंठ अमात्य वगैरेंना हि होतें असें शक १६१८ तील ८१, ८२, ८३, ८५, ८६, या लेखांकांवरून दिसतें. लेखांक ८६ हें रामचंद्र नीळकंठ अमात्य यांनीं १६१८ फाल्गुन शु. ३ स कऱ्हाड प्रांताचे मुख्य देशाधिकारी व लेखक भानजी गोपाळ यांस लिहिलेलें पत्र आहे. त्यांत "राजश्री कैलासवासी स्वामीस ( म्हणजे श्री शिवरायास ) उतरोतर चढता वाढता श्री देवाचा भक्तिमहोत्सव चालवावा तैसें च चढतें वाढतें राज्य अभिवृधीतें पावेल हें श्रीचें ( म्हणजे श्रीसमर्थांचें ) कृपापूर्वक आसीर्वादवाक्य आहे तरी हें धर्मराज्य श्रीचे कृपेकरून वृधीतें पावलें" याप्रमाणें रामचंद्र नीळकंठ श्रीसमर्थांचें वचन उद्धृत करून तसा प्रत्यय आल्याचें हि कळवीत आहेत.

असा या दास्यभक्तींत थोडासा इतिहास हि आहे. ज्यांना कळेल आणि मानवेल त्यांनीं स्वतःच्या, समाजाच्या, राष्ट्राच्या अभिवृद्धीसाठीं श्रीसमर्थांच्या या आज्ञेचें अखंड पालन केलें पाहिजे. त्यांनीं

**भंगलीं देवालयें करावीं । मोडलीं सरोवरें बांधावीं ।**
**सोफे धर्मशाळा चालवावीं । नूतन चि कार्यें ॥ ४ ॥**

**नाना रचना जीर्ण जर्जर । त्यांचे करावे जीर्णोद्धार ।**
**पडिलें कार्य तें सत्वर । चालवीत जावें ॥ ५ ॥**

ही हि दास्यभक्ती च होय. देवाच्या संनिध राहून दास्य करणारांची वाणी किती मृदु असावी !

**वचनें बोलावीं करुणेचीं । नाना प्रकारें स्तुतीचीं ।**
**अंतरें निवती सकळांचीं । ऐसें वदावें ॥ २६ ॥**

याप्रमाणें श्रीसमर्थसेवकांनीं आणि भक्तांनीं हरएक प्रकारें देवाचें वैभव चालवावें आणि देवगृहीं नीच दास्यत्व पतकरावें आणि पडेल तें काम करावें. जशी देवाची सेवा करावयाची, तशी च ती सद्गुरूची करावी. प्रत्यक्ष घडण्याचा योग नसेल तर मानसपूजेच्या द्वारें करावी.

**ऐसें दास्य करावें देवाचें । येणें चि प्रकारें सद्गुरूचें ।**
**प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें । करीत जावें ॥ २८ ॥**

**आठवी** भक्ति, सातवीच्या हि पुढची वरचढ, सख्य भक्ति होय.

**देवासी परम सख्य करावें । प्रेम प्रीतीनें बांधावें ।**
**आठवे भक्तीचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ ४-८-२ ॥**

या भक्तींत पादसेवनभक्तीची परमावधि होत आहे. आपण आपल्याला देवाला किती वाहून घ्यावें, त्याला मर्यादा च नाहीं !

**देवास जयाची अत्यंत प्रीति । आपण वर्तावें तेणें रीतीं ।**
**येणें करितां भगवंतीं । सख्य घडे नेमस्त ॥ ३ ॥**

**भक्ति भाव आणि भजन । निरूपण आणि कथाकीर्तन ।**
**प्रेमळ भक्ताचें गायन । आवडे देवा ॥ ४ ॥**

**आपण तैसें चि वर्तावें । आपणासी तें च आवडावें ।**
**मनासारिखें होतां स्वभावें । सख्य घडे नेमस्त ॥ ५ ॥**

ओवी उद्धृत करतां करतां वाटतें, सर्व च ओव्या उद्धृत कराव्या. हात आंखडण्याचें नुसतें मनांत आलें तरी वाईट वाटतें. पुढच्या निदान तीन ओव्या उद्धृत न करून कसें चालेल ? त्यांत श्रीसमर्थहृदयाचें प्रतिबिंब पडलेलें स्पष्ट दिसत आहे !

**देवाच्या सख्यत्वाकारणें । आपलें सौख्य सोडून देणें ॥**
**अनन्यभावें जीवें प्राणें । शरीर तें हि वेंचावें ॥ ६ ॥**

**सांडून आपुली संसारवेथा । करीत जावी देवाची चिंता ।**

अनन्य भक्ताचा कसा उलटा न्याय आहे ! भक्तानें देवाची चिंता करावयाची !

**निरूपण कीर्तन कथा वार्ता । देवाच्या चि सांगाव्या ॥ ७ ॥**
**देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी ।**

हें कोण बोलत आहे ? घरदार, शेतीवाडी, सोयरेधायरे, सर्वांना सोडून चालते झालेले श्रीसमर्थ सांगत आहेत ! दुसरें कोण सांगूं शकेल ?

**सर्व अर्पावें, सेवटीं । प्राण तो हि वेचावा ॥ ८ ॥**

या समासाच्या प्रत्येक ओवींत श्रीसमर्थहृदयाचें प्रतिबिंब पडलेलें आहे. जीवावर उदार होऊन भक्त देवाची चिंता करूं लागला म्हणजे मग देवाला

भक्ताची चिंता लागते. तेव्हां देवावर सर्वस्वीं भार टाकून असावें. याचा अर्थ आपण हात पाय हालवावयाचे नाहींत, असा नव्हे. पण सर्वस्वीं देवावर विसंबून प्रयत्न चालू असला म्हणजे देवाच्या इच्छेनें जें घडेल, त्यांत च आपलें हित आहे, असें मानून चालावें.

**देवाचें जें मनोगत । तें चि आपुलें उचित ।**
**इच्छेसाठीं भगवंत । अंतरूं नये कीं ॥ २२ ॥**

**देवाचे इच्छेनें वर्तावें । देव करील तें मानावें ।**
**मग सहज चि स्वभावें । कृपाळु देव ॥ २३ ॥**

**पाहातां देवाचे कृपेसी । मातेची कृपा कायेसी ।**
**माता वधी बाळकासी । विपत्तिकाळीं ॥ २४ ॥**

परंतु **देवें भक्त कोण वधिला । कधीं देखिला ना ऐकिला ।**
**शरणागतास देव जाला । वज्रपंजरु ॥ २५ ॥**

**देव कृपेचा सागरु । देव करुणेचा जळधरु ।**
**देवासी भक्ताचा विसरु । पडणार नाहीं ॥ २८ ॥**

**सख्य देवाचें तुटेना । प्रीती देवाची विटेना ।**
**देव कदा पालटेना । शरणागतासी ॥ ३० ॥**

असें त्रिवार श्रीसमर्थ आश्वासनपूर्वक सांगत असतां त्यावर कोण विश्वास ठेवणार नाहीं ? समासाच्या शेवटच्या ओवींत

**जैसा देव तैसा गुरु । शास्त्रीं बोलिला हा विचारु ।**
**म्हणौन सख्यत्वाचा प्रकारु । सद्गुरूसीं असावा ॥ ३२ ॥**

अशी श्रीसमर्थांची आज्ञा आहे. ती शिरसा मान्य करून या समासांत जेथें जेथें देव आहे, तेथें तेथें ‘सद्गुरु’ योजून समास वाचून पाहावा. पाहावा म्हणजे आपल्या ठिकाणीं किती अल्पांशानें अनन्य भक्ति उतरली आहे व ती पूर्णांशानें कशी उतरेल, याचा विचार करावा !

या समासांतील देव कोण–प्रत्यक्ष कां मूर्ति–असा प्रश्न करावासा वाटतो. देवाशीं सख्य करावें, म्हणजे च मुळीं कोणाशीं ? देवाची आवड, देवाला चिंता, देवाचा सहवास, देवाचें मनोगत, देवाची इच्छा, त्याची

कृपा, देवाला आपलें स्मरण, देवाची मैत्री, देवाला वाटणारी प्रीति, इत्यादि जे शब्दप्रयोग या समासांत आहेत, ते काय मूर्तीला उद्देशून समजावयाचे? आपल्या मनांतील

**हितगुज तयासि सांगावें ॥ ३१ ॥**

तें काय मूर्तीला? केवळ मूर्तीला उद्देशून हा समास आहे, असें मला वाटत नाहीं. श्रीराम श्रीसमर्थांपुढें प्रत्यक्ष होते. ते श्रीसमर्थांना सोडून केव्हां हि दूर झाले नाहींत. समर्थासी रक्षित दोनी धनुर्धारी। हें सत्य आहे. जनीं आणि वनीं राम आणि लक्ष्मण दोघे श्रीसमर्थांच्या दोन्ही बाजूंस असत.

श्रीसमर्थांनीं स्वहस्ताक्षरें लिहिलेल्या त्या एकमेव उपलब्ध असलेल्या पत्रांत 'आपण जाला समाचार रघुनाथजीस विदित केला' असें त्यांनीं म्हटलें आहे, म्हणजे काय झालेला सर्व वृत्तान्त त्यांनीं मूर्तीला निवेदन केला, असें मानावयाचें? मला तसें वाटत नाहीं.

स्वानुभवदिनकराच्या १६ व्या कलापांतील ४ थ्या किरणांत, श्री क्षेत्र जांब येथें वयाच्या अकराव्या वर्षीं ज्यांनीं निजमुद्रांकित पत्र समर्थांच्या हातांत दिलें, दुर्मुजी रंगाच्या दिव्य वस्त्रानें श्रीसमर्थांचें अंग वेष्टिलें आणि त्यांच्या मस्तकीं कृपाहस्त ठेवून कर्णीं महावाक्याचा उपदेश केला आणि हनुमंतास निरविलें, किंवा श्रीसमर्थप्रतापाच्या तिसऱ्या समासांत गिरिधरांनीं वर्णिल्याप्रमाणें, हिमालयकुंडीं बुडी देण्यास श्रीसमर्थ सिद्ध झाले असतां ज्यांनीं त्यांना वरच्या वर धरलें, त्या प्रत्यक्ष श्रीरामाशीं श्रीसमर्थांनीं सख्य केलें होतें आणि या समासांत त्याप्रमाणें करण्यास ते आपणांस आज्ञा करीत आहेत! अनेक जन्मांत अनेक साधनें करून हि न साधणारी अशी ही कठीण गोष्ट आपल्या अगदीं हातची आहे, असें श्रीसमर्थ म्हणतात.

**देव सख्यत्वें राहे आपणासी। तें तों वर्म आपणा चि पासीं ॥ १२ ॥**

तें वर्म कोणतें? अनन्य भाव!

**आपण असतां अनन्य भावें। देह तत्काळ चि पावे ॥ १३ ॥**

तत्काळ चि! त्याला विलंब नाहीं! काय करावें? जीव कासावीस होतो. हा सारा च समास वाचकांस विव्हल करून सोडणारा आहे. चित्त इतकें विव्हल झाल्यावर शेवटची

**नववी** भक्ति आत्मनिवेदन साधावयाला थोडा च उशीर होणार आहे ?

**ऐका निवेदनाचें लक्षण । देवासी वाहावें आपण ।**
**करावें तत्त्वविवरण । म्हणिजे कळे ॥ ४-९-३ ॥**
**तस्मात् विचार करावा । देव कोण तो वोळखावा ।**
**आपला आपण शोध घ्यावा । अंतर्यामीं ॥ ७ ॥**
**मी कोण ऐसा निवाडा । पाहों जातां तत्त्वझाडा ।**
**विचार करितां उघडा । आपण नाहीं ॥ ८ ॥**
**तत्त्वें तत्त्व जेव्हां सरे । तेव्हां आपण कैंचा उरे ।**
**आत्मनिवेदन येणें प्रकारें । सहज चि जालें ॥ ९ ॥**

आत्मनिवेदन म्हणजे ‘ अहं ब्रह्मास्मि ’ चा साक्षात्कार. साक्षात्कार हि नव्हे, ब्रह्म च होऊन राहणें, ब्रह्माहून निराळें न उरणें, देव आणि भक्त एक च होऊन असणें, सायुज्यता मुक्ति प्राप्त होणें. अशी ही

**नवमी भक्ति आत्मनिवेदन । न होतां न चुके जन्ममरण ।**
**हें वचन सत्य प्रमाण । अन्यथा नव्हे ॥ २५ ॥**
**ऐसी हे नवविधा भक्ति । केल्यां पाविजे सायोज्यमुक्ति ॥ २६ ॥**

स्वलोकता, समीपता, स्वरूपता आणि सायोज्यता, अशा चार मुक्ति आहेत, पैकीं पहिल्या तिहींचा, केव्हां ना केव्हां, अंत होतो, फक्त चवथी सायुज्यता मुक्ति ही च खरी अविनाशी मुक्ति होय. पहिल्या तीन मुक्तींचें स्वरूप मोठें मोहक असतें. देवलोकीं सुखाला पार नाहीं. सुखाच्या ज्या ज्या कल्पना कराव्या त्या पूर्ण होण्याची अनुकूलता तेथें असते. पण केव्हां तरी त्या नाश होणार च. तेव्हां त्या तिन्ही मुक्ति झिडकारून चवथी मुक्ति शहाण्यानें प्राप्त करून घेतली पाहिजे.

तात्पर्य, माझ्या समजुतीप्रमाणें, श्रवण, कीर्तन, स्मरण, अर्चन, वंदन, दास्य आणि सख्य अशीं हीं सात हि, पादसेवन भक्ति घडण्याचीं साधनें मानून पादसेवन भक्ति करावी, ती च सर्व भक्तींत श्रेष्ठ आहे, ती घडली कीं, आत्मनिवेदन हें तिचें फळ आपोआप पदरीं पडेल !

असा हा पूर्वार्धाच्या पूर्वार्धाचा मतलब आहे. आतां पूर्वार्धाच्या उत्तरार्धांत प्रवेश करण्याला आपण अधिकारी झालों. श्रीसद्गुरुचरणांपाशीं थोडी विश्रांति घेऊन पुढें जाऊं.

**जय जय जी सद्गुरु पूर्णकामा। परमपुरुषा आत्मयारामा।**
**अनुर्वाच्य तुमचा महिमा। वर्णिला न वचे।**

## दशक पांचवा

या दशकाच्या चवथ्या समासांत उपदेशाचे अनेक प्रकार आणि मंत्र यांचा उल्लेख आला असल्यामुळें या दशकाचें नांव 'मंत्रांचा दशक' पडलें असलें तरी या दशकाचा मुख्य विषय आत्मज्ञानाचा आहे. आत्मज्ञान म्हणजे, आपण कोण याचें ज्ञान.

**ऐक ज्ञानाचें लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान।**
**पाहावें आपणासी आपण। या नांव ज्ञान॥ ५-६-१॥**

इतर सर्व प्रकारचें ज्ञान तें नुसतें कौशल्य किंवा बहुधा ज्ञान होय. बहुधा ज्ञानाचे विषय अनंत आहेत. त्यांची लहानशी यादी पांचव्या समासांत श्रीसमर्थांनीं दिली आहे. हल्लींच्या काळीं तर, ती कितीतरी पटीनें वाढवितां येईल. परंतु काय उपयोग ! यांपैकीं एकाच्या हि योगानें सर्व संशयांचा निरास होऊन मोक्षाची प्राप्ति होणार नाहीं. अगदीं दुसऱ्याच्या मनांतलें जाणतां आलें, तर आपणांस मोठा चमत्कार वाटेल, पण तें हि कांहीं खरें ज्ञान नव्हे.

**जाणावें दुसऱ्याचे जीवीचें। हें ज्ञान वाटे साचें।**
**परंतु हें आत्मज्ञानाचें। लक्षण नव्हे॥ ५-५-३४॥**

ग्रन्थराजाच्या संपूर्ण वीस दशकांत मी या पांचव्या दशकाला श्रेष्ठ मानीत आलों आहें, कारण त्यांत श्रीसमर्थांनीं, ज्या योगें आपलें अत्यंत समाधान झालें तें आपल्या स्वामीचें वचन उघड सांगितलें आहे. तें वचन म्हणजे

## अहं ब्रह्मास्मि

हें होय. यावर पुष्कळ प्रश्न उद्भवतात आणि उद्भवतील, पण त्यांचा विचार आपण पुढें करूं. तूर्त इतकें च मानावयाचें कीं, मी ब्रह्म आहें आणि

## तत्त्वमसि

तूं हि तें च आहेस, तेव्हां तूं आणि मी एक च आहोंत. भरतखंडांत जन्माला आलेला आणि वैदिक संस्कृतींत वाढलेला प्रत्येक जण हें मानतो, पण तें ज्याच्या प्रत्ययास आलें, त्याचा ज्याला साक्षात्कार झाला व ज्याच्या वर्तनावरून त्याला झालेला साक्षात्कार जगाच्या हि निदर्शनास आला, असा पुरुष विरळा !

मनुष्याच्या चार कोटी आहेत : बद्ध, मुमुक्षु, साधक आणि सिद्ध. कोटींत एकादा च सिद्ध असेल, दोन चारशें साधक निघतील, हजार दोन हजारांच्या ठिकाणीं मुमुक्षुत्व उत्पन्न होत असेल, बाकी सारे बद्ध असतात. बद्ध म्हणजे ज्याला संसाराशिवाय दुसऱ्या कशाचें भान नसतें तो. बद्ध म्हणजे ज्याच्या ठिकाणीं प्रपंचाचा अत्यादर आणि परमार्थाचा अनादर असतो तो. श्रीसमर्थांच्या भाषणांत पुष्कळदां विनोद हि असे. त्याचें एक ठळक उदाहरण म्हणजे त्यांनीं बद्धाचें केलेलें विनोदपूर्ण वर्णन होय.

**हातीं द्रव्याची जपमाळ । कांताध्यान सर्वकाळ ।**
**सत्संगाचा दुष्काळ । या नांव बद्ध ॥ '१–७–३९ ॥**
**नेत्रीं द्रव्य दारा पाहावी । श्रवणीं द्रव्य दारा ऐकावी ।**
**चिंतनीं द्रव्य दारा चिंतावी । या नांव बद्ध ॥ ४० ॥**
**काया वाचा आणि मन । चित्त वित्त जीव प्राण ।**
**द्रव्यदारेचें करी भजन । या नांव बद्ध ॥ ४१ ॥**
**इंद्रियें करून निश्चळ । चंचळ होऊं नेदी पळ ।**
**द्रव्यदारेसी लावी सकळ । या नांव बद्ध ॥ ४२ ॥**
**द्रव्य दारा त चि तीर्थ । द्रव्य दारा तो चि परमार्थ ।**
**द्रव्य दारा सकळ स्वार्थ । म्हणे तो बद्ध ॥ ४३ ॥**
**वेर्थ जाऊं नेदी काळ । संसारचिंता सर्वकाळ ।**
**कथा वार्ता ते चि सकळ । या नांव बद्ध ॥ ४४ ॥**
**घटिका पळ निमिष्यभरी । दुश्चीत नव्हतां अंतरीं ।**
**सर्वकाळ ध्यान करी । द्रव्यदाराप्रपंचाचें ॥ ४६ ॥**

**तीर्थ यात्रा दान पुण्य । भक्ति कथा निरूपण ।**
**मंत्र पूजा जप ध्यान । सर्व हि द्रव्य दारा ॥ ४७ ॥**

**जागृति स्वप्न रात्रि दिवस । ऐसा लागला विषयध्यास ।**
**नाहीं क्षणाचा अवकाश । या नांव बद्ध ॥ ४८ ॥**

आपण हें काय चालविलें आहे, इकडे एकाद्याचें च दैववशात् लक्ष जातें. संसारदु:खांनीं दु:खवला, त्रिविध तापांनीं पोळला, भाग्यानें सत्पुरुषाच्या तोंडून चांगल्या गोष्टी ऐकावयास मिळाल्या आणि एके दिवशीं सहज स्वत:कडे लक्ष गेलें, आपले दोष दिसूं लागले, नाहीं नाहीं ते दोष आपल्या हातून घडले असें वाटलें, दु:ख झालें, सारें चरित्र आठवलें, क्षणभर मन विरघळलें, विषाद वाटला, पश्चात्ताप झाला, यापुढें

**आतां कांहीं आपुला काळ । सार्थक करूं ॥ ५-८-५ ॥**

असें मनांत आलें, म्हणजे त्या क्षणीं बद्धाचा मुमुक्षु झाला, असें समजावें. मुमुक्षूचें मुख्य लक्षण म्हणजे आपले अवगुण दिसूं लागून, दुसऱ्याची निंदा करण्याचा आजवर चालविलेला धंदा सोडून तो स्वत:ची निंदा करूं लागतो.

**म्हणे मी पतित चांडाळ । म्हणे मी दुराचारी खळ ।**
**म्हणे मी पापी केवळ । या नांव मुमुक्ष ॥ २८ ॥**
**म्हणे मी अभक्त दुर्जन । म्हणे मी हीनाहूनि हीन ।**
**म्हणे मी जन्मलों पाषाण । या नांव मुमुक्ष ॥ २९ ॥**
**म्हणे मी कांहीं च नेणे । म्हणे मी सकाळाहूनि उणें ।**
**आपलीं वर्णी कुलक्षणें । या नांव मुमुक्ष ॥ ३३ ॥**
**म्हणे मी अवगुणाची रासी । म्हणे मी वेर्थ आलों जन्मासी ।**
**म्हणे मी भार जालों भूमीसी । या नांव मुमुक्ष ॥ ३६ ॥**

अशी कांहींशी जागृति होऊन कांहीं साधनें करूं लागतो, पोथ्यापुस्तकें वाचूं लागतो, तीर्थक्षेत्रें पाहूं लागतो, प्रपंचाचा ध्यास कमी होत जाऊन परमार्थाचा हव्यास वाढत जातो, पण समाधान कांहीं होत नाहीं, अशा अवस्थेंत, एकदम प्रकाश पडावा त्याप्रमाणें,

**अंकित होईन सज्जनाचा ॥ ४३ ॥**

अशी बुद्धि उत्पन्न होते. अशी बुद्धि झाली म्हणजे बद्धदशा संपली, असें समजावें !

सद्गुरूवांचून ज्ञान नाहीं. ते हि एकदम कृपा करतील, असें समजूं नका. श्रीसमर्थांचें च पाहाना, त्यांनीं आपल्या जीवींचें गुज एकदम कोठें सांगितलें आहे. मला मोठी मौज वाटते.

**असो पूर्वीं थोर थोर । जेणें ज्ञानें पैलपार ।**
**पावले ते साचार । ऐक आतां ॥ ५-६-२२ ॥**

' ऐक आतां '. असें म्हटल्यावर सांगावें कीं नाहीं ? पण नाहीं, पुन्हा त्या ज्ञानाची च प्रतिष्ठा सांगूं लागले ! पुन्हा कांहीं वेळानें

**साधु संत आणि सज्जन । भूत भविष्य वर्तमान ।**
**सर्वत्रांचें गुह्य ज्ञान । तें सांगिजेल आतां ॥ २८ ॥**

असें म्हणून तरी सांगितलें का ? नाहीं ! पुन्हा ज्ञानाची च महती सुरू झाली ! तें ज्ञान तुला पुराणें वाचून होणार नाहीं, वेद सांगूं शकणार नाहींत, तें मी च

**तें चि आतां ये चि क्षणीं । बोधीन गुरुकृपें ॥ ३२ ॥**

ह्या च क्षणीं सांगतों असें म्हणून हि, स्वतःवर झालेल्या गुरुकृपेची आठवण झाल्यामुळें ज्ञान सांगण्याचें बाजूस च राहून गुरुकृपेकडे च चित्त वळलें. ह्या गुरुकृपेच्या ओव्या कोणाच्या हि हृदयाचें पाणी करतील ! त्या ओव्यांत श्रीसमर्थ बोलले नाहींत, त्यांचें हृदय बोललें आहे ! ! मधून मधून, सांगतों म्हणतात, पण न सांगतां गुरुकृपेंत दंग होतात. शिष्याची आतुरता सारखी वाढत चालली ! श्रीसमर्थांच्या मुखानें आपणांस ज्ञान व्हावें म्हणून तो अति उतावीळ झाला, हे सांगणार का नुसते च चाळविणार, असें वाटून शिष्यानें म्लान होऊन श्रीसमर्थांचे पाय च घट्ट धरले, तेव्हां कोठें त्यांना दया आली आणि बोलूं लागले ! त्या गुरुकृपेच्या अकरा ओव्या, म्हणजे प्रत्यक्ष श्रीसमर्थहृदय च ! तें हृदय आपण आपल्या हृदयाशीं धरूं ! त्या ओव्या आपण आपल्या हृदयांत सांठवूं ! ज्ञान पलीकडे च राहिलें, पण या अकरा ओव्यांनीं च माझें कार्य होत आहे ! माझें कार्य कोणतें ? श्रीसमर्थभक्तिप्रेम. मी दुसरें कांहीं जाणत नाहीं !

## सद्गुरुकृपा

पाहिलें नस्तां संस्कृतीं । रीग नाहीं म-हाष्टग्रन्थीं ।
हृदईं वसल्या कृपामूर्ती । सद्गुरुस्वामी ॥ ५-६-३३ ॥

आतां नलगे संस्कृत । अथवा ग्रन्थ प्राकृत ।
माझा स्वामी कृपेसहित । हृदईं वसे ॥ ३४ ॥

न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवणसायास ।
प्रेत्नेंविण सौरस । सद्गुरुकृपा ॥ ३५ ॥

ग्रन्थ मात्र म-हाष्ट । त्याहून संस्कृत श्रेष्ठ ।
त्या संस्कृतामधें पष्ट । थोर तो वेदांत ॥ ३६ ॥

त्या वेदांतापरतें कांहीं । सर्वथा श्रेष्ठ नाहीं ।
जेथें वेदगर्भ सर्व हा । प्रगट जाला ॥ ३७ ॥

असो ऐसा जो वेदांत । त्या वेदांताचा हि मथितार्थ ।
अति गहन जो परमार्थ । तो तूं ऐक आतां ॥ ३८ ॥

अरे गहनाचें हि गहन । तें तूं जाण सद्गुरुवचन ।
सद्गुरुवचनें समाधान । नेमस्त आहे ॥ ३९ ॥

सद्गुरुवचन तो चि वेदांत । सद्गुरुवचन तो चि सिद्धांत ।
सद्गुरुवचन तो चि धादांत । सप्रचीत आतां ॥ ४० ॥

जें अत्यंत गहन । माझ्या स्वामीचें वचन ।
जेणें माझें समाधान । अत्यंत जालें ॥ ४१ ॥

तें हें माझें जीवीचें गुज । मी सांगेन म्हणतों तुज ।
जरी अवधान देसी मज । तरी आतां ये च क्षणीं ॥ ४२ ॥

असें पांच वेळां, सांगतों म्हणून हि न सांगतां शिष्याची आतुरता इतकी वाढली कीं, अखेरीस,

शिष्य म्लानवदनें बोले । धरिले सदृढ पाउलें ।

तेव्हां कोठें दया येऊन

मग बोलों आरंभिलें । गुरुदेवें ॥ ४३ ॥

आपल्या गुरूपासून जें ज्ञान प्राप्त झालें होतें, तें मग श्रीसमर्थांनीं ४४ आणि ४५ या दोन च ओव्यांत सांगून पुढच्या सहा ओव्यांत त्याचें स्पष्टीकरण केलें आहे आणि हें ज्ञान एकदां झालें म्हणजे त्याचें दृढीकरण होण्याचा उपाय दोन ओव्यांत सांगून पुढच्या म्हणजे अकराव्या ओवींत समारोप केला आहे. फार तर यापुढें आपण उतारे घेतांना संकोच करूं, पण या हि अकरा ओव्या सतत डोळ्यांपुढें पाहिजेत, म्हणून त्यांना ओलांडून पुढें जाणें योग्य होणार नाहीं.

## आत्मज्ञान

**अहं ब्रह्मास्मि माहांवाक्य । येथीचा अर्थ अतर्क्य ।**
**तो हि सांगतो ऐक्य । गुरुशिष्य जेथें ॥ ४४ ॥**

**ऐक शिष्या येथीचें वर्म । स्वयें तूं चि आहेसि ब्रह्म ॥**
**ये विषईं संदेह भ्रम । धरूं चि नको ॥ ४५ ॥**

## स्पष्टीकरण

**नवविधा प्रकारें भजन । त्यांत मुख्य तें आत्मनिवेदन ।**
**तें समग्र प्रकारें कथन । कीजेल आतां ॥ ४६ ॥**

**निर्माण पंचभूतें यीयें । कल्पांतीं नासतीं येथान्वयें ।**
**प्रकृति पुरुष जीयें । ते हि ब्रह्म होती ॥ ४७ ॥**

**दृश्य पदार्थ आटतां । आपण हि नुरे तत्वतां ।**
**ऐक्यरूपें ऐक्यता । मुळीं च आहे ॥ ४८ ॥**

**सृष्टीची नाहीं वार्ता । तेथें मुळीं च ऐक्यता ।**
**पिंड ब्रह्मांड पाहों जातां । दिसेल कोठें ॥ ४९ ॥**

**ज्ञानवन्ही प्रगटे । तेणें दृश्यकेर आटे ।**
**तदाकारें मूळ तुटे । भिन्नत्वाचें ॥ ५० ॥**

**मिथ्यत्वें वृत्ति फिरे । तों दृश्य असतां च वोसरे ।**
**सहज चि येणें प्रकारें । जालें आत्मनिवेदन ॥ ५१ ॥**

## दृढीकरण

**असो गुरूचे ठाईं अनन्यता। तरी तुज कायसी रे चिंता।**
**वेगळेपणें अभक्ता। उरों चि नको॥ ५२॥**
**आतां हें चि दृढीकर्ण। व्हावया करी सद्गुरुभजन।**
**सद्गुरुभजनें समाधान। नेमस्त आहे॥ ५३॥**

## समारोप

**या नांव शिष्या आत्मज्ञान। येणें पाविजे समाधान।**
**भवभयाचें बंधन। समूळ मिथ्या॥ ५४॥**

एकांतांत बसावें, याचें अखंड श्रवण मनन करावें, भाग्योदयाचा दिवस उजाडल्यावांचून राहणार नाहीं! मुख्य म्हणजे श्रीसद्गुरुवचनीं पूर्ण विश्वास पाहिजे.

**सद्गुरुविण ज्ञान कांहीं। सर्वथा होणार नाहीं॥ ५-१-२१॥**

हा सिद्धान्त आहे. इतर पुष्कळ साधनें केलीं, तरी गुरुकृपेवांचून तीं फोल होत. हा सिद्धान्त निरपवाद आहे. पहिल्या समासाच्या ३३ ते ४४ या ओव्यांत तो सर्वथैव निःसंदिग्ध आणि अत्यंत हृदयभेदक शब्दांत श्रीसमर्थांनीं प्रतिपादिला आहे. त्यांचा ठाम सिद्धान्त कीं,

**सद्गुरुविण जन्म निर्फळ। सद्गुरुविण दुःख सकळ।**
**सद्गुरुविण तळमळ। जाणार नाहीं॥ ३९॥**
**सद्गुरुविण मोक्ष पावावा। हें कल्पांतीं न घडे॥ ४४॥**

कोणाला आवडो, न आवडो, त्यांचा दुसरा सिद्धान्त असा आहे,

**गुरु तों सकळांसी ब्राह्मण। जर्‍हीं तो जाला क्रियाहीन।**
**तरी तयासी च शरण। अनन्यभावें असावें॥ ५-१-६॥**

फार काय, पण

**जरी ब्राह्मण मूढमती। तरी तो जगद्वंद्य॥ १५॥**

ब्राह्मण्य हें एक अविनाशी तत्त्व दिसतें. एरवीं श्रीसमर्थांनीं त्याची एवढी प्रतिष्ठा ठेवली नसती. जगाच्या आरंभापासून सारें जग जरी त्यावर उलटलेलें असलें, तरी तें टिकून च आहे, कां, तर तें अविनाशी आहे म्हणून!

मी ब्राह्मण पडलों म्हणून मला हा सिद्धान्त पटत असेल, नाहीं म्हणतां येत नाहीं, पण या सिद्धान्ताच्या पाठीशीं हजारों हजार वर्षांची

परंपरा उभी आहे आणि म्हणून तात्त्विक दृष्टि बाजूस ठेवली तरी समाजशास्त्राच्या दृष्टीनें तो मला सत्य आणि हितावह वाटतो. पण यांत ब्राह्मणांनीं शेफारून जाण्यासारखें कांहीं नाहीं. क्रियाहीन आणि मूढमति ब्राह्मण असला तरी तो त्याच्या परंपरेमुळें वंद्य होय. येथें श्रीसमर्थ परंपरेला महत्त्व देत आहेत, हें ब्राह्मणांनीं ओळखिलें पाहिजे. ही क्रियाहीनत्वाला आणि मूढमतित्वाला श्रीसमर्थांकडून सनद मिळाली, असें नव्हे. तत्कालीन ब्राह्मणांच्या आचारविचारभ्रष्टतेबद्दल व मूर्खपणाबद्दल त्यांनीं अन्यत्र काढलेले दुःखोद्गार प्रसिद्ध आहेत. दासबोधग्रन्थाधारें तत्कालीन लोकस्थितीच्या खुणा पाहतांना ते दुःखोद्गार आपल्या कानांवर येतील च.

तात्पर्य, गुरुत्वाचा अधिकार ब्राह्मणांचा आहे, पण तो मानावयाचा नसेल तर, निदान गुरु स्वयातीचा तरी असावा. ( ५–२–६४ )

सद्गुरुवांचून ज्ञान नाहीं आणि ज्ञानावांचून मोक्ष नाहीं, हे सिद्धान्त खरे असले, तरी अज्ञानामुळें त्या सिद्धान्तांच्या योगानें महाराष्ट्रसमाजांत, पुरुषांत आणि त्यांच्या हि पेक्षां स्त्रियांत विपरीत घडल्याचें निदर्शनास येत आहे. सद्गुरूवांचून ज्ञान नाहीं आणि ज्ञानावांचून मोक्ष नाहीं, तेव्हां जो कोणी भेटेल आणि सद्गुरु म्हणवील आणि मिरवीत असेल त्याच्या नादीं, बेसावधपणा, अज्ञान, भोळेपणा यांच्या योगें लागून स्त्रिया आणि पुरुष आपलें सारखें च अकल्याण करून घेत असतात. सद्गुरु किती दुर्मिळ आहेत. पण हल्लीं त्यांचें पीक किती तरी फोफावलेलें दिसतें. महाराष्ट्रांत तालुक्याचें असें क्वचित च ठिकाण असेल कीं, जेथें एखाद्या सद्गुरूनें आत्मज्ञान विकण्याचें दुकान थाटलेलें नसेल. दहा पांच खेडीं मिळून एखादा तरी मंत्र देणारा बुवा असतो च. बुवांना बोलून काय उपयोग, तो त्यांच्या चरितार्थाचा धंदा असतो. चालत आहे तोंपर्यंत ते आपला धंदा चालविणार च. लोकांनीं च सावध झालें पाहिजे आणि ओळखिलें पाहिजे.

यासाठीं, दुसऱ्या समासांत श्रीसमर्थांनीं सद्गुरु काय करूं शकतात म्हणून जें वर्णन केलें आहे, त्याची कसोटी लावून आपण च आधीं सद्गुरूची परीक्षा केली पाहिजे.

जो ब्रह्मज्ञान उपदेसी । अज्ञानअंधारें निरसी ।
जीवात्मयां परमात्मयांसी । ऐक्यता करी ॥ ५-२-९ ॥

बिघडले देव आणि भक्त । जीवशिवपणें द्वैत ।
तया देवभक्तां येकांत । करी तो सद्गुरु ॥ १० ॥

भवव्याघ्रें घालूनि उडी । गोवत्सास तडातोडी ।
केली देखोनि सीघ्र सोडी । तो सद्गुरु जाणावा ॥ ११ ॥

प्राणी मायाजाळीं पडिले । संसारदुःखें दुःखवले ।
ऐसे जेणें मुक्त केले । तो सद्गुरु जाणावा ॥ १२ ॥

वासनानदीमाहांपुरीं । प्राणी बुडतां ग्लांती करी ।
तेथें उडी घालूनि तारी । तो सद्गुरु जाणावा ॥ १३ ॥

गर्भवास अति सांकडी । इछाबंधनाची बेडी ।
ज्ञान देऊन सीघ्र सोडी । तो सद्गुरु स्वामी ॥ १४ ॥

फोडूनि शब्दाचे अंतर । वस्तु दाखवी निजसार ।
तो चि गुरु माहेर । अनाथांचें ॥ १५ ॥

जीव येकदेसी बापुडें । तयास ब्रह्म चि करी रोकडें ।
फेडी संसारसांकडें । वचनमात्रें ॥ १६ ॥

जें वेदांचे अभ्यांतरीं । तें काढून अपत्यापरी ।
शिष्यश्रवणीं कवळ भरी । उद्गारवचनें ॥ १७ ॥

या कसोटीला उतरणारे सद्गुरु काय वाटेवर पडले आहेत? परंतु याच्या उलट

शिष्यास न लविती साधन । न करविती इंद्रियेदमन ।
ऐसे गुरु आडक्याचे तीन । मिळाले तरी त्यजावे ॥ २१ ॥

या सद्गुरूच्या बाबतींत आणखी एक मोठा धोका असतो. तो चांगल्या चांगल्या चिकित्सकांना हि मोहांत पाडूं शकतो. ब्रह्मज्ञानाची भाषा सुलभ असल्यामुळें ती एकाद्याच्या मुखांत बसलेली आढळली तर फसगत होण्याचा फार संभव असतो.

अद्वैतनिरूपणें अगाध वक्ता । परी विषई लोलंगता ।
ऐसिया गुरूचेनि सार्थकता । होणार नाहीं ॥ ३१ ॥

असले हि लोभी, केवळ शब्दज्ञानी गुरु टाळले पाहिजेत. मग सद्गुरु ओळखावा तरी कसा, हा मोठा प्रश्न पडतो. त्याचें उत्तर दोन ओव्यांत, सर्व लक्षणें एकत्र करून देण्यांत आलें आहे :

**म्हणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन। स्वधर्मकर्म आणि साधन।**
**कथा निरूपण श्रवण मनन। नीति न्याये मर्यादा ॥ ५२ ॥**

या ओवींतील बारा लक्षणें आणि समासाच्या शेवटच्या ओवींत दिलेलें

**या हि वरी कृपाळुपण।**

हें तेरावें लक्षण, मिळून या तेरा लक्षणांच्या कसोटीवर जो उतरेल तो च खरा सद्गुरु होय.

असले सद्गुरु दुर्मिळ होत ! यावर माझा एक च तोडगा आहे. त्याचा उल्लेख स्फुट ओव्यांच्या निरूपणांत ब्रह्मज्ञानप्राप्तीचीं साधनें सांगतांना मीं मागें एकदां केला आहे. तो तोडगा मीं अनेकदां प्रवचनांत हि बोलून दाखविला आहे. तो ऐकून खऱ्याला उलट बरें वाटतें, पण गुरूपणाचा धंदा करणारे कांहीं जण मजवर रागावल्याचें हि मला कळलें आहे. पण एका बाजूस अशांचा राग व दुसऱ्या बाजूस भाविक स्त्रीपुरुषांची फसवणूक, यांत गुरूचा धंदा करणाऱ्यांचा राग पतकरणें मला इष्ट वाटतें.

माझें म्हणणें असें. ब्रह्म आणि सद्गुरुपद हीं एक च होत. ब्रह्मपदास पोंचलेले असे साक्षात्कारी सद्गुरु हल्लींच्या अवनतीच्या, धर्मभ्रष्टतेच्या, वर्णसंकराच्या काळांत कोठें दिसावे ? तेव्हां माझा तोडगा असा, श्री ज्ञानेश्वर, श्री नामदेव, श्री एकनाथ, श्री तुकाराम आणि श्री रामदास कोठें गेले नाहींत, किंवा फार दूर नाहींत, यांपैकीं कोणाची हि कांस धरावी. ती घट्ट धरावी, इतकी कीं,

**कोसळोनि पडो हें आकाश। आणिकाची वास न पाहूं ॥**

इतर कोणाला निंदूं नये. भले असोत नष्ट असोत, सर्वांना नमस्कार करावा, सर्वांच्या पायां पडावें, पण कोणाची हि आशा करूं नये !

तात्पर्य, बद्धाचा मुमुक्षु झाला म्हणजे च तो सद्गुरूच्या शोधाला लागतो. सद्गुरूचीं लक्षणें आपण वर पाहिलीं च आहेत. त्या च प्रमाणें

सच्छिष्याचीं लक्षणें कोणतीं तीं समजून घेऊन तीं आपण स्वतःच्या ठिकाणीं बाणून घेतलीं पाहिजेत. नुसता पश्चात्ताप झाला, एवढ्यानें च भागावयाचें नाहीं. हीं लक्षणें श्रीसमर्थांनीं तिसऱ्या समासांत विस्तारानें सांगितलीं आहेत. त्या समासाच्या १०४ ओव्या आहेत. एवढा मोठा समास दासबोधांत दुसरा नाहीं. याचा अर्थ मी असा करतों, श्रीसमर्थांना सच्छिष्यांची इतकी काळजी वाटे. आपण सारे च सच्छिष्य होण्याची महत्त्वाकांक्षा बाळगून आहोंत. तेव्हां आपल्यांपैकीं प्रत्येकानें स्वतःकडे पाहात तो समास शांतपणें वाचला पाहिजे आणि बोध घेतला पाहिजे. बुवांत जसे ढोंगी बुवा असतात, तसे शिष्यांत हि ढोंगी शिष्य असतात. ढोंगी शिष्य आपल्या एकट्याचा च घात करून घेतो, पण ढोंगी गुरु अनेकांच्या नाशाला कारण होतो. म्हणून ढोंगी गुरूचें ढोंग बाहेर काढण्यास धूर्त लोक जसे टपलेले असतात, तसे ढोंगी शिष्याच्या मागें ते लागत नाहींत, त्यावरून शिष्यांत कोणी ढोंगी नसतात च असें होत नाहीं. गुरु होऊन पोट भरणें, हा जसा एक धंदा आहे, तसा शिष्य होऊन तुंबडी भरणें हा हि एक चरितार्थाचा मार्ग आहे. असल्या नष्ट शिष्यांचें हि वर्णन अत्यंत निषेधपूर्वक केलेलें आपणांस त्या च समासांत आढळेल. त्या समासाच्या ५४ ते ९७ ओव्या या असच्छिष्यांनीं च अडविल्या आहेत. त्या लक्षणांत आपण कोठें येत नाहीं ना, हें आपण सर्वांनीं फार दक्षतेनें पाहिलें पाहिजे.

कठीण आहे, पण सर्व गोष्टी जुळून आल्या पाहिजेत. शेतीचा दृष्टान्त घेऊन श्रीसमर्थांनीं हें समजावून दिलें आहे. भूमि चांगली पाहिजे, पेरावयाचें बीं चांगलें पाहिजे, वेळच्या वेळीं पाऊस पाहिजे आणि पीक आलें तरी निगा ही केली च पाहिजे. अगदीं तद्वत्, उत्तम भूमिकेचा सच्छिष्य पाहिजे, शुद्ध ज्ञानाचें बीज पेरणारा सद्गुरु पाहिजे, अध्यात्म-निरूपणाचा पाऊस अखंड पडत राहिला पाहिजे आणि परमार्थाचें पीक वायां जाऊं नये म्हणून साधनें चालू च ठेविलीं पाहिजेत.

**म्हणौन साधन अभ्यास आणि सद्गुरु ।**
**सच्छिष्य आणि सच्छास्त्रविचारु ।**
**सत्कर्म सद्वासना पारु । पाववी भवाचा ॥ ५-३-१२ ॥**

**सदुपासना सत्कर्म । सत्क्रिया आणि स्वधर्म ।**
**सत्संग आणि नित्य नेम । निरंतर ॥ १३ ॥**

**ऐसें हें अवघें चि मिळे । तरी च विमळ ज्ञान निवळे ।**
**नाहीं तरी पाषांड संचरे बळें । समुदांई ॥ १४ ॥**

आधीं काय विचार करावयाचा असेल तो करावा, काय कसोटी लावावयाची असेल ती लावावी, परीक्षा पाहावयाची असेल ती पाहावी, पण एकदां सद्गुरु म्हणून शरण गेल्यावर

**लागतां सद्गुरुवचनपंथें । जालें ब्रह्मांड पालथें ।**
**तरी जयाच्या शुद्ध भावार्थें । पालट न धरिजे ॥ ५१ ॥**

इतका विश्वास पाहिजे. हें तर सच्छिष्याचें मुख्य लक्षण गणलें गेलें आहे :

**मुख्य सच्छिष्याचें लक्षण । सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण ।**
**अनन्यभावें शरण । या नांव सच्छिष्य ॥ ५-३-१९ ॥**

पश्चात्ताप करण्याची पाळी येऊं नये म्हणून मी वर सांगितलेला तोडगा मानावा. आपला महाराष्ट्र मोठा भाग्यवान् आहे. इतकें भाग्य दुसऱ्या कोणत्या हि देशाचें किंवा प्रांताचें असेल, असें वाटत नाहीं. ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास या पंचकांतून बेलाशक कोणाची निवड करा, रामदास, केशव, आनंदमूर्ति, रंगनाथ, जयराम या पंचायतनापैकीं कोणाचे हि पाय धरा, कल्याण, उद्धव, दिनकर, दिवाकर, वासुदेव या पंचकापैकीं कोणाची हि कांस धरा, किंवा अशीं पंचकें जीं तुम्हांस आणखी सुचतील तीं विचारांत घ्या, पण गुरुविरहित राहूं नका,

**येक गुरु एक देव । कोठें तरी असावा भाव ।**

म्हणजे आपलें काम संपलें. मग आपली काळजी त्या गुरूला आणि त्या देवाला लागली.

असें झालें म्हणजे च मुमुक्षूचा साधक होतो :

**जो संतासी शरण गेला । संतजनीं आश्वासिला ।**
**मग तो साधक बोलिला । ग्रंथांतरीं ॥ ५-९-३ ॥**

**उपदेशिलें आत्मज्ञान । तुटलें संसारबंधन ।**
**दृढतेकारणें करी साधन । या नांव साधक ॥ ४ ॥**

हा समास मुळावरून पुढें पुढें वाचीत च जा, सारखा प्रवाह चालला आहे. त्यांत तुम्हांस आढळेल कीं, साधक हा लावी ऐक्यतेची समाधी। बळें चि स्वरूपाकार होतो। स्वरूपीं लावी निजध्यास। सदा स्वरूपीं मिसळे। आत्मस्थितीची धारणा धरी। वस्तु साधी लागवेगें। स्वरूपीं करी दृढ बुद्धी। फार काय, तो वस्तु च होऊन राहिलेला असतो, आपणांस दिसत असतो तो तो नसतो च मुळीं ! मग दिसत असतो तो कोण असतो ? तो तो नसतो ! तो

**विवेकबळें गुप्त जाला। आपेंआप मावळला।**
**दिसतो परी देखिला। नाहीं च कोणीं॥ ५-९-२५॥**

आपल्या समर्थांची हि अशी च स्थिति आहे. ज्याला त्याला वाटतें, मी समर्थांना पाहिलें, मी त्यांना ओळखिलें. पण, खरें बोला. त्यांना नाहीं हो कोणी पाहिलें किंवा ओळखिलें !

५×३ त जितक्या कडक रीतीनें श्रीसमर्थांनीं असच्छिष्याचा धिक्कार केला आहे, तितक्या च उत्साहानें आणि जोरानें ५×९ च्या ३३ ते ५८ ओव्यांत त्यांनीं साधकाचा जयजयकार केला आहे. त्या ओव्यांत अनायासें श्रीसमर्थांचा भाषाविलास हि पाहावयास मिळतो. उतारा मोठा होईल, म्हणून त्या ओव्या मुळावरून वाचण्याची वाचकांस विनंति करितों.

अशा साधकापासून सिद्धाची पायरी फारशी दूर नसते. साधकाच्या ठिकाणीं आरंभीं संशय असतो (५-९-७) आणि नंतर त्याची निवृत्ति होते आणि सिद्ध हा आरंभापासून च निःसंदेह असतो. याचा अर्थ, साधक निःसंदेह झाला म्हणजे तो च सिद्ध होतो.

**साधकासी संदेहवृत्ती। पुढें होतसे निवृत्ती।**
**या कारणें निःसंदेह श्रोतीं। साधु वोळखावा॥ ५-१०-१२॥**

सिद्ध संदेहरहित असतात व त्यांना निश्चयाचें समाधान प्राप्त झालेलें असतें, असें म्हणतात. तो निश्चय कोणता ? आत्मबुद्धीचा !

**आत्मबुद्धि निश्चयाची। ते चि दशा मोक्षश्रीची।**
**अहमात्मा हें कधीं चि। विसरों नये॥ ५-१०-३८॥**

याप्रमाणें हा दशक **अहं ब्रह्मास्मि** या महावाक्याचा आहे. त्यांत सर्व आत्मज्ञान आलें. या वचनाचा च पुढच्या दशकांत विस्तारपूर्वक विचार केला आहे, तिकडे आतां आपण वळूं.

## दशक सहावा

देवशोधनाचा. मागील दशकांत **अहं ब्रह्मास्मि** हें जें ज्ञानाचें सूत्र सांगितलें तें या दशकांत विस्तारपूर्वक समजावून दिलें आहे.

'मी ब्रह्म आहें' यांत मी कोण, ब्रह्म काय आहे व माझें आणि त्याचें तादात्म्य कसें आहे, हे तीन मुख्य प्रश्न व एक ब्रह्म तेवढें खरें बाकी सर्व मिथ्या आहे, तर हें सारें दिसतें तें काय खोटें आहे, हें गहन ज्ञान मला कसें होईल व एकदां तें ज्ञान झाल्यावर मग मला कांहीं करावयाचें उरत नाहीं ना, असे तीन उपप्रश्न उद्भवतात. या सर्व प्रश्नांचा या दशकांत साकल्यानें विचार केला आहे. हे च प्रश्न पुढें हि वारंवार उद्भवले आहेत, तेव्हां ते येथें च एकवार चांगले समजून घेतलेले बरे, म्हणजे वारंवार त्यांचा विचार करणें नको.

पोट भरण्याच्या विद्येला हि व्यवहारांत ज्ञान म्हणतात, पण तें कांहीं खरें ज्ञान नव्हे. परमेश्वर ओळखणें, ब्रह्म समजणें हें खरें ज्ञान.

**तो देव ठाईं पडेना। तरी यमयातना चुकेना।**
**ब्रह्मांडनायक चोजवेना। हें बरें नव्हे ॥ ६–१–१३ ॥**

**जेणें संसारीं घातलें। आवघें ब्रह्मांड निर्माण केलें।**
**त्यासी नाहीं वोळखिलें। तो चि पतित ॥ १४ ॥**

तेव्हां हरएक प्रयत्न करून आपण त्याची ओळख करून घेतली पाहिजे.

मी कोण आणि ब्रह्म काय आहे, असा आपल्यापुढें प्रश्न आहे आणि मी ब्रह्म च असल्यामुळें ब्रह्माचा शोध लागला म्हणजे माझ्या स्वरूपाचा उलगडा आपोआप च होणार आहे, म्हणून आपण आधीं ब्रह्म जाणण्याच्या उद्योगास लागूं.

## ब्रह्मस्वरूप

**निर्गुण आत्मा तो निर्मळ । जैसें आकाश अंतराळ ।**
**घनदाट निर्मळ निश्चळ । सदोदित ॥ ६-३-१ ॥**
**जें खंडलें चि नाहीं अखंड । जें उदंडाहूनि उदंड ।**
**जें गगनाहूनि वाड । आणि सूक्ष्म ॥ २ ॥**
**जें दिसेना ना भासेना । जें उपजेना ना नासेना ।**
**जें येयना ना जायना । परब्रह्म तें ॥ ३ ॥**
**जें चळेना ना ढळेना । जें तुटेना ना फुटेना ।**
**जें रचेना ना खचेना । परब्रह्म तें ॥ ४ ॥**
**जें सन्मुख चि सर्वकाळ । जें निःकळंक आणि निखळ ।**
**सर्वांतर आकाशपाताळ । व्यापूनि असे ॥ ५ ॥**
**अविनाश तें ब्रह्म निर्गुण । नासे ते माया सगुण ।**
**सगुण आणि निर्गुण । कालवलें ॥ ६ ॥**

अशा या सगुणनिर्गुण मायाब्रह्माच्या कर्दमांतून आपणांस ब्रह्माची ओळख करून घ्यावयाची आहे. या मायाब्रह्माचें अति सरस विवरण पांचव्या समासांत आहे. मला तो समास फार आवडतो व मला वाटतें, तो सर्वांना मुखोद्गत असावा. तो भूपाळीसारखा म्हणतां येतो. पाठ झाला म्हणजे प्रत्यहीं सकाळीं उठल्यावर तो शांत वेळीं शांतपणें भूपाळीसारखा म्हणावा. मला तरी तो समास एक भूपाळी च वाटतो. श्रीसमर्थांनीं तो भूपाळी म्हणून च रचला असेल काय? या समासाला आपण भूपाळी च मानूं. ती स्वतंत्र आहे, तिचा शेवट हि फलश्रुतींत झाला आहे. वाचक मुळावरून जरूर पाहतील, मुखोद्गत करतील, या विश्वासानें उतरून घेत नाहीं.

त्या भूपाळीचा आरंभ

**श्रोते पुसती ऐसें । माया ब्रह्म तें कैसें ।**
**श्रोत्यां वक्तयांच्या मिसें । निरूपण ऐका ॥ ६-५-१ ॥**
**ब्रह्म निर्गुण निराकार । माया सगुण साकार ।**
**ब्रह्मासि नाहीं पारावार । मायेसि आहे ॥ २ ॥**

आणि तिचा शेवट

**मायाब्रह्माचें विवरण। करितां चुके जन्ममरण।**
**संतांस गेलियां शरण। मोक्ष लाभे ॥ २५ ॥**

**अरे या संतांचा महिमा। बोलावया नाहीं सीमा।**
**जयांचेनि जगदात्मा। अंतर चि होये ॥ २६ ॥**

दिक्, काल आणि गुण या तिन्ही दृष्टींनीं ब्रह्माची व्याप्ति किती ती विचार करण्यासारखी आहे. या दशकांत कालापुरती व्याप्ति सांगितली आहे, सातव्या दशकांत दिग्दृष्ट्या सांगितली आहे, आणि नवव्यांत गुणांपुरती आली आहे. ब्रह्मस्वरूप एका च वेळीं आपल्या नजरेंत भरावें, म्हणून या तिन्ही दृष्टींनीं आपण येथें च पाहूं.

कालाच्या दृष्टीनें ब्रह्माची व्याप्ति ६ × ४ त दाखविली आहे, ती आपण आपल्या भाषेंत मांडूं. तें गणितांतील एक उदाहरण आहे. गणितज्ञांनीं तें उदाहरण सोडवून उत्तराचा आंकडा काढावा.

एकंदर युगें चार. कलियुगाचीं वर्षें ४,३२,०००, द्वापाराचीं ८,६४,०००, त्रेतायुगाचीं १२,९६,००० आणि कृताचीं १७,२८,००० मिळून चार हि युगांचीं ४३,२०,००० वर्षें होतात. इतकीं वर्षें लोटलीं म्हणजे चार युगांचा एक फेरा होतो. असे १००० फेरे झाले म्हणजे ब्रह्मदेवाचा अवघा एक दिवस होतो. मग असे किती फेरे झाले म्हणजे त्याचें एक वर्ष होणार आणि किती फेरे झाले म्हणजे ४३,२०,००० वर्षें होणार यांचें गणित करा! या हिशोबानें ब्रह्मदेवाच्या चारी युगांचे हजार फेरे झाले म्हणजे विष्णूची ती एक घटिका होते. सोडवा विष्णूच्या चारी युगांच्या हजार फेर्‍यांचें गणित. कारण विष्णूच्या युगांचे हजार फेरे झाले म्हणजे शंकराचें एक पळ होणार आहे आणि शंकराच्या युगांचे हजार फेरे झाले म्हणजे शक्तीचें तें अर्ध पळ होय! आणि

**ऐशा अनंत शक्ती होती। अनंत रचना होती जाती।**

तरी परब्रह्म जसेंच्या तसें असतें.

**तरी अखंड खंडेना स्थिती। परब्रह्माची ॥ ६-४-५ ॥**

आणि मी जर तें च परब्रह्म असेन, हें वर्णन जर माझ्या च स्वरूपाचें असेल, तर केवढें आश्चर्य म्हणावयाचें कीं, अनंत काळ टिकणाऱ्या त्या माझ्या शाश्वत स्वरूपाची यत्किंचित् चिंता न करतां, प्रस्तुत मला जें, फार फार तर, शंभर वर्षांचें आयुष्य लाभलें आहे, त्यापायीं मी अहोरात्र धडपडत आणि तळमळत असावें.

दिग्दृष्ट्या हि असेंच आश्चर्य वाटतें. ७ × ४ त त्या दृष्टीनें परब्रह्माची म्हणजे माझ्या च स्वरूपाची व्यापकता सांगितली आहे.

**ब्रह्म नभाहून निर्मळ । पाहातां तैसें चि पोकळ ।**
**अरूप आणि विशाळ । मर्यादेवेगळें ॥ ७--४--१ ॥**
**येकवीस स्वर्गे सप्त पाताळ । मिळोन एक ब्रह्मगोळ ।**
**ऐसीं अनंत तें निर्मळ । व्यापून असे ॥ २ ॥**
**अनंत ब्रह्मांडांखालतें । अनंत ब्रह्मांडावरुतें ।**
**तेणेंविण स्थळ रितें । अणुमात्र नाहीं ॥ ३ ॥**

इतका मी व्यापक असतां, काय नवल म्हणावें कीं, त्या माझ्या विशाल प्रांताला विसरून मीं माझ्या टीचभर घरट्यासाठीं आणि वीतभर शेतासाठीं, हातभर जहागिरीसाठीं आणि गजभर राज्याकरितां आयुष्यभर चिंतेंत मग्न होऊन बसावें !

नवव्या दशकाच्या पहिल्या समासांत माझ्या स्वरूपाचा गुणगौरव आहे. परब्रह्म कसें आहे ? तें निराकार, निराधार, निर्विकल्प; निरामय, निराभास, निरावेव; निःप्रपंच, निःकलंक, निरोपाधी; निरोपम्य, निरालंब, निरापेक्ष; निरंजन, निरंतर, निर्गुण; निःसंग, निर्मळ, निश्चळ; निःशब्द, निर्दोष, निवृत्ति; निःकाम, निर्लेप, निःकर्म; अनाम्य, अजन्मा, अप्रत्यक्ष; अगणीत, अकर्तव्य, अक्षै; अरूप, अलक्ष, अनंत; अपार, अढळ, अतर्क्य; अद्वैत, अदृश्य, अच्युत; अछेद, अदाह्य, अक्लेद; असें आहे. म्हणजे तात्पर्य,

**परब्रह्म म्हणिजे सकळांपरतें ।**

आहे. आणि मी कोण आहें ? तर

**तयास पाहातां आपण चि तें ॥ ९-१-२९ ॥**

असें माझें वास्तविक स्वरूप असतां, त्या गुणांकडे दुर्लक्ष करून षड्रिपूंच्या तावडींत सांपडून मीं नाना वेडेचार करावे, यास काय म्हणावें?

याप्रमाणें ब्रह्म दिक्कालाद्यनवच्छिन्न आहे.

**ब्रह्म प्रळयावेगळें । ब्रह्म नांवरूपानिराळें ।**
**ब्रह्म कोणी येका काळें । जैसें तैसें ॥ ६–४–२३ ॥**

परब्रह्माचें असें वर्णन करीत असतां श्रीसमर्थांच्या मुखांतून सहजगत्या ब्राह्मणाची व्याख्या बाहेर पडली :

**करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण ।**
**ते चि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ ६–४–२४ ॥**

बाकीचे सारे नांवाचे ब्राह्मण !

देवाचें वास्तविक स्वरूप हें असें आहे :

**जें शस्त्रें तोडितां तुटेना । जें पावकें जाळितां जळेना ।**
**कालवितां कालवेना । आपेंकरूनी ॥ ६–२–१६ ॥**

**जें वायोचे नि उडेना । जें पडेना ना झडेना ।**
**जें घडेना ना दडेना । परब्रह्म तें ॥ १७ ॥**

**ज्यासी वर्ण चि नसे । जें सर्वांहूनि अनारिसें ।**
**परंतु असत चि असे । सर्वकाळ ॥ १८ ॥**

तात्पर्य, तें

**पृथ्वी नव्हे आप नव्हे । तेज नव्हे वायु नव्हे ।**
**वर्णवेक्त ऐसें नव्हे । अव्यक्त तें ॥ २६ ॥**

**तयासी म्हणावें देव । वरकड लोकांचा स्वभाव ।**
**जितुके गांव तितुके देव । जनाकारणें ॥ २७ ॥**

## लोकांच्या देवाचें स्वरूप

परंतु लोकांच्या देवाचें स्वरूप भिन्न असतें आणि तें दुःखाला कारण होत असतें :

**पाषाणाचा देव केला । येके दिवशीं भंगोन गेला ।**
**तेणें भक्त दुखवला । रडे पडे आक्रंदे ॥ ६–६–३३ ॥**
**देव हारपला घरीं । येक देव नेला चोरीं ।**
**येक देव दुराचारीं । फोडिला बळें ॥ ३४ ॥**
**येक देव जापाणिला । येक देव उदकीं टाकिला ।**
**येक देव नेऊन घातला । पायातळीं ॥ ३५ ॥**

त्या काळीं हे असले प्रकार फार घडत ! मंदिरें उध्वस्त होत होतीं, मूर्ति फोडल्या जात होत्या किंवा भ्रष्ट केल्या जात होत्या, त्या नेऊन मशिदींत जाण्यायेण्याच्या वाटेवरच्या पायऱ्यांच्या पायतळीं घातल्या जात होत्या ! हे असले अनन्विन कैक प्रकार इतिहासग्रन्थांत नमूद आहेत.

**धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा ।**
**तेथें देव कैंचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥ ४४ ॥**
**हे आपुली कल्पना । प्राप्तऐसीं फळें जाणा ।**
**परी त्या देवाचिया खुणा । वेगळ्या चि ॥ ४५ ॥**
**म्हणौनि हें मायाभ्रमणें । सृष्टि मिथ्या कोटिगुणें ।**
**वेद शास्त्रें पुराणें । ऐसीं च बोलती ॥ ४६ ॥**
**साधु संत मानुभाव । त्यांचा ऐसा चि अनुभव ।**
**पंचभूतातीत देव । सृष्टि मिथ्या ॥ ४७ ॥**
**सृष्टीपूर्वीं सृष्टि चालतां । सृष्टि अवघी संव्हारितां ।**
**शाश्वत देव तत्त्वता । आदिअंतीं ॥ ४८ ॥**

हें तात्त्विक पण कठोर निरूपण ऐकून शिष्य विचारिता झाला, तर मग काय आतां आम्ही सगुणोपासना सोडून द्यावी ? श्रीसमर्थ उत्तर देतात, नाहीं, तर

**सगुणीं भजावें निश्चित । निश्चयालागीं ॥ ६–६–५४ ॥**

**सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे निर्धारें ।**
**सारासारविचारें । संतसंगें ॥ ५५ ॥**

एवढ्यानें समाधान न होऊन शिष्यानें भीत भीत पण स्पष्ट शब्दांत आपली शंका प्रदर्शित केली :

## ज्ञानोत्तर कर्म कां करावें ?

**ज्ञानें दृश्य मिथ्या जालें । तरी कां पाहिजे भजन केलें ।**
**तेणें काये प्राप्त जालें । हें मज निरोपावें ॥ ६–७–१ ॥**

सर्व कांहीं नाशिवंत आहे, मिथ्या आहे, तर मग भजनपूजनाचा मिथ्याचार कशास हवा ? मला कळलें सर्व नश्वर आहे, मला ज्ञान झालें, मग आतां पुन्हा साधनें कां करूं ?

या प्रश्नाचें श्रीसमर्थांनीं पहिलें उत्तर दिलें तें असें, माझी आज्ञा तुला प्रमाण आहे ना, मग मी म्हणतों म्हणून भजनपूजनादि कर्में सोडूं नकोस.

शिष्य म्हणतो, महाराज, आपली आज्ञा कोण अमान्य करील, पण आपण तरी आम्हांस असें कां सांगतां ?

श्रीसमर्थ उत्तर देतात – तूं ज्ञानी झालास, मग तूं सर्व कांहीं सोडलें असशील ? तूं खात पीत नसशील, आपला परका हा तुला भेद उरला नसेल, फार काय, मळमूत्रत्याग हि तुला करावा लागत नसेल ? पण हीं सर्व कर्में तुझीं सुटलीं नसतील, तर मग एवढ्या भजनानें च असें काय केलें कीं त्यावर तूं उदार व्हावेंस ?

**ज्ञानविवेकें मिथ्या जालें । परंतु अवघें नाहीं टाकलें ।**
**तरी मग भजनें चि काय केलें । सांग बापा ॥ ६–७–१८ ॥**

**साहेबास लोटांगणीं जावें । नीचासारिखें व्हावें ।**
**आणि देवास न मनावें । हें कोण ज्ञान ॥ १९ ॥**

शिवाय, श्रीसमर्थ स्वतःचा अनुभव सांगून व जगांत प्रत्यक्ष काय चाललें आहे तिकडे शिष्याचें लक्ष वेधून घेऊन त्यास खडखडीत बजावतात :

**ज्ञानबळें उपासना । आम्ही भक्त जरी मानूं ना ।**
**तरी या दोषाच्या पतना । पावों अभक्तपणें ॥ ४० ॥**

श्रीसमर्थांचा अनुभव ऐका :

**आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथें आमुचा परमार्थ ।**
**जो समर्थाचा हि समर्थ । देवां सोडविता ॥ ६–७–२१ ॥**

**त्याचे आम्ही सेवक जन । सेवेकरितां जालें ज्ञान ।**
**तेथें अभाव धरितां पतन । पाविजेल कीं ॥ २२ ॥**

शिष्याला म्हणतात, तूं जी शंका विचारलीस, ती ज्ञान्याच्या भूमिकेवरून विचारली च नाहींस. ज्ञान्याला असली शंका येणार च नाहीं. तुला धड ज्ञान नाहीं आणि भाव हि नाहीं, तूं केवळ देहाचा अभिमान घेऊन बोलत आहेस. तरी माझें ऐक, असें करूं नकोस, सगुणोपासना सोडूं नकोस, तर च तुला खरें ज्ञान होईल.

**तरी आतां ऐसें न करावें । रघुनाथभजनीं लागावें ।**
**तेणें चि ज्ञान बोलावें । चळेना ऐसें ॥ २८ ॥**

प्रत्यक्ष चालू घटकेला आपल्या हातून घडणारा रोकडा चमत्कार त्यास सांगून अनन्य भक्ताच्या सामर्थ्याची प्रचीति स्वतः घेऊन पाहण्यास श्रीसमर्थ शिष्यास उद्युक्त करीत आहेत :

**करी दुर्जनाचा संव्हार । भक्तजनासी आधार ।**
**ऐसा हा तों चमत्कार । रोकडा चाले ॥ २९ ॥**
**मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघें चि नासोन जातें ।**
**कृपा केलियां रघुनाथें । प्रचित येते ॥ ३० ॥**
**रघुनाथभजनें ज्ञान जालें । रघुनाथभजनें महत्त्व वाढलें ।**
**म्हणौनियां तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१ ॥**
**हें तों आहे सप्रचित । आणि तुज वाटेना प्रचित ।**
तरी **साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥ ३२ ॥**

## मी कोण ?

ब्रह्म पाहिलें, देवाची ओळख झाली, आतां मी कोण आहें, तें पाहूं.

शरीर हें पंचभूतांचें एक गांठोडें आहे. मेल्यावर स्मशानांत तें सुटणार च आहे. पण जिवंतपणीं च तें विचारानें सोडून पाहिल्यास कळेल कीं, तत्त्वांत तत्त्वें उडून गेल्यावर शिल्लक जो आत्मा उरला, तो मी. त्याला जन्ममरण, पापपुण्य कांहीं नसतें.

तत्वें तत्व मेळविलें । त्यासी देह हें नाम ठेविलें ।
तें जाणते पुरुषीं शोधिलें । तत्वें तत्व ॥ ६–३–२० ॥

तत्वझाडा निशेष होतां । तेथें निमाली देहअहंता ।
निर्गुण ब्रह्मीं ऐक्यता । विवेकें जाली ॥ २१ ॥

विवेकें देहाकडे पाहिलें । तों तत्वें तत्व वोसरलें ।
आपण कांहीं नाहीं, आलें । प्रत्ययासी ॥ २२ ॥

आपला आपण शोध घेतां । आपली तों माईक वार्ता ।
तत्त्वांतीं उरलें तत्वता । निर्गुण ब्रह्म ॥ २३ ॥

आपणाविण निर्गुण ब्रह्म । हें चि निवेदनाचें वर्म ।
तत्वासरिसा गेला भ्रम । मीतूंपणाचा ॥ २४ ॥

## दृश्य मिथ्या, तर दिसतें कां ?

या प्रश्नाचीं श्रीसमर्थांनीं दोन उत्तरें दिलीं आहेत. एक, जें जें दिसतें तें सारें खरें च असतें असें नव्हे, हें अनेक दृष्टान्त देऊन श्रीसमर्थांनीं सिद्ध केलें आहे. दुसरें, दृश्य अविद्यात्मक असतें, तसा च पाहाणाराचा देह हि अविद्यात्मक च असतो. तेव्हां अविद्येनें अविद्या पाहिली आणि खरी मानली, म्हणून ती खरी थोडी च होणार आहे ?

दृश्यभास अविद्यात्मक । तुझा हि देहो तदात्मक ।
म्हणौनि हा अविवेक । तेथें संचरला ॥ ६–८–३८ ॥

अविद्येनें अविद्या देखिली । म्हणोनि गोष्टी विश्वासली ।
तुझी काया अवघी संचली । अविद्येची ॥ ४० ॥

इकडे सत्य मानिला देहो । तिकडे दृश्य सत्य हा निर्वाहो ।
दोहींमधें माहां संदेहो । पैसावला बळें ॥ ४२ ॥

देहबुद्धि केली बळकट । आणि ब्रह्म पाहों गेला धीट ।
तों दृश्यानें रुंधिली वाट । परब्रह्माची ॥ ४३ ॥

हे सारे शब्द समजतात, पण प्रत्यय येणें कठीण आहे ! कठीण तर खरें च, पण मग पुरुषार्थ तो काय उरला ?

**जें उमजेना तें उमजावें । जें दिसेना तें पाहावें ।**
**जें कळेना तें जाणावें । विवेकबळें ॥ ६-२-२२ ॥**

**वेद विरंची आणि शेष । जेथें सिणले निशेष ।**
**तें चि साधावें विशेष । परब्रह्म तें ॥ २४ ॥**

## तें कोणेपरी साधावें ?

विवेक, विचार, हें फार प्रभावी साधन आहे. कठीण मानून आपण आधीं च हातपाय गाळतों, हें खोटें कर्म होय. एकांतांत विचार केल्यानें हळुहळु प्रकाश पडत जाईल. विचार करण्याची आपण कधीं संवय च लावून घेत नाहीं! खूप वाचावें, ऐकावें, त्याचा खूप विचार करावा, इतका कीं देहाचा विसर पडला पाहिजे. मग केव्हां तरी सद्गुरु भेटतील च, त्यांचे पाय घट्ट धरावे, त्यांची कृपा होईल आणि आरंभीं जें कठीण वाटलें होतें, तें च साध्य होईल! हा च क्रम आहे.

**आधीं अध्यात्मश्रवण । मग सद्गुरुपादसेवन ।**
**पुढें आत्मनिवेदन । सद्गुरुप्रसादें ॥ ६-२-४० ॥**

अशा पायऱ्या च आहेत. कोणी म्हणेल श्रवण, मनन हें आपल्या हातचें आहे, पण सद्गुरुकृपा होईल च, हा काय विश्वास धरावा? सद्गुरुकृपा ही हि आपल्या हातची गोष्ट आहे. श्रीसमर्थांनीं शंभरदां सांगितलें असेल, सद्गुरु वाट पाहात असतात, आपल्या च ठिकाणीं अनन्य भक्तीचा अभाव असतो. सद्गुरुकृपा न होईल तर जिणें व्यर्थ जाईल. निदिध्यास घेतला पाहिजे.

## सद्गुरुपाय सेवावे

हें या एका दशकांत अकरा ठिकाणीं, जवळ जवळ प्रत्येक समासांत एकदां तरी श्रीसमर्थांनीं सांगितलें आहे:

**न कळे तरी सत्संग धरावा । म्हणिजे कळे ॥ १-१५ ॥**
**ऐसें जयापासीं ज्ञान । तो चि जाणावा सज्ञान ।**
**तयापासीं समाधान । पुसिलें पाहिजे ॥ १-२४ ॥**

याकारणें ज्ञाता पाहावा । त्याचा अनुग्रह घ्यावा ।
सारासारविचारें जीवा । मोक्ष प्राप्त ॥ १–३१ ॥

प्रगट तें जाणावें असार । आणि गुप्त तें जाणावें सार ।
गुरुमुखें हा विचार । उमजों लागे ॥ २–२१ ॥

मी पाहातां आडळेना । निर्गुण ब्रह्म तें चळेना ।
आपण तें चि परी कळेना । सद्गुरुविण ॥ ३–२५ ॥

आपुलाली उपासना । अभिमान लागला जना ।
याचा निश्चयो निवडेना । साधुविण ॥ ४–१२ ॥

मायाब्रह्माचें विवरण । करितां चुके जन्ममरण ।
संतांस गेलियां शरण । मोक्ष लाभे ॥ ५–२५ ॥

वेदशास्त्रांचें भांडण । शस्त्रें तोडी ऐसा कोण ।
हें निवडेना साधुविण । कदा कल्पांतीं ॥ ६–२७ ॥

दृश्य मिथ्या साधुजना । कळों आलें ॥ ७–४४ ॥

दिसेना जें गुप्त धन । तयासि करणें लागे अंजन ।
गुप्त परमात्मा सज्जन–। संगतीं शोधावा ॥ ९–१९ ॥

सांगतां न ये तें सांगणें । गोडी कळाया गूळ देणें ।
ऐसें हें सद्गुरुविणें । होणार नाहीं ॥ १०–१० ॥

याप्रमाणें श्रीसमर्थांनीं दहादां सांगितलेली गोष्ट आपण ऐकली पाहिजे, नाहीं ? त्यांचें ऐकल्यानें आत्मनिवेदन घडेल आणि मग

आत्मनिवेदनाउपरी । निखळ वस्तु निरंतरी ।
आपण आत्मा अंतरीं । बोध जाला ॥ ६–२–४१ ॥

त्या ब्रह्मबोधें ब्रह्म चि जाला । संसारखेद तो उडाला ।
देहो प्रारब्धीं टाकिला । सावकाश ॥ ४२ ॥

यासी म्हणिजे आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान ।
परब्रह्मीं अभिन्न । भक्त चि जाला ॥ ४३ ॥

आणि आतां होणार तें होयेना कां । आणि जाणार तें जायेना कां ।
तुटली मनांतील आशंका । जन्ममृत्याची ॥ ४४ ॥

इतकी निर्भयता प्राप्त होईल ! मला जन्म नाहीं, मरण नाहीं, मी नव्हतों कधीं असा काळ नव्हता, नसेन असा काळ कधीं येणार नाहीं, मी जेथें नाहीं असें ठिकाण नाहीं, इतकें ज्ञान झाल्यावर भय कसलें उरणार ?

वेदांतानें राष्ट्र बुडविलें, असें म्हणत असतात ! राष्ट्र बुडालें आहे, हें खरें आहे, पण तें वेदांतानें बुडविलें नसून वेदांताच्या अज्ञानानें बुडविलें आहे. तें तारावयाचें असेल तर, ज्या योगें अंगीं अशी निर्भयता बाणते, तो वेदांत श्रीसमर्थांच्या चरणापाशीं बसून समजावून घेतला पाहिजे.

आपल्या उपासनेची शपथ घेऊन श्रीसमर्थ सांगत आहेत :

**या चि जन्में येणें चि काळें । संसारीं होइजे निराळें ।**
**मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारें ॥ ६-९-२९ ॥**

**ये गोष्टीस करी अनुमान । तो सिद्ध चि पावेल पतन ।**
**मिथ्या वदे त्यास आण । उपासनेची ॥ ३० ॥**

**हे येथार्थ चि आहे बोलणें । विवेकें सीघ्र चि मुक्त होणें ।**
**असोनी कांहीं च नसणें । जनामधें ॥ ३१ ॥**

**देवपद आहे निर्गुण । देवपदीं अनन्यपण ।**
**हा चि अर्थ पाहातां पूर्ण । समाधान बाणे ॥ ३२ ॥**

देव कोण आणि मी कोण, हें कळावें म्हणून या दशकाला आपण सुरुवात केली, तें कळलें कीं, देव आणि आपण एक च आणि कळून पूर्ण समाधान झालें !

तें समाधान ज्याचें त्याला, तें बोलून दाखवितां येत नाहीं !

**दृढ करोनियां बुद्धी । आधीं घ्यावी आपशुद्धी ।**
**तेणें लागे समाधी । अकस्मात ॥ ६-१०-१२ ॥**

समाधि आणि समाधान एक च

**म्हणोनि तें समाधान । बोलतां चि न ये ऐसें जाण ।**
**निशब्दाची ऐसी खूण । वोळखावी ॥ ६-१०-६० ॥**

## दशक सातवा

पांचव्या दशकाच्या आरंभीं मी म्हटलें आहे खरें, कीं सर्व दशकांत पांचवा दशक श्रेष्ठ होय, कारण त्यांत श्रीसमर्थांनीं आपल्या हृदयांतील गुजगोष्ट सांगितली आहे. तें माझें म्हणणें कायम ठेवून मी आज असें म्हणतों कीं, पांचवा, सहावा आणि सातवा हे एकाहून एक वरचढ दशक होत. पांचव्यांत श्रीसमर्थांनीं ब्रह्मज्ञानमंदिराचा पाया घातला, सहाव्यांत त्यावर ब्रह्मज्ञानाची इमारत उठविली आणि सातव्यांत तीवर मोक्षाचा कळस चढविला. पांचव्यांत अहं ब्रह्मास्मि सांगितलें, सहाव्यांत त्या तिन्ही पदांचें विवरण केलें आणि सातव्यांत त्याचा अनुभव आणून दिला. पांचव्यांत महावाक्य कर्णीं पडलें, सहाव्यांत देवाचा शोध लागला आणि सातव्यांत देव पावला. असे हे श्रेष्ठ, श्रेष्ठतर, श्रेष्ठतम दशक होत.

या दशकाच्या रचनेविषयीं आरंभींच्या सामान्य विचारांत माझी कल्पना सविस्तर सांगितली च आहे. सर्व प्रमाणांचा विचार करतां, मला असें दिसतें, सहा दशक झाल्यावर ग्रन्थ पुरा झाला, सातवा दशक स्वतंत्र म्हणून च लिहिला गेला, पण तो सहाव्यानंतर च लिहिला गेला असावा. एक बाब मनांत वागविली पाहिजे ती अशी कीं, विशिष्ट नांवें योजून श्रीसमर्थांनीं जीं प्रकरणें लिहिलीं, तीं खेरीज करून बाकी जे जे स्फुट समास त्यांच्या मुखांतून बाहेर पडले त्या सर्वांचा शेवट बहुधा ‘ इति श्री दासबोधे ’ असा च केलेला आढळतो. श्रीसमर्थ जें कांहीं बोलले, तो सारा दासबोध च. त्यामुळें एकवीससमासी हि दासबोध, एक ते सहा दशक हि दासबोध, सातवा दशक हि दासबोध आणि इतर असंख्य स्फुट समास हि दासबोध च. आठवा दशक मात्र ज्ञानदशक म्हणून च स्वतंत्र लिहिला गेला होता. अखेरीस एकवीससमासी बाजूस ठेवून, पहिले सहा, पुढें सातवा, नंतर आठव्याच्या जागीं ज्ञानदशक आणि स्फुट समासांची विल्हे लावून नऊ ते वीस दशक पाडून वीसदशकी ग्रन्थराज दासबोध सिद्ध झाला. त्यामुळें च स्वतंत्रपणें लिहिल्या गेलेल्या सातव्या दशकाचें नांव च ‘ दासबोध ’ म्हणून आढळावें, हें युक्त च होय.

या दशकाचें, तो रचला गेला त्या वेळीं जरी दासबोध असें नामाभिधान असलें, तरी वीसदशकी दासबोधांत समाविष्ट होतांना तो ‘ चतुर्दश ब्रह्म ’

असें नामाभिधान पावला. या दशकांत वेदाधारें चौदा ब्रह्मांचें विवरण केलें असून, एक एक ब्रह्म खोडीत तेरा ब्रह्मांचें खंडन करून शेवटचें अनुर्वाच्य असें सत्य, किंवा केवळ, किंवा विमळ ब्रह्म श्रीसमर्थांनीं प्रस्थापित केलें आहे. असें करतांना Reductio ad Absurdum म्हणजे खंडन करीत करीत आपला सिद्धान्त प्रस्थापित करण्याची जी सत्यान्वेषणाची पद्धति, तिचा अवलंब श्रीसमर्थांनीं केलेला पाहून मला मोठें कौतुक वाटतें.

**खोटें निवडितां येकसरें । उरलें तें जाणिजे खरें ॥ ७–२–५५ ॥**
किंवा **आधीं मिथ्या उभारावें । मग तें वोखळोन सांडावें ।**
**पुढें सत्य तें स्वभावें । अंतरीं बाणे ॥ ७–३–४ ॥**
या पद्धतीचें जणूं, वरील लॅटिन शब्दांत भाषांतर च आहे, असें म्हणतां येईल; असो.

या पद्धतीप्रमाणें तेरा ब्रह्मांचें खंडन करतांना त्यांनीं जी कसोटी लावली ती शाश्वतपणाची. जें शाश्वत तें ब्रह्म आणि जें अशाश्वत ती माया, हा सिद्धान्त मानून तेरांचा अशाश्वतपणा दाखवून त्यांचें त्यांनीं खंडन केलें आहे. आणि मग चवथ्या आणि पांचव्या समासांत केवल किंवा विमल ब्रह्माचें केलेलें निरूपण आणि तें ब्रह्म अनुभवण्यासाठीं कल्पनेचा च आश्रय करून कल्पना हि कशी दूर सारावी किंवा ती तद्रूप च कशी होते याचें केलेलें विवेचन, हीं इतकीं गुंगविणारीं झालीं आहेत कीं, तीं तन्मयतेनें ऐकून श्रोत्यानें उल्हसित मनानें कबुली दिली कीं, महाराज,

**क्षण येक तदाकार केलें । मज या निरूपणें ॥ ७–६–१ ॥**

इतका ज्या दोन समासांचा प्रभाव, ते दोन समास तितक्या च तन्मयतेनें आणि चिंतनपूर्वक मुळावरून वाचण्यासाठीं आमचे वाचक उत्सुक होणार नाहींत काय? त्या दोन समासांचा सारांश सांगण्याचा तरी अधिकार कोणास आहे? शंभर वेळां जरी श्रीसमर्थांना ब्रह्मनिरूपण करावें लागलें – आणि तसें त्यांनीं केलें च आहे – तरी प्रत्येक वेळेला निरूपणाची निरनिराळी तऱ्हा आढळेल! परब्रह्म कसें आहे? तें आपल्या सर्वांगास लिगटलेलें आहे,

**अति निकट परी चोरलें । सकळांसि जें ॥ ७–४–८ ॥**

**तयामधें चि असिजे । परी तयास नेणिजे ।**
**उमजे भास, नुमजे । परब्रह्म तें ॥ ९ ॥**
**जवळि च दुरावलें । नवल कैसें ॥ ३३ ॥**
**जो जो पदार्थ दृष्टी पडे । तें त्या पदार्था ऐलिकडे ॥ ३७ ॥**
**पोथी वाचूं जातां पाहे । मातृकांमधें चि आहे ।**
**नेत्रीं निघोनि राहे । मृदपणें ॥ ४२ ॥**
**श्रवणें शब्द ऐकतां । मनें विचार पाहातां ।**
**मना सबाह्य तत्वता । परब्रह्म तें ॥ ४३ ॥**

त्याच्या व्यापकतेची येथें हद्द झाली ! मनानें विचार करीत असतां तें मनाला हि आंतबाहेर व्यापून असतें, याहून त्याची जास्त व्यापकता कशी सांगावी ! अज्ञान, ज्ञान, विज्ञान मुरून मन हि उन्मन व्हावें, तेव्हां तें अनुभवावें ! त्याचा अनुभव यावा म्हणून आरंभ तर मनानें कल्पना करण्यापासून च केला पाहिजे ना ? कल्पनेचें साहाय्य घेतलें च पाहिजे. अद्वैत ब्रह्माची कल्पना करावी, ती शुद्ध कल्पना व द्वैताची कल्पना करावी ती शबल, अशुद्ध कल्पना होय. कल्पनेनें कल्पना उडवावी. प्रथम शुद्ध कल्पनेनें अशुद्ध कल्पना उडवावी आणि शेवटीं शुद्ध कल्पना हि

**स्वरूप कल्पितां तद्रूप । होये आपण ॥ ७–५–३९ ॥**

श्रीसमर्थांच्या मुखांतून तें सारें निरूपण ऐकून श्रोता इतका कांहीं आनंदला कीं, त्याला वाटलें, आतां दुसरें कांहीं करणें नको. या आनंदांत च अखंड मग्न होऊन राहावें !

**मनें अंतरिक्ष जावें । क्षण येक ब्रह्म चि व्हावें ।**
**पुन्हा तेथून कोंसळावें । वृत्तीवरी मागुतें ॥ ७–६–५ ॥**

याचें त्याला दुःख वाटूं लागलें, त्यानें विचारलें,

**प्रत्यावृत्ती सैरावैरा । किती करूं येरझारा ।**
**पाईं लाउनियां दोरा । कीटक जैसा ॥ ६ ॥**

त्याच्या मनानें घेतलें कीं, एकदां ब्रह्मरूप झाल्यावर शरीर निपचित पडून राहिलें पाहिजे, कांहीं पाहिलें न पाहिजे, ऐकलें न पाहिजे, कळलें न पाहिजे ! असें न होतां, उलट,

**ब्रह्म होऊन संसार करणें ॥ ७-६-८ ॥**

हें त्याला विपरीत वाटूं लागलें. कळकळून तो म्हणतो :

**जो स्वयें ब्रह्म चि जाला । तो मागुता कैसा आला ।**
**ऐसें ज्ञान माझें मजला । प्रशस्त न वटे ॥ ७-६-९ ॥**

**ब्रह्म चि होऊन जावें । कां तें संसारीं च असावें ।**
**दोहींकडे भरंगळावें । किती म्हणूनी ॥ १० ॥**

**निरूपणीं ज्ञान प्रबळे । उठोन जातां तें मावळे ।**
**मागुता कामक्रोध खवळे । ब्रह्मरूपासी ॥ ११ ॥**

**ऐसा कैसा ब्रह्म जाला । दोहीकडे अंतरला ।**
**वोडगस्तपणें चि गेला । संसार त्याचा ॥ १२ ॥**

**घेतां ब्रह्मसुखाची गोडी । संसारिक मागें वोडी ।**
**संसार करितां आवडी । ब्रह्मीं उपजे मागुती ॥ १३ ॥**

**ब्रह्मसुख नेलें संसारें । संसार केला ज्ञानद्वारें ।**
**दोनीं अपुरीं, पुरें । येक हि नाहीं ॥ १४ ॥**

**याकारणें माझें चित्त । चंचळ जालें दुश्चीत ।**
**काये करणें निश्चीत । येक हि नाहीं ॥ १५ ॥**

**ऐसा श्रोता करी विनती । आतां राहावें कोणे रीतीं ।**
**म्हणे अखंड माझी मती । ब्रह्माकार नाहीं ॥ १६ ॥**

म्हणजे अगदीं हुबेहूब गीतारहस्यांत लोकमान्यांच्या पुढें जो प्रश्न होता, तो च प्रश्न या ठिकाणीं श्रोत्यानें श्रीसमर्थांपुढें उभा केला.

लोकमान्यांच्या सिद्धान्ताला बहुतांशीं पोषक असें च उत्तर श्रीसमर्थांनीं दिलें आहे.

श्रीसमर्थांनीं दोन्ही मार्ग मोकळे ठेवले आहेत : ज्ञानोत्तर कर्म करावें वा न करावें, पण आपण तर काय ज्ञानी, तेव्हां आपणांस कर्म कशास हवें, साधनें काय करावयाचीं, असा अहंभाव उत्पन्न होऊन जर कोणी कर्म सोडील किंवा साधनें करणार नाहीं, तर तो सिद्धपणें बद्ध झाला, असें

समजावें. तात्पर्य, ज्ञानी झाला तरी त्यानें साधनें करीत च राहाणें, हा च मार्ग श्रेयस्कर होय.

**ब्रह्म चि होऊन जे पडिले । ते चि मुक्तपदास गेले ।**
**येर ते काये बुडाले । व्यासादिक ॥ ७–६–१८ ॥**

शुको मुक्तो वामदेवो वा । या श्रुतीचा आधार घेऊन

**जो ब्रह्माकार जाला । तो काष्ठ होऊन पडिला ॥ ४० ॥**

असें म्हणशील तर, शुक कांहीं काष्ठ होऊन पडला नव्हता.

**शुक तो हि अनुवादला । नाना निरूपणें ॥ ७–६–३७ ॥**

**शुक मुक्त ऐसें वचन । वेद बोलिला हें प्रमाण ।**
**परी तो नव्हता अचेतन । ब्रह्माकार ॥ ३८ ॥**

**शुक भागवत बोलिला । परीक्षितीपुढें ॥ ४० ॥**

तात्पर्य,**म्हणोनी बोलतां चालतां । निचेष्टित पडिलें नस्तां ।**
**मुक्ति लाभे सायोज्यता । सद्गुरुबोधें ॥ ४४ ॥**

निचेष्टित पडणें, ही देहाची अवस्था आहे. तिचा आणि मोक्षाचा संबंध च काय?

**स्वरूपबोधें स्तब्धता । ते जाणावी ताटस्तता ।**
**ताटस्तता आणि स्तब्धता । हा देहसमंधु ॥ ४७ ॥**
**येथें अनुभवासी कारण । येर सर्व निःकारण ।**
**तृप्ती पावावी आपण । आपुल्या स्वानुभवें ॥ ४८ ॥**

आपण सिद्ध असतां, हा साधन करतो म्हणून कोणीं दूषण लावलें, तरी त्या योगें आपल्या अवस्थेला काय बाध येणार आहे? फक्त आपल्या ठिकाणीं अहंभाव नसला म्हणजे झालें.

**मीपणापासून सुटला । तो चि येक मुक्त जाला ॥ ५४ ॥**

मग तो बोलो अथवा मुखस्तंभ राहो.

मुख्य म्हणजे अशी सिद्धावस्था च प्राप्त होणें कठीण आहे. सिद्धानें कर्म करावें कां सोडावें हा गौण प्रश्न आहे. तो कर्म करो वा न करो, त्यानें

अहंकार जडूं देऊं नये, म्हणजे झालें. त्यानें कर्म न केलें तरी कदाचित् चालेल, पण मी तर ब्रह्म झालों, आतां साधनें कां करूं, अशी कल्पना हि मनांत येऊं देऊं नये. किंबहुना, त्यानें साधनें सोडूं च नयेत. कारण,

**साधनेंविण ब्रह्म होतां । लागों पाहे देहममता ।**
**आळस प्रबळे तत्वता । ब्रह्मज्ञानमिसें ॥ ७-७-६४ ॥**

**साधन करितां च सिद्धपण । हातींचें जाईल निघोन ।**
**तेणें गुणें साधन । करूं च नावडे ॥ ७० ॥**

**लोक म्हणती हा साधक । हे चि लज्या वाटे येक ।**
**साधन करिती ब्रह्मादिक । हें ठाउकें नाहीं ॥ ७१ ॥**

असो; सिद्धावस्था प्राप्त करून घेण्याचें साधन म्हणून श्रीसमर्थांनीं अद्वैतग्रन्थांचें श्रवण हें एक च साधन सांगितलें आहे.

**ऐका परमार्थाचें साधन । जेणें होये समाधान ।**
**तें तूं जाण गा श्रवण । निश्चयेंसीं ॥ ७-८-१ ॥**

तथापि त्या श्रवणाच्या पाठोपाठ मनन येतें, मननानंतर निदिध्यास लागतो, निदिध्यास लागला कीं सद्गुरु भेटतात च, ते कृपा करतात आणि अहं ब्रह्मास्मि । हा बोध होतो, अशी च एकाहून एक वरचढ साधनपरंपरा श्रीसमर्थांनीं प्रतिपादिली आहे, असें मी मानतों. श्रवण हें पहिलें साधन, श्रवणापासून आरंभ होतो, म्हणून त्याची प्रतिष्ठा, असा च मी या ओवीचा आणि या समासाचा अर्थ करतों.

**तस्मात् श्रवण करावें । साधन मनीं धरावें ।**
**नित्य नेमें तरावें । संसारसागरीं ॥ ७-८-४६ ॥**

**सेविलें चि सेवावें अन्न । घेतलें चि घ्यावें जीवन ।**
**तैसें श्रवणमनन । केलें चि करावें ॥ ४७ ॥**

**श्रवणाचा अनादर । आळसें करी जो नर ।**
**त्याचा होये अपहार । स्वहितविषईं ॥ ४८ ॥**

तात्पर्य, पूर्वतयारी सगळी आपली आपण करावी, परंतु सद्गुरुकृपेवांचून व्यर्थ आहे! सद्गुरूची ओळख पटणें आधीं च कठीण, त्यांत नाना तऱ्हेच्या

भ्रामक कल्पना समाजांत वावरत असल्यामुळें साधु ओळखणें अधिक च कठीण होऊन बसलें आहे. अशा स्थितींत आशाळभूतपणानें दुसऱ्या कोणाच्या तोंडाकडे कशास पाहा ? श्रीसमर्थ कोठें गेले आहेत ? ते कोठें नाहींत ?

**जो जन्मला च नाहीं ठाईंचा । त्यास मृत्य येईल कैंचा ।**
**विवेकबळें जन्ममृत्याचा । घोट भरिला जेणें ॥ ७-१०-२८ ॥**

**तो जीत चि असतां मेला । मरणास मारून ज्याला ।**
( ज्याला म्हणजे जिआला, जगला )
**जन्ममृत्य न स्मरे त्याला । विवेकबळें ॥ ३० ॥**

**तो जनीं दिसतो परी वेगळा । वर्ततां भासे निराळा ।**
**दृश्य पदार्थ त्या निर्मळा । स्पर्शला चि नाहीं ॥ ३१ ॥**

तेव्हां आतां आपणांकडे एवढें च उरलें कीं, आपण विश्वासानें हांक मारली पाहिजे, चरण धरिले पाहिजेत ! येथून च आपण आपल्या परमार्थाला आरंभ करूं ! श्रीसमर्थांचें च हें सांगणें आहे.

**परमार्थाचें जन्मस्थान । तें चि सद्गुरूचें भजन ।**
**सद्गुरुभजनें समाधान । अकस्मात बाणे ॥ ३८ ॥**

**देह मिथ्या जाणोनि जीवें । याचें सार्थक चि करावें ।**
**भजनभावें तोषवावें । चित्त सद्गुरूचें ॥ ३९ ॥**

याप्रमाणें सद्गुरुभजनापासून आरंभ केला म्हणजे

**सद्गुरुकृपा ते चि किल्ली ॥ ७-२-१५ ॥**

हातीं येऊन सर्व सुखाचें भांडार हस्तगत होईल !

## दशक आठवा

हा ज्ञानदशक होय. याला च मायोद्भव असें दुसरें जोडनांव आहे. मायोद्भव म्हणजे ब्रह्माच्या ठिकाणीं झालेला मायेचा उद्भव. ब्रह्मस्वरूप ओळखलें पाहिजे आणि हें सारें दिसतें तें काय आहे व तें कसें

उद्भवलें याचें ज्ञान करून घेतलें पाहिजे. त्यासाठीं काय करावें ? शास्त्रें पाहावीं म्हटलें तर तीं अनंत आहेत आणि त्यांच्यांत तरी मेळ कोठें आहे, त्यांच्यांत हि आम्हां प्राकृतांसारखीं भांडणें लागलेलीं च आहेत, तेव्हां कोणाचें खरें मानावें ? तीर्थयात्रा करीत हिंडूं म्हणावें, तर तीं तरी काय थोडीं आहेत आणि सुखाचीं आहेत ? तीं हि किती अवघड आहेत. शिवाय शास्त्रें पाहण्याला आणि तीर्थें हिंडण्याला आपल्याला इतकें आयुष्य कोठें आहे ? तप, दान, योग इत्यादि साधनें करावीं म्हटलें, तरी त्यांचे श्रम काय थोडे असतात ? मग काय करावें कीं, जेणेंकरून, हें सारें ब्रह्मांड ज्यानें निर्माण केलें त्या देवाची आपणांस ओळख होईल ? तो देव साऱ्या जगाचा – नव्हे – साऱ्या विश्वाचा एक च असला पाहिजे नाहीं ? पण जगांत पाहावें तर

**बहुविध उपासना । ज्याची जेथें पुरे कामना ।**
**तो तेथें चि राहिला मना । सद्दढ करूनि ॥ ८–१–९ ॥**

या हि पलीकडे कित्येक तर

**देवें निर्मिली हे क्षिती । तिचे पोटीं पाषाण होती ।**
**तयास चि देव म्हणती । विवेकहीन ॥ ८–१–२९ ॥**

काय, आपल्या देवघरांत देव्हाऱ्यांत जो देव असतो त्यानें उठून हें सारें विश्व निर्माण केलें, असें मानतां येईल काय ? खऱ्या देवाचें स्वरूप सांगावयाचें तर

**जग मिथ्या साच आत्मा । सर्वांपर जो परमात्मा ।**
**अंतर्बाह्य अंतरात्मा । व्यापूनि असे ॥ ८–१–४४ ॥**
**तयास म्हणावें देव । येर हें अवघें चि वाव ।**
**ऐसा आहे अतर्भाव । वेदांतीचा ॥ ४५ ॥**

याच्या पुढचा प्रश्न असा, ब्रह्म निर्गुण, निराकार, निरावेव असतां त्याच्या ठिकाणीं हें चराचर झालें च कसें ?

**याचें ऐसें प्रतिवचन । ब्रह्म जें कां सनातन ।**
**तेथें माया मिथ्याभान । विवर्तरूप भासे ॥ ८–२–२ ॥**
**कर्ता ठाईंचा अरूप । केलें तें हि मिथ्यारूप ॥ ८–२–५५ ॥**

तेव्हां, हें कसें झालें हा प्रश्न च उरत नाहीं.

**अरे जें जालें चि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई ॥ ८–३–१ ॥**

आपल्या या बुद्धीला हें कळण्यासारखें नाहीं. मूळमायेच्या पलीकडच्या भूमिकेवरून हें बोलणें आहे. मूळमाया ओलांडून जो पलीकडे जाऊन मागें वळून पाहील, त्याला सारें मिथ्या च आहे, कांहीं च झालेलें नाहीं ! मूळमायेच्या कर्तृत्वांत गुरफटलेले जे आपण, त्यांना हें सारें सत्य आहे. हें सारें करणें मूळमायेचें आहे. त्याच्या योगें ब्रह्माच्या निर्गुणतेला बाध येत नाहीं. तें कसें हें दृष्टान्त देऊन श्रीसमर्थ समजावून सांगत आहेत :

**आकाश असतां निश्चळ । मधें वायो जाला चंचळ ।**
**तैसी जाणावी केवळ । मूळमाया ॥ ८–३–२७ ॥**

**रूप वायोचें जालें । तेणें आकाश भंगलें ।**
**ऐसें हें सत्य मानलें । नवचे किं कदा ॥ २८ ॥**

**तैसी मूळमाया जाली । आणि निर्गुणता संचली ॥ २९ ॥**

आणि मग पुढचें सगळें करणें त्या मूळमायेचें. त्या मूळमायेला च, फारसा विचार न करतां व शब्द तोलून न पाहतां, परमात्मा, परमेश्वर, ईश्वर, मूळपुरुष इत्यादि नांवांनीं संबोधण्यांत येतें. ब्रह्म वेगळें आणि मूळमायारूपी परमात्मा, परमेश्वर वेगळा, हें लक्षांत बाळगिलें पाहिजे.

आणखी एक गोष्ट विचारांत घेतली पाहिजे, ती अशी कीं, मूळमाया, गुणमाया, त्रिगुण, पंचभूतें असा क्रम सांगण्यांत येत असतो खरा, पण खरें पाहूं गेल्यास मूळमायेंत च अव्यक्तरूपानें त्रिगुण आणि पंचभूतें असतात.

एकोऽहं बहु:स्याम् । ही ब्रह्माच्या ठिकाणीं झालेली स्फूर्ति, इच्छा, ती च मूळमाया ना ? मग,

**तत्वें मुळीं च आहेती । वोंकार वायोची गती ।**
**तेथीचा अर्थ जाणती । दक्ष ज्ञानी ॥ ८–३–५५ ॥**

तो च अर्थ विशद करून श्रीसमर्थ पुढें सांगतात :

**मूळमायेचें चळण । तें चि वायोचें लक्षण ।**
**सूक्ष्म तत्त्वें तें चि जाण । जडत्वा पावलीं ॥ ५६ ॥**

**ऐसीं पंच माहांभूतें । पूर्वीं होतीं अवेक्तें ।**
**पुढें जालीं वेक्तें । सृष्टिरचनेसी ॥ ५७ ॥**

**मूळमायेचें लक्षण । तें चि पंचभूतिक जाण ।**
**त्याची पाहें वोळखण । सूक्ष्मदृष्टीं ॥ ५८ ॥**

**आकाशवायोविण । इछ्याशब्द करी कोण ।**
**इछा शक्ति ते चि जाण । तेजस्वरूप ॥ ५९ ॥**

**मृदपण तें चि जळ । जडत्व पृथ्वी केवळ ।**
**ऐसी मूळमाया सकळ । पंचभूतिक जाणावी ॥ ६० ॥**

पंचभूतांपैकीं प्रत्येक भूतांत बाकीच्या चार हि भूतांचा अंश असतो.

**जें जें जड आणि कठिण । तें तें पृथ्वीचें लक्षण ।**
**मृद आणि वोलेपण । तितुकें आप ॥ ८-४-१० ॥**

**जें जें उष्ण आणि सतेज । तें तें जाणावें पै तेज ।**
**आतां वायो हि सहज । निरोपिजेल ॥ ११ ॥**

**चैतन्य आणि चंचळ । तो हा वायो चि केवळ ।**
**शून्य आकाश निश्चळ । आकाश जाणावें ॥ १२ ॥**

या व्याख्या विचारांत घेऊन प्रत्येक भूताकडे पाहिलें म्हणजे प्रत्येकांत बाकीचीं चार हि भूतें आढळतील.

आतां वास्तविक जडत्वास आलेलीं पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पंचभूतें समजावून द्यावयास नकोत, परंतु

**केवळ मूर्ख तें नेणें । म्हणौन घडलें सांगणें ।**
**पंचभूतांचीं लक्षणें । विशद करूनि ॥ ८-५-१ ॥**

असें म्हणून ८×५ त स्थूल पंचभूतांचीं उदाहरणें देऊन श्रीसमर्थांनीं तीं समजावून सांगितलीं आहेत आणि त्या समासाच्या शेवटीं आकाश आणि स्वरूप यांच्यांतील भेद विशद केला आहे.

**आकाश तमापासून जालें । म्हणौन कामक्रोधें वेष्टिलें ।**
**अज्ञान सुन्यत्व बोलिलें । नाम तयाचें ॥ ८-५-५५ ॥**

**अज्ञानें कामक्रोधादिक । मोहो भये आणि शोक ।**
**हा अज्ञानाचा विवेक । आकाशागुणें ॥ ५६ ॥**
**आकाश वेगळेपणें पाहावें । स्वरूपीं स्वरूप चि व्हावें ।**
**वस्तूचें पाहाणें स्वभावें । ऐसें असे ॥ ६६ ॥**

आतांपर्यंत हें जें आपण विवेचन करीत आलों, त्याचा शांतपणें विचार केल्यास तें समजल्यासारखें वाटेल, पण खरें म्हटलें म्हणजे श्रीसद्गुरुचरणांपाशीं बसून च तें सारें समजावून घेतलें पाहिजे.

**सकळ माया गथागोवी । संतसंगें हे उगवावी ।**
**पाविजे मोक्षाची पदवी । सत्समागमें ॥ ८–५–७० ॥**

श्रीसमर्थांच्या मुखांतून निघालेली ही ओवी ऐकतां च शिष्यानें प्रश्न केला :

**धरितां साधूची संगती । कितां दिवसां होते मुक्ती ॥ ८–६–२ ॥**

यत्किंचित् विलंब न लावतां श्रीसमर्थांनीं उत्तर दिलें :

**मुक्ती लाभे तत्क्षणीं । विश्वासतां निरूपणीं ॥ ३ ॥**

श्रवण होत असतां दुश्चित्त नसावें. दुश्चित्तपण आलें तर तें तत्काळ दवडावें.

**मनाच्या तोडून वोढी । श्रवणीं बैसावें आवडीं ।**
**सावधपणें घडीनें घडी । काळ सार्थक करावा ॥ ५ ॥**

श्रोता सावध, साक्षपी, दक्ष, प्रज्ञावंत आणि अनन्य असेल तर, खरोखर च त्याला मोक्षाची प्राप्ति होण्याला क्षणाचा हि विलंब लागणार नाहीं. या पांच गुणांतला प्रत्येक गुण दुर्मिळ आहे. या पांच हि गुणांनीं युक्त अशा सच्छिष्याला सद्गुरु भेटले म्हणजे मोक्षाला काय उशीर आहे ?

**लोहो परीसेसीं लागला । थेंबुटा सागरीं मिळाला ।**
**गंगे सरिते संगम जाला । तत्क्षणीं ॥ ४३ ॥**

तद्वत्

**सावध साक्षपी विशेष ( दक्ष ) । प्रज्ञावंत आणि विश्वास ।**
**तयास साधनीं सायास । करणें चि नलगे ॥ ४९ ॥**

या पांच गुणांचा सकलार्थ जाणावा आणि ते गुण आपल्या ठायीं बिंबवून घ्यावे आणि मग सद्गुरूचा प्रताप पाहावा.

शिष्याकडून पुढचा प्रश्न आला, मोक्ष कशाला म्हणतात ? श्रीसमर्थ उत्तर देतात :

**प्राणी संकल्पें बांधला । जीवपणें बद्ध जाला ।**
**तो विवेकें मुक्त केला । साधुजनीं ॥ ८-७-४ ॥**

**मी जीव ऐसा संकल्प । दृढ धरितां गेले कल्प ।**
**तेणें प्राणी जाला अल्प । देहबुद्धीचा ॥ ५ ॥**

**मी जीव मज बंधन । मज आहे जन्ममरण ।**
**केल्या कर्माचें फळ आपण । भोगीन आतां ॥ ६ ॥**

हें संकल्पाचें बंधन ताडकन तोडून झुगारून देतां आलें पाहिजे ! सत्संगति असेल तर च तें शक्य आहे. नाहींपेक्षां जीव युगानुयुगें बंधनांत पडून जन्ममरणाचे फेरे भोगीत च राहतो. इतर योनींत ज्ञान होणें शक्य नाहीं. नरदेह हि वारंवार प्राप्त होईल, अशी खात्री देतां येत नाहीं. तेव्हां दैववशात् नरदेह प्राप्त झाला असतां मनुष्यानें दुश्चित्त राहून आयुष्य दवडावें, यासारखा घोर अपराध कोणता आहे ! जीवाला सारखी तळमळ लागली पाहिजे. घटाकाश, मठाकाश, महदाकाश आणि चिदाकाश यांच्या दृष्टान्तानें जीवात्मा, शिवात्मा, परमात्मा किंवा विश्वात्मा आणि निर्मळात्मा असे हे चारी आत्मे श्रीसद्गुरूपासून समजून घेऊन जन्ममृत्यूपासून सुटका करून घेतली पाहिजे. आपण आपलें निर्मल स्वरूप जाणलें पाहिजे.

**आत्मयाचा ठाईं कांहीं । बद्ध मोक्ष दोनी नाहीं ।**
**जन्ममृत्य हें सर्व हि । आत्मत्वीं न घडे ॥ ८-७-६६ ॥**

हें ज्ञान आत्मनिवेदन भक्ति घडल्यानें होतें. आत्मनिवेदन भक्तीची श्रेष्ठ पायरी चढून गेलेले भक्त फार थोडे असतात. जन्मास येऊन ती पायरी गांठावी. यासाठीं श्रीसमर्थांना शरण जावयाचें. यासाठीं श्रीमत् दासबोधादि अद्वैतग्रन्थ चिंतनपूर्वक अवलोकावयाचे. यासाठीं इतर साधनें करावयाचीं. नाहींपेक्षां फुकट च कां मरावें !

**आत्मनिवेदनाचे अंतीं । जे कां घडली अभेद भक्ती ।**
**तये नांव सायोज्यमुक्ती । सत्य जाणावी ॥ ८–८–१९ ॥**

**जो संतास शरण गेला । अद्वैतनिरूपणें बोधला ।**
**मग जरी वेगळा केला । तरी होणार नाहीं ॥ २० ॥**

**नदी मिळाली सागरीं । ते निवडावी कोणेपरीं ।**
**लोहो सोनें होतां माघारी । काळिमा न ये ॥ २१ ॥**

**तैसा भगवंतीं मिळाला । तो नवचे वेगळा केला ।**
**देव भक्त आपण जाला । विभक्त नव्हे ॥ २२ ॥**

असा आत्मसाक्षात्कारी पुरुष कसा असतो त्याचें वर्णन नवव्या समासांत केलें आहे.

**सदा स्वरूपानुसंधान । हें मुख्य साधूचें लक्षण ।**
**जनीं असोन आपण । जनावेगळा ॥ ८–९–९ ॥**

**स्वरूपीं स्वरूप चि जाला । मग तो पडोनि च राहिला ।**
**अथवा उठोनि पळाला । तरी चळेना ॥ १६ ॥**

**येथें कारण अंतरस्थिती । अंतरीं च पाहिजे निवृत्ती ।**
**अंतर लागलें भगवंतीं । तो चि साधु ॥ १७ ॥**

अशा पुरुषापुढें षड्रिपु गर्भगळित होतात, यांत काय आश्चर्य आहे ? अशा पुरुषाला काय मिळवावयाचें राहिलें असतें ? तो कां आणि कोणावर रागावेल ? कठोर वचनें त्याच्या मुखांतून कां येतील ? त्याला चिंता कसली असणार ? मानापमानाची त्याला काय पर्वा असणार ?

याप्रमाणें साधुलक्षणें आंगीं बाणून न घेतल्यास, मतामतांचा जो गलबला माजलेला असतो त्यांत च आपण हि कोठें तरी गुरफटून जाऊं. जग हें बोलून चालून त्रिविध आहे. सर्वांचा च अनुभव कांहीं एकसारखा नसतो. सर्वांचे अनुभव पाहिले, तर त्यांचे तीन प्रकार दिसतात. ( १ ) **येक साक्षत्वें वर्तती ।** म्हणजे दृश्य आणि द्रष्टा हीं भिन्नभिन्न होत, असें मानतात. हे **द्वैतवादी** दिसतात, ( २ ) दुसरे, **द्रष्टा आणि दृश्य । अवघा येक चि**

**जगदीश।** असें मानतात. हे **सर्वब्रह्मवादी** होत, आणि ( ३ ) तिसरे, **प्रपंच सारूनियां सर्व। कांहीं नाहीं तो चि देव।** ऐसें म्हणती. हे **शून्यवादी** होत. परंतु

**आपण वस्तु मुळीं येक। ऐसा ज्ञानाचा विवेक॥** ८-१०-८१ ॥

हा श्रीसमर्थांचा सिद्धान्त सदृढ जीवीं धरून साधकानें वर्तावें, हा च कल्याणाचा मार्ग होय.

येथें श्रीमत् ग्रन्थराज दासबोधाचा पूर्वार्ध संपतो. पूर्वार्धांत बहुधा अध्यात्मनिरूपण होतें, हें निर्विवाद आहे, तसें च केवळ तें उत्तरार्धांत नाहीं. उत्तरार्धांत विविधता आहे. त्यामुळें त्यांत गोडी हि विशेष च असणार आणि सर्व तऱ्हेच्या मनोवृत्तीच्या लोकांचें त्यांत चित्त रमणार, हें उघड आहे.

# ( २ ) उत्तरार्ध – दशक ९ ते २०

प्रस्तावना, ( १ ) श्रीसमर्थांच्या अंतरंगाच्या कांहीं खुणा, ( २ ) तत्कालीन लोकस्थिति, ( ३ ) श्रीसमर्थांचीं कांहीं मतें आणि विश्वास, (४) अध्यात्म, (५) ब्रह्मांडाची उभारणी आणि संहारणी, ( ६ ) पंचीकरण, ( ७ ) अंतरात्मा, ( ८ ) त्याची उपासना, ( ९ ) त्या उपासनेंतून उद्भवलेलें राजकारण आणि समाजकारण, ( १० ) तदनुरोधानें श्रीसमर्थांनीं केलेल्या कांहीं आज्ञा, ( ११ ) ग्रन्थराजाची अपूर्वता.

## प्रस्तावना

योजून सूत्रबद्ध अशी रचना आठ दशक अखेरपर्यंत झाली. त्यांत बहुधा कां, सर्वथा अध्यात्मनिरूपण आहे. येथवरचा ग्रन्थ शक १५८१ त पूर्ण झाला. आपली कल्पना अशी आहे कीं, १५८१ च्या पूर्वीं आणि नंतर अनेक स्फुट समास सांगण्यांत आले होते, ते सर्व गोळा करून, त्यांतील कांहीं निवडून, त्यांचे दशक पाडून १६०३ च्या मार्गशीर्षांत नऊ ते वीस दशक पूर्ण करण्यांत आले. यांत केव्हां केव्हां एकादा च समास स्फुट असेल, केव्हां लागोपाठ दोन चार समास स्फुट असतील आणि क्वचित् एकाद्या दशकाचे दहाचे दहा समास एका च वेळीं, पण स्फुट म्हणून च लिहिले गेले असतील. ग्रन्थराजाच्या उत्तरार्धाविषयीं माझी कल्पना याप्रमाणें असल्यामुळें एक एक दशक विवेचनाला न घेतां, कांहीं महत्त्वाचे विषय मनांत आणून त्यांचें विवरण करावें, असें वाटतें. असें करतांना पुनरुक्ति टाळली तर आठ दहा सदरांखालीं सर्व विषयांचा समावेश करतां येईल. असें करतांना माझें लक्ष प्रथम श्रीसमर्थांच्या अंतरंगाच्या खुणांनीं वेधलें जाईल, हें उघड आहे. म्हणून मी त्या खुणा आधीं पाहीन, त्याबरोबर च तत्कालीन लोकस्थितीचें अवलोकन करीन आणि श्रीसमर्थांचीं कांहीं मतें आणि विश्वास नमूद करीन. नंतर अध्यात्माकडे वळेन व त्याच्या पोटांत च ब्रह्मांडाची उभारणी आणि संहारणी आणि पंचीकरण यांचा विचार करीन. तदनंतर आतांपर्यंत बरा च परिचय झालेल्या अंतरात्म्याची पूर्ण ओळख करून घेऊन श्रीसमर्थांनीं त्याच्या केलेल्या उपासनेचें स्वरूप पाहूं व त्या अंतरात्म्याच्या उपासनेंतून च

श्रीसमर्थांचें राजकारण आणि समाजकारण हीं कशीं उद्भवतात, याचा विचार करून व तदनुरोधानें श्रीसमर्थांनीं केलेल्या कांहीं आज्ञा सांगून ग्रन्थराजाच्या अपूर्वतेंत उत्तरार्धाची समाप्ति करूं. श्रीसमर्थांनीं कृपा करावी आणि हेतु सिद्धीस न्यावा, अशी प्रार्थना आहे.

## ( १ ) श्रीसमर्थांच्या अंतरंगाच्या कांहीं खुणा

( खूण पहिली ) नवव्या दशकाच्या दुसऱ्या समासांत

**। करून कांहीं च न करावें ।**

**असोन निशेष नसावें । विवेकबळें ॥**

असा ब्रह्मनिरूपणाचा शेवट केलेला पाहून आडरानांत शिरून किंचित् चेष्टेनें च श्रोता बडबडूं लागला

**जन्म मृत्य भोगिले च भोगी । परी तो भोगून अभोक्ता योगी ।**
**यातना हि तयालागीं । येणें चि पाडें ॥ ९-३-४ ॥**

**कुटून नाहीं कुटिला । रडोन नाहीं रडला ।**
**कुंथोन नाहीं कुंथिला । योगेश्वर ॥ ५ ॥**

**जन्म नसोन घातला । पतित नसोन जाला ।**
**यातना नसोन पावला । नानापरी ॥ ६ ॥**

यावर त्या चेष्टेखोराला श्रीसमर्थ म्हणतात, योगी तुला कोठून कळणार ? तूं हे आपले स्वतःचे च अनुभव सांगत आहेस !

**योगी वोळखावा योगेश्वरें । ज्ञानी वोळखावा ज्ञानेश्वरें ।**
**माहाचतुर तो चतुरें । वोळखावा ॥ ११ ॥**

असें सांगून आणि कांहीं दृष्टान्त देऊन शेवटीं

**प्रचित बोलों कांहीं हेत ॥ १६ ॥**

असें स्पष्ट म्हणून त्यांनीं जें प्रचीतीनें साधूचें वर्णन केलें आहे, तें त्यांचें आत्मचरित्र नव्हे असें कोण म्हणेल ?

**जो जो ज्ञानें गुप्त जाला । जो विवेकें विराला ।**
**जो अनन्यपणें उरला । नाहीं च कांहीं ॥ १७ ॥**

**तयास कैसें गवसावें । शोधूं जातां तो चि व्हावें ।**

किती कर्म कठीण आहे ! त्यांच्या अंतरंगांत मिसळून जाऊं तर च त्यांचें अंतरंग कळणार आहे !

**तो चि होतां म्हणावें । नलगे कांहीं ॥ १८ ॥**

**देहीं पाहातां दिसेना । तत्वें शोधितां भासेना ।**
**ब्रह्म आहे निवडेना । कांहीं केल्यां ॥ १९ ॥**

**दिसतो तरी देहधारी । परी कांहीं च नाहीं अंतरीं ।**
**तयास पाहातां वरिवरी । कळेल कैसा ॥ २० ॥**

**कळाया शोधावें अंतर । तंव तो नित्य निरंतर ।**
**जयास धुंडितां विकार । निर्विकार होती ॥ २१ ॥**

**तो परमात्मा केवळ । तयास नाहीं मायामळ ।**
**अखंड हेतूचा विटाळ । जाला च नाहीं ॥ २२ ॥**

**ऐसा जो कां योगीराज । तो आत्मा सहजीं सहज ।**
**पूर्णब्रह्म वेदबीज । देहाकारें कळेना ॥ २३ ॥**

आपण हि देहभानावर राहून त्यांचें स्वरूप पाहूं म्हटलें तर तें आपणांस कळणार नाहीं, किंवा त्यांच्या हि देहाकडे पाहून त्यांच्या अंतरंगाची आपणांस कल्पना होणार नाहीं !

**देह भावितां देह चि दिसे । परी अंतर अनारिसें असे ।**
**तयास शोधितां नसे । जन्ममरण ॥ २४ ॥**

निंदकांनीं खुशाल निंदा करावी, चेष्टेखोरांनीं चेष्टा करण्यांत आनंद मानावा, मत्सरी असतील त्यांनीं मत्सर करण्यांत चूर होऊन राहावें व सर्वांनीं आपल्या कर्मांचीं फळें भोगावीं !

**माध्यानीं थुंकितां सूर्यावरी । तो थुंका पडेल आपणा च वरी ।**
**दुसऱ्यास चिंतितां अंतरीं । आपणास घडे ॥ २७ ॥**

**समर्थ रायाचें महिमान । जाणतां होतें समाधान ।**
**परंतु भुंकों लागलें स्वान । तरी तें स्वान चि आहे ॥ २८ ॥**

ज्ञानी तो सत्यस्वरूप । अज्ञान देखे मनुष्यरूप ।
भावासारिखा फळद्रूप । देव तैसा ॥ २९ ॥

देव निराकार निर्गुण । लोक भाविती पाषाण ।
पाषाण फुटतो, निर्गुण । फुटेल कैसा ॥ ३० ॥

देव सदोदित संचला । लोकीं बहुविध केला ।
परंतु बहुविध जाला । हें तों घडेना ॥ ३१ ॥

तैसा साधु आत्मज्ञानी । बोधें पूर्ण समाधानी ।
विवेकें आत्मनिवेदनी । आत्मरूपी ॥ ३२ ॥

या खुणेंत आपणांस श्रीसमर्थांचें ब्रह्मरूप पाहावयास मिळतें.

( दुसरी ) दहाव्याच्या सहाव्यांत

गत ज्ञात्याचे चमत्कार । या नांव भ्रम ॥ $१०\frac{६}{३७}$ ॥

असें श्रीसमर्थांनीं म्हणतां च शिष्यानें दोन शंका काढल्या.

( १ ) ज्ञात्याची समाधी पूजिली ।
तेथें कांहीं प्रचित आली । किंवा नाहीं ॥ $१०\frac{६}{३८}$ ॥

( २ ) तैसे चि अवतारी संपले ।
त्यांचें हि सामर्थ्य उदंड चाले ।
तरी ते काये गुंतले । वासना धरूनी ॥ ३९ ॥

पुढच्या च समासांत श्रीसमर्थ प्रथम दुसऱ्या शंकेचें उत्तर देऊन मग पहिल्या शंकेचें समाधान सांगतात :

ज्ञानी मुक्त होऊन गेले । मागें त्यांचें सामर्थ्य चाले ।
परंतु ते नाहीं आले । वासना धरूनी ॥ $१०\frac{७}{३}$ ॥

आणि

ज्ञानी मुक्त होऊन गेले । त्यांचें सामर्थ्य उगें चि चाले ।
कां जे पुण्यमार्गें चालिले । म्हणोनियां ॥ $१०\frac{७}{११}$ ॥

याकारणें पुण्यमार्गें चालावें । भजन देवाचें वाढवावें ।
न्याये सांडून न जावें । अन्यायमार्गें ॥ १२ ॥

तो पुण्यमार्ग कोणता ? ज्या मार्गानें श्रीसमर्थ गेले तो.

**नाना पुरश्चरणें करावीं । नाना तीर्थाटणें फिरावीं ।**
**नाना सामर्थ्यें वाढवावीं । वैराग्यबळें ॥ १३ ॥**

या एका ओवींत श्रीसमर्थांचें सारें चरित्र आलें आहे, नाहीं ? पहिलीं बारा वर्षें बाळपणाचीं गेल्यानंतर बारा वर्षें श्रीसमर्थांनीं पुरश्चरण केलें, नंतर बारा वर्षें तीर्थाटणाच्या निमित्तानें सर्व भरतखंडभर पर्यटन केलें आणि नंतर दक्षिणेंत येऊन आपल्या वैराग्याच्या बळावर पुढचीं छत्तीस वर्षें महाराष्ट्रास रामराज्याची प्राप्ति करून देऊन त्याचें सामर्थ्य वाढविण्यांत खर्च केलीं.

पुरश्चरण आणि तीर्थाटण यांपैकीं श्रीसमर्थांना एकाचें स्मरण झालें म्हणजे दुसऱ्याचें बहुधा व्हावें, हें स्वाभाविक होय.

**येक फिरती तीर्थाटणें । येक करिती पुरश्चरणें ।**
**येक अखंड नामस्मरणें । निष्ठावंत राहिले ॥ १–१०–३ ॥**

**नाना शास्त्रें धांडोळावीं । अथवा तीर्थें तरी करावीं ।**
**अथवा पुरश्चरणें बरवीं । पापक्षयाकारणें ॥ २–४–८ ॥**

**विरक्तें करावीं पुरश्चरणें । विरक्तें फिरावीं तीर्थाटणें ।**
**विरक्तें करावीं नाना स्थानें । परम रमणीय ॥ २–९–२५ ॥**

स्वतः करून बोलण्याचा ज्यांचा बाणा, ते जें इतरांस करावयास सांगतात तें त्यांचें आत्मचरित्र च असतें, तें हें असें.

( तिसरी ) अकराव्याचा सहावा समास महंतलक्षणांचा आहे. समास लहान आहे, अवघ्या १९ ओव्यांचा आहे. त्यांतील सारीं लक्षणें श्रीसमर्थांना लागतात. तो सबंध समास च म्हणजे श्रीसमर्थांचें आत्मचरित्र होय. मी येथें शेवटच्या सहा ओव्या सादर करतों :

**आहे तरी सर्वां ठाईं । पाहों जातां कोठें चि नाहीं ।**
**जैसा अंतरात्मा ठाईंचा ठाईं । गुप्त जाला ॥ ११–६–१४ ॥**

**त्यावेगळें कांहीं च नसे । पाहों जातां तो न दिसे ।**
**न दिसोन वर्तवीतसे । प्राणीमात्रासी ॥ १५ ॥**

**तैसा च हा हि नानापरी । बहुत जनास शाहाणे करी ।**
**नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्मा ॥ १६ ॥**

**आपणाकरितां शाहाणे होती । ते सहज चि सोये धरिती ।**
**जाणतेपणाची महंती । ऐसी असे ॥ १७ ॥**

**राखों जाणे नीतिन्याय । न करी न करवी अन्याये ।**
**कठीण प्रसंगीं उपाये । करूं जाणे ॥ १८ ॥**

**ऐसा पुरुष धारणेचा । तो चि आधार बहुतांचा ।**
**दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९ ॥**

प्रचंड व्याप करून श्रीसमर्थांनीं गुप्तपणें महाराष्ट्राचीं सूत्रें कशीं हालविलीं, याची प्रतीति या खुणेवरून येते.

(चौथी) श्रीसमर्थांचें आत्मचरित्र या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचा समास म्हणजे अकराव्या दशकाचा दहावा समास होय.

**आधीं केलें मग सांगितलें ।**

ही आबालवृद्धांस ठाऊक झालेली श्रीसमर्थांची प्रतिज्ञा या समासांतील होय. त्यांची ही प्रतिज्ञा मी त्यांच्या सर्व च शिकवणीला लावतों, पण प्रत्यक्ष ज्या समासांत च ती आली आहे, त्या समासांतील प्रत्येक क्रिया श्रीसमर्थांच्या हातून घडलेली असली पाहिजे, हें कोणी हि मान्य करील. तीर्थाटणाचीं बारा वर्षें आणि त्यानंतरचीं एक दोन वर्षें म्हणजे शक १५५४ ते १५६८ या तेरा चौदा वर्षांच्या काळांतील हें श्रीसमर्थचरित्र होय, असें मी मानतों. कां तें सांगतों. पण आधीं तें साद्यन्त चरित्र त्यांच्या मुखांतून आपण श्रवण केलें पाहिजे.

## आत्मचरित्र ११ × १०

**मूर्ख येकदेसी होतो । चतुर सर्वत्र पाहातो ।**
**जैसा बहुधा होऊन भोगितो । नाना सुखें ॥ १ ॥**

**तो चि अंतरात्मा महंत । तो कां होईल संकोचित ।**
**प्रशस्त जाणता समस्त । विख्यात योगी ॥ २ ॥**

कर्ता भोक्ता तत्वता । भूमंडळीं सर्व सत्ता ।
त्यावेगळा त्यास ज्ञाता । पाहेसा कवणु ॥ ३ ॥

ऐसें महंतें असावें । सर्व सार शोधून घ्यावें ।
पाहों जातां न संपडावें । येकायेकीं ॥ ४ ॥

कीर्तिरूपें उदंड ख्यात । जाणती लाहान थोर समस्त ।
वेश पाहातां शाश्वत । येक हि नाहीं ॥ ५ ॥

प्रगट कीर्ति ते ढळेना । बहुत जनास कळेना ।
पाहों जातां आढळेना । काये कैसें ॥ ६ ॥

वेषभूषण तें दूषण । कीर्तिभूषण तें भूषण ।
चाळणेविण येक क्षण । जाऊं च नेदी ॥ ७ ॥

त्यागी वोळखीचे जन । सर्वकाळ नित्य नूतन ।
लोक शोधून पाहाती मन । परी इच्छा दिसेना ॥ ८ ॥

पुर्तें कोणाकडे पाहेना । पुर्तें कोणासीं बोलेना ।
पुर्तें येके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥ ९ ॥

जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें तरी जायेना ।
आपुली स्थिती अनुमाना । येवों च नेदी ॥ १० ॥

लोकीं केलें तें चुकावी । लोकीं भाविलें तें उलथवी ।
लोकीं तर्किलें तें दावी । निर्फळ करूनी ॥ ११ ॥

लोकांस पाह्याचा आदर । तेथें याचा अनादर ।
लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिछ्या ॥ १२ ॥

एवं कल्पितां कल्पेना । ना तर्कितां हि तर्केना ।
कदापी भावितां भावेना । योगेश्वर ॥ १३ ॥

ऐसें अंतर सांपडेना । शरीर ठाई पडेना ।
क्षण येक विशंभेना । कथाकीर्तन ॥ १४ ॥

लोक संकल्प विकल्प करिती । ते अवघे चि निर्फळ होती ।
जनाची जना लाजवी वृत्ति । तेव्हां योगेश्वर ॥ १५ ॥

बहुतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें ।
तरी मग जाणावें साधिलें । महत्कृत्य ॥ १६ ॥

अखंड येकांत सेवावा । अभ्यास चि करीत जावा ।
काळ सार्थक चि करावा । जनासहित ॥ १७ ॥

उत्तम गुण तितुके घ्यावे । घेऊन जनास सिकवावे ।
उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ १८ ॥

अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग ।
लोक समजोन मग । आज्ञा इछिती ॥ १९ ॥

आधीं कष्ट मग फळ । कष्ट चि नाहीं तें निर्फळ ।
साक्षेपेंविण केवळ । वृथापुष्ट ॥ २० ॥

लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे ।
जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥ २१ ॥

अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नस्तां वेर्थ जातें ।
जाणोनि शोधावीं चित्तें । नाना प्रकारें ॥ २२ ॥

अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्वास धरणें ।
आपला मगज राखणें । कांहींतरी ॥ २३ ॥

हें प्रचितीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें ।
मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणीयेकें ॥ २४ ॥

महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे ।
जाणते करून विखरावे । नाना देसीं ॥ २५ ॥

त्यांच्या आयुष्यांतील अनोळखी म्हणून हिंडण्याचा काळ म्हणजे तीर्थाटणाचा काळ होय. कृष्णातटाकीं आल्यानंतर वर्ष दोन वर्षांत च ते जनविख्यात होऊन उत्साही आणि महत्त्वाकांक्षी राष्ट्रधर्मभक्त तरुणांचा घोळका त्यांच्याभोंवतीं जमूं लागला असला पाहिजे. त्यांना हाताशीं धरून, नाना युक्तिबुद्धीनें भरून, त्यांच्या भिन्न भिन्न अधिकाराप्रमाणें त्यांच्यावर कामगिरी सोंपवून, कोणास उत्तरेकडे तर कोणास दक्षिणेकडे, कोणास अंतर्वेदींत तर कोणास तेलंगणांत, कोणास सह्याद्रींत तर

कोणास विंध्याद्रींत पाठवून सर्वत्र आपल्या शिष्यांचें जाळें त्यांनीं पसरविलें असलें पाहिजे. स्वतःच्या तीर्थाटणांत प्रचीति घेऊन त्या काळाला आवश्यक अशी ठरविलेली कार्यपद्धति या समासांत त्यांनीं आपल्या शिष्यांना उपदेशिलेली दिसते. समासांतील प्रत्येक ओवी घेऊन आपण चिंतन करीत बसलों तर वेळ कारणीं लागेल, पण ग्रंथ अंदाजाबाहेर वाढेल. म्हणून वाचकांची च प्रार्थना करतों कीं, या समासाच्या प्रत्येक ओवींत आणि शब्दांत योगेश्वर श्रीसमर्थ नटून राहिले आहेत. त्यांना आपण च शोधून काढा आणि पाहा! उदाहरणार्थ एक च ओवी :

**बहुतीं शोधून पाहिलें। बहुतांच्या मनास आलें।**
**तरी मग जाणावें साधलें। महत्कृत्य ॥ १६ ॥**

अंतःकरणांत कांहीं महत्कृत्य साधावयाचा विचार होता, म्हणून त्यांचा हा सारा खटाटोप होता, नाहीं?

(पांचवी) विवेक आणि वैराग्य यांची महती आणि परमार्थाला त्यांची आवश्यकता हीं श्रीसमर्थांनीं कितीतरी वेळां प्रतिपादिलीं आहेत.

**वैराग्यें करावा त्याग। तरी च परमार्थयोग।**
**प्रपंचत्यागें सर्व सांग। परमार्थ घडे ॥ १२–७–९ ॥**
**वैराग्यापरतें नाहीं भाग्य। वैराग्य नाहीं तें अभाग्य।**
**वैराग्य नसतां योग्य। परमार्थ नव्हे ॥ १७ ॥**
**प्रत्ययज्ञानी वीतरागी। विवेकबळें सकळ त्यागी ॥**
**तो जाणिजे माहांयोगी। ईश्वरी पुरुष ॥ १८ ॥**

हा महायोगी ईश्वरी पुरुष दुसरा कोण? नुसता विवेक किंवा नुसतें वैराग्य निरर्थक होय. विवेकयुक्त वैराग्य पाहिजे. बाराव्याच्या चवथ्या समासांत हा विवेक आणि वैराग्य यांचा योग त्यांनीं समजावून सांगितला आहे व त्यांत च त्यांचें आत्मचरित्र आपोआप प्रकट झालें आहे.

**विवेकें अंतरीं सुटला। वैराग्यें प्रपंच तुटला।**
**अंतर्बाह्य मोकळा जाला। निःसंग योगी ॥ १२–४–१२ ॥**

दुसरा कोण?

जैसें मुखें ज्ञान बोले । तैसी च सर्वे क्रिया चाले ।
दीक्षा देखोनी चकित जाले । सुचिस्मंत ॥ १३ ॥

आस्था नाहीं त्रैलोक्याची । स्थिती बाणली वैराग्याची ।
येत्नविवेकधारणेची । सीमा नाहीं ॥ १४ ॥

संगीत रसाळ हरिकीर्तन । ताळबद्ध तानमान ।
प्रेमळ आवडीचें भजन । अंतरापासुनी ॥ १५ ॥

तत्काळ चि सन्मार्ग लागे । ऐसा अंतरीं विवेक जागे ।
वक्तृत्व करितां न भंगे । साहित्य प्रत्ययाचें ॥ १६ ॥

सन्मार्गें जगास मिळाला । म्हणिजे जगदीश वोळला ।
प्रसंग पाहिजे कळला । कोणीयेक ॥ १७ ॥

प्रखर वैराग्य उदासीन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान ।
स्नानसंध्या भगवद्भजन । पुण्यमार्ग ॥ १८ ॥

मला मोठें नवल वाटतें. या सात ओव्या वाचतांना कोणाचें हि हृदय प्रेमानंदानें भरून येईल. या सात हि ओव्यांतील कोणतें विधान त्यांना लागत नाहीं ? महाराज, आपण कोणता प्रसंग मनांत आणून बोलून गेलां, हें तीनशें वर्षांनंतर आज आम्हांस कसें कळावें ? आम्ही इतकें च जाणतों कीं, आपली कृपा ती च जगदीशाची कृपा होय ! ती कृपादृष्टि एकवार महाराष्ट्राकडे वळली होती, ती पुन्हां कां नाहीं वळणार ?

( सहावी ) श्रीसमर्थ जो उपदेश करीत तो नेहमीं स्वतःचें च उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून करीत कीं काय, न कळे. किंवा आत्मप्रचीति हा त्यांच्या प्रतिपादनाचा मुख्य आधार असल्यामुळें, स्वाभाविकपणें च असें घडे कीं, ते प्रचीतीच्या गोष्टी बोलत आणि तें च आपणांस त्यांचें आत्मचरित्र वाटतें. महंताचीं त्यांनीं जीं शेंकडों लक्षणें ठिकठिकाणीं सांगितलीं आहेत, तीं सर्व त्यांच्या च ठायीं विलसत असल्यामुळें, अशा लक्षणांनीं युक्त असलेल्या महंताच्या भोंवतीं

नभामाजी तारांगणें । तैसे लोक ॥ १२-९-२७ ॥

गोळा होतात म्हणून जें ते सांगतात, तें स्वतःविषयीं च होय, असें मी मानतों. हें विधान मी त्यांच्या लोकप्रियतेची आणि लोकसंग्रहाची खूण समजतों.

(सातवी) बाराव्याच्या दहाव्या समासांत १ ते ३१ ओव्यांत महापुरुषाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. तीं सर्व लक्षणें दुसऱ्या कोणाचीं नसून श्रीसमर्थांचीं च होत. कृपा करून वाचून पाहा. उतारे तरी कोठवर घ्यावे? निम्मा दासबोध तरी उतरून काढावा लागेल! श्रीमत् ग्रन्थराज दासबोध म्हणजे श्रीसमर्थांचें आत्मचरित्र च होय, असें जें मी म्हणत आलों, त्याची सत्यता सारखी प्रत्ययास येत आहे. या ३१ ओव्यांतील लक्षणांनीं युक्त

**ऐसा जो माहानुभाव। तेणें करावा समुदाव।**
**भक्तियोगें देवाधिदेव। आपुला करावा ॥ १२–१०–३२ ॥**
**आपण अवचितें मरोन जावें। मग भजन कोणें करावें।**
**याकारणें भजनास लावावे। बहुत लोक ॥ ३३ ॥**
**आमची प्रतिज्ञा ऐसी। कांहीं न मागावें शिष्यासी।**
**आपणामागें जगदीशासी। भजत जावें ॥ ३४ ॥**

हीं जर दुसऱ्या कोणाचीं लक्षणें असतीं तर मध्यें च श्रीसमर्थांनीं आपला संबंध कशास आणला असता? भोंवतालीं शिष्यांचा पाळा पडला असतां, मध्यभागीं बसून श्रीसमर्थ शिष्यांशीं बोलत आहेत, असें मला दिसतें.

**याकारणें समुदाव। जाला पाहिजे मोहोछाव।**
**हातोपातीं देवाधिदेव। बोळेसा करावा ॥ ३५ ॥**

याप्रमाणें समुदाय करणाराच्या ठिकाणीं दोन गुण पाहिजेत: एक, प्रबोधशक्ति व दुसरा गुण म्हणजे वर १ ते ३१ ओव्यांत सांगितलेले सारे उत्तम गुण. प्रबोधशक्तीची व्याख्या कोठें दिलेली नाहीं, पण तिचें कार्य सांगितलें आहे.

**जेणें बहुतांस घडे भक्ति। ते हे रोकडी प्रबोधशक्ति।**
**बहुतांचें मनोगत हातीं। घेतलें पाहिजे ॥ ३७ ॥**

प्रस्तुतच्या खुणेंत श्रीसमर्थांच्या अंतरंगांतील समुदायाविषयींची आतुरता प्रकट होत आहे.

( आठवी ) या च प्रबोधशक्तीचें कार्य पंधराव्याच्या दुसऱ्या समासांत विस्तारानें सांगितलें आहे. तें सारें च एका धूर्त तार्किक विचक्षण महापुरुषाचें चरित्र आहे. काय हो तो महापुरुष करीत असतो ?

**प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें । जाणे सकळांचीं अंतरें ।**
**निरूपणें तदनंतरें । चटक लागे ॥ १५-२-१६ ॥**

**मतें मतांतरें सगट । प्रत्यय बोलोन करी सपाट ।**
**दंडक सांडून नीट । वेधी जना ॥ १७ ॥**

**नेमकें भेदकें वचनें । अखंड पाहे प्रसंगमानें ।**
**उदास वृत्तीच्या गुमानें । उठोन जातो ॥ १८ ॥**

**प्रत्यय बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला ।**
**नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १९ ॥**

**परी तो कोठें आडळेना । कोणे स्थळीं सांपडेना ।**

श्रीशिवरायांची च अशी स्थिति झाली होती, श्रीसमर्थांना धुंडीत त्यांना हिंडावें लागलें होतें, असें आपण वाचलें आहे !

**वेष पाहातां हीन दीना- । सारिखा दिसे ॥ २० ॥**

**उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ।**
**तेथें यशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१ ॥**

**ठाइं ठाइं भजन लावी । आपण तेथून चुकावी ।**
**मछरमतांची गोवी । लागों च नेदी ॥ २२ ॥**

**खनाळामधें जाऊन राहे । तेथें कोणी च न पाहे ।**

मी वाचकांस विचारूं इच्छितों, कोणाचें तरी चरित्र पाहून आणि मनांत आणून श्रीसमर्थ ही रेखाटणी करीत आहेत, इतकें तर खरें ना ! हें कांहीं काल्पनिक वर्णन नव्हे ! या अकरा ओव्यांत वाचकांस श्रीसमर्थहृदयाचा साक्षात्कार झाला पाहिजे !

**सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३ ॥**

**अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहणें नेमक ।**

वाचकांस विनंति केल्यावांचून मला कोठें राहवतें ? निदान हेळवांकची घळ व शिवतर खोऱ्यांतील घळ या दोन घळी अवश्य पाहून या, अशी वाचकांस माझी विनंति आहे !

**सृष्टीमधें सकळ लोक । धुंडीत येती ॥ २४ ॥**

**तेथें कोणाचें चालेना । अनुमात्र अनुमानेना ।**
**कष्ट घालून राजकारणा । लोक लावी ॥ २५ ॥**

किती लोक ? अगणित; नभामाजी जितके तारे तितके लोक. ही अतिशयोक्ति नव्हे.

**लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले ।**
**भूमंडळीं सत्ता चाले । गुप्तरूपें ॥ २६ ॥**

असा इतिहास आहे कीं, श्रीसमर्थांच्या हयातींत च त्यांची शिष्यपरंपरा अकराव्या पुरुषापर्यंत पोंचली होती ! म्हणजे त्यांचा शिष्य, त्या शिष्याचा शिष्य, त्या शिष्याचा शिष्य, अशा परंपरेनें, जगूं, श्रीसमर्थांचा अकरावा वंशज त्यांच्या हयातींत च विद्यमान होता ! विचार करा, ही ओवी किती सार्थ आहे. श्रीसमर्थांचे हजारों शिष्य, त्या हजारों शिष्यांचे हजारों शिष्य, त्या हजारोंचे आणखी अनेक शिष्य, अशा रीतीनें शिष्यप्रशिष्यांची संख्या अमर्याद होऊन त्या काळीं भूमंडळीं सत्ता चालली आमच्या श्रीसमर्थांची, पण तिचा सुगावा कोणास लागला नव्हता !

(नववी) **संसार मिथ्या ऐसा कळला ।**
**ज्ञान समजोन निघोन गेला ॥ १४–७–२५ ॥**

कोण ? स्वतः श्रीसमर्थ च. ऐन लग्नसमारंभांतून निसटले, गंगा ओलांडली, दक्षिण कांठानें गंगेच्या उगमाकडे पंचवटीस गेले, श्रीरामाचें दर्शन घेतलें, त्यास आपला हेतु निवेदन केला, जवळ टाकळीस एकांत स्थळीं राहिले, बारा वर्षें तीव्र तप केलें, पुरश्चरणादि साधनें केलीं, देह अत्यंत कष्टविला, याचें च वर्णन १४ व्याच्या ७ व्यांत मला भासतें.

**पुरश्चरणी कायाक्लेसी । दृढव्रती परम सायासी ।**
**जगदीशावेगळें जयासी । थोर नाहीं ॥ १४–६–७ ॥**

**काया वाचा जीवें प्राणें । कष्टे भगवंताकारणें ।**
**मनें घेतलें धरणें । भजनमार्गीं ॥ ८ ॥**

**ऐसा भगवंताचा भक्त । विशेष अंतरीं विरक्त ।**
**संसार सांडून जाला मुक्त । देवाकारणें ॥ ९ ॥**

इत्यादि, हें दुसऱ्या कोणाचें चरित्र आहे?

**जनास दिसे हा दुश्चित । परी तो आहे सावचित ।**
**अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥ १५ ॥**

शेजारच्या पाजारच्या लोकांना वाटे, हा मुलगा असा कसा, याचें चित्त आहे तरी कोणीकडे? ते आपल्या नादांत असत. त्यांचा नाद कोणता?

**उपासनामूर्तिध्यानीं । अथवा आत्मानुसंधानीं ।**
**नाहीं तरी श्रवणमननीं । निरंतर ॥ १६ ॥**

मला असें वाटतें, या च काळांत वेद आणि वेदांत, अनेक गीता, भागवतादि नाना ग्रन्थ यांचें त्यांना अध्ययन घडलें असावें. वाल्मीकिरामायणाचीं कांहीं कांडें त्यांनीं उतरलीं, तीं या च काळांत होत. हा काळ १५४२ ते १५५४ चा होय.

(दहावी) सभांतून काय किंवा इतर प्रसंगीं काय, प्रमुख नेत्यांनीं आणि सज्जनांनीं क्षमाशांति धारण करून विवेकाच्या योगानें लोकांचीं अंतःकरणें सांभाळीत जावीं, हें त्यांचें कर्तव्य होय. सभेंत कलह माजला, तर त्याचा बोल नेत्यावर येतो. तसा बोल न यावा म्हणून नेत्यानें कसें वागावें, हें १८ व्याच्या १० व्यांत ३३ व्या ओवीपासून तों ४२ व्या ओवीपर्यंत सामान्यतः सांगून ४३ ते ५० ओव्यांत स्वतःचें उदाहरण देऊन दाखविलें आहे, असें समजण्यास हरकत नाहीं.

**पृथ्वीमधें उदंड जन । जनामध्यें असती सज्जन ।**
**जयांकरितां समाधान । प्राणीमात्रासी ॥ १८-१०-४३ ॥**

**तो मनोगताचीं आंगें जाणे । मान प्रसंग समये जाणे ।**
**संतप्तालागीं निवऊं जाणे । नाना प्रकारें ॥ ४४ ॥**

**ऐसा तो जाणता लोक । समर्थ तयाचा विवेक ।**
**त्याचें करणें कांहीं येक । जनास कळेना ॥ ४५ ॥**

**बहुत जनास चालवी । नाना मंडळें हालवी ॥**
**ऐसी हे समर्थपद्वी । विवेकें होते ॥ ४६ ॥**

**विवेक येकांतीं करावा । जगदीश धारणेनें धरावा ।**
**लोक आपला आणि परावा । म्हणों चि नये ॥ ४७ ॥**

**येकांतीं विवेक ठाई पडे । येकांतीं येत्न सांपडे ॥**
**येकांतीं तर्क वावडे । ब्रह्मांडगोळीं ॥ ४८ ॥**

**येकांतीं स्मरण करावें । चुकलें निधान पडे ठावें ।**
**अंतरात्म्यासरिसें फिरावें । कांहीं तरी ॥ ४९ ॥**

प्रत्येक ओवीचें च मनन झालें पाहिजे. ही राष्ट्रगुरूची शिकवण आहे. पण त्यांतल्या त्यांत हि, येकांतीं बसून डोळे मिटून अंतरात्म्याबरोबर ब्रह्मांडांत संचार कसा करावा, याचा प्रत्येकानें विचार केला पाहिजे. हें श्रीसमर्थांचें अंतरंग आहे. श्रीसमर्थ याप्रमाणें फिरत, हें उघड आहे. आपण अभ्यास करावा.

**जयास येकांत मानला । अवघ्या आधीं कळे त्याला ।**
**त्यावेगळें वडिलपणाला । ठाव चि नाहीं ॥ ५० ॥**

' त्यावेगळें ' याचा अर्थ मी ' अंतरात्म्यावेगळें ' असा करतों.

**तस्मात् वडिल अंतरात्मा । जेथें चेतला तेथें महिमा ।**
**हें तों प्रगट चि आहे आम्हा । शब्द नाहीं ॥ १५–३–१९ ॥**

( अकरावी ) १९ × ४ म्हणजे श्रीसमर्थांचें आत्मचरित्र होय.

**जितुके कांहीं उत्तम गुण । तें समर्थाचें लक्षण ॥ ३१ ॥**

असा त्या समासाचा शेवट केलेला आहे. तेव्हां हा समास आत्मचरित्राचा आहे, असें मानण्याला आणखी निराळा आधार नको आहे. समासाच्या प्रत्येक ओवींत श्रीसमर्थांच्या अंतरंगाची एक एक खूण उमटली आहे. पैकीं कांहीं महत्त्वाच्या खुणा पाहा :—

जो मानला बहुतांसी । कोणी बोलों न शके त्यासी ।
धगधगीत पुण्यरासी । माहांपुरुष ॥ १९-४-९ ॥

तो परोपकार करितां चि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला ।
मग काये उणें तयाला । भूमंडळीं ॥ १० ॥

बहुत जन वास पाहे । वेळेसी तत्काळ उभा राहे ।
उणें कोणाचें न साहे । तया पुरुषासी ॥ ११ ॥

उत्तमगुणें शृंघारला । तो बहुतांमधें शोभला ।
प्रगट प्रतापें उगवला । मार्तंड जैसा ॥ १५ ॥

प्रपंचीं जाणे राजकारण । परमार्थीं साकल्य विवरण ।
सर्वांमधें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १७ ॥

राजकारण हें प्रपंचाचें श्रेष्ट स्वरूप होय, असा बोध अनायासें या ओवीवरून होत आहे.

दुसऱ्याच्या दुःखें दुखवे । दुसऱ्याच्या सुखें सुखावे ।
आवघे चि सुखी असावे । ऐसी वासना ॥ २३ ॥

उदंड मुलें नानापरी । वडिलांचें मन अवघ्यांवरी ।
तैसी अवघ्यांची चिंता करी । माहांपुरुष ॥ २४ ॥

( बारावी ) तीर्थाटणाच्या निमित्तानें श्रीसमर्थांना जें परिभ्रमण घडलें, त्यांत त्यांनीं अत्यन्त सूक्ष्म रीतीनें लोकस्थितीचें कसें निरीक्षण केलें, हें १९×८ वरून चांगलें कळतें. सामान्य लोकांपासून तों असामान्य कर्तृत्ववान् पुरुषापर्यंत ते आपली दृष्टि पोंचवीत. या निरीक्षणांत त्यांचें अंतरंग हि प्रकट होत आहे.

सृष्टिमधें बहु लोक । परिभ्रमणें कळे कौतुक ।
नाना प्रकारींचे विवेक । आडळों लागती ॥ १९-८-१ ॥

किती प्रपंची जन । अखंड वृत्ति उदासीन ।
सुखदुःखें समाधान । दंडळेना ॥ २ ॥

स्वभावें चि नेमक बोलती । सहज चि नेमक चालती ।
अपूर्व बोलण्याची स्थिती । सकळांसी माने ॥ ३ ॥

**सहज चि ताळज्ञान येतें । स्वभाव चि रागज्ञान उमटतें ।**
**सहज चि कळत जातें । न्यायनीतिलक्षण ॥ ४ ॥**

**येखादा आडळे गाजी । सकळ लोक अखंड राजी ।**
**सदा सर्वदा आवडी ताजी । प्राणीमात्राची ॥ ५ ॥**

परिभ्रमण करीत असतां श्रीसमर्थांचें लक्ष कोणीकडे असे, याचें किंचित् अनुमान होतें.

(तेरावी) साऱ्या ब्रह्मांडाचा व्याप करीत असतां हि वृत्ति निश्चल कशी राखावी, याची गुरुकिल्ली या च १९×८ समासांत आढळते. व्याप करणें हें अंतरात्म्याचें काम होय. अंतरात्मा चंचळ आहे. चंचळ होऊन व्याप करावा, निश्चळ होऊन विश्रांति घ्यावी, हें श्रीसमर्थांचें अंतरंग होय.

**अंतरात्म्याकडे सकळ लागे । निर्गुणीं हें कांहीं च न लगे ।**
**नाना प्रकारीचे दगे । चंचळामधें ॥ १९–८–२४ ॥**

**शुद्ध विश्रांतीचें स्थळ । तें एक निर्मळ निश्चळ ।**
**तेथें विकार चि सकळ । निर्विकार होती ॥ २५ ॥**

**उद्वेग अवघे तुटोनी जाती । मनासी वाटे विश्रांती ।**
**ऐसी दुर्लभ परब्रह्मस्थिती । विवेकें सांभाळावी ॥ २६ ॥**

किती कठीण आहे ! श्रीसमर्थांच्या अंतरंगाचें दर्शन काय सहजासहजीं घडणार आहे ?

**आपणास उपाधी मुळीं च नाहीं । रुणानुबंधें मिळालें सर्व हि ।**
**आल्यागेल्याची क्षिती नाहीं । ऐसें जालें पाहिजे ॥ २७ ॥**

**जो उपाधीस कंटाळला । तो निवांत होऊन बैसला ।**
**आटोपेना तो गल्बला । कासयासी ॥ २८ ॥**

**कांहीं गल्बला कांहीं निवळ । ऐसा कंठीत जावा काळ ।**
**जेणेंकरितां विश्रांतीवेळ । आपणासी फावे ॥ २९ ॥**

(चौदावी) १९×१० हें निवळ श्रीसमर्थांचें आत्मचरित्र आहे. त्यांचा व्याप केवढा मोठा आणि अनेकांगी होता, याची त्यावरून कल्पना होते,

त्यांची कार्य करण्याची पद्धति कळते. त्यांच्या उपस्थितींत त्यांच्या नेतृत्वाखालीं अखंड चाळणा आणि चर्चा चाले. ती चाळणा आणि चर्चा प्रपंचाची आणि परमार्थाची, राजकारणाची आणि धर्मकारणाची, दोहोंची चालवयाची. राजकारण आणि धर्मकारण या दोहोंचा, या समासांत, जणूं गोफ च विणला आहे.

**उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहुंकडे ।**
**भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ १९-१०-८ ॥**

तया म्हणजे कोणाला? हें कांहीं काल्पनिक वर्णन दिसत नाहीं किंवा हा कांहीं केवळ तात्त्विक उपदेश वाटत नाहीं.

**जाणती परी आढळेना । काये करितो तें कळेना ।**
**नाना देसीचे लोक नाना । येऊन जाती ॥ ९ ॥**

कशाला? हें कल्पनेनें च जाणलें पाहिजे.

**तितुक्यांचीं अंतरें धरावीं । विवेकें विचारें भरावीं ।**
**कडोविकडीचीं विवरावीं । अंतःकर्णें ॥ १० ॥**

**किती लोक तें कळेना । किती समुदाव आकळेना ।**
**सकळ लोक श्रवणमनना-। मध्यें घाली ॥ ११ ॥**

ते लोक कसे असत आणि त्यांना कोणता मंत्र मिळे?

**धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला ।**
**नाना बुद्धि शक्ताला । म्हणोनी सिकवाव्या ॥ २२ ॥**

**व्याप होईल तों राहावें । व्याप राहातां उठोन जावें ।**
**आनंदरूप फिरावें । कोठें तऱ्ही ॥ २३ ॥**

**उपाधीपासुनी सुटला । तो निस्पृहपणें बळावला ।**
**जिकडे अनकूळ तिकडे चालिला । सावकास ॥ २४ ॥**

अशा त्यांच्या अंतरंगाच्या खुणा आपण किती देत बसणार? सबंध ग्रन्थ च जेथें त्यांचें स्वरूप मानलें जातें, तेथें आपण पुरे कसे पडणार? ज्या कांहीं उत्तान खुणा आपण येथवर पाहिल्या तेवढ्यांवरून श्रीमत् ग्रन्थराज

दासबोध म्हणजे श्रीसमर्थांचें आत्मचरित्र होय, हें विधान वाचकांस पटलें म्हणजे पुरे आहे. प्रत्येक वाचकानें आपआपल्या परीनें दासबोधांत श्रीसमर्थांना पाहिलें पाहिजे.

## ( २ ) तत्कालीन लोकस्थिति

श्रीसमर्थांच्या काळीं भरतखंडांतील आणि विशेषत: आपल्या महाराष्ट्रांतील लोकांची स्थिति कशी होती, तिचें अनुमान करतां येईल असे कांहीं उल्लेख आपण पूर्वार्धांत पाहिले च आहेत. उत्तरार्धांतील तीन ठळक उल्लेख माझ्या नेहमीं स्मरणांत असतात, ते आतां आपण पाहूं. त्या योगें तत्कालीन समाजस्थितीवर तर प्रकाश पडेल च, पण तशा स्थितींत श्रीसमर्थांसारख्या महापुरुषाचा अवतार झाला तो किती वेळेवर झाला, याचा हि आपणांस बोध होईल.

( श्री ) पहिला उल्लेख समाजाच्या **निर्नायक स्थितीचा** दर्शक आहे. समाजाला आळा घालणारा कोणी सामर्थ्यवान् पुरुष नव्हता. कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, अशी स्थिति झाली होती. ऐका —

**नाना मतें निर्माण जालीं । नाना पाषांडें वाढलीं ।**
**नाना प्रकारीचीं उठिलीं । नाना बंडें ॥ ११–२–१६ ॥**

**जैसा प्रवाह पडिला । तैसा च लोक चालिला ।**
**कोण वारील कोणाला । येक नाहीं ॥ १७ ॥**

**पृथ्वीचा जाला गळांठा । येकाहून येक मोठा ।**
**कोण खरा कोण खोटा । कोण जाणे ॥ १८ ॥**

**आचार बहुकचिंत पडिला । कित्येक पोटासाठीं बुडाला ।**
**अवघा वरपंग चि जाला । साभिमानें ॥ १९ ॥**

**देव जाले उदंड । देवांचें मांडलें भंड ।**
**भूतादेवतांचें थोतांड । येक चि जालें ॥ २० ॥**

**मुख्य देव तो कळेना । काशास कांहीं च मिळेना ।**
**येकास येक वळेना । अनावर ॥ २१ ॥**

**ऐसा नासला विचार। कोण पाहातो सारासार।**
**कैंचा लाहान कैंचा थोर। कळे चि ना ॥ २२ ॥**

**शास्त्रांचा बाजार भरला। देवांचा गल्बला जाला।**
**लोक कामनेच्या व्रताला। झोंबोन पडती ॥ २३ ॥**

**ऐसें अवघें नासलें। सत्यासत्य हारपलें।**
**अवघे अनायेक जाले। चहूंकडे ॥ २४ ॥**

**मतामतांचा गल्बला। कोणी पुसेना कोणाला।**
**जो जे मतीं सांपडला। तयास तें चि थोर ॥ २५ ॥**

**असत्याचा अभिमान। तेणें पाविजे पतन।**

तें पतन टाळण्यासाठीं श्रीसमर्थांचा अवतार झाला!

**म्हणोनियां ज्ञाते जन। सत्य शोधिती ॥ २६ ॥**

महाराष्ट्राची आज काय स्थिति आहे, तिचा विचार वाचकांनीं करावा.

(रा) दुसऱ्या उल्लेखांत महाराष्ट्राच्या **भांबावलेल्या स्थितीचें** वर्णन आहे—

**कित्येक म्लेंच्छ होऊन गेले। कित्येक फिरंगणांत आटले।**
**देशभाषानें रुधिले। कितीयेक ॥ १५-२-३ ॥**

म्हणजे परकी भाषा बोलूं लागले!

**मऱ्हाष्टदेश थोडा उरला। राजकारणें लोक रुधिला।**
**अवकाश नाहीं जेवायाला। उदंड कामें ॥ ४ ॥**

**कित्येक युद्धप्रसंगीं गुंतले। तेणें गुणें उन्मत्त जाले।**
**रात्रंदिवस करूं लागले। युध्यचर्चा ॥ ५ ॥**

**उदिम्यास व्यासंग लागला। अवकाश नाहींसा जाला।**
**अवघा पोटधंदा च लागला। निरंतर ॥ ६ ॥**

**शडदर्शनें नाना मतें। पाषांडें वाढलीं बहुतें।**
**पृथ्वीमधें जेथतेथें। उपदेसिती ॥ ७ ॥**

**स्मार्थीं आणि वैष्णवीं। उरलीं सुरलीं नेलीं आग्रवीं।**
**ऐसी पाहातां गथागोवी। उदंड जाली ॥ ८ ॥**

**कित्येक कामनेचे भक्त। ठाइं ठाइं जाले आसक्त।**
**युक्त अथवा अयुक्त। पाहातो कोण ॥ ९ ॥**

तेव्हांपासून आतांपर्यंत ज्या कामनेच्या ग्रंथाची महाराष्ट्रांतील लोकांच्या मनावर छाप बसलेली आढळते, त्याला अनुलक्षून ही ओवी आहे काय ?

**या गलबल्यामधें गलबला। कोणीं कोणीं वाढविला।**
**त्यास देखों सकेनासा जाला। वैदिक लोक ॥ १० ॥**

कर्माचा त्याग करून एकाद्या सुलभ भासणाऱ्या साधनावर जोर देणाऱ्या अशा एकाद्या पंथाविषयीं हा उल्लेख आहे काय? नाहींपेक्षां वैदिक लोकांना पाहवेनासें काय झालें ?

**त्या हि मधें हरिकीर्तन। तेथें वोढले कित्येक जन।**
**प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान। कोण पाहे ॥ ११ ॥**

तें प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान निस्पृहपणें सांगण्यासाठीं श्रीसमर्थांचा अवतार झाला.

(म) तिसरा उल्लेख **ब्राह्मणांच्या निकृष्टावस्थेबद्दलचा** आहे. वरील दोन उल्लेखांत वर्णन केल्याप्रमाणें जरी महाराष्ट्राची स्थिति झाली होती, तरी हि ब्राह्मणांची बुद्धि ठिकाणावर असती, तर आशा करण्याला कांहीं जागा झाली असती! पण ते हि अति च बहकले होते! गुरुत्व ब्राह्मणांकडे असावयाचें तें खालच्या जातीकडे गेलें होतें, ऐहिक वैभवाचें आद्यस्थान जें राज्य तें बहुतेक म्लेंच्छांकडे गेलें होतें, फार च थोडें क्षत्रियांकडे उरलें होतें. ब्राह्मण हे दोहींकडून नागविले गेले होते. ते अन्नाला हि महाग झाले होते. जुलुमजबरदस्तीनें काय बाटविले जात असतील ते वेगळे, पण ब्राह्मण आपण होऊन परधर्मांतील आचार स्वीकारीत आणि धर्मांतर करण्यास प्रवृत्त होत. अशा रीतीनें ज्यांचा आचारविचार सुटला होता त्या ब्राह्मणांविषयीं शूद्रांना स्वाभाविक च आदर वाटेनासा झाला होता. याप्रमाणें ब्राह्मण आपल्या ऐहिक आणि पारलौकिक स्थानापासून जरी हुसकून लावण्यांत येत होते, तरी

त्यांचा मूर्खपणाचा अभिमान मात्र सुटला नव्हता ! या संबंधांत श्रीसमर्थांच्या हृदयापासून अति कळवळ्याचे दुःखोद्गार बाहेर पडले आहेत :

नीच प्राणी गुरुत्व पावला। तेथें आचार चि बुडाला।
वेदशास्त्रब्राह्मणाला। कोण पुसे ॥ १४-७-२९॥

ब्रह्मज्ञानाचा विचारु। त्याचा ब्राह्मणासी च अधिकारु।
वर्णानां ब्राह्मणो गुरुः। ऐसें वचन ॥ ३० ॥

परंतु

ब्राह्मण बुद्धीपासून चेवले। आचारापासून भ्रष्टले।
गुरुत्व सांडून जाले। शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥

कित्येक दावलमलकास जाती। कित्येक पीरास भजती।
कित्येक तुरुक होती। आपले इछेनें ॥ ३२ ॥

ऐसा कलयुगींचा आचार। कोठें राहिला विचार।
पुढें पुढें वर्णसंकर। होणार आहे ॥ ३३ ॥

ती वेळ येऊन ठेपलेली दिसत आहे !

गुरुत्व आले नीचयाती। कांहींयेक वाढली महंती।
शूद्र आचार बुडविती। ब्राह्मणाचा ॥ ३४ ॥

हें ब्राह्मणास कळेना। त्याची वृत्ति च वळेना।
मिथ्या अभिमान गळेना। मूर्खपणाचा ॥ ३५ ॥

राज्य नेलें म्लेंछिं क्षेत्रीं। गुरुत्व नेलें कुपात्रीं।
आपण अरत्रीं ना परत्रीं। कांहीं च नाहीं ॥ ३६ ॥

ब्राह्मणास ग्रामणीनें बुडविलें। विष्णूनें श्रीवत्स मिरविलें।
त्या च विष्णूनें श्रापिलें। फरशरामें ॥ ३७ ॥

हृदयाला पीळ पडून श्रीसमर्थ म्हणतात :

आम्ही हि ते चि ब्राह्मण। दुःखें बोलिलें हें वचन।
वडिल गेले ग्रामणी करून। आम्हां भोंवते ॥ ३८ ॥

**आतांचे ब्राह्मणीं काये केलें। अन्न मिळेना ऐसें जालें।**
**तुम्हा बहुतांचे प्रचीतीस आलें। किंवा नाहीं ॥ ३९॥**

श्रीसमर्थांच्या अंतःकरणापासून पिळवटून निघालेले हे उद्गार वाचून ब्राह्मणांचे डोळे उघडावेत, पण संभव दिसत नाहीं! ईश्वरी संकेत कोण टाळूं शकेल? तथापि धडपडलें पाहिजे च! धडपड हा च ईश्वर! येईल त्याला दया! करील तो कृपा!

## (३) श्रीसमर्थांचीं कांहीं मतें आणि विश्वास

### (१) मेल्यावर प्राण येणें, श्रापदेह, परकाया प्रवेश

**कित्येक प्राणी निःशेष मरती। पुन्हां मागुतें जीव येती।**
**ढकलून दिल्हें तेणें दुखवती। हस्तपादादिक ॥ ९–८–६ ॥**

**सर्पदृष्टी जालियांवरी। तीं दिवसां उठवी धन्वंतरी।**
**तेव्हां ते माघारी। वासना येते कीं ॥ ७ ॥**

**कित्येक शवें होऊन पडती। कित्येक तयांस उठविती।**
**येमलोकींहून आणिती। माघारे प्राणी ॥ ८ ॥**

**कित्येक पूर्वीं श्रापिले। ते शापें देह पावले।**
**उश्रापकाळीं पुन्हां आले। पूर्वदेहीं ॥ ९ ॥**

**कित्येकीं बहु जन्म घेतले। कित्येक परकाया प्रवेशले।**
**ऐसे आले आणि गेले। बहुत लोक ॥ १० ॥**

### (२) **राहाण** म्हणजे अंगांत दैवत आणवून बोलविणें.

**राहाणें ब्राह्मणसमंध जाती। राहाणें ठेवणीं सांपडती।**
**नाना गुंतले उगवती। प्रत्यक्ष राहाणें ॥ ९–८–२१ ॥**

### (३) मंत्रसामर्थ्य

**मंत्रें देव प्रगटती। मंत्रें भूतें अखरकिती।**
**बाजीगरी वोडंबरी करिती। मंत्रसामर्थ्यें ॥ ९–८–३३ ॥**

राक्षसांची मावरचना । ते हे देवादिकां कळेना ।
विचित्र सामर्थ्यें नाना । स्तंबनमोहनादिकें ॥ ३४ ॥

धड चि पिसें करावें । पिसें च उमजवावें ।
नाना विकार सांगावे । किती म्हणोनी ॥ ३५ ॥

मंत्रीं संग्राम देवाचा । मंत्रीं साभिमान ऋषीचा ।
महिमा मंत्रसामर्थ्याचा । कोण जाणे ॥ ३६ ॥

मंत्रीं पक्षी आटोपिती । मूशकें स्वापदें बांधती ।
मंत्रीं माहांसर्प खिळिती । आणि धनलाभ ॥ ३७ ॥

## ( ४ ) नाना देह

येक नाना सामर्थ्यें केले । येक इछेपासून जाले ।
येक शब्दासरिसे पावले । श्रापदेह ॥ १५–८–२२ ॥

येक देह बाजीगरीचे । येक देह वोडंबरीचे ।
येक देह देवतांचे । नाना प्रकारें ॥ २३ ॥

येक क्रोधापासून जाले । येक तपापासून जन्मले ।
येक उश्रापें पावले । पूर्वदेह ॥ २४ ॥

ऐसें भगवंताचें करणें । किती म्हणौन सांगणें ।
विचित्र मायेच्या गुणें । होत जातें ॥ २५ ॥

## ( ५ ) भ्रम

( १ ) येक परब्रह्म संचलें । कदापी नाहीं विकारलें ।
त्यावेगळें भासलें । तें भ्रमरूप ॥ १०–६–२ ॥

निर्गुण ब्रह्मावेगळें अघवें । भ्रमरूप ॥ १०–६–३६ ॥

( २ ) आतां जें जें देइजेतें । तें तें पुढें पाविजेतें ।
मेलें माणुस भोजना येतें । या नांव भ्रम ॥ १०–६–२४ ॥

( ३ ) ब्रह्मा लिहितो अदृष्टीं । आणि वाचून जाते सटी ।
ऐशा प्रकारीच्या गोष्टी । या नांव भ्रम ॥ १०–६–३४ ॥

( ४ ) गत ज्ञात्याचे चमत्कार । या नांव भ्रम ॥ १०–६–३७ ॥

## ( ६ ) आचारविचार

आचाराविचाराच्या शुद्धतेवर श्रीसमर्थांचा फार कटाक्ष असे.

( १ ) १४ × १ त निस्पृह शिष्यांना जी शिकवण आहे, तींत **आचारभ्रमण होऊं नये ।** १४–१–७ अशी स्पष्ट ताकीद आहे.

( २ ) १५–१–२४ त **आचारविचारेंविण । जें जें करणें तो तो सीण ।।** असा सिद्धांत सांगितला आहे.

( ३ ) **आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार ।**
**आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥ १७–१०–२५ ॥**

इतकें आचाराविचाराचें महत्त्व आहे.

( ४ ) १८ × ६ त श्रीशिवरायाचे गुण घेतांना त्यांना आचाराविचाराचा विसर पडला नाहीं.

**देव ब्राह्मण आचार विचार । कितेक जनासी आधार ।**

## ( ७ ) भेद ईश्वर करून गेला

( १ ) **रायापासून रंकवरी । अवघ्या मनुष्यांचिया हारी ।**
**सगट समान सरी । कैसी करावी ॥ १३–१०–८ ॥**

**देव दानव मानव । नीच योनी हीन जीव ।**
**पापी सुकृति अभिप्राव । उदंड आहे ॥ ९ ॥**

**येकांशें जग चाले । परी सामर्थ्य वेगळालें ।**
**येकासंगें मुक्त केलें । येकासंगें रवरव ॥ १० ॥**

**साकर माती पृथ्वी होये । परी ते माती खातां न ये ।**
**गरळ आप नव्हे काये । परी तें खोटें ॥ ११ ॥**

**पुण्यात्मा आणि पापात्मा । दोहींकडे अंतरात्मा ।**
**साधु भोंदु सीमा । सांडूं च नये ॥ १२ ॥**

**अंतर येक तों खरें । परी सांगातें घेऊं न येती माहारें ।**
**पंडित आणि चाटें पोरें । येक कैसीं ॥ १३ ॥**

यासाठीं **याकारणें आचार शुद्ध । त्याउपरी विचारशुद्ध ।**
**वीतरागी आणि सुबुद्ध । ऐसा पाहिजे ॥ १६ ॥**

असें जरी आहे तरी

**( रा ) वर्तायाचा विवेक । राजी राखणें सकळ लोक ।**
**हळुहळु पुण्यश्लोक । करीत जावें ॥ २३ ॥**

**( म ) मुख्य मनोगत राखणें । हें चि चातुर्याचीं लक्षणें ॥ २५ ॥**

**( दा ) प्राणीमात्राचा अंतरंग । होऊन जावें ॥ २७ ॥**

**( स ) याकारणें मनोगत । राखेल तो मोठा महंत ।**
**मनोगत राखतां समस्त । वोढोन येती ॥ २९ ॥**

**( २ ) भेद ईश्वर करून गेला । त्याच्या बाचेन नवचे मोडिला ।**
**मुखामधें घांस घातला । तो अपानीं घालावा ॥ १७ 4/27 ॥**

**( ३ ) ईश्वरें नाना भेद केले । भेदें सकळ सृष्टी चाले ॥ १७ 1/20 ॥**

यामुळें एकंकाराच्या प्रवृत्तींत समाजाचें हित नाहीं.

## ( ८ ) हठयोग

श्रीसमर्थ महान् योगी होते. हठयोग ते जाणत, त्यावर त्यांचा विश्वास होता, पण शिष्यांची परिस्थिति पाहून त्यांना ते हठयोगापासून परावृत्त करीत, असें स्वानुभवदिनकरावरून दिसतें. अजपानिरूपणांत ( १७ × ५ ) हठयोगाचें महत्त्व त्यांनीं मान्य केलें आहे.

**सहज समजायाकारणें । नाना हटयोग करणें ।**
**परंतु येकायेकीं समजणें । घडत नाहीं ॥ १७-५-१९ ॥**

हठयोगानें सिद्धी प्राप्त होतात, असें ते मानीत ( पहा १ × १० × ६ ते ११ ).

## ( ९ ) वायुरूप देव देवता देवतें भूतें

**( १ ) वायोरूपें देवतें भूतें । आंगीं भरती अकस्मातें ।**
**वीध केलियां प्रेतें । सावध होतीं ॥ ९-८-२० ॥**

(२) देव देवता देवतें भूतें । पृथ्वीमध्यें असंख्यातें ।
परंतु या समस्तांतें । वायोस्वरूप बोलिजे ॥ १०–३–९ ॥

वायोस्वरूप सदा असणें । प्रसगें नाना देह धरणें ।
गुप्त प्रगट होणें जाणें । समस्तांसीं ॥ १० ॥

वायोस्वरूपें विचरती । वायोमध्यें जगज्जोती ।
जाणतीकळा वासना वृत्ति । नाना भेदें ॥ ११ ॥

(३) देव देवता देवतें भूतें । मिथ्या म्हणों नये त्यांतें ।
आपलाल्या सामर्थ्यें ते । सृष्टीमधें फिरती ॥ १०–९–२० ॥

सदा विचरती वायोस्वरूपें । स्वइछा पालटिती रूपें ।
अज्ञान प्राणी भ्रमें संकल्पें । त्यास बाधिती ॥ २१ ॥

(४) भूतें देवतें नाना शक्ती । वायोरूप त्यांच्या वेक्ती ।
नाना जीव नेणों किती । भूमंडळीं ॥ १६–६–२२ ॥

## (१०) वायुस्वरूप ब्रह्मा विष्णु महेश

वायोमध्यें विष्णु होता । तो वायोस्वरूप चि तत्वता ।
पुढें जाला देहधर्ता । चतुर्भुजु ॥ १०–४–२१ ॥

तैसा च ब्रह्मा आणि महेश । देह धरिती सावकास ।
गुप्त प्रगट होतां तयांस । वेळ नाहीं ॥ २२ ॥

आतां रोकडी प्रचिती । मनुष्यें गुप्त प्रगटती ।
मां त्या देवांच्या च मूर्ती । सामर्थ्यवंत ॥ २३ ॥

देव देवता भूतें देवतें । चढतें सामर्थ्य आहे तेथें ।
येणें चि न्यायें राक्षसांतें । सामर्थ्यकळा ॥ २४ ॥

झोटिंग वायोस्वरूप असती । सर्वें च खुळखुळां चालती ।
खोबरीं खारिका टाकून देती । अकस्मात ॥ २५ ॥

अवघें चि न्याल अभावें । तरी हें बहुतेकांस ठावें ।
आपुलाल्या अनुभवें । विश्वलोक जाणती ॥ २६ ॥

मनुष्यें धरिती शरीरवेष । नाना परकायाप्रवेश ॥
मां तो परमात्मा जगदीश । कैसा न धरी ॥ २७ ॥

म्हणोनि वायोस्वरूपें देह धरिले । ब्रह्मा विष्णु महेश जाले ।
पुढें ते चि विस्तारले । पुत्रपौत्रीं ॥ २८ ॥

## (११) ज्ञानी मुक्त होऊन गेले ।

ज्ञानी मुक्त होऊन गेले । मागें त्यांचें सामर्थ्य चाले ।
परंतु ते नाहीं आले । वासना धरूनी ॥ १०-७-३ ॥

लोकांस होतो चमत्कार । लोक मानिती साचार ।
परंतु याचा विचार । पाहिला पाहिजे ॥ ४ ॥

जीत अस्तां नेणों किती । जनामधें चमत्कार होती ।
ऐसियाची सद्यप्राचिती । रोकडी पाहावी ॥ ५ ॥

तो तरी आपण नाहीं गेला । लोकीं प्रत्यक्ष देखिला ॥
ऐसा हा चमत्कार जाला । यास काये म्हणावें ॥ ६ ॥

तरी हा लोकांचा भावार्थ । भाविकां देव येथार्थ ।
अनेत्र कल्पना वेर्थ । कुतर्काची ॥ ७ ॥

ज्ञानी मुक्त होऊन गेले । त्यांचें सामर्थ्य उगें चि चाले ।
कां जे पुण्यमार्गें चालिले । म्हणोनियां ॥ ११ ॥

## (४) अध्यात्म

माया ब्रह्म वोळखावें । तयास अध्यात्म म्हणावें ॥ ७-१-५४ ॥

अध्यात्म हा दासबोधाचा मुख्य च विषय होय. पूर्वार्धाचा तो एक च एक विषय होता, पण उत्तरार्धांत हि तो इतर विषयांबरोबर प्रामुख्यानें आहे च. ब्रह्म म्हणजे काय, माया म्हणजे काय, ती ब्रह्माच्या ठिकाणीं कशी उद्भवली, मी कोण, इत्यादि प्रश्नांचा विचार आपण पूर्वार्धांत केला च आहे. प्रश्न जरी ते च ते असले, तरी श्रीसमर्थ हे शब्दसृष्टीचे ईश्वर असल्यामुळें आणि प्रत्ययानें बोलत असल्यामुळें, ते च प्रश्न आणि त्यांचीं

तीं च उत्तरें त्यांनीं शंभरदां सांगितलीं तरी प्रत्येक वेळीं त्यांची सांगण्याची तऱ्हा भिन्न भिन्न आढळते. त्या सर्व तऱ्हा वाचकांनीं मूळ ग्रन्थावरून च अवलोकिल्या पाहिजेत.

## (१) ब्रह्म

ब्रह्मापुरता च विचार करावयाचा तर आपण अगदीं शेवटचा च समास पाहूं. ७×४ त जें विवेचन आहे, तें च यांत हि आहे, शब्द वेगळे, तऱ्हा वेगळी. तो समास संपूर्ण येथें देण्याचा मीं विचार केला आहे. वाचतांना आपण नुसते शब्द वाचूं, अर्थ प्रतीत होईल च असें नाहीं. पण दुसरा मार्ग नाहीं. शांतपणें वाचलें पाहिजे, शतशः वाचलें पाहिजे, बोध होई तों वाचलें पाहिजे, मनन केलें पाहिजे. कोणत्या क्षणीं अर्थ स्फुरेल याचा नेम नाहीं.

**धरूं जातां धरितां न ये । टाकूं जातां टाकितां न ये ।**
**जेथें तेथें आहे च आहे । परब्रह्म तें ॥ २०–१०–१ ॥**

**जिकडे तिकडे जेथें तेथें । विन्मुख होतां सन्मुख होतें ।**
**सन्मुखपण चुकेना तें । कांहीं केल्या ॥ २ ॥**

**बैसलें माणुस उठोन गेलें । तेथें आकाश चि राहिलें ।**
**आकाश चहुंकडे पाहिलें । तरी सन्मुख चि आहे ॥ ३ ॥**

**जिकडे तिकडे प्राणी पळोन जातें । तिकडे आकाश चि भोंवतें ।**
**बळें आकाशाबाहेर तें । कैसें जावें ॥ ४ ॥**

**जिकडे जिकडे प्राणी पाहे । तिकडे तें सन्मुख चि आहे ।**
**समस्तांचे मस्तकीं राहे । माध्यानीं मार्तंड जैसा ॥ ५ ॥**

**परी तो आहे येकदेसी । दृष्टांत न घडे वस्तुसी ।**
**कांहीं येक चमत्कारासी । देउनी पाहिलें ॥ ६ ॥**

**नाना तीर्थें नाना देसीं । कष्टत जावें पाहाव्यासी ।**
**तैसें नलगे परब्रह्मासी । बैसले ठाईं ॥ ७ ॥**

**प्राणी बैसोनी च राहातां । अथवा बहुत पळोन जातां ।**
**परब्रह्म तें तत्वता । समागमें ॥ ८ ॥**

पक्षी अंतराळीं गेला । भोंवतें आकाश चि तयाला ।
तैसें ब्रह्म प्राणीयाला । व्यापून आहे ॥ ९ ॥

परब्रह्म पोकळ घनदाट । ब्रह्म सेवटाचा सेवट ।
ज्यासी त्यासी ब्रह्म नीट । सर्वकाळ ॥ १० ॥

दृश्य सबाहे अंतरीं । ब्रह्म दाटलें ब्रह्मांडोदरीं ।
आरे त्या विमळाची सरी । कोणास द्यावी ॥ ११ ॥

वैकुंठकैळासस्वर्गलोकीं । इंद्रलोकीं चौदा लोकीं ।
पन्नगादिक पाताळलोकीं । तेथें हि आहे ॥ १२ ॥

कासीपासून रामेश्वर । आवघें दाटलें अपार ।
परता परता पारावार । त्यास नाहीं ॥ १३ ॥

परब्रह्म तें येकलें । येकदां चि सकळांसी व्यापिलें ।
सकळांस स्पर्शोन राहिलें । सकळां ठाईं ॥ १४ ॥

परब्रह्म पाउसें भिजेना । अथवा चिखलानें भरेना ।
पुरामधें परी वाहेना । पुरासमागमें ॥ १५ ॥

येकसरें सन्मुख विमुख । वाम सव्य दोहिंकडे येक ।
आर्धऊर्ध प्राणी सकळीक । व्यापून आहे ॥ १६ ॥

आकाशाचा डोहो भरला । कदापि नाहीं उचंबळला ।
असंभाव्य पसरला । जिकडे तिकडे ॥ १७ ॥

येकजिनसी गगन उदास । जेथें नाहीं दृश्यभास ।
भासेंविण निराभास । परब्रह्म जाणावें ॥ १८ ॥

संतसाधुमाहानुभावां । देवदानवमानवां ।
ब्रह्म सकळांसी विसांवा । विश्रांतिठाव ॥ १९ ॥

कोणेकडे सेवटा जावें । कोणेकडे काये पाहावें ।
असंभाव्य तें नेमावें । काये म्हणोनी ॥ २० ॥

स्थूळ नव्हे सूक्ष्म नव्हे । कांहीं येकासारिखें नव्हे ।
ज्ञानदृष्टीविण नव्हे । समाधान ॥ २१ ॥

पिंडब्रह्मांडनिरास । मग तें ब्रह्म निराभास ।
येथून तेथवरी अवकास । भकासरूप ॥ २२ ॥

ब्रह्म व्यापक हें तों खरें । दृश्य आहे तों हें उत्तरें ।
व्यापेंविण कोण्या प्रकारें । व्यापक म्हणावें ॥ २३ ॥

ब्रह्मासी शब्द चि लागेना । कल्पना कल्पूं शकेना ।
कल्पनेतीत निरंजना । विवेकें वोळखावें ॥ २४ ॥

शुद्ध सार श्रवण । शुद्ध प्रत्ययाचें मनन ।
विज्ञानीं पावतां उन्मन । सहज चि होतें ॥ २५ ॥

हे नुसते शब्द नव्हत. तें श्रीसमर्थांनीं सांगितलेलें प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान आहे. तें आपण 'विवेकें वोळखावें' असें ते म्हणतात. ते सांगतात

मतीसारिखा मतिप्रकाश । अंतरीं वाढे ॥ ९-९-२९ ॥

मती करितां विशाळ । कवळों लागे अंतराळ ।
पाहातां भासे ब्रह्मगोळ । कवीट जैसें ॥ ३० ॥

वृत्ति त्याहून विशाळ । करितां ब्रह्मांड बद्रिफळ ।
ब्रह्माकार होतां केवळ । कांहीं च नाहीं ॥ ३१ ॥

आपण विवेकें विशाळला । मर्यादेवेगळा जाला ।
मग ब्रह्मगोळ देखिला । वटबीजन्यायें ॥ ३२ ॥

होतां त्याहून विस्तीर्ण । वटबीज कोटिप्रमाण ।
आपण होतां परिपूर्ण । कांहीं च नाहीं ॥ ३३ ॥

आपण भ्रमें लाहानाळला । केवळ देहधारी जाला ।
तरी मग ब्रह्मांड त्याला । कवळेल कैसें ॥ ३४ ॥

वृत्ति ऐसी वाढवावी । पसरून नाहीं च करावी ।
पूर्णब्रह्मास पुरवावी । चहुंकडे ॥ ३५ ॥

पण इतका मतिप्रकाश आणि इतकें विवेकबळ आमच्याजवळ कोठें आहे ? श्रीसमर्थ सहज बोलून जातात आणि आमचा जीव कासावीस होतो.

शाश्वतास शोधीत गेला । तेणें ज्ञानी साच जाला ।
विकार सांडून मिळाला । निर्विकारीं ॥ १५-१०-२५ ॥

दुःस्वप्न उदंड देखिलें । जागे होतां लटिकें जालें ।
पुन्हां जरी तें आठविलें । तरी तें मिथ्या ॥ २६ ॥

प्रारब्धयोगें देह असे । असे अथवा नासे ।
विचार अंतरीं बैसे । चळेना ऐसा ॥ २७ ॥

बीज अग्नीनें भाजलें । त्याचें वाढणें खुंटलें ।
ज्ञात्यास तैसें जालें । वासनाबीज ॥ २८ ॥

विचारें निश्चळ जाली बुद्धि । बुद्धिपासीं कार्यसिद्धि ।
पाहातां वडिलांची बुद्धि । निश्चळीं गेली ॥ २९ ॥

निश्चळास ध्यातो तो निश्चळ । चंचळास ध्यातो तो चंचळ ।
भूतास ध्यातो तो केवळ । भूत होये ॥ ३० ॥

जो पावला सेवटवरी । तयास हें कांहीं च न करी ।
अंतरनिष्ठां बाजीगरी । तैसी माया ॥ ३१ ॥

मिथ्या ऐसें कळों आलें । विचारानें सद्दढ जालें ।
अवघें भये चि उडालें । अकस्मात ॥ ३२ ॥

उपासनेचें उत्तीर्ण व्हावें । भक्तजनें वाढवावें ।
अंतरीं विवेकें उमजावें । सकळ कांहीं ॥ ३३ ॥

केवढा हा श्रीसमर्थांचा विवेकावर आणि विचारावर भर ! आपण त्यांचे म्हणवितों, त्यांच्यावर पूर्ण विश्वास टाकतों, तर निराश होतां कामा नये. जें कठीण आहे तें त्यांच्या कृपेनें सोपें होईल, जें दुर्लभ वाटतें तें सुलभ होईल. सर्वकाळ मनन केलें पाहिजे. श्रीसमर्थांच्या तोंडून ऐकलें म्हणजे वाचकांना धीर येईल व केव्हां तरी साधेल, असें वाटूं लागेल.

## ( २ ) मायेचें स्वरूप कसें आहे ?

मायेचें वर्णन ग्रन्थराजांत अनेक ठिकाणीं अनेक प्रकारांनीं करण्यांत आलें आहे. तथापि सामान्य वाचकांना तर रिझवील च, पण कवींना हि कौतुक वाटेल असें मायेचें तीन ठिकाणचें वर्णन मला अपूर्व वाटतें. एका ठिकाणीं गुप्त गंगा म्हणून, दुसऱ्या ठिकाणीं भ्रामक कल्पना

म्हणून व तिसऱ्या ठिकाणीं कड्यावरील वेल म्हणून मायेचें वर्णन केलेलें आहे. हीं तिन्ही वर्णनें पाहिलीं म्हणजे मायेच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना आपणांस होईल.

## (एक) गुप्त गंगा ११×७

चंचळ नदी गुप्त गंगा । स्मरणें पावन करी जगा ।
प्रचित रोकडी पाहा गा । अन्यथा नव्हे ॥ ११-७-१ ॥

केवळ अचंचळीं निर्माण जाली । अधोमुखें बळें चालिली ।
अखंड वाहे परी देखिली । नाहीं च कोणी ॥ २ ॥

वळणें वांकाणें भोवरे । उकळ्या तरंग झरे ।
लाद्या लाटा कातरे । ठाईं ठाईं ॥ ३ ॥

शुष्क जळाचे चळाळ । धारा धबाबे खळाळ ।
चिपळ्या चळक्या भळाळ । चपळ पाणी ॥ ४ ॥

फेण फुगे हेलावे । सैरावैरा उदक धावे ।
थेंब फुई मोजावें । अणुरेणु किती ॥ ५ ॥

वोसाणे वाहाती उदंड । झोतावे दर्कुटे दगड ।
खडकें बेटें आड । वळसा उठे ॥ ६ ॥

मृद भूमी तुटोन गेल्या । कठीण तैश्या चि राहिल्या ।
ठाईं ठाईं उदंड पाहिल्या । सृष्टीमधें ॥ ७ ॥

येक ते वाहत चि गेले । येक वळशामधें पडिले ।
येक सांकडींत आडकले । अधोमुख ॥ ८ ॥

येक आपटआपटों च गेलीं । येक चिरडचिडों च मेलीं ।
कितीयेक तें फुगलीं । पाणी भरलें ॥ ९ ॥

येक बळाचे निवडले । ते पोहत चि उगमास गेले ।
उगमदर्शनें पवित्र जाले । तीर्थरूप ॥ १० ॥

तेथें ब्रह्मादिकांचीं भुवनें । ब्रह्मांडदेवतांचीं स्थानें ।
उफराटी गंगा पाहातां मिळणें । सकळांस तेथें ॥ ११ ॥

त्या जळा ऐसें नाहीं निर्मळ । त्या जळा ऐसें नाहीं चंचळ ।
आपोनारायण केवळ । बोलिजे त्यासी ॥ १२ ॥

माहानदी परी अंतराळीं । प्रत्यक्ष वाहे सर्वकाळीं ।
स्वर्गमृत्यपाताळीं । पसरली पाहा ॥ १३ ॥

अधोर्ध अष्ट हि दिशा । तिचें उदक करी वळसा ।
जाणते जाणती जगदीशा । सारिखी च ते ॥ १४ ॥

अनंत पात्रीं उदक भरलें । कोठें पाझपाझरें च गेलें ।
कितीयेक तें वेचलें । संसारासी ॥ १५ ॥

येक्यासंगें तें कडवट । येक्यासंगें तें गुळचट ।
येक्यासंगें तें तिखट । तुरट क्षार ॥ १६ ॥

ज्या ज्या पदार्थास मिळे । तेथें तद्रूप चि मिसळे ।
सखोल भूमीस तुंवळे । सखोलपणें ॥ १७ ॥

विषामधें विष चि होतें । अमृतामधें मिळोन जातें ।
सुगंधीं सुगंध तें । दुर्गंधीं दुर्गंध ॥ १८ ॥

गुणीं अवगुणीं मिळे । ज्याचें त्यापरी निवळे ।
त्या उदकाचा महिमा न कळे । उदकेंविण ॥ १९ ॥

उदक वाहे अपरांपर । न कळे नदी कीं सरोवर ।
जळवास करून नर । राहिले कितीयेक ॥ २० ॥

उगमापैलिकडे गेले । तेथें परतोन पाहिलें ।
तंव तें पाणी च आटलें । कांहीं नाहीं ॥ २१ ॥

वृत्तिशून्य योगेश्वर । याचा पाहावा विचार ।
दास म्हणे वारंवार । किती सांगों ॥ २२ ॥

मायेचें इतकें भव्य आणि भयानक वर्णन दुसरा कोण करूं शकेल ?

## ( दोन ) भ्रामक कल्पना १४×१०

माया दिसे परी नासे । वस्तु न दिसे परी न नासे ।
माया सत्य वाटे परी मिथ्या असे । निरंतर ॥ १४-१०-१ ॥

करंटा पडोनी उताणा । करी नानापरी कल्पना ।
परी तें कांहीं च घडेना । तैसी माया ॥ २ ॥

द्रव्यदारेचें स्वप्नवैभव । नाना विळासें हावभाव ।
क्षणीक वाटे परी माव । तैसी माया ॥ ३ ॥

गगनीं गंधर्वनगरें । दिसताती नाना प्रकारें ।
नाना रूपें नाना विकारें । तैसी माया ॥ ४ ॥

लक्षुमी रायेविनोदाची । बोलतां वाटे साची ।
मिथ्या प्रचित तेथीची । तैसी माया ॥ ५ ॥

दसऱ्याचे सुवर्णाचे लाटे । लोक म्हणती परी ते कांटे ।
परी सर्वत्र राहाटे । तैसी माया ॥ ६ ॥

मेल्याचा मोहोछाव करणें । सतीचें वैभव वाढवणें ।
मसणीं जाउनी रुदन करणें । तैसी माया ॥ ७ ॥

राखेसी म्हणती लक्षुमी । दुसरी भारदोरी लक्षुमी ।
तिसरी नाममात्र लक्षुमी । तैसी माया ॥ ८ ॥

मुळीं बाळविधवा नारी । तिचें नांव जन्मसावित्री ।
कुबेर हिंडे घरोघरीं । तैसी माया ॥ ९ ॥

दश अवतारांतील कृष्णा । उपजे जीर्ण वस्त्राची तृष्णा ।
नदी नामें पीयुष्णा । तैसी माया ॥ १० ॥

बहुरूपांतील रामदेराव । ग्रामस्तांपुढें दाखवी हावभाव ।
कां माहाराज म्हणोनी लाघव । तैसी माया ॥ ११ ॥

देव्हारां असे अनपूर्णा । आणी गृहीं अन्न चि मिळेना ।
नामें सरस्वती सिकेना । शुभावळु ॥ १२ ॥

सुण्यास व्याघ्र नाम ठेविलें । पुत्रास इंद्रनामें पाचारिलें ।
कुरूप परी आळविलें । सुंदरा ऐसें ॥ १३ ॥

मूर्ख नामें सकळकळा । रासभी नामें कोकिळा ।
नातरी डोळसेचा डोळा । फुटका जैसा ॥ १४ ॥

मातांगीचें नाम तुळसी । चर्मिकीचें नाम कासी ।
बोलती अतिशूद्रिणीसी । भागीरथी ऐसें ॥ १५ ॥

साउली आणी अंधकार । येक होतां तेथीचा विचार ।
उगा चि दिसे भासमात्र । तैसी माया ॥ १६ ॥

श्रवण बोटें संधी करतळ । रविरश्मे दिसती इंगळ ।
रम्य आरक्तकल्होळ । तैसी माया ॥ १७ ॥

भगवें वस्त्र देखतां मनाला । वाटे अग्न चि लागला ।
विवंचितां प्रत्ये आला । तैसी माया ॥ १८ ॥

जळीं चरणकरांगुळें । आखुड लांबें किरकोळें ।
विपरीत काणें दिसती जळें । तैसी माया ॥ १९ ॥

भोवंडीनें पृथ्वी कलथली । कामिणीनें पिवळी जाली ।
सन्यपातस्थां अनुभवली । तैसी माया ॥ २० ॥

कोणीयेक पदार्थविकार । उगा चि दिसे भासमात्र ।
अनन्याचा अन्य प्रकार । तैसी माया ॥ २१ ॥

## ( तीन ) कड्यावरील वेल १५×७

पाहातां कोणीयेक वेल । त्याच्या मुळ्या असती खोल ।
पत्रें पुष्पें फळें केवळ । मुळा च पासीं ॥ १५–७–५ ॥

या हि वेगळे नाना रंग । आकार विकार तरंग ।
नाना स्वाद अंतरंग । मुळामध्यें ॥ ६ ॥

तें चि मूळ फोडून पाहातां । कांहीं च नाहीं वाटे आतां ।
पुढें वाढतां वाढतां । दिसों लागे ॥ ७ ॥

कड्यावरी वेल निघाला । अधोमुखें बळें चालिला ।
फांपावोन पुढें आला । भूमंडळीं ॥ ८ ॥

तैसी मूळमाया जाण । पंचभूतें आणी त्रिगुण ।
मुळीं आहेत हें प्रमाण । प्रत्ययें जाणावें ॥ ९ ॥

अखंड वेल पुढें वाढला। नाना विकारीं शोभला।
विकारांचा विकार जाला। असंभाव्य ॥ १० ॥

नाना फडगरें फुटलीं। नाना जुंबाडें वाढलीं।
अनंत अग्रें चालिलीं। सृष्टीमधें ॥ ११ ॥

कित्येक फळें तीं पडती। सवें चि आणीक निघती।
ऐसीं होती आणी जाती। सर्वकाळ ॥ १२ ॥

येक वेल चि वाळले। पुन्हां तेथें चि फुटले।
ऐसे आले आणी गेले। कितीयेक ॥ १३ ॥

पानें झडती आणी फुटती। पुष्पें फळें तेणें चि रीतीं।
मध्यें जीव हे जगती। असंभाव्य ॥ १४ ॥

अवघा वेल चि कर्पतो। मुळापासून पुन्हा होतो।
ऐसा अवघा विचार जो तो। प्रत्यक्ष जाणावा ॥ १५ ॥

मूळ खाणोन काढिलें। प्रत्ययेज्ञानें निर्मूळ केलें।
तरी मग वाढणें चि राहिलें। सकळ कांहीं ॥ १६ ॥

## ( ३ ) ती ब्रह्माच्या ठिकाणीं कशी उद्भवली ?

जैसा गगनीं चालिला पवन। तैसें निश्चळीं जालें चळण।
इछा स्फूर्तिलक्षण। स्फूर्णरूप ॥ १०–१०–१२ ॥

अहंपणें जाणीव जाली। ते चि मूळप्रकृति बोलिली।
महाकारणकाया रचली। ब्रह्मांडीची ॥ १३ ॥

महामाया मूळप्रकृती। कारण ते अव्याकृती।
सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती। विराट ते स्थूळ ॥ १४ ॥

ऐसें पंचीकर्ण शास्त्राप्रमये। ईश्वरतनुचतुष्टये।
म्हणोन हें बोलणें होये। जाणीव मूळमाया ॥ १५ ॥

## ( ४ ) एक ब्रह्म आणि दुसरी माया मधला मी कोण ?

येक मुख्य परमेश्वरु। दुसरी प्रकृति जगदाकारु।
तिसरी आपण कैंचा चोरु। आणिला मधें ॥ ४–२–११ ॥

एक ब्रह्म आणि दुसरी माया, आपण कोण मधले? आपण एक तर ब्रह्मांत मिसळूं किंवा मायेंत मोडूं, निराळे कोठून उरूं? आमचा पंचभूतात्मक देह मायेचा आहे आणि आम्ही ब्रह्माचे आहोंत.

देह तरी पांचा भूतांचा। जीव तरी अंश ब्रह्मींचा।
परमात्मा तरी अनन्याचा। ठाव पाहा ॥ ९-१०-२१ ॥

प्रकृतिनिरासें अवघें चि गेलें। विकारवंत ॥ २६ ॥

उरलें तें निखळ निर्गुण। विवंचितां तें चि आपण।
ऐसी हे परमार्थाची खूण। अगाध आहे ॥ २७ ॥

वेद शास्त्रें पुराणें। नाना साधनें निरूपणें।
सिद्ध साधु ज्याकारणें। नाना सायास करिती ॥ ३० ॥

तें ब्रह्मरूप आपण चि आंगें। सारासारविचारप्रसंगें।
करणें न करणें वाउगें। कांहीं च नाहीं ॥ ३१ ॥

हें च उत्तर निराळ्या शब्दांत आणखी एका ठिकाणीं दिलें आहे :

सकळ देहाचा शोध घेतां। मीपण दिसेना पाहातां।
मीतूंपण हें तत्वता। तत्वीं मावळलें ॥ १२-३-२४ ॥

दृश्य पदार्थ चि वोसरे। तत्वें तत्व तेव्हां सरे।
मीतूंपण हें कैचें उरे। तत्वता वस्तु ॥ २५ ॥

पंचीकर्ण तत्वविवर्ण। माहावाक्यें वस्तु आपण।
निसंगपणें निवेदन। केलें पाहिजे ॥ २६ ॥

देवभक्ताचें मूळ। शोधून पाहातां सकळ।
उपाधीवेगळा केवळ। निरोपाधी आत्मा ॥ २७ ॥

मीपण तें बुडालें। विवेकें वेगळेपण गेलें।
निवृत्तिपदास प्राप्त जालें। उन्मनीपद ॥ २८ ॥

विज्ञानीं राहिलें ज्ञान। ध्येये राहिलें ध्यान।
सकळ कांहीं कार्याकारण। पाहोन सांडिलें ॥ २९ ॥

जन्ममरणाचें चुकलें। पाप अवघें चि बुडालें।
येमयातनेचें जालें। निसंतान ॥ ३० ॥

**निर्वेद अवघा चि तुटला । विचारें मोक्ष प्राप्त जाला ।**
**जन्म सार्थक चि वाटला । सकळ कांहीं ॥ ३१ ॥**

संपलें, मी आतां कोणी निराळा उरलों च नाहीं !

**मी लटिका माझें बोलणें लटिकें । मी लटिका माझें चालणें लटिकें ।**
**मी माझें अवघें चि लटकें । कल्पनिक ॥ ९–२–३७ ॥**

**मज मुळीं च नाहीं ठाव । माझें बोलणें अवघें चि वाव ।**
**हा प्रकृतीचा स्वभाव । प्रकृती लटिकी ॥ ३८ ॥**

**प्रकृति आणि पुरुष । यां दोहींस जेथें निरास ।**
**तेथें मीपण विशेष । हें केवि घडे ॥ ३९ ॥**

## ( ५ ) अशा स्थितींत माझें कर्तव्य काय ?

ब्रह्म समजलें, मायेचा पत्ता लागला, मी कोण तें कळलें, अशा स्थितींत आतां माझें कर्तव्य काय, तेवढें कृपा करून सांगा, म्हणजे त्या कर्तव्याच्या पाठीमागें लागतों.

प्रत्ययज्ञानी जे श्रीसमर्थ त्यांच्या हृदयाशीं समरस होऊन जाणें, एवढें च आतां तुझें काम उरलें !

**अधोमुखें भेद वाढतो । ऊर्धमुखें भेद तुटतो ।**
**निःसंगपणें निर्गुणी तो । माहांयोगी ॥ २०–४–२२ ॥**

**माया मिथ्या ऐसी कळली । तरी मग भीड कां लागली ।**
**मायेचे भिडेनें घसरली । स्वरूपस्थिती ॥ २३ ॥**

**लटकें मायेनें दपटावें । सत्य परब्रह्म सांडावें ।**
**मुख्य निश्चयें हिंडावें । कासयासी ॥ २४ ॥**

**पृथ्वीमधें बहुत जन । त्यामध्यें असती सज्जन ।**
**परी साधूस वोळखतो कोण । साधुवेगळा ॥ २५ ॥**

श्रीसमर्थहृदय जाणावयाचें तर स्वतः समर्थ च झालें पाहिजे !

**म्हणौन संसार सांडावा । मग साधूचा शोध घ्यावा ।**
**फिरफिरों ठाईं पाडावा । साधुजन ॥ २६ ॥**

उद्दंड हुडकावे संत । सांपडे प्रचीतीचा महंत ।
प्रचीतीविण स्वहित । होणार नाहीं ॥ २७ ॥

प्रपंच अथवा परमार्थ । प्रचीतीविण अवघें वेर्थ ।
प्रत्ययेज्ञानी तो समर्थ । सकळांमध्यें ॥ २८ ॥

रात्रदिवस पाहावा अर्थ । अर्थ पाहेल तो समर्थ ।
परलोकींचा निजस्वार्थ । तेथें चि घडे ॥ २९ ॥

म्हणौन पाहिलें च पाहावें । आणि शोधिलें चि शोधावें ।
अवघें कळतां स्वभावें । संदेह तुटती ॥ ३० ॥

## (५) ब्रह्मांडाची उभारणी आणि संहारणी

हा विषय ग्रन्थराजांत ९ × ६, १० × २, १० × ३, १० × ४, १० × ५, १० × ९, ११ × १, १२ × ६, १३ × ३, १३ × ४, १३ × ५, १५ × ४, १७ × २, २० × २, २० × ३ इत्यादि ठिकाणीं आला आहे. पैकीं एका ठिकाणचा तरी येथें पाहिला पाहिजे. जो एका ठिकाणचा तो च सर्व ठिकाणचा. शिवाय पूर्वींच्या कांहीं प्रकरणांत हि तो आला आहे.

### १२ × ६

ब्रह्म निर्मळ निश्चळ । शाश्वत सार अमळ विमळ ।
अवकाश घन पोकळ । गगना ऐसें ॥ १२–६–१ ॥

तयास करणें ना धरणें । तयास जन्म ना मरणें ।
तेथें जाणणें ना नेणणें । शून्यातीत ॥ २ ॥

तें रचेना ना खचेना । तें होयेना ना जायेना ।
मायातीत निरंजना । पार चि नाहीं ॥ ३ ॥

पुढें संकल्प उठिला । षड्गुणेश्वर बोलिजे त्याला ।
अर्धनारीनटेश्वराला । बोलिजेतें ॥ ४ ॥

सर्वेश्वर सर्वज्ञ । साक्षी द्रष्टा ज्ञानघन ।
परेश परमात्मा जगजीवन । मूळपुरुष ॥ ५ ॥

ते मूळमाया बहुगुणी । अधोमुखें गुणक्षोभिणी ।
गुणत्रये तिजपासूनि । निर्माण जाले ॥ ६ ॥

पुढें विष्णु जाला निर्माण । जाणतीकळा सत्वगुण ।
जो करिताहे पाळण । त्रैलोक्याचें ॥ ७ ॥

पुढें जाणीवनेणीवमिश्रित । ब्रह्मा जाणावा नेमस्त ।
त्याच्या गुणें उत्पत्ति होत । भुवनत्रैं ॥ ८ ॥

पुढें रुद्र तमोगुण । सकळ संव्हाराचें कारण
सकळ कांहीं कर्तेपण । तेथें चि आलें ॥ ९ ॥

तेथून पुढें पंचभूतें । पावलीं पष्ट दशेतें ।
अष्टधा प्रकृतीचें स्वरूप तें । मुळीं च आहे ॥ १० ॥

निश्चळीं जालें चळण । तें चि वायोचें लक्षण ।
पंचभूतें आणि त्रिगुण । सूक्ष्म अष्टधा ॥ ११ ॥

आकाश म्हणिजे अंतरात्मा । प्रत्ययें पाहावा महिमा ।
त्या आकाशापासून जन्मा । वायो आला ॥ १२ ॥

तया वायोच्या दोनी झुळुका । उष्ण सीतळ ऐका ।
सीतळापासून तारा मयंका । जन्म जाला ॥ १३ ॥

उष्णापासून रवि वन्ही । विद्युल्यता आदिकरूनि ।
सीतळ उष्ण मिळोनि । तेज जाणावें ॥ १४ ॥

तया तेजापासून जालें आप । आप आळोन पृथ्वीचें रूप ।
पुढें औषधी अमूप । निर्माण जाल्या ॥ १५ ॥

औषधीपासून नाना रस । नाना बीज अन्नरस ।
चौऱ्यासी लक्ष योनीचा वास । भूमंडळीं ॥ १६ ॥

ऐसी जाली सृष्टिरचना । विचार आणिला पाहिजे मना ।
प्रत्ययेंविण अनुमाना । पात्र होइजे ॥ १७ ॥

ऐसा जाला आकार । येणें चि न्यायें संव्हार ।
सारासार विचार । यास बोलिजे ॥ १८ ॥

**जें जें जेथून निर्माण जालें । तें तें तेथें चि निमालें ।**
**येणें चि न्यायें संव्हारलें । माहाप्रळंईं ॥ १९ ॥**

वरील सर्व ठिकाणांच्या आधारानें ब्रह्मांडाच्या उभारणीचा क्रम मांडून दाखवितां येतो तो असा—

**ब्रह्म**—त्या निश्चळ ब्रह्माच्या ठिकाणीं स्मरण चेतलें किंवा चळण झालें ती **मूळ माया,** तिच्यांत पंचभूतें आणि त्रिगुण गुप्त रूपानें असतात, ती मुख्यतः वायुरूप आहे, तिला च अंतरात्मा, ईश्वर, परमात्मा, अर्धनारीनटेश्वर, द्रष्टा, साक्षी, शिवशक्ति, आदिशक्ति, इत्यादि नांवें दिलेलीं आढळतात, इतकीं कीं, तिच्या नांवांत आणि परब्रह्माच्या नांवांत अगदीं साम्य आढळून आपला घोंटाळा होतो, ( १०×१० त आलेलीं मायेचीं नांवें व ७×२ तील परब्रह्माचीं नांवें पहावीं ), संदर्भावरून च ओळखावें लागतें – **गुणक्षोभिणी** – **त्रिगुण** म्हणजे पालनकर्ता जाणीवरूप सत्त्वगुणी विष्णु, उत्पत्तिकर्ता जाणीवनेणीवमिश्रित रजोगुणी ब्रह्मा आणि संहारकर्ता नेणीवरूप तमोगुणी रुद्र – शब्दगुण **आकाश,** त्याला च अंतरात्मा हि म्हटलें आहे – **वायु** – **तेज** – **आप** – **पृथ्वी** – **औषधी** वगैरे.

ही झाली उभारणी, याची च उलट क्रमांत संहारणी होते.

**जें जें जेथें निर्माण होतें । तें तें तेथें लया जातें ॥ १५-४-२२ ॥**

या उभारणीचा विचार केला म्हणजे असें दिसतें, मूळमायेंत च जर पंच भूतें आणि त्रिगुण आहेत, तर मग हा क्रम अकारण कां लावला? अशा अर्थाच्या श्रीसमर्थांच्या हि दोन ओव्या आहेत. याचा अर्थ इतका च कीं मूळमायेंत पंचभूतें आणि त्रिगुण गुप्त, सूक्ष्मरूपानें असतात तीं पुढें जडरूपानें प्रकट होतात.

**येकापासून एक जालें । हें येक उगें चि दिसोन आलें ।**
**स्वरूप मुळीं च भासलें । त्रिगुणभूतांचें ॥ ९-६-१४ ॥**

**ऐसा हा मुळींचा कर्दमु । पुढें पष्टतेचा अनुक्रमु ।**
**सांगतां येकापासून येक उगमु । हें हि खरें ॥ १५ ॥**

या एकंदर उभारणींत त्रिगुणांचा च पराक्रम विशेष दिसतो. साऱ्या जगांत या त्रिगुणांनीं च सारखा हुतुतु घातलेला आढळतो. चालू घटकेची जगाची स्थिति पहा, पौराणिक किंबहुना वेदकाळापासूनची स्थिति आठवा, भावी स्थितीची कल्पना करा, तुम्हांस असें दिसून येईल कीं, तेराव्या दशकाच्या पांचव्या समासांत या त्रिगुणांच्या खेळाला श्रीसमर्थांनीं जें काहाणीचें रूप दिलें आहे, त्या काहाणींत जगाच्या उत्पत्तीपासून अंतापर्यंतचा इतिहास भरला आहे. हा ईश्वरानें लिहून ठेवलेला इतिहास आहे. त्या इतिहासाच्या सारख्या आवृत्त्या निघत आहेत. आजपर्यंत कितीतरी निघाल्या व पुढें निघत च राहणार आहेत. त्या इतिहासाचें आपण चिंतन केलें पाहिजे, ती काहाणी ऐकली पाहिजे, ऐकून स्वतःच्या ठिकाणीं जागृत होऊन बोध घेतला पाहिजे. आधीं कृपा करून लक्षपूर्वक काहाणी ऐका, मग बोध पाहूं.

या काहाणींतील स्त्रीपुरुषें म्हणजे, प्रकृतिपुरुष, त्यांचा पुत्र म्हणजे सत्वगुणात्मक जाणीवरूप प्रतिपालक विष्णु, नातु म्हणजे रजोगुणी जाणीवनेणीवमिश्रित उत्पत्तिकर्ता ब्रह्मा आणि पणतु म्हणजे तमोगुणी नेणीवरूप संहारकर्ता शंकर, हीं नातीं लक्ष्यांत घेऊन आतां काहाणी ऐका :

## काहाणी १३ × ५

**कोणी येक दोघे जण । पृथ्वी फिरती उदासीन ।**
**काळक्रमणें लागून । कथा आरंभिली ॥ १ ॥**

**श्रोता पुसे वक्तयासी । काहाणी सांगा जी बरवीसी ।**
**वक्ता म्हणे श्रोतयासी । सावध ऐकें ॥ २ ॥**

**येकें स्त्रीपुरुषें होतीं । उभयेतांमधें बहु प्रीति ।**
**येकरूपें चि वर्तती । भिन्न नाहीं ॥ ३ ॥**

**ऐसा कांहीं येक काळ लोटला । तयांस येक पुत्र जाला ।**
**कार्यकर्ता आणि भला । सर्वविषीं ॥ ४ ॥**

**पुढें त्यास हि जाला कुमर । तो पित्याहून आतुर ।**
**कांहीं तदर्ध चतुर । व्यापकपणें ॥ ५ ॥**

तेणें व्याप उदंड केला । बहुत कन्यापुत्र व्याला ।
उदंड लोक संचिला । नाना प्रकारें ॥ ६ ॥

त्याचा पुत्र जेष्ठ । तो अज्ञान आणि रागिट ।
अथवा चुकतां नीट । संव्हार करी ॥ ७ ॥

पिता उगा च बैसला । लेकें बहुत व्याप केला ।
सर्वज्ञ जाणता भला । जेष्ठ पुत्र ॥ ८ ॥

नातु त्याचें अर्ध जाणे । पणतु तो कांहीं च नेणे ।
चुकतां संव्हारणें । माहा क्रोधी ॥ ९ ॥

लेंक सकळांचें पाळण करी । नातु मेळवी वरिचावरी ।
पणतु चुकल्या संव्हार करी । अकस्मात ॥ १० ॥

नेमस्तपणें वंश वाढला । विस्तार उदंड चि जाला ।
ऐसा बहुत काळ गेला । आनंदरूप ॥ ११ ॥

विस्तार वाढला गणवेना । वडिलांस कोणी च मानीना ।
परस्परें कित मना । बहुत पडिला ॥ १२ ॥

उदंड घरकलहो लागला । तेणें कित्येक संव्हार जाला ।
विपट पडिलें थोरथोरांला । बेबंद जालें ॥ १३ ॥

नेणपणें भरीं भरले । मग ते अवघे च संव्हारले ।
जैसे यादव निमाले । उन्मत्तपणें ॥ १४ ॥

बाप लेंक नातु पणतु । सकळांचा जाला निपातु ।
कन्या पुत्र हेतु मातु । अणुमात्र नाहीं ॥ १५ ॥

ऐसी काहाणी जो विवरला । तो जन्मापासून सुटला ।
श्रोता वक्ता धन्य जाला । प्रचितीनें ॥ १६ ॥

ऐसी काहाणी अपूर्व जे ते । उदंड वेळ होत जाते ।
इतुकें बोलोन गोसावी ते । निवांत जाले ॥ १७ ॥

असा हा इतिहास युगायुगाचे ठायीं घडत आहे. त्यांत प्रत्येकाच्या वांट्याला जें काम नियोजित असेल तें त्यानें पार पाडलें च पाहिजे. पण तसें करीत असतां हि या कलहांत शाश्वत अशी जी एक वस्तु आहे, ती

ओळखून तिचें प्रत्येकानें सारखें अनुसंधान राखलें पाहिजे. असें अनुसंधान जो ठेवील, तो च तेवढा शहाणा, जाणता, मुक्त होय.

**आद्य मध्य अवसान । जें शाश्वत निरंजन ।**
**तेथें लावावें अनुसंधान । जाणते पुरुषीं ॥ १२–६–२० ॥**

या काहाणीपासून हा बोध प्रत्येकानें घ्यावा.

## ( ६ ) पंचीकरण

### ( १ ) सूक्ष्मदेह

५ × ५ = २५

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अंतःकरणपंचक | = | अंतःकरण | मन | बुद्धि | चित्त | अहंकार | आकाशाचे गुण |
| प्राणपंचक | = | व्यान | समान | उदान | अपान | प्राण | वायूचे गुण |
| ज्ञानेंद्रियपंचक | = | श्रोत्र | त्वचा | चक्षु | जिव्हा | नासिक | तेजाचे गुण |
| कर्मेंद्रियपंचक | = | वाचा | पाणी | पाद | शिस्न | गुद | आपाचे गुण |
| विषयपंचक | = | शब्द | स्पर्श | रूप | रस | गंध | पृथ्वीचे गुण |

| | आकाश | वायु | तेज | आप | पृथ्वी |
|---|---|---|---|---|---|
| ( २ ) स्थूल देह ५ × ५ = २५ | काम | चळण | क्षुधा | शुक्लीत | अस्थि |
| | क्रोध | वळण | तृषा | श्रोणीत | मांस |
| | शोक | प्रासारण | आलस्य | लाळ | त्वचा |
| | मोह | निरोध | निद्रा | मूत्र | नाडी |
| | भय | अकोचन | मैथुन | स्वेद | रोम |

( ३ ) कारण देह = अज्ञान

( ४ ) महाकारण देह = ज्ञान

हे चार देह पिंडाचे व हिरण्यगर्भ, विराट, अव्याकृत आणि मूळप्रकृति हे चार देह ब्रह्मांडाचे होत. मिळून अष्ट देह.

## पिंडाच्या देहांचीं तत्त्वें

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ४ देह | = स्थूल | सूक्ष्म | कारण | महाकारण |
| ४ अवस्था | = जागृति | स्वप्न | सुषुप्ति | तुर्या |
| ४ अभिमान | = विश्व | तैजस | प्राज्ञ | प्रत्यगात्मा |
| ४ स्थानें | = नेत्र | कंठ | हृदय | मूर्धन् |
| ४ भोग | = स्थूल | प्रविविक्त | आनंद | आनंदावभास |
| ४ मात्रा | = अकार | उकार | मकार | अर्धमात्रा |
| ४ गुण | = तम | रज | सत्त्व | शुद्धसत्त्व |
| ४ शक्ति | = क्रिया | द्रव्य | इच्छा | ज्ञान |

**ऐसीं हे बत्तिस तत्वें । दोहीचीं पन्नास तत्वें ।**
**अवघीं मिळोन ब्यासि तत्वें । अज्ञान आणि ज्ञान ॥ १७-९-७ ॥**

हा विषय अष्टाक्षरी लघु काव्यांपैकीं पंचीकरणयोगांत पूर्वीं किंचित् येऊन गेला आहे. हा विषय ग्रन्थराजाच्या सतराव्या दशकाच्या आठव्या आणि नवव्या समासांत आला आहे, व त्यांच्या च आधारें, श्रीसमर्थांच्या आज्ञेप्रमाणें वरील कोठे केले आहेत. आठव्या समासाचें नांव 'तत्वनिरूपण' दिलेलें आहे, परंतु प्रत्यक्ष समासांत शेवटून दुसऱ्या म्हणजे ३३ व्या ओवींत ' इति श्री पंचीकर्ण ' असें च म्हटलेलें आहे.

हे कोठे पाहून कांहीं **शंका** उद्भवतात.

**पहिली शंका**—सूक्ष्म देहांत पृथ्वीच्या रूपांत प्राणपंचकापैकीं ' प्राण ' याला स्थान दिलें आहे, त्याऐवजीं त्या जागीं ' अपान ' घेऊन प्राणाला आपाच्या रूपांत घेणें योग्य होणार नाहीं काय ?

**दुसरी शंका**—बत्तीस तत्त्वांत स्थूळ, सूक्ष्म आणि कारण या तीन देहांच्या वांट्याला तम, रज आणि सत्त्व असे तीन गुण येतात, ते रज, सत्त्व आणि तम या क्रमांत असणें सयुक्तिक होणार नाहीं काय ?

**तिसरी शंका**—बत्तीस तत्त्वांत कारणदेहाच्या वांट्याला इच्छाशक्ति येते व सूक्ष्मदेहाच्या वांट्याला द्रव्यशक्ति जाते, तो क्रम उलटा करून

कारणाच्या वांट्याला द्रव्य व सूक्ष्माच्या वांट्याला इच्छा देणें इष्ट होणार नाहीं काय?

**तिन्ही शंकांचें समाधान**—देहांचे घटक देतांना त्यांचा क्रम लक्ष्यांत न घेतल्यामुळें शंका येण्याला जागा झाली आहे, इतकें च. उदाहरणार्थ, आठव्या समासांत व्यान, समान, उदान, अपान आणि प्राण असा प्राणपंचकाचा क्रम दिला असला, तरी लागलीं च पुढच्या च नवव्या समासांत व्यान, समान, उदान, प्राण आणि अपान असा क्रम दिला आहे. यावरून हें स्पष्ट होतें कीं, तत्त्वांचा उल्लेख श्रीसमर्थांनीं क्रमांत च केला आहे, असें नव्हे. हें जें आपण आपलें समाधान करून घेत आहोंत त्याला आपणांस श्रीसमर्थांचा च प्रत्यंतर आधार मिळत आहे. तडवळेमठांतील १६१ व २१९, आपचंदमठांतील ११८४ व येक्केहाळीमठांतील १०६७ व १११६ या बाडांकांत "श्रीरामदासकृत पंचीकरण" म्हणून प्रकरण आहे, त्यांपैकीं कांहीं बाडांत प्राणपंचकाचा क्रम व्यान, प्राण, उदान, समान आणि अपान असा दिला आहे व इतर हि ज्या शंका वर घेण्यांत आल्या आहेत त्यांना पोषक असा च गुणांचा आणि शक्तींचा क्रम दिला आहे. वरील कोठे आपण त्या दोन समासांना अनुसरून केले आहेत, त्यांत वरील समाधानानुसार फरक करण्यास हरकत नाहीं.

**आणखी एक शंका**—चारी देहांचीं बत्तीस तत्त्वें सांगतांना त्या बत्तिसांत चार देहांची गणना न करतां चत्वार वाणींचा समावेश करणें इष्ट होणार नाहीं काय? या शंकेचा पाठपुरावा करण्याला ग्रन्थराजाच्या पूर्वप्रकाशित कांहीं प्रतींचा आधार घेण्यांत येत असतो. त्या कांहीं प्रतींत ९ व्या समासांतील ६ व्या ओवीनंतर

**परा पश्यंती मध्यमा वैखरी। चौ देहांच्या वाचा चारी।**
**सूक्ष्म दृष्टीनें विवरी। धन्य तो साधु॥**

अशी ७ वी ओवी आढळते. मला वाचकांनीं क्षमा करावी, पण या पूर्व-प्रकाशकांचें प्रकाशन पाहून माझ्या अंगावर शहारे येत असतात. तें प्रकाशन, डोळे मिटून मान्य करण्यास मी तयार नसतों. ८ व्या समासाच्या

आरंभीं चारी वाणींचा श्रीसमर्थांनीं उल्लेख केला आहे. तेवढा पुरे आहे. ग्रन्थराजाच्या मूळ प्रतींत किंवा श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत निरनिराळ्या मठांतील आणि शकांतील ज्या सतरा हस्तलिखित प्रती आहेत, त्यांपैकीं कोणत्या हि प्रतींत ही ओवी नाहीं. ती ओवी म्हणजे कोणा तरी प्रकाशकाची करामत होय. ती त्याज्य मानली पाहिजे. श्रीसमर्थकृत पंचीकरणांत हि बत्तीस तत्त्वांत वाणींना स्थान दिलेलें नाहीं. अर्थात् श्रीसमर्थांच्या मतें ही शंका अस्थानीं होय.

या शंका केवळ शाब्दिक आणि विद्वत्तेच्या आहेत, अनुभवाच्या नाहींत. मुख्य मुद्दा घटकांचा नसून पिंडाचे चार व ब्रह्मांडाचे चार, अशा अष्ट देहांचें साधकानें विवेकानें निरसन करावें, हा आहे. तिकडे साधकांचें लक्ष असावें!

**पहिला देह स्थूळकाया। आठवा देह मूळमाया।**
**अष्ट देह निर्शलियां। विकार कैंचा ॥ ११-४-११ ॥**

अष्ट देह समजून घेऊन त्यांचा निरास करतां येईल तर च परब्रह्मीं अनन्य आत्मनिवेदन घडणार आहे! पंचप्रळयांची वाट न पाहतां विवेकप्रळय साधला पाहिजे. त्या प्रयत्नाला लागावें.

**विचारें चौदेहावेगळें केलें। मीपण तत्वांसरिसें गेलें।**
**अनन्य आत्मनिवेदन जालें। परब्रह्मीं ॥ १७-८-३१ ॥**
**विवेकें चुकला जन्ममृत्य। नरदेहीं साधिलें महत्कृत्य।**
**भक्तियोगें कृत्यकृत्य। सार्थक जालें ॥ ३२ ॥**

## (७) अंतरात्मा

**आत्मा जगज्जोती सर्वज्ञपण। तिनी मिळोन येक चि जाण।**
**अंतःकरण चि प्रमाण। ज्ञप्तिमात्र ॥ १०–१०–३३ ॥**

(१) श्रीसमर्थवाङ्मयांत हा अत्यंत महत्त्वाचा विषय आहे. सबंध श्रीसमर्थवाङ्मय अवलोकन करून ज्याचें अंतरात्म्याकडे लक्ष वेधलें नाहीं, तो समुद्रांत बुडून कोरडा बाहेर पडला, असें समजावें. श्रीसमर्थवाङ्मयाच्या अभ्यासकाला मी एक च विनंति करीन, अंतरात्मा समजून घ्या आणि मला समजावून द्या. मला असें म्हणावेंसें वाटतें, अंतरात्मा म्हणजे

श्रीसमर्थहृदय च! ज्याला श्रीसमर्थहृदयाचा ठाव घ्यावयाचा असेल, त्यानें अंतरात्म्याचा विचार करावा. अंतरात्मा समजणार नाहीं तर श्रीसमर्थ-हृदयाचा ठाव लागणार नाहीं! मोठा च बिकट प्रसंग आहे. विषय कठीण आहे. आणि श्रीसमर्थहृदयाचा ठाव लागणें तरी कोठें सोपें आहे? त्यांची कृपा भाकीत प्रयत्न करावयाचा आहे.

(२) श्रीमत् दासबोधाची पहिली आवृत्ति जी एकवीससमासी तींत अंतरात्मा शब्द हि आला नाहीं. दुसरी आवृत्ति म्हणजे पहिले सहा दशक, तींत हि अंतरात्मा नाहीं. सातव्या दशकाला आपण स्वतंत्र तिसरी आवृत्ति मानतों, पण तींत हि अंतरात्मा नाहीं! हें आश्चर्य नव्हे? आठव्या दशकांत त्याचा एकदा उल्लेख आला आहे :

**म्हणोनि जग मिथ्या साच आत्मा। सर्वांपर जो परमात्मा।**
**अंतर्बाह्य अंतरात्मा। व्यापूनि असे ॥ ८-१-४४ ॥**

**तयास म्हणावें देव। येर हें अवघें चि वाव।**
**ऐसा आहे अंतर्भाव। वेदांतीचा ॥ ४५ ॥**

पुन्हां नवव्यांत अंतरात्मा नाहीं. पण नंतर दहाव्या दशकापासून तों शेवटच्या विसाव्या दशकापर्यंत अंतरात्म्याशिवाय प्रतिपाद्य दुसरा विषय च नाहीं, असें म्हटलें तरी चालेल! दशक १० ते २० हा स्वतंत्र ग्रन्थ कल्पून त्याचें नांव ' अंतरात्मा ' ठेवलें, तरी शोभेल, इतके ते अकरा हि दशक अंतरात्म्यानें व्यापिले आहेत ! पहिल्या तीन आवृत्तींत अंतरात्मा कां नाहीं व पुढें तो श्रीसमर्थांना सोडून क्षणभर हि दूर झाला नाहीं, असें कां, हें माझ्या चांगलेंसें लक्ष्यांत येत नाहीं. एक कारण वाटतें. दासबोधाचा उत्तरार्ध स्फुट समासांचा बनला आहे. स्फुट समासांत श्रीसमर्थांना लोकांच्या जीवनाच्या बहुविध अंगांचा विचार करावा लागे. कोणी हि एकटा जीव आपल्या खोलींत बसून जगाच्या लक्ष्यांत हि न येऊं देतां, आपल्या एकट्याचें कल्याण करून घेईल, देव आपलासा करून घेईल, समाधानानें जगूं शकेल आणि मरूं शकेल. श्रीसमर्थांना जगांत येऊन जगाचें इहपरलोकीं कल्याण साधून द्यावयाचें होतें. म्हणून त्यांना अंतरात्म्याचें स्वरूप विशद करून जगाला आत्मकल्याणाचा मार्ग दाखवावा लागला असेल.

(३) अंतरात्मा म्हणजे काय व त्याचें ज्ञान इहपरलोकीं आपल्या कल्याणाचें साधन कसें आहे, याचा आतां विचार करावयाचा.

**मुळीं मुळींचें स्फुरण। हें चि अंतरात्म्याचें लक्षण ॥ १६-७-४ ॥**

अशी अंतरात्म्याची व्याख्या आढळते. अंतरात्मा म्हणजे अहं ब्रह्मास्मि। एकोऽहं बहुः स्याम्। हें निर्गुण ब्रह्माचे ठिकाणीं चेतलेलें स्मरण किंवा झालेलें पहिलें स्फुरण होय. मूळमाया ती ती च. हा अंतरात्मा अनेक नांवांनीं ओळखला जातो. जीवात्मा, शिवात्मा, परमात्मा, जगदात्मा, विश्वात्मा, गुप्तात्मा, नादरूप, ज्योतिरूप, साक्षरूप, सत्तारूप, चैतन्यरूप, सस्वरूप, द्रष्टा, नरोत्तमु, वीरोत्तमु, पुरुषोत्तमु, रघोत्तमु, सर्वोत्तमु, उत्तमोत्तमु, ज्ञानात्मा, षड्गुणेश्वर, जगदीश्वर, शिवशक्ति, क्षेत्रज्ञ, कूटस्थ, शुद्धसत्त्व, महत्तत्त्व, महद्भूत, जगज्जोती, जाणती कळा, देव, भगवंत, नारायण, परमेश्वर इत्यादि त्याचीं अनेक नांवें असलीं, तरी आपण गोंधळून जाण्याचें कारण नाहीं. निर्गुणीं स्मरण चेतलें। मुळीं मुळींचें स्फुरण। ती मूळमाया आणि तो च अंतरात्मा ही खूणगांठ आपण पक्की ध्यानांत ठेवावी. त्या अंतरात्म्याचे घटक दोन: वायु आणि जाणीव, म्हणजेच प्रकृति आणि पुरुष. तो अंतरात्मा सूक्ष्मरूपांत असतो. पुढचा सारा पसारा तदंगभूत होय. पंचभूतें आणि त्रिगुण त्याच्या पोटांत च असतात. त्याला केव्हां केव्हां पांचवें भूत म्हणजे आकाश हि म्हटलें जातें. पहिलें स्फुरण झालें आणि मग पुढचें सारें दृश्यादृश्य कर्तृत्व त्या स्फुरणाचें म्हणजे अंतरात्म्याचें. त्यानें च हें विश्वाचें चक्र प्रवर्तित केलें आहे. तो चंचल आहे, ब्रह्म निश्चल आहे. तो विकार आहे, ब्रह्म निर्विकार आहे. तो

**युगानुयुगें येकटा येक। चालवितो तिनी लोक ॥ १७-३-१२ ॥**

**युगानुयुगें तिन्ही लोक। येक चि चालवी अनेक।**
**हा निश्चयाचा विवेक। वेदशास्त्रीं पाहावा ॥ १८-८-२ ॥**

आज काल च नव्हे, तर युगायुगाचे ठायीं हा च विश्वाचीं सूत्रें चालविता झाला! रामरावणाचें युद्ध याचा च खेळ होता. कृष्णलीलांत याचा च हात होता. तो जो पूर्वीच्या तीन युगांत होता तोच आज हि चालू युगांत आहे. सिंध प्रांतांत मोहनजो डेरो येथें उत्खननानें उघडकीस आलेल्या त्या प्रचंड घरांत

आणि खोल्यांत हजारों वर्षांमागें जीं कुटुंबें नांदलीं त्यांच्या जीवनाचा चालक आणि सुखदु:खाचा साक्षी त्या वेळीं जो अंतरात्मा होता, त्यानें च आज हि जगांत खणाखणी आणि दणादणी चालविली आहे आणि मोडतोड मांडली आहे. फार काय सांगावें, हें जें कांहीं कागदावर लिहिलें जात आहे, तें मी म्हणजे तो च लिहीत आहे. माझेंचसें असें नाहीं. तुम्हां आम्हां सर्वांच्या, फार काय, प्राणिमात्राच्या सर्व क्रियांचा चालक तो आहे.

**सकळ चाळिता येक। अंतरात्मा वर्तवी अनेक।**
**मुंगीपासून ब्रह्मादिक। तेणें चि चालती ॥ १०–१०–३५ ॥**

**तो अंतरात्मा आहे कैसा। प्रस्तुत वोळखाना आमासा।**
**नाना प्रकारींचा तमासा। येथें चि आहे ॥ ३६ ॥**

**तो कळतो परी दिसेना। प्रचित येते परी भासेना।**
**शरीरीं असे परी वसेना। येके ठाईं ॥ ३७ ॥**

**तीक्षणपणें गगनीं भरे। सरोवर देखतां च पसरे।**
**पदार्थ लक्षून उरे। चहुंकडे ॥ ३८ ॥**

**जैसा पदार्थ दृष्टीस दिसतो। तो त्यासारिखा चि होतो।**
**वायोहूनि विषेश तो। चंचळविषईं ॥ ३९ ॥**

**कित्येक दृष्टीनें देखे। कितीयेक रसनेनें चाखे।**
**कितीयेक ते वोळखे। मनेंकरूनि ॥ ४० ॥**

**श्रोत्रीं बैसोन शब्द ऐकतो। घ्राणेंद्रियें वास घेतो।**
**त्वचेइंद्रियें जाणतो। सीतोष्णादिक ॥ ४१ ॥**

**ऐशा जाणे अंतर्कळा। सकळांमध्यें परी निराळा।**
**पाहातां त्याची अगाध लीळा। तो चि जाणे ॥ ४२ ॥**

( ४ ) याप्रमाणें सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणीं तो एकटा एक च आहे – समस्तांमध्यें जीवेश्वरें। वस्ति कीजे ॥ १५-८-५ ॥ – तर मग जगांत भेदाभेद कां माजलेला दिसावा ?

**येक चि जगाचा जिव्हाळा। परी देहलोभाचा आडताळा।**
**देहसमंधें वेगळा। अभिमान धरी ॥ ११-९-१६ ॥**

**देहप्रकृतीनें जाला । भिन्न भिन्न ॥ १४-८-९ ॥**

**शरीरभेदें आहारभेदें । वाचाभेदें गुणभेदें ॥**
**अंतरीं वसिजे अभेदें । येकरूपें ॥ १५-८-१२ ॥**

मूळचा अभेद अंतरात्मा देहादिपरत्वें भेद धरतो. परंतु जाणीवरूपानें तो एकटा एक च जगांत वावरतो. तो दुष्टामध्यें दुष्ट आणि सुष्टामध्यें सुष्ट होतो.

**दुर्जन प्राणी त्यांतील देव । त्याचा लाताड स्वभाव ।**
**रागास आला जरी राव । तरी तंडों नये कीं ॥ १४-८-१६ ॥**

जाणत्यानें हें ओळखून सर्वांशीं वागलें पाहिजे. देहसंबंधामुळें लोक विपरीत वर्तन करितात. पण आपण जर अंतरात्मा ओळखत असूं, तर आपण क्षमाशील च असलें पाहिजे.

**आत्मत्वीं दिसतो भेद । हा अवघा चि देहसमंध ।**
**येका जीवनें नाना स्वाद । औषधीभेदें ॥ १४-८-१८ ॥**

**गरळ आणि अमृत जालें । परी आपपण नाहीं गेलें ।**
**साक्षत्वें आत्मयास पाहिलें । पाहिजे तैसें ॥ १९ ॥**

आत्म्याची ज्याला ओळख पटली असा पुरुष वर्दळीवर कधीं येणार नाहीं. दुष्टाला देखील ताळ्यावर आणण्याची तो वाट पाहील.

**अंतरनिष्ठ जो पुरुष । तो अंतरनिष्ठेनें विशेष ।**
**जगामधें जो जगदीश । तो तयास वोळखे ॥ २० ॥**

(५) अंतरात्मा म्हणजे मूळप्रकृति. पिंडाचा चौथा देह महाकारण व ब्रह्मांडाचा चौथा देह मूळप्रकृति. दोन्ही एक च, म्हणजे ज्ञान किंवा जाणीव. ही जाणीव ज्या प्रमाणांत ज्यापाशीं असते, त्या प्रमाणांत तो मोठा, अवतारी, ईश्वराच्या जवळ गेलेला होय.

**विवेकें बहुत पैसावले । म्हणौन अवतारी बोलिले ॥ १५-३-५ ॥**

किंवा **देहेसामर्थ्यानुसार । सकळ करी जगदेश्वर ।**
**थोर सामर्थ्यें अवतार । बोलिजेती ॥ २०-८-२१ ॥**

तेव्हां मनुष्यानें आपल्या ठिकाणचा अंतरात्मा चेतविला पाहिजे. ज्या व्यक्तीचा, समाजाचा, राष्ट्राचा अंतरात्मा सदा जागृत, ती व्यक्ति, तो समाज, तें राष्ट्र भाग्यवान् होय.

**जेथें उदंड जाणीव । ते चि तितुके सदेव ।**
**थोडे जाणीवेनें नदेंव । होती लोक ॥ १५–३–६ ॥**

सदेव आणि नदेंव म्हणजे सदैव आणि निर्दैव म्हणजे भाग्यवान् आणि अभागी.

**व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती ।**
**तेणें प्राणी सदेव होती । देखतदेखतां ॥ ७ ॥**

आपण पाहातों, आपल्या डोळ्यांदेखत, व्यक्ति आणि राष्ट्रें प्रयत्नानें वैभवाचें शिखर गांठतात आणि मूर्ख लोक नुसते पाहात च राहतात.

**ऐसें हें आतां वर्ततें । मूर्ख लोकांस कळेना तें ।**
परंतु **विवेकी मनुष्य समजतें । सकळ कांहीं ॥ ८ ॥**

जागृत अंतरात्मा, त्याची उपासना, ज्ञान, जाणीव, विवेक, व्याप, प्रयत्न हीं भाग्याचीं कारणें होत.

( ६ ) अंतरात्मा वायुस्वरूप आहे व देवाचे रामकृष्णादि जे अनेक अवतार झाले त्या सर्वांचें मूळ अंतरात्मा च होय. वायुरूपांत देव, देवता, देवतें, भूतें संचार करीत असतात, हें आपण, श्रीसमर्थांच्या मतांचा आणि विश्वासाचा मागें विचार केला, तेव्हां पाहिलें च आहे. ब्रह्मा, विष्णु, महेश आणि त्यांचे सारे अवतार या अंतरात्म्याच्या पोटांत आले. एका अंतरात्म्याचें स्वरूप जाणलें म्हणजे सर्व देवादिकांचें स्वरूप जाणल्यासारखें होणार आहे. तें जाणण्याला पदरीं अगाध पुण्य पाहिजे.

**अरे या आत्मयाची चळवळ पाहे । ऐसा भूमंडळीं कोण आहे ।**

असा भाग्यवान्, सामर्थ्यवान् त्यांना कोणी दिसेना, म्हणून श्रीसमर्थांनीं हा प्रश्न केला आहे ! खरें आहे. श्रीसमर्थ आणि त्यांच्या सारखे च दुसरे ईश्वरी महापुरुष याशिवाय, अंतरात्म्याला ओळखणारे कोण असणार ? अंतरात्म्याचें सारखें अनुसंधान ठेवण्या इतकी पुण्याई दुसऱ्या कोणाची असणार ?

**अगाध पुण्यें अनुसंधान राहे। कांहीं येक ॥ १८-१-२२ ॥**

**त्या अनुसंधानासरिसें। जळोनि जाईजे किल्मिषें।**
**अंतरनिष्ठ ज्ञानी ऐसें। विवरोन पाहाती ॥ २३ ॥**

असे जे अंतर्निष्ठ ज्ञानी, ज्यांनीं अंतरात्मा ओळखला, तो त्यांनीं ओळखल्याची साक्ष ज्यांच्या चरित्रावरून च जगास पटली, तेवढे च काय ते तरले व तरतील, बाकी सर्व बाह्याचारांत च घुटमळत राहिले व राहतील! बाह्याचार म्हणजे स्नान, संध्या, टिळे, माळा, बाह्याचार म्हणजे व्याख्यान, प्रवचन, संशोधन, लेखन, इत्यादि बाह्याचाराचें अवडंबर पुष्कळ माजविलें आणि अंतरात्म्याचें दुरून नुसतें दर्शन हि नाहीं, मग अनुसंधान लांब च राहिलें, तर सारा बाह्याचार फुकट, कवडीमोल होय!

**अंतरनिष्ठ तितुके तरले। अंतरभ्रष्ट तितुके बुडाले।**
**बाह्यात्कारें भरंगळले। लोकाचारें ॥ २४ ॥**

(७) आपण कोणी बुडतां आणि भरंगळतां कामा नये. मी त्यास कबूल नाहीं आणि कोणी हि कबूल होऊं नये. आपण श्रीसमर्थांचे म्हणवितों, ग्रन्थराज दासबोध श्रीसमर्थांचें च स्वरूप मानून त्यास मस्तकीं धारण करतों, तर आपण कोणी, अंतरात्म्याची ओळख करून घेतल्यावांचून राहूं नये, मरूं नये. अंतरात्म्याची ओळख झाल्याशिवाय दासबोधाचा वियोग कोणी सहन करूं नये. दासबोधाला शरण असावें. १६०३ त जें त्याच्यांत सत्त्व होतें तें च आज १८६४ त त्यांत कायम आहे. तुम्हांस उपासनेची आण आहे, हें असत्य मानूं नका.

**बोलविशी तैसें आणी अनुभवा।**
**नाहीं तरी देवा विटंबना ॥**

(८) एकदम समजणार नाहीं म्हणून, अंतरात्म्याची ओळख करून घेण्याचा सोपा मार्ग १६×९ त लहानशा संवादरूपानें सुचविण्यांत आला आहे.

**वक्ता**– अंतरात्मा प्राणिमात्रांत आहे, तेव्हां आपण प्राणिमात्राची सेवा केली म्हणजे सर्वांचें मूळ जो अंतरात्मा त्यास ती पावेल.

**सकळ जनासी मानावें तें। येका अंतरात्म्यास पावतें ॥ १६–९–५ ॥**

**श्रोता**—हें मला उलटें वाटतें, मुळाला पाणी घालावें तेव्हां तें आपोआप पानोपान जाऊन पोंचतें.

**श्रोता म्हणे हा अनुमान। मुळीं घालावें जीवन।**
**तें पावे पानोपान। हे सध्या प्रचिती ॥ ६ ॥**

**वक्ता**—असें कां म्हणतोस? तुळशीच्या झाडावर पाणी घातलें म्हणजे तें क्षणभर हि वर न राहतां जमिनींत मुळास जाऊन पट्कन् पोंचतें च कीं नाहीं?

**वक्ता म्हणे तुळसीवरी। उद्क घालावें पात्रभरी।**
**परी न थिरे निमिषभरी। भूमीस भेदे ॥ ७ ॥**

**श्रोता**—मोठ्या झाडावर कसें पाणी घालणार?

**थोर वृक्षास कैसें करावें। सेंड्या पात्र कैसें न्यावें।**
**याचा अभिप्राव देवें। मज निरोपावा ॥ ८ ॥**

**वक्ता**—त्याला पावसाचें पाणी मिळतें. तें वर पडून मुळाकडे च जातें कीं नाहीं?

**प्रजन्याचें उद्क पडतें। तें तों मुळाकडे येतें।**
**हात चि पावेना तेथें। काये करिती ॥ ९ ॥**

असा हा लहानसा संवाद आहे. वक्ता म्हणजे दुसरे कोण? श्रीसमर्थ च. ते अखेरीस म्हणतात, श्रोत्याच्या विचारसरणींत कांहीं तथ्यांश आहे असें मानलें तरी या ब्रह्मांडवृक्षाचें मूळ जो अंतरात्मा तो गवसण्याचें भाग्य किती जणांचें असतें? यासाठीं या ब्रह्मांडवृक्षाला जीं पुढें फडगरें फुटलेलीं आहेत, त्यांची जोपासना केली म्हणजे वृक्षाचें मूळ जो अंतरात्मा तो प्रसन्न होईल.

(९) याचा सरळ अर्थ असा होतो कीं, अंतरात्मा प्रसन्न करून घ्यावयाचा तर अंतरात्म्या चेंवास्तव्य ज्या प्राणिमात्रांत असतें त्या प्राणिमात्रांचा संतोष राखला पाहिजे. या च रीतीनें श्रीसमर्थांनीं स्वतः अंतरात्म्याची उपासना केली आणि इतरांस शिकविली. तिचा प्रकार आतां आपण पाहूं.

## (८) अंतरात्म्याची उपासना

**माझे उपासनेचा बडिवार। ज्ञान सांगावें साचार।**
**मिथ्यां बोलतां उत्तर। प्रभूस लागे॥ १०-८-२७॥**

(१) श्रीसमर्थांची उपासना अंतरात्म्याची. अंतरात्म्याचा विचार आपण इतक्यांत च संपविला. ज्यानें ब्रह्मांडाचा हा सारा पसारा मांडला आहे, जो वायुरूप आहे, जो कळतो पण दिसत नाहीं, जाणवतो पण भासत नाहीं, अशा अंतरात्म्याची उपासना श्रीसमर्थांनीं केली. ती कठीण असली पाहिजे, हें उघड आहे. ज्याला रूप नाहीं, आकार नाहीं, त्याची उपासना कशी करावी? त्याला स्नान कसें घालावें? गंध कोठें लावावें? फुलें कशीं वाहावीं? त्याचें ध्यान कसें करावें? ज्याला देह च नाहीं, त्याला हे उपचार कसे करावे?

**देहेंविण देव कैसा भजावा। देहेंविण देव कैसा पुजावा।**
**देहाविण मोहछाव कैसा करावा। कोण्या प्रकारें॥ १९-५-९॥**

**अन्न गंध पत्र पुष्प। फल तांबोल धूप दीप।**
**नाना भजनाचा साक्षेप। कोठें करावा॥ १०॥**

**देवाचें तीर्थ कैसें घ्यावें। देवासी गंध कोठें लावावें।**
**मंत्रपुष्प तरी वावें। कोणे ठाईं॥ ११॥**

(२) सामान्य माणसांच्या आटोक्याच्या बाहेरची ही उपासना आहे. म्हणून मग अंतरात्म्याच्या अंगभूत असलेल्या त्रिगुणात्मक ब्रह्मा, विष्णु, महेश यांच्याकडे लक्ष गेलें. पण ते हि जगदीश्वर अंतरात्म्याप्रमाणें वायुरूप च, तेव्हां त्यांचा हि काय उपयोग?

**ब्रह्मा विष्णु महेश्वर। चौथा आपण जगदेश्वर।**
**वायोस्वरूप विचार। विवेकी जाणती॥ १६-६-१९॥**

तेव्हां मग रामकृष्णादि जे विष्णूचे अवतार, त्यांच्याकडे दृष्टि वळली.

**रामकृष्णादि अवतार। त्यांचा महिमा अपार।**
**उपासनेस बहुत नर। तत्पर जाले॥ १८-१-१५॥**

पण ते हि प्रत्यक्ष कोठें आहेत? ते होऊन गेले. त्यांचीं स्थानें उरलीं. त्या स्थानीं त्यांच्या मूर्ति स्थापण्यांत आल्या व नंतर तशा मूर्ति गांवोगांवीं आणि घरोघरीं होऊन उपासना करणें सोपें झालें! याप्रमाणें वरून खालीं या किंवा आतां खालून वर जा, एवढें खरें कीं, असे तीन प्रकारचे देव जगांत पूजा पावत आहेत. प्रतिमादेवांचें मूळ तरी अवतार च होत. त्या अवताराहून थोर ब्रह्मा, विष्णु, महेश हे होत. त्या तिन्ही देवांवर सत्ता अंतरात्म्याची. तेव्हां आपण देवाची कोणत्या हि स्वरूपांत उपासना केली, तरी ती जाऊन पावते अंतरात्म्यास च.

**देव क्षत्रीं पाहिला। त्यासारिखा धातूचा केला।**
**पृथ्वीमधें दंडक चालिला। येणें रीतीं॥ १८-८-४॥**
**नाना प्रतिमादेवांचें मूळ। तो हा क्षत्रदेव चि केवळ।**
**नाना क्षत्रें भूमंडळ। शोधून पाहावें॥ ५॥**
**क्षत्रदेव पाषाणाचा। विचार पाहातां तयाचा।**
**तंत लागला मुळाचा। अवताराकडे॥ ६॥**
**अवतारी देव संपले। देह धरुनी वर्तोन गेले।**
**त्याहून थोर अनुमानले। ब्रह्मा विष्णु महेश॥ ७॥**
**त्या तिही देवांस ज्याची सत्ता। तो अंतरात्मा चि पाहातां।**
**कर्ता भोक्ता तत्वता। प्रतक्ष आहे॥ ८॥**

प्रतिमापूजन करा कीं अवतारांना माना, तुमचें भजनपूजन जाऊन पोंचावयाचें आहे अंतरात्म्याला, मग एकदम च त्या अंतरात्म्याची भेट कां न घ्या? तथापि खालपासून आरंभ करावयाचा असेल तर त्यास श्रीसमर्थांची हरकत मुळीं च नाहीं, पण मध्यें च थांबूं नका, वरपर्यंत जाऊन भिडा.

(३) वरपर्यंत जाऊन भिडा, म्हणजे केवळ अंतरात्म्यापर्यंत च नव्हे, तर त्याच्या हि पलीकडे निर्गुणापर्यंत पोंचलें पाहिजे.

**येक नाना प्रतिमा। दुसरा अवतारमहिमा।**
**तिसरा तो अंतरात्मा। चौथा तो निर्विकारी॥ ११-२-३३॥**

त्या निर्विकारी चौथ्या देवाची उपासना करावयाची नसते. अंतरात्म्यापाशीं उपासना थांबते.

**महत्तत्त्व महद्भूत । तो चि जाणावा भगवंत ।**
**उपासना हे समाप्त । येथून जाली ॥ १५–५–३१ ॥**

उपासनेला उपास्य आणि उपासक असें द्वैत लागतें. तें द्वैत त्या चौथ्या देवापाशीं नसतें. तेथें दोघे एकरूप झालेले असतात. अंतरात्म्याची उपासना तरी एवढ्याचसाठीं करावयाची.

**च्यारी देह निरसावे । साधकें देहातीत व्हावें ।**
**देहातीत होतां जाणावें । अनन्य भक्त ॥ १०–१०–४७ ॥**

**देहमात्र निरसुनी गेला । तेथें अंतरात्मा कैसा उरला ।**
**निर्विकारीं विकाराला । ठाव नाहीं ॥ ४८ ॥**

(४) तात्पर्य, अंतरात्म्याची उपासना केली पाहिजे. तेव्हां अंतरात्म्याच्या देवळांचा शोध केला पाहिजे, कारण देव कोठें तरी देवळांत असणार.

**देव पाहावयाकारणें । देउळें लागती पाहाणें ।**
**कोठें तरी देउळाच्या गुणें । देव प्रगटे ॥ १७–१–१२ ॥**

अंतरात्म्याचीं देवळें कोणतीं ? प्राणीमात्रांचीं शरीरें तीं सारीं अंतरात्म्याचीं देवळें होत ! प्राणीमात्राचीं न तु मनुष्यमात्राचीं.

**पृथ्वीमधें जितुकीं शरीरें। तितुकीं भगवंताचीं घरें॥ २०–४–४॥**

**देउळें म्हणिजे नाना शरीरें । तेथें राहिजे जीवेश्वरें ।**
**नाना शरीरें नाना प्रकारें । अनंत भेदें ॥ १७–१–१३ ॥**

**चालतीं बोलतीं देउळें । त्यामधें राहिजे राउळें ।**
**जितुकीं देउळें तितुकीं सकळें । कळलीं पाहिजे ॥ १४ ॥**

त्यांची गणती कोण करूं शकेल ? कोटीच्या कोटीच्या कोटी संख्या कमी पडेल. इतक्या सगळ्या देवळांतील देव जो अंतरात्मा त्याची श्रीसमर्थांनीं उपासना केली आणि आपणांस करावयास ते आज्ञापितात. स्वतःचें उदाहरण देऊन ते शिकवितात :

**नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।**

साऱ्या विश्वांत भरलेल्या नारायणाची पूजा कशी करावी ?

**याकारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥ १५–९–२५ ॥**

लक्षांत घ्या, कोणी तरी. आपल्या बोलण्यानें, चालण्यानें कोणत्या हि जीवाला आपण संतोषवूं शकलों म्हणजे ती भगवंताची पूजा होते. अडचणींत सांपडलेल्या गाढवाचा प्राण वांचवितां आला तरी ईश्वराची पूजा होईल ! घडलेली गोष्ट आहे. दोन दरडीच्या मध्यभागीं चारी पाय अडकून पडलेल्या गाढवाला बाहेर काढतां च तें संतोषानें फुरफुरलें आणि प्राणीमात्रांत परमेश्वराला पाहणारा मित्र म्हणाला, हें गाढव फुरफुरलें नाहीं, त्याच्या देहांत वास करणारा जो परमेश्वर त्यानें आशीर्वाद दिला, 'तुम्हीं मला जीवदान दिलें, देव तुमचें भलें करो.' गाढवाहून नीच प्राणी कोण आहे ? त्याचा हि संतोष ही जर ईश्वराची पूजा होत असेल, तर माणसासारख्या जीवांची सेवा करणें ही ईश्वराची पूजा होणार नाहीं काय ? पूजा म्हणजे केवळ गंध, पत्र, पुष्प आणि दुरून नैवेद्य नव्हे. श्रीसमर्थांची उपासना ही अशी होती :

**नारायण असे विश्वीं । त्याची पूजा करीत जावी ।**
**याकारणें तोषवावी । कोणी तरी काया ॥ १५–९–२५ ॥**

**उपासना शोधून पाहिली । तों ते विश्वपाळिती जाली ।**
**न कळे लीला परीक्षिली । न वचे कोणा ॥ २६ ॥**

**देवाची लीळा देवेंविण । आणीक दुसरा पाहे कोण ।**
**पाहाणें तितुकें आपण । देव चि असे ॥ २७ ॥**

**उपासना सकळां ठाईं । आत्माराम कोठें नाहीं ।**
**याकारणें ठाइं ठाइं । रामें आटोपिलें ॥ २८ ॥**

**ऐसी माझी उपासना । आणितां न ये अनुमाना ।**

पण तिचा प्रभाव केवढा मोठा आहे ?

**नेऊन घाली निरंजना । पैलिकडे ॥ २९ ॥**

ऐसी माझी उपासना । असें म्हणून ही च उपासना त्यांनीं २०×८त हि सांगितली आहे.

**देह्यामध्यें आत्मा असतो । देहे पूजितां आत्मा तोषतो ।**
**देहे पीडितां आत्मा क्षोभतो । प्रतक्ष आतां ॥ १८-४-३४ ॥**

**देह्यावेगळी पूजा पावेना । देह्यविण पूजा फावेना ।**
**जनीं जनार्दन म्हणोनी जना । संतुष्ट करावें ॥ ३५ ॥**

गाढवाचें उदाहरण दिलें म्हणून कांहीं उद्यांपासून गाढवांच्या सेवेला लागावयाचें नाहीं. तो मूर्खपणा च होईल. सारासारविचार केव्हां च सुटतां कामा नये. पूजा, अधिकार पाहून च करावयाची असते. संतोष, प्राणीमात्राचा राखावयाचा असतो. दुःख, कोणाच्या हि जीवाला द्यावयाचें नसतें.

**सगट भजन करूं येतें । तरी मूर्खपण आंगीं लागतें ।**

श्रीसमर्थ हि गाढवाचें च उदाहरण घेऊन म्हणतात,

**गाढवासी पूजितां कळतें । काये त्याला ॥ ३७ ॥**

तेव्हां, नियम करावयाचा तो असा :

**पूज्य पूजेसी अधिकार । उगे चि तोषवावे इतर ।**
**दुखऊं नये कोणाचें अंतर । म्हणिजे बरें ॥ ३८ ॥**

(५) अशी त्या अंतरात्म्याची उपासना घडली पाहिजे. ब्रह्माच्या ठिकाणीं जो पहिला संकल्प उद्भवला, त्याला जाऊन मिडलें पाहिजे.

**उपासनायोगें मिठी । तेथें घातली पाहिजे ॥ १७-३-२५ ॥**

ह्या पहिला, अंतरात्म्यापर्यंतचा च पल्ला फार अवघड आहे. तेथून पुढचा टप्पा मग सोपा आहे.

**मग त्यापैलिकडे जाण । निखळ ब्रह्म निर्गुण ।**
**निर्मळ निश्चळ त्याची खूण । गगनासारिखी ॥ २६ ॥**

तेथें मग एकान्त, निवान्त, शांत आहे. त्या स्थितीची कल्पना कोणीं करावी !

**उपासनेचे सेवटीं । देवां भक्तां अखंड भेटी ।**
**अनुभवी जाणेल गोष्टी । प्रत्ययाची ॥ १८-२-३० ॥**

(६) तें सुख श्रीसमर्थांनीं भोगिलें, हें आपण काय बोलावें ! ते जगदंतराशीं म्हणजे अंतरात्म्याशीं एकजीव झाले होते. ते आपला च अनुभव सांगत आहेत —

**जो जगदांतरें मिळाला । तो जगदांतर चि जाला ।**

अंतरात्म्याच्या उपासनेचें हें केवढें सामर्थ्य आहे ! अंतरात्म्याची उपासना करणारा जगाचा अंतरात्मा होतो, मग

**अरत्रीं परत्रीं तयाला । काये उणें ॥ १५–१–१४ ॥**

श्रीसमर्थचरित्रांत आपण हें पाहिलें च आहे. ही अंतरात्म्याची उपासना आणि ती करण्याची त्यांची पद्धति, इतक्या स्पष्ट आणि असंदिग्ध रीतीनें आणखी कोणीं प्रतिपादिलेली आहे किंवा नाहीं, याची मला कल्पना नाहीं, कारण माझें वाचन फार थोडें आहे. पण जें थोडें वाचन झालें आहे, त्याच्या आधारानें मी इतकें च म्हणतों कीं या उपासनेंत श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानाचा पूर्ण विकास झाला आहे. या उपासनेंत च त्यांच्या अतुल सामर्थ्याचें रहस्य आहे. या उपासनेच्या योगानें च महाराष्ट्राला त्यांचें अद्वितीयत्व पटलें आणि म्हणून च, त्या काळीं, सारा महाराष्ट्र आणि विशेषतः महाराष्ट्रांतील तरुण त्यांच्या चरणांपाशीं गोळा झाले. फार काय बोलूं, या त्यांच्या उपासनेंतून च त्यांची राजकारणाची आणि समाजकारणाची शिकवण उद्भवली आहे.

(७) या उपासनेचें सामर्थ्य फार मोठें आहे. १६ व्या दशकाच्या १० व्या समासांतील शेवटच्या त्या चार ओव्या या उपासनेला अनुलक्षून आहेत.

**उपासना प्रगट जाली । तरी हे विचारणा कळली ।**
**याकारणें पाहिजे केली । विचारणा देवाची ॥ १६–१०–२८ ॥**

**उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेविण निराश्रयो ।**
**उदंड केलें तरी तो जयो । प्राप्त नाहीं ॥ २९ ॥**

**समर्थाची नाहीं पाठी । तयास भलता च कुटी ।**
**याकारणें उठाउठी । भजन करावें ॥ ३० ॥**

**भजन साधन अभ्यास । येणें पाविजे परलोकास ।**
**दास म्हणे हा विश्वास । धरिला पाहिजे ॥ ३१ ॥**

हें भजन कोणतें, तें आपण मागें करुणाष्टकांतील एका सवाईंत पाहिलें च आहे.

# (९) अंतरात्म्याच्या उपासनेंतून च

उद्भवलेली

# श्रीसमर्थांची समाजराजकारणपर शिकवण

प्रस्तावना, (१) इहलोक आणि परलोक दोन्ही साधावीं, (२) प्रपंचाचें स्वरूप, (३) परमार्थाचें स्वरूप, (४) प्रमुख साधन कोणतें, (५) समुदाय करावा, (६) समुदाय करणाराच्या ठिकाणीं कोणते गुण असावेत, (७) बहुतांला राजी राखावें, (८) मृदु भाषण, (९) परोपकार, (१०) परोपकारार्थ देह झिजवावा, (११) सांडा अवघे करंटपण, (१२) म्हणौन आळस नसावा, (१३) अत्यंत साक्षपी व्हावें, (१४) अखंड सावधान असावें, (१५) अखंड येकांत सेवावा, (१६) प्रतीति, (१७) म्हणोन सद्गुरु करावा, (१८) निस्पृहपणें विख्यात व्हावें.

## प्रस्तावना

श्रीसमर्थांची उपासना आणि ती करण्याची त्यांची पद्धति आपण पाहिली. प्राणीमात्राचा संतोष राखण्यानें अंतरात्म्याची उपासना कशी घडते, याचा विचार झाला. श्रीसमर्थांच्या आत्मारामानें सारें ब्रह्मांड व्यापलें होतें आणि त्याचे ते उपासक होते. म्हणून च, आवघे चि सुखी असावे। ऐसी वासना॥ हा श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानाचा ध्रुवाचा तारा होय, असें मी मानीत आलों आहें. अशा त्यांच्या उपासनेच्या विश्वव्यापक स्वरूपांतून च स्वाभाविकपणें त्यांची भूतदया, त्यांचें राजकारण, धर्मकारण, त्यांची समाजसेवा, लोककल्याणाविषयीं वाटणारी चिंता इत्यादिविषयक शिकवण उद्भवलेली आहे. त्या शिकवणीच्या कांहीं प्रमुख अंगांचें येथें विवेचन करावयाचें आहे.

## (१) इहलोक आणि परलोक दोन्ही साधावीं

श्रीसमर्थांच्या पोटांतली इच्छा अगदीं वेगळी. ती त्यांनीं एकवीससमासींत व्यक्त केलेली आपण मागें पाहिली च आहे. पण जगाच्या राहाटीकडे पाहून प्रपंच आणि परमार्थ हीं दोन्ही साधावीं, असा त्यांनीं उपदेश केला आहे.

**पृथ्वीमधें बहुत लोक । तेहीं पाहावा विवेक ।**
**इहलोक आणि परलोक । बरा पाहावा ॥ १२–३–१ ॥**

नरदेह कांहीं वारंवार प्राप्त होत नाहीं. तो परम भाग्यानें लाभला असतां निष्काळजीपणानें वायां दवडूं नये.

**तरी आतां ऐसें न करावें । बहुत विवेकें वर्तावें ।**
**इहलोक परत्र साधावें । दोहीकडे ॥ ११–३–९ ॥**

प्रपंच हि करावा आणि परमार्थ हि पाहावा. बायकापोरांचा प्रपंच करूं नका असें श्रीसमर्थ सर्वांना सांगत नाहींत. ते जग जाणतात. त्यांचें सांगणें इतकें च कीं, प्रपंच करावयाचा तर तो सुखानें करा. पण परमार्थ हि अगदीं च बुडवूं नका. प्रपंच परमार्थांपैकीं कोणती एक च गोष्ट करावयाची असेल तर ती परमार्थाची होय. सामान्यपणें लोकप्रवृत्ति पाहून च श्रीसमर्थ सांगतात :

**आधीं प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थ विवेका ।**
**येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥ १२–१–१ ॥**
**प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल ।**
**प्रपंच परमार्थ चालवाल । तरी तुम्ही विवेकी ॥ २ ॥**
**प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला ।**
**मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ ३ ॥**
**परमार्थ सांडून प्रपंच करिसी । तरी तूं येमयातना भोगिसी ।**
**अंतीं परम कष्टी होसी । येमयातना भोगितां ॥ ४ ॥**

* * *

**म्हणौन सावधानपणें । प्रपंच परमार्थ चालवणें ।**
**ऐसें न करितां भोगणें । नाना दुःखें ॥ १० ॥**

तारुण्याच्या ऐन उमेदींत पुष्कळांच्या मनांत, श्रीसमर्थांचें चरित्र आठवून, संसार सोडून दूरदेशीं कोठें तरी दऱ्याखोऱ्यांत एकांतांत आयुष्य कंठावें व परमेश्वरास आळवावें, असें येतें. पण हें वैराग्य इतकें सोपें असतें तर आजपर्यंत सांगण्याला आणि ऐकण्याला एकट्या श्रीसमर्थांचें च उदाहरण कां झालें असतें ? विवेकयुक्त वैराग्य ही दुर्घट गोष्ट आहे !

**वेडें संसार सांडून गेलें । तरी तें कष्टकष्टों चि मेलें ।**
**दोहीकडे अंतरलें । इहलोक परत्र ॥ १४-७-२० ॥**

**निघोन गेला परी अज्ञान । त्याचे संगती लागले जन ।**
**गुरू शिष्य दोघे समान । अज्ञानरूपें ॥ २२ ॥**

तसें च पुष्कळदां आपण असें पाहतों कीं, लौकिकासाठीं, प्रतिष्ठेसाठीं परमार्थाची बतावणी केली जाते. ही वाईट गोष्ट आहे. तींत अध:पात आहे. परमार्थ हा लौकिकाचा विषय च नव्हे. लौकिकाची चाड आणि परमार्थाची आवड एका ठायीं नांदूं शकत नाहींत. तात्पर्य,

**बहुतां जन्मांचा शेवट । नरदेह सांपडे अवचट ।**
**येथें वर्तावें चोखट । नीतिन्यायें ॥ ११-३-१ ॥**

**प्रपंच करावा नेमक । पाहावा परमार्थ विवेक ।**
**जेणें करितां उभय लोक । संतुष्ट होती ॥ २ ॥**

यांत च नरजन्माची सफलता आहे.

**संसारा आलियाचें सार्थक । जेथें नित्यानित्यविवेक ।**
**येहलोक आणि परलोक । दोनी साधिले ॥ १७-१-२१ ॥**

## ( २ ) प्रपंचाचें स्वरूप

जें स्वत: केलें नाहीं, तें श्रीसमर्थांनीं दुसऱ्यास करावयास सांगितलें नाहीं. प्रपंच आणि परमार्थ हीं दोन्ही साधावीं, असें त्यांनीं उपदेशिलें आणि तीं दोन्ही त्यांनीं उत्कृष्ट रीतीनें करून दाखविलीं. त्यांनीं हि प्रपंच केला, पण तो एकट्याचा न करतां सर्वांचा केला, राष्ट्राचा केला, किंबहुना जगाचा केला! प्रपंचाचीं अंगें अनेक आहेत. त्यांतील श्रेष्ठ जें अंग तें त्यांनीं आचरणांत आणून दाखविलें. तें कोणतें?

एकोणविसाव्या दशकाच्या चौथ्या समासांत श्रीसमर्थांनीं महापुरुषाचीं लक्षणें सांगितलीं आहेत. तीं सारीं त्यांचीं स्वत:चीं च लक्षणें होत. जे कांहीं थोडे समासच्या समास श्रीसमर्थचरित्रपर आहेत, त्यांपैकीं हा एक समास आहे, हें आपण मागें पाहिलें च आहे. प्रपंचाच्या उत्कृष्ट अंगाचा बोध या समासांतील सतराव्या ओवीवरून होतो, याचा उल्लेख मागें येऊन गेला च आहे. पुनरुक्ति क्षम्य असावी.

श्रीसमर्थांच्या अंतरंगाच्या ज्या हजारों खुणा त्यांच्या वाङ्मयांत आढळतात, त्यांपैकीं ही एक ओवी आहे. तिचा सरळ अर्थ असा: प्रपंचाचीं जीं अनेक अंगें आहेत, त्यांतील सर्वोत्तम अंग म्हणजे राजकारण होय व परमार्थाचीं जीं अनेक साधनें आहेत, त्यांपैकीं श्रेष्ठ साधन म्हणजे पंचीकरणमहावाक्याचें विवरण होय आणि या दोन्ही गोष्टी महापुरुष साधीत असतो !

ज्यानें राजकारण केलें त्यानें च खरा प्रपंच केला, इतका व्यापक बोध या ओवीवरून होत आहे. भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायांत भगवंताच्या अनेक स्वरूपांचें किंवा विभूतींचें वर्णन करतांना, हरएक प्रकारच्या वस्तूंतील मुख्य वस्तु सांगून ती आपलें स्वरूप होय, हें जसें भगवंतांनीं म्हटलें आहे, तद्वत् च जणूं या ओवींत श्रीसमर्थ ध्वनित करीत आहेत कीं, राजकारण हें प्रपंचाचें मुख्य स्वरूप होय व तें भगवंताची विभूति आहे.

श्रीसमर्थांनीं असला श्रेष्ठ प्रतीचा प्रपंच केला. त्यांनीं राष्ट्राचा प्रपंच केला. त्यांनीं राजकारण केलें. राजकारण करून त्यांना काय साधावयाचें होतें ?

धर्माचा उच्छेद होण्याची वेळ येऊन ठेपली होती, देवालयें जमीनदोस्त होत होतीं, देवांच्या मूर्ति भंग पावत होत्या, धातूच्या मूर्ति वितळून त्यांच्या तोफा ओतल्या जात होत्या, आपल्या आयाबहिणींच्या अब्रूचें रक्षण करण्याचें सामर्थ्य लोकांत उरलें नव्हतें ! असा एकंदरींत भयंकर, कल्पनातीत, कल्पना केली च तर अंगावर शहारे आणणारा संकटकाळ प्राप्त झाला होता ! त्या स्थितीचा शेवट झाला पाहिजे, असा श्रीसमर्थांनीं संकल्प केला. धर्माच्या, देवांच्या, ब्राह्मणांच्या, अनाथांच्या रक्षणार्थ महाराष्ट्रराज्याची स्थापना झाली पाहिजे, अशी त्यांना चिंता लागली होती.

**ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी ॥ १९–९–२५ ॥**

परमेश्वरानें त्यांचे कोड पुरविले ! परमेश्वरानें नियोजित केलेलें हें त्यांचें अवतारकार्य होतें. पडत्या काळांत करंट्यांनीं खुशाल वाद घालावा, पण त्या

काळीं राजांना आणि मुत्सद्यांना, वीरांना आणि सरदारांना, देशाधिकाऱ्यांना आणि कारकुनांना, राजकारभारांतील वरपासून तळापर्यंतच्या सर्वांना, महाराष्ट्रराज्य म्हणजे काय, याची पूर्ण कल्पना होती. **श्रीरामदास** आणि **रामदासी** ग्रन्थमालेंतील श्रीसंप्रदायाच्या अपूर्व कागदपत्रांचा जो नववा भाग, त्यांतील कांहीं लेखांकांवरून ही गोष्ट सिद्ध होत आहे. त्यांपैकीं कांहीं लेखांकांचा, अन्य कारणासाठीं आपण पूर्वीं उपयोग केला च आहे. तो ग्रन्थ दुर्मिळ झाला असल्यामुळें, त्या लेखांकांतील जरूर तो भाग, वाचकांच्या प्रत्यक्ष अवलोकनांत असावा म्हणून उद्धृत करणें आवश्यक वाटतें.

लेखांक ८० १६१८ मार्गशीर्ष वद्य २

आनाजी जनार्दन देशाधिकारी व लेखक
प्रांत वाई यांस
क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपति
यांजकडून

"... श्री (रामदासस्वामीं) चे कृपेकरून महाराजाचे राज्य वृधीतें पावले याउपरी श्री (रधुनाथदेवा) चा समारंभ विशेष चालवीला पाहीजे येविसी पूर्वीं श्री (रामदासस्वामी) चे वचन राजश्री (श्रीशिवछत्रपति) कैलासवासी यासी आहे कीं श्री देवाचा चढता वाढता महोत्सव चालवावा तैसे च चढते वाढते राज्य अभिवृधीते पावेल हे श्रीचे कृपापूर्वक आशीर्वादरूप वाक्य आहे ...... श्री सत्पुरुषाचे देवस्थान बहुत थोर व हे महाराष्ट्रराज्य म्हणजे देवाब्राह्मणांचे आहे ..."

लेखांक ८४ १६१८ मार्गशीर्ष वद्य ५

आणाजी जनार्दन देशाधिकारी व
देशलेखक प्रांत वाई यास
शंकराजी नारायण सचीव
यांजकडून

"... देवस्थान परम थोर व स्वामी सत्पुरुश बहुत थोर हे राज्य देवा ब्राह्मणाचे आसीर्वादाचे आहे ..."

लेखांक ८५ १६१८ मार्गशीर्ष वद्य १०

उधो बावाजी हवालदार व कारकून
समत नीब यासी
अनाजी जनार्दन सुभेदार व कारकून
सुभा प्रा वांई याजकडून

"...हे मऱ्हाठे राज्य म्हणिजे देवा ब्राह्मणांचे आहे..."

लेखांक ८६ १६१८ फाल्गुन शुद्ध ३

भानजी गोपाल मुख्य देशाधिकारी
व लेखक प्रांत कऱ्हाड यांस
रामचंद्र नीलकंठ अमात्य
याजकडून

"...उतरोतर चढता वाढता श्री (रघुनाथ देवा) चा भक्तिमहोत्सव चालवावा तैसें च चढतें वाढतें राज्य अभिवृधीतें पावेल हें श्री (रामदासस्वामी) चे कृपापूर्वक आशीर्वादवाक्य आहे तरी हे धर्मराज्य श्रीचे कृपेकरून वृधीतें पावलें...श्री सतपुरुषांचें देवस्थांन बहुत थोर आणि हें महाराष्ट्रराज्य म्हणजे देवा ब्राह्मणांचे आहे..."

लेखांक ८८ १६१८ फाल्गुन शुद्ध ३

महादाजी सामराज नामजाद व लेखक
प्रांत जाउली यांसी
क्षत्रिय कुलावतंस श्री राजाराम
छत्रपती यांजकडून

"......हें राज्य म्हणजे देवाब्राह्मणाचे आहे धर्मस्थापना विशेषात्कारे चालवणे हे स्वामीस अगत्य आहे......"

लेखांक ९४ १६१९ ज्येष्ठ वद्य १४

खंडो आपाजी हवालदार व
कारकून सा बारामुरें यासी

माहादाजी सामराज नामजाद व कारकून
सुभा जावली याजकडून

"......हे महाराष्ट्र राज्य म्हणजे देवाब्राह्मणाचे......"

इत्यादि.

हे सारे उतारे अस्सल कागदपत्रांतील असून तीं अस्सल पत्रें श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत कोणास हि पाहतां येतील. या पत्रांत मराठ्यांचें राज्य म्हणजे देवांब्राह्मणांचें राज्य, असें जें त्या राज्याचें स्वरूप प्रकट करण्यांत आलें आहे, त्याचा धागा थेट श्रीसमर्थांपर्यंत जाऊन पोंचतो.

त्या वेळीं उलटा डाव पडता तर केवढा अनर्थ होता, याची नुसती कल्पना हि करवत नाहीं ! अफझुलखानाच्या मनांत काय आहे, याची बरोबर परीक्षा करून व धारिष्ट धरून त्याच्या वधासारखें अद्भुत आणि अचाट कार्य करून १५८१ च्या मार्गशीर्षात श्रीशिवछत्रपति श्रीसमर्थांच्या दर्शनास आले असतां श्रीशिवरायाला जणूं पोटाशीं धरून अठराव्या दशकाच्या सहाव्या समासांत परमेश्वराच्या उपकाराचें स्मरण करीत श्रीसमर्थांनीं श्रीशिवरायाचें जें कौतुक केलें आहे – त्यांच्यावरून जणूं निंबलोण उतरून टाकलें आहे – त्यांत भावी महाराष्ट्रराज्याच्या स्वरूपाचा पाया घातलेला कोणाला हि स्पष्ट दिसेल.

**सकळकर्ता तो ईश्वरु । तेणें केला आंगिकारु ।**
**तया पुरुषाचा विचारु । विरुळा जाणे ॥ १८–६–१३ ॥**

**न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंगप्रकार ।**
**परीक्षिणें परांतर । देणें ईश्वराचें ॥ १४ ॥**

**माहायेत्न सावधपणें । समई धारिष्ट धरणें ।**
**अद्भुत चि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ १५ ॥**

**येश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणासी नाहीं सीमा ।**
**नाहीं दुसरी उपमा । देणें ईश्वराचें ॥ १६ ॥**

**देव ब्राह्मण आचार विचार । कितेक जनासी आधार ।**
**सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १७ ॥**

**येहलोक परलोक पाहाणें । अखंड सावधपणें राहाणें ।**
**बहुत जनाचें साहाणें । देणें ईश्वराचें ॥ १८ ॥**

**देवाचा कैपक्ष घेणें । ब्राह्मणाची चिंता वाहाणें ।**
**बहु जनासी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १९ ॥**

**धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।**
**जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ २० ॥**

" तुम्ही देवब्राह्मणांना मानता, आचार विचार पाळता, परोपकारांत देह झिजविता, इहलोक आणि परलोक पाहाता, अखंड सावध असता, लोकांचे कष्ट सोसता, देवांचा कैवार घेता, ब्राह्मणांची चिंता वाहाता, सर्वांचें पालन करता, ही तुम्हावर ईश्वराची कृपा होय. उभयलोकीं तरून जाण्याचा हा च मार्ग होय."

श्रीसमर्थांच्या प्रपंचाचें हें असें स्वरूप होतें. महाराष्ट्रराज्याची स्थापना धर्मासाठीं होती. महाराष्ट्रराज्य म्हणजे नीतिन्यायाचें, देवाब्राह्मणांचें राज्य होय. महाराष्ट्रराज्य म्हणजे रामराज्य च. त्या राज्याची स्थापना होऊन श्रीशिवछत्रपति सिंहासनीं विराजमान झालेले पाहून श्री समर्थांना जी कृतार्थता वाटली, जो आनंद झाला, तो आनंदवनभुवनी प्रकरणांत शब्दांचें रूप धारण करून प्रकट झालेला आपण पूर्वीं च पाहिला आहे.

श्रीसमर्थांच्या उपदेशाप्रमाणें महाराष्ट्रधर्माच्या ज्या पायावर श्रीशिवछत्रपतींनीं महाराष्ट्रराज्याची उभारणी केली होती, तो पाया पुढें ढांसळला आणि त्यावर उभारलेली महाराष्ट्रराज्याची इमारत स्वाभाविक च कोसळली !

## ( ३ ) परमार्थाचें स्वरूप

राजकारण हें प्रपंचाचें जसें श्रेष्ठ स्वरूप, तद्वत् पंचीकरणमहावाक्याचें साकल्य विवरण होऊन "अहं ब्रह्मास्मि" चा साक्षात्कार होणें, ही

परमार्थाची उच्च पायरी -- नव्हे -- शिखर होय. प्रपंचपरमार्थाला हिमालयाची उपमा दिल्यास रामराज्य आणि ब्रह्मसाक्षात्कार हीं त्याचीं दोन परमोच्च शिखरें म्हणतां येतील. जन्मास आलेल्या प्रत्येकानें हीं शिखरें गांठावीं, अशी श्रीसमर्थांची आज्ञा आहे. पण कोटींत एकाद्याला तरी तीं गांठतां येतात काय? हिमालयाचीं शिखरें गांठण्याचा दांडगा प्रयत्न क्वचित् केव्हां केव्हां कोणी धाडसी व्यक्ती करीत असतात. त्या प्रयत्नांत आजपर्यंत अनेक प्राणास मुकले, पण अजून कोणास यश आलें नाहीं. त्याच्या मानानें रामराज्य आणि ब्रह्मसाक्षात्कार हीं दोन शिखरें गांठणें किती तरी पटीनें कठीण आहे.

परमार्थाचें म्हणजे ब्रह्मानुभवाचें महत्त्व श्रीसमर्थांनीं ग्रन्थराजांत किती तरी वेळां सांगितलेलें आहे, पण त्या सर्वांत आरंभींच्या च स्तवनदशकाच्या नवव्या समासांत परमार्थाची जी महती वर्णिली आहे ती च माझें समाधान होण्यास मला पुरेशी वाटते. वर्णन करून श्रीसमर्थ जणूं थकले म्हणून मग म्हणतात,

**या परमार्थाची सरी । कोणास द्यावी ॥ २३ ॥**
**अनंत जन्मींचें पुण्य जोडे । तरी च परमार्थ घडे ।**
**मुख्य परमात्मा आतुडे । अनुभवासी ॥ २४ ॥**
**जेणें परमार्थ वोळखिला । तेणें जन्म सार्थक केला ।**
**येर तो पापी जन्मला । कुलक्षयाकारणें ॥ २५ ॥**

श्रीसमर्थांच्या शब्दांकडे लक्ष न देतां आम्ही क्षणभर राहूं तर खरे च पापी ठरूं. हें कर्तव्य मुख्यतः ब्राह्मणांचें आहे !

## ( ४ ) प्रमुख साधन कोणतें

कठीण आहे म्हणून हातपाय गाळून बसूं नये. श्रीसमर्थांच्या राज्यांत अशक्य, निराशा इत्यादि निरुत्साह करणाऱ्या दौर्बल्यदर्शक गुणांना खरोखर च स्थान नव्हतें. यत्न हा च ज्यांचा देव त्यांच्या राज्यांत निराशेला थारा कोठून मिळणार ?

**घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड ।**
**तेथें कैचें आणिलें द्वाड । करंटपण ॥ १२-९-२९ ॥**

मनुष्यानें केव्हां हि हताश होऊं नये. आपआपल्या अधिकाराप्रमाणें प्रत्येकानें प्रयत्न करावा. काय करावें म्हणता? जें श्रीसमर्थांनीं केलें तें च करावें. आधीं भगवंताचें अधिष्ठान प्राप्त करून घेतलें पाहिजे. हा मार्ग त्यांनीं सिद्ध करून दाखविलेला आहे. यशस्वी म्हणून सिद्ध झालेल्या त्या मार्गानें न जातां इतर असिद्ध मार्गांचे प्रयोग करण्यांत आपण आयुष्याचा नाश कां करावा? सबंध दासबोध धुंडाळला तरी हें च आढळेल.

**सामर्थ्य आहे चळवळीचें । जो जो करील तयाचें ।**
**परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २०-४-२६ ॥**

भगवंत म्हणजे ज्याचा आपण नुकता च विचार केला तो अंतरात्मा. हा अर्थ सरळ आणि संदर्भाला धरून असतां त्याच्या अर्थाविषयींचा वाद अकारण होय. श्रीसमर्थांनीं सिद्ध करून दाखविलेल्या मार्गानें जाण्यांत च आपलें कल्याण आहे.

## (५) समुदाय करावा

याप्रमाणें मार्गाला लागून उपासना प्रकट झाली म्हणजे समुदाय करण्याच्या उद्योगाला लागावें. समुदायावांचून राजकारणात्मक प्रपंच होऊं च शकणार नाहीं, हें उघड आहे, पण स्वतः तरून दुसऱ्याचे तारक व्हावयाचें असेल तर परमार्थांत हि समुदाय करणें आवश्यक च होय. समुदाय करणें हें श्रीसमर्थसंप्रदायाचें पहिलें बाह्य लक्षण होय. समुदाय करण्यावर त्यांचा मोठा कटाक्ष असे. श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांतील बाडांक ३५ मध्यें जें एक श्रीसमर्थांचें अप्रतिम आज्ञापत्र आहे व जें आम्ही शके १८३७ च्या श्रीदासनवमीच्या निमित्तानें श्रीसांप्रदायिक विविध विषयांक २४ त प्रथम च प्रसिद्ध केलें होतें, तें प्रस्तुत विषयासंबंधानें अति महत्त्वाचें आहे च, पण त्यांत समुदाय कसा करावा, मुलें कोठून आणावीं, तीं कशीं असावींत, त्यांच्यांशीं कसें बोलावें, त्यांचीं मनें आपलीशीं कशीं करावीं, इत्यादि जी अवांतर शिकवण आहे, तिच्या

योगें आपला श्रीसमर्थहृदयांत प्रवेश होऊन तेथील किंचित् हार्द जाणण्याची आपणांस संधी मिळणार आहे, म्हणून तें पत्र येथें देतों.

विवेक जालियां देवाचा योग । मग होणार नाहीं वियोग ।
देव सर्वांचें अंतरंग । अखंडित भेटी ॥ १ ॥

या समाधानें असावें । निरूपणीं विवरावें ।
मानसपूजनें आठवावें । सकळ कांहीं ॥ २ ॥

रुणानुबंधें भेटी होईल । परस्परें समाचार कळेल ।
सहज वर्तमान निवळेल । ते प्रसंगीं ॥ ३ ॥

कांहीं समुदाव करणें । येविशीं आलस्य न करणें ।
आलस्य करितां उदंड उणें । दिसेल परमार्थीं ॥ ४ ॥

पोहोणारें बुडते तारावे । सामर्थ्यें बुडों नेदावे ।
मूर्ख ते शाहाणे करावे । विवेकी पुरुषें ॥ ५ ॥

आपणाहून जो धींग । त्यासीं करूं नये प्रसंग ।
आपणाधीन जो प्रसंग । तो चि करावा ॥ ६ ॥

सोईऱ्याधाईऱ्याचीं मुलें । तिक्षण बुधीचीं सखोलें ।
तयासी बोलणें मृद बोलें । करीत जावें ॥ ७ ॥

त्याचा संसार समाचार । पुसत जावा विस्तार ।
उदंड सांगतां तत्पर । होऊनि ऐकावें ॥ ८ ॥

दुःख ऐकतां दुःख जातें । त्याचें दुःख हळु होतें ।
मग तें सर्वें चि धरितें । मित्रभावें ॥ ९ ॥

निकट मित्रि बरी होतां । मग त्यासी न्यावें येकांता ।
म्हणावें रे भगवंता । कांहीं तऱ्हीं भजावें ॥ १० ॥

पूर्वीं देव पूजिला नव्हता । म्हणोनि आली दरिद्रता ।
या कारणें अनंता । कांहीं तऱ्हीं भजावें ॥ ११ ॥

मान्य होतां जप सांगावा । मग तो इकडे पाठवावा ।
मग तयाचा सकळ गोवा । उगऊं आम्हीं ॥ १२ ॥

पत्रांतील प्रत्येक ओवी गूढार्थपूर्ण आहे. पहिल्या तीन ओव्यांवरून असें दिसतें, कोणी एकानें भेटीची इच्छा दर्शविली असतां, आपली नेहमींच भेट आहे, तेव्हां तुटीविण भेटी । इच्छितसा ।। मानसपूजनें आठवावें । सकळ कांहीं ।। असें श्रीसमर्थांनीं सुचविलें आहे. भूत, भविष्य, वर्तमान काळीं ज्यांना ज्यांना त्यांच्या भेटीची तळमळ वाटेल त्या सर्वांना त्यांची भेट होण्याचा श्रीसमर्थांनीं यांत मार्ग सुचविला आहे, असें आपण समजूं या. सर्वांच्या अंतरंगांत श्रीसमर्थ आहेत च, अशा समाधानानें राहून मानस-पूजेनें त्यांच्या सर्व लीला आठवाव्या, ऋणानुबंधानुसार प्रत्यक्ष कृपा व्हावयाची असेल तेव्हां होईल. पहिल्या तीन ओव्यांत हा औपचारिक पण महत्त्वाचा विचार प्रकट करून श्रीसमर्थ एकदम पहिली आज्ञा करतात ती, **कांहीं समुदाव करणें** । ही होय. या बाबतींत आळस मुळीं च कामाचा नाहीं. आळसानें परमार्थास उणेपणा येईल. स्वतःस परमार्थी समजावयाचें आणि इतरांस तारावयाचें नाहीं, हें श्रीसमर्थांना विसंगत वर्तन वाटतें. ज्याला पोहतां येतें त्यानें दुसरा बुडत असतां नुसतें पाहात राहून कसें चालेल, त्यानें स्वसामर्थ्यानें बुडणाराला तारलें पाहिजे, जो विवेकी असेल त्यानें मूर्खांना शहाणे करून सोडलें पाहिजे, तर च तो खरा पोहणारा आणि विवेकी होय, असें श्रीसमर्थांचें तत्त्वज्ञान आहे.

समुदाय करावा म्हणतां, तर मुलें कोठून आणावीं ? जे आळ्यताखोर असतील त्यांच्या वांट्यास जाऊं नये, तर आपल्या वळणांतील जीं माणसें असतील, त्यांचीं मुलें मिळवावीं. आपल्या सोयऱ्याधायऱ्यांचीं मुलें मिळवावीं. मठ्ठ मुलांचा काय उपयोग ? त्या मुलांत जीं तीक्ष्ण बुद्धीचीं आणि खोल अंतःकरणाचीं असतील, तेवढीं च जवळ करावीं.

मनांत असें येतें, हा काय निवळ परमार्थाचा च मार्ग असेल काय ? मठ्ठ मुलांना तरावयाचें नसतें काय ? तीक्ष्ण आणि खोल बुद्धीचीं तेवढीं च मुलें घेऊन काय करावयाचें होतें ?

त्या मुलांशीं गोड बोलावें, त्यांना सर्व कांहीं पुसावें, तीं सांगतील तें सारें सहानुभूतिपूर्वक ऐकावें, उतावीळपणानें पुरे पुरे म्हणून त्यांना थांबवूं नये, त्यांना हिडिस फिडिस करूं नये, बोलूं द्यावें, म्हणजे जगांत

आपल्या जिव्हाळ्याचे कोणी तरी आहेत, असें वाटून तीं आपलें सारें दुःख तुम्हांपुढें ओकतील आणि त्यांना हलकें वाटूं लागेल, तीं तुमचीं होतील. याप्रमाणें त्यांचीं मनें तुमच्या पूर्ण कह्यांत आल्यावर त्यांना एकांत स्थळीं —जणूं गांवाबाहेरच्या एकाद्या निर्जन अशा मोडक्या देवळांत—न्या, तुमचें हृद्गत त्यांना सांगा, त्यांना सांगा कीं, विश्वांत भरलेल्या नारायणाला आपण विसरलों म्हणून ही अवदशा आली, ती आतां घालवावयाची असेल तर त्या नारायणाच्या पूजेला लागलें पाहिजे! तुमचें आणि त्यांचें मन एक झालें म्हणजे त्यांना मंत्रोपदेश द्या आणि इतकें झाल्यावर, श्रीसमर्थ म्हणतात, त्यांस आमच्या कडे पाठवा,

**मग तयाचा सकळ गोवा। उगऊं आम्हीं॥**

मग आम्ही त्यांच्या ठिकाणीं कांहीं किल्मिष राहिलें असल्यास तें ठोकून ठाकून साफ करूं आणि आमच्या मनास येईल तिकडे मग त्यांना आम्ही जगदुद्धारार्थ पाठवूं!

वाचक हो, यंत्रांतून बाहेर पडल्याप्रमाणें अशा शिकवणीनें तरबेज झालेले हजारों शिष्य सर्व देशभर संचार करीत असतां त्यांनीं राष्ट्राची आणि धर्माची केवढी कामगिरी बजाविली असेल, याची कल्पना करा. मी काय सांगूं!

हें पत्र म्हणजे

**जीव जीवांत घालावा। आत्मा आत्म्यांत मिसळावा॥ १५-१-४॥**

म्हणजे काय करावें, याचा श्रीसमर्थांनीं घालून दिलेला धडा च होय.

**महंतें महंत करावे। युक्तिबुद्धीनें भरावे।**
**जाणते करून विखरावे। नाना देसीं॥ ११-१०-२५॥**

याचें हें पत्र म्हणजे प्रात्यक्षिक च होय!

श्रीसमर्थांना श्रीसमर्थ ही पदवी त्यांच्या ह्या मंडळीकरणामुळें च प्राप्त झाली असावी, असें त्यांच्या च वचनाधारें म्हणावेसें वाटतें:

**बहुत जनास चालवी। नाना मंडळें हालवी।**
**ऐसी हे समर्थपदवी। विवेकें होते॥ १८-१०-४६॥**

इतिहास असा आहे, त्या काळांत एकट्या दुकट्यानें च काय, पण पांच पंचवीस जण मिळून सुद्धां प्रवास करणें, यात्रा करणें धोक्याचें होतें. म्हणून त्या काळीं शक्य तितक्या मोठ्या जमावानें लोक यात्रांना निघत. दोन दोन चार चार हजार लोक एकत्र जमून जात, असे दाखले आहेत. श्रीसमर्थ बहुधा जमाव करून जात असावेत किंवा जमावांत मिसळत असावेत. यांत केवळ सुरक्षितपणा एवढा च त्यांचा हेतु नसावा. त्यांना शोध घ्यावयाचा असे, लोकांची परीक्षा करावयाची असे, प्रचीतीचे संत हुडकावयाचे असत.

**ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या ।**
**संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥ १९-६-१४ ॥**

यांतील तीन निरनिराळीं क्रियापदें एका च अर्थाचीं दिसत नाहींत. स्वतः समुदाय करावे व आयते असतील त्या समुदायांची परीक्षा करावी. हें शोध घेण्याचें आणि संघटणेचें धोरण त्यांच्या जीवनाचें एक अंग च बनलें होतें.

**कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें ।**
**भिक्षामिसें लाहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥ १५-६-२४ ॥**

ही त्यांची आज्ञा प्रख्यात आहे. नुसतें कोठें कथेला गेलें तरी तेथें हि हें मुख्य धोरण सुटूं नये.

**जगामधें जगमित्र । जिव्हेपासीं आहे सूत्र ।**
**कोठें तऱ्ही सत्पात्र । शोधून काढावें ॥ १९-२-१९ ॥**
**कथा होती तेथें जावें । दुरी दीनासारिखें बैसावें ।**
**तेथील सकळ हरद्र घ्यावें । अंतर्यामीं ॥ २० ॥**
**तेथें भले आडळती । व्यापक ते हि कळों येती ।**
**हळु हळु मंदगती । रीग करावा ॥ २१ ॥**

सर्वत्र बारिक शोध ठेवून निवडक माणसें एकत्र करण्याची उत्सुकता किती होती, ती स्पष्ट दिसत आहे.

याप्रमाणें दृष्टि ठेवून जे मुख्य मुख्य असतील त्यांच्यांशीं संधान बांधून त्यांना अनुकूल करून घेतलें, म्हणजे त्यांचे जे अनुयायी असतात,

ते आपोआप येऊन मिळतात, त्यांच्यासाठीं निराळा प्रयत्न करावा लागत नाहीं.

**धूर्त आणि विचक्षण । ते चि शोधावे ॥ १५-१-२४ ॥**

**उदंड बाजारी मिळाले । परी ते धूर्तें चि आळिले ।**
**धूर्तापासीं कांहीं न चले । बाजाऱ्यांचें ॥ २५ ॥**

**याकारणें मुख्य मुख्य । तयांसी करावें सख्य ।**
**येणें करितां असंख्य । बाजारी मिळती ॥ २६ ॥**

**धूर्तासी धूर्त चि आवडे । धूर्त धूर्तीं च पवाडे ।**
**उगें चि हिंडती वेडे । कार्येंविण ॥ २७ ॥**

या सूचना करणारे महापुरुष स्वतः किती धूर्त आणि विचक्षण असतील आणि त्यांनीं कां, कसा आणि केवढा व्याप केला असेल आणि समुदाय मिळविला असेल, याची कल्पना करावी. यांत हि आणखी एक इषारा आहे.

**धूर्तासी धूर्तपण कळलें । तेणें मनास मन मिळालें ।**
**परी हें गुप्तरूपें केलें । पाहिजे सर्वें ॥ २८ ॥**

ही सूचना त्या काळीं आवश्यक च होती. ती त्यांनीं अनेकदां देऊन ठेवली आहे.

**उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ ११-१०-१८ ॥**
**उदंड करी गुप्तरूपें । भिकाऱ्यासारिखा स्वरूपें ॥ १५-२-२१ ॥**

इत्यादि. आपल्या करण्याचा आणि समुदायाचा कोणाला पत्ता लागूं देऊं नये.

**उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहुंकडे ।**
**भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ १९-१०-८ ॥**

तया म्हणजे कोणाला ? दुसऱ्या कोणाला ? हें आत्मचरित्र नव्हे तर दुसरें काय आहे ?

**जाणती परी आडळेना । काये करितो तें कळेना ।**
**नाना देसीचे लोक नाना । येऊन जाती ॥ ९ ॥**

**तितुक्यांचीं अंतरें धरावीं । विवेकें विचारें भरावीं ।**
**कडोविकडीचीं विवरावीं । अंतःकर्णें ॥ १० ॥**

**किती लोक तें कळेना । किती समुदाव आकळेना ।**
**सकळ लोक श्रवणमनना । मध्यें घाली ॥ ११ ॥**

श्रीसमर्थांचीं वचनें आपण सारखीं उद्‌धृत करीत चाललों आहोंत, पण तसें करतांना आपण हळु हळु त्यांच्या हृदयांत प्रवेश करीत आहोंत, असा अनुभव तुम्हांस येत आहे ना? ते शोधीत होते लोकांना आणि आपण शोध चालविला आहे त्यांच्या हृदयाचा. त्यांना त्यांच्या कार्यांत गुप्तपणा राखावा लागे आणि आम्हांला हि आमचें काम श्रीसमर्थांना न कळत च करावें लागत आहे. त्यांना कळल्यास ते आपल्या हृदयाचा ठाव लागूं देणार नाहींत, अशी भीति आहे !

## ( ६ ) समुदाय करणाराच्या ठिकाणीं कोणते गुण असावेत

ते १२×१० त श्रीसमर्थांनीं एका ठिकाणीं दिले आहेत

**उत्तम गुण स्वयें घ्यावे । ते बहुतांस सांगावे ।**
**वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ॥ १२–१०–३ ॥**

असा श्रीसमर्थांचा दंडक असल्यामुळें, या समासांत जी गुणमालिका दिली आहे, ती त्यांच्या स्वतःच्या ठिकाणीं विराजमान होती, असें मी मानतों. शिवाय

**जितुके कांहीं उत्तम गुण । तें समर्थाचें लक्षण ॥ १९–४–३१ ॥**

असें त्यांनीं स्पष्ट च म्हटलेलें असल्यामुळें, असें मानण्यांत आपण चुकत नाहीं, अशी खात्री वाटते.

या समासाच्या पहिल्या दोन ओव्यांत, आपण ज्ञानोत्तर कसें वागावें, जगाकडे पाहावें कां पाहूं नये, कर्म करावें कां करूं नये, आपण ज्ञानी झालों आतां जग बुडेना कां, अशी बेफिकीर वृत्ति धारण करावी, कां आपलें कल्याण ज्या मार्गानें झालें तो मार्ग जगास सांगावा, याविषयीं श्रीसमर्थांचा अभिप्राय स्पष्ट शब्दांत आला आहे. मागच्या आज्ञापत्रांत पोहणाराचा जो दृष्टान्त आला आहे तो च येथें हि आहे.

**आपण येथेष्ट जेवणें । उरलें तें अन्न वाटणें ।**
**परंतु वाया दवडणें । हा धर्म नव्हे ॥ १२-१०-१ ॥**

**तैसें ज्ञानें तृप्त व्हावें । तें चि ज्ञान जनास सांगावें ।**
**तरतेन बुडों नेदावें । बुडतयासी ॥ २ ॥**

अशी प्रस्तावना करून श्रीसमर्थ उत्तम गुण सांगत आहेत, त्यांचें आपणांस चिंतन घडावें :

(१) स्नान संध्या देवार्चन, (२) येकाग्र करावें जपध्यान, (३) हरिकथा निरूपण, (४) शरीर परोपकारीं लावावें, (५) आडलें जाकसलें जाणावें, (६) मृदवचनें बोलत जावें, (७) दुसऱ्याच्या दुःखें दुखवावें, (८) परसंतोषें सुखी व्हावें, (९) बहुतांचे अन्याय क्षमावे, (१०) बहुतांचे कार्यभाग करावे, (११) आपल्यापरीस व्हावे पारखे जन, (१२) दुसऱ्याचें अंतर जाणून तदनुसार वर्तावें, (१३) लोकांस परीक्षित जावें, (१४) नेमक चि बोलावें, (१५) तत्काळ चि प्रतिवचन द्यावें, (१६) कदापि रागास न यावें, (१७) आलस्य अवघा च दवडावा, (१८) यत्न उदंड चि करावा, (१९) शब्दमत्सर न करावा कोणीयेकाचा, (२०) उत्तम पदार्थ दुसऱ्यास द्यावा, (२१) शब्द निवडून बोलावा, (२२) सावधपणें करीत जावा संसार आपुला, (२३) मरणाचें स्मरण ठेवून हरिभक्तीस नेहमीं सादर असावें, (२४) मरोन कीर्तीस उरावें, (२५) चळों नेदावी शांति, (२६) ज्ञानवैराग्यें शोभावें, (२७) स्वयें आपण कष्टून बहुतांचें सोसावें, (२८) परांतरास न लावावा ढका, (२९) प्रसंगीं कामास चुकवूं नये, आणि (३०) आपणावरून दुसऱ्याला राखत जावें.

या गुणांनीं जो संपन्न असेल, त्याच्या मागें जग जाईल, यांत काय शंका आहे? ज्याला समुदाय करावयाचा असेल, त्याच्या ठिकाणीं हे गुण असावेत. शिवाय त्याच्या वाणींत प्रबोधशक्ति असावी, एरवीं त्याला लोकांचीं मनें आपल्याकडे खेंचून घेतां येणार नाहींत.

तात्पर्य, समुदाय करावयाचा तर

**बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे ॥ १२-१०-३७ ॥**

आणि बहुतांचें मनोगत हातीं घेतां यावें,

**याकारणें बहुतांला । राजी राखावें ॥ १२–१०–४३ ॥**

## (७) बहुतांला राजी राखावें

**लोक राजी राखोन कीजे । सकळ कांहीं ॥ १९–७–१० ॥**

लोक मिळवावयाचे तर लोकांचें मनोगत जाणून त्यांना राजी राखलें पाहिजे. श्रीसमर्थांच्या शिकवणींत ही फार महत्त्वाची शिकवण आहे. अध्यात्माच्या पायावर च या व्यावहारिक शिकवणीची उभारणी केली आहे. सर्वांच्या च देहांत देवाचें वास्तव्य असतें, तेव्हां सर्वांना राजी राखणें म्हणजे च देव अनुकूल करून घेणें होय. दुसऱ्याचें मनोगत जाणून तदनुसार वर्तावें, हें श्रीसमर्थांनीं शंभर वेळां सांगितलें असेल. कठीण आहे. जगांत सुष्ट दुष्ट असतात, सज्जन दुर्जन आहेत, सर्वांत च देव आहे, पण सर्वांना च राजी राखणें कसें शक्य आहे ? जनीं जनार्दन बोळला म्हणजे मग कांहीं कमी नाहीं, पण तो जनार्दन बोळावा कसा ?

**कठीण आहे जनार्दन । राजी राखणें ॥ १९–६–३ ॥**
**परांतर रक्षायाचीं कामें । बहुत कठीण विवेकवर्में ॥ १२ ॥**

हें काम करणाराच्या चातुर्यावर अवलंबून राहील. प्रथम दुसऱ्याचा कल पाहून च वागलें पाहिजे आणि मग हळु हळु उमज पाडीत च त्याला सरळ मार्गावर आणलें पाहिजे. हें कसें करावें, त्याचे नियम घालून देतां येणार नाहीं, पण कांहीं सूचना देतां येतील. अशा सूचना श्रीसमर्थांनीं दोन ठिकाणीं दिल्याचें माझ्या पाहण्यांत आहे.

**(१) मुलाचे चालीनें चालावें । मुलाच्या मनोगतें बोलावें ।**
**तैसें जनास शिकवावें । हळुहळु ॥ १३–१०–२४ ॥**

**मुख्य मनोगत राखणें । हें चि चातुर्याचीं लक्षणें ।**
**चतुर तो चतुरांग जाणे । इतर तीं वेडीं ॥ २५ ॥**

**वेड्यास वेडें म्हणों नये । वर्म कदापि बोलों नये ।**
**तरी च घडे दिग्विजये । निस्पृहासी ॥ २६ ॥**

(२) **माणुस हेंकाड आणि कच्चें। मान्य करावें तयाचें।**
**येणें प्रकारें बहुतांचें। अंतर राखावें ॥ १५-६-१३ ॥**

**मिळोन जाऊन मेळवावें। पडी घेऊन उलथावें।**
**कांहीं च कळों नेदावें। विवेकबळें ॥ १६ ॥**

**दुसऱ्याचे चालणीं चालावें। दुसऱ्याचे बोलणीं बोलावें।**
**दुसऱ्याचे मनोगतें जावें। मिळोनियां ॥ १७ ॥**

पण आपण जर हेंकाडावरोबर हेंकाड बनलों तर मग एकजीव होण्याची आशा च नको

**हेंकाडास हेंकाड मिळाला। तेथें गलबला चि जाला।**
**कळहो उठतां चातुर्याला। ठाव कैंचा ॥ २० ॥**

तात्पर्य **धके चपेटे सोसावे। नीच शब्द साहात जावे।**
**प्रस्तावोन परावे। आपले होती ॥ २२ ॥**

याप्रमाणें आरंभीं पड खाऊन च दुष्ट, दुर्जन, हेंकाड, कच्चें, या सर्वांना आपल्या मार्गावर आणून सोडावें.

लोकांना राजी राखून त्यांना आपलेसे करून घेण्याला आणखी काय काय करावें, त्याचे नियम घालून देतां येणार नाहींत. तथापि समुदाय करण्यावर श्रीसमर्थांचा मोठा कटाक्ष असल्यामुळें, माझ्या समजुतीप्रमाणें समुदाय होण्याला उपकारक होतील अशा, आणखी अकरा ठळक गुणांचा विचार करण्याचें मी मनांत आणीत आहे.

## (८) मृदु भाषण

**सुशब्दें राजी राखावा। सकळ लोक ॥ ११-३-१८ ॥**

पहिला गुण म्हणजे भाषण मृदु असावें. हें साधन जितकें सोपें आहे तितकें तें गुणकारी आहे. क्रिया हवी, पण ती नंतर. आधीं नुसत्या गोड बोलण्यानें च लोक वळतात. दुसरा कोणता हि गुण अंगीं नसला, तरी निदान वाणी गोड असावी. कार्यकर्त्यानें हें स्वतःवरून च ओळखावें.

बरें बोलतां सुख वाटतें । हें तो प्रत्यक्ष कळतें ।
आतमवत परावें तें । मानीत जावें ॥ १२–१०–२२ ॥
कठिण शब्दें वाईट वाटतें । हें तों प्रत्ययास येतें ।
तरी मग वाईट बोलावें तें । काये निमित्य ॥ २३ ॥
आपणास चिमोटा घेतला । तेणें कासाविस जाला ।
आपणावरून दुसऱ्याला । राखत जावें ॥ २४ ॥

शस्त्रानें केलेली जखम लवकर बरी होते, पण शब्दानें केलेली जखम सारखी डांचत राहते, खुटखुट करीत असते.

जे दुसऱ्यास दुःख करी । ते अपवित्र वैखरी ।
आपणास घात करी । कोणी येके प्रसंगीं ॥ २५ ॥
पेरिलें तें उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें ।
तरी मग कर्कश बोलावें तें । काये निमित्य ॥ २६ ॥

## ( ९ ) परोपकार

लोकांचीं मनें आकर्षून घेण्याला मृदु भाषण हें जसें पहिलें आणि सोपें साधन, तसें दुसरें पण कठीण साधन म्हणजे आत्मौपम्य बुद्धीनें अखंड परोपकार करीत राहणें, हें होय. मनाच्या त्रिगुणात्मक अनंत वृत्ति असतात, त्यांत परोपकार करण्याची उपजत बुद्धि असणें महान् सुकृताचें फळ होय. तशी बुद्धि उपजत नसली तर विचारानें ती निर्माण होऊं शकते. कार्यकर्त्याच्या ठिकाणीं ती हवी, हें खरें. लोकांना तत्काळ आपलेसे करून घेण्याचें तें अमोघ साधन आहे. प्रापंचिक माणसाला इतर बंधनें असल्यामुळें त्याच्या परोपकारबुद्धीला कांहीं तरी आळा बसतो, पण जो निस्पृह आहे, लोकांचें सुख हें च ज्याचें ध्येय आहे, विश्व हें च ज्याचें कुटुम्ब आहे, श्रीसमर्थांसारखा जो धगधगीत पुण्यरासी महापुरुष आहे

तो परोपकार करित चि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला ।
मग काये उणें तयाला । भूमंडळीं ॥ १९–४–१० ॥

डोमगांव प्रतींत ‘ करितां चि गेला ’ असें आहे, पण १६०६ तील महाबळेश्वरच्या प्रतींत ‘ करित चि गेला ’ असा पाठ आहे व तो च श्रीसमर्थांना अभिप्रेत असावा.

**बहुत जन वास पाहे। वेळेसी तत्काळ उभा राहे।**
**उणें कोणाचें न साहे। तया पुरुषासी॥ ११॥**

हा दुसऱ्या कोणाचें उणें पडूं देत नाहीं, वेळेवर सर्वांच्या मदतीस धांवून जातो, तेव्हां साहजिक च याच्या हांकेला लोक हि ओ देतात.

**आपल्या कार्यास तत्पर। लोक असती लाहान थोर।**
**तैसा चि करी परोपकार। मनापासुनी॥ २२॥**

तात्पर्य, परोपकाराची फलश्रुति समुदाय किंवा समुदायाची किल्ली परोपकार होय.

परोपकार कोणावर करावा आणि कोणावर करूं नये, असा भेदाभेद मुळीं च नसावा. दुर्जनांना सुद्धां दूर राहूं देऊं नये, अपाय करीत राहतील. त्यांच्या वर हि परोपकार करून त्यांना मिंधे करून ठेवावे.

**दुर्जन सांपडोन सोडावे। परोपकार करूनी॥ ११-५-१०॥**

तेथें सज्जनांविषयीं बोलावयास च नको.

परोपकार करण्याचे मार्ग अनंत आहेत. ते गरजवंताच्या गरजेवर आणि कार्यकर्त्याच्या अनुकूलतेवर अवलंबून राहतील. महंताला सूचना देतांना श्रीसमर्थ म्हणतात, स्वतःचें पाठांतर तर अपार असावें च व तें शांतिसुखार्थ इतरांना हि ऐकवावें, इतकें च नव्हे, तर त्यांपैकीं कोणी कांहीं लिहून मागितलें तरी तें लिहून द्यावें. हा हि उपकार च व तो महंतानें करावा. ज्याला जें पाहिजे असेल तें पुरवावें.

**नाना जिनसपाठांतरें। निवती सकळांचीं अंतरें।**
**लेहोन देतां परोपकारें। सीमा सांडावी॥ १५-६-२७॥**

**जैसें जयास पाहिजे। तैसें तयास दीजे।**
**तरी मग श्रेष्ठ चि होइजे। सकळां मान्ये॥ २८॥**

कवित्व सुद्धां परोपकार बुद्धीनें करावें, असें जेव्हां श्रीसमर्थ सांगतात, तेव्हां ते परोपकार करण्याच्या तऱ्हा मर्यादित समजत नाहींत, हें उघड आहे. ज्याला जशी अनुकूलता असेल, तसा त्याच्या कडून परोपकार घडेल, पण सर्वांना देहाची तर अनुकूलता असते च ना? तेव्हां प्रत्येक महंताच्या

आणि कार्यकर्त्यांच्या हातची ही गोष्ट आहे कीं, त्यानें परोपकारांत आपला देह झिजवावा. समुदाय व्हावा एतदर्थ प्रत्येकानें

**शरीर परोपकारीं लावावें ॥ १२-१०-५ ॥**

## ( १० ) परोपकारार्थ देह झिजवावा आणि उदंड कष्ट करावे

परोपकार करावयाचा तर देह सारखा झिजविला पाहिजे व अहर्निश कष्ट केले पाहिजेत. या दोन गोष्टींचा विचार मनांत आला म्हणजे माझ्या डोळ्यांपुढें श्रीसमर्थांचें सारें चरित्र उभें राहतें. बाळपण आईच्या मांडीवर आणि नजरेखालीं जें काय मातृसुखांत गेलें असेल तें व श्रीशिवराज्याभिषेकानंतर शेवटचीं सहा सात वर्षें समाधानानें स्नानसंध्या करीत स्वराज्यसुखांत जीं काय गेलीं असतील तीं वगळून म्हणजे वयाच्या १२ व्या वर्षांपासून तों ६६ व्या वर्षांपर्यंतचा ५४ वर्षांचा काळ श्रीसमर्थांचा अत्यंत कष्ट करण्यांत गेला ! पुरश्चरणाचे कष्ट, तीर्थाटणाच्या काळांतील नुसते कष्ट च नव्हत तर अनेक घोर प्रसंग, पर्यटणाचे कष्ट, मठस्थापनेचे कष्ट, इत्यादि कष्ट करण्यांत, प्रसंग सहन करण्यांत आणि अहोरात्र चिंता वाहण्यांत त्यांचा काळ गेला. श्रीसमर्थांचें चरित्र एका लहानशा शब्दांत सांगावयाचें झाल्यास मी म्हणेन त्यांनीं राष्ट्रासाठीं आणि धर्मासाठीं सारखे कष्ट, कष्ट, कष्ट केले ! त्या अवधींत क्षणाचा हि त्यांचा काळ सुखांत आणि विश्रांति घेण्यांत गेला नसेल. हें मी आपल्या लौकिक कल्पनेप्रमाणें म्हणतों. त्यांच्या दृष्टीनें त्यांच्या सर्व समाधानाचें मूळ कष्टांत च होतें.

तनें मनें झिजावें, अहोरात्र सारखें झिजावें.

**दुसऱ्यास सुखी करावें । तेणें आपण सुखी व्हावें ॥ १४-६-२३ ॥**

आपलें सुख निराळें नसावें. दुसऱ्याचें सुख तें च आपलें सुख असावें. उदात्त कल्पना आहे. चंदनाप्रमाणें तनमनधनें करून आपण झिजलों च नाहीं, तर आपण कोण आणि लोक आपले कोण, हें समजावें च कसें ? आणि समजल्यावांचून लोक तरी आपल्या जवळ येतील कसे ?

**जंवरी चंदन झिजेना । तंव तो सुगंध कळेना ।**
**चंदन आणि वृक्ष नाना । सगट होती ॥ १२-२-१७ ॥**

**जंव उत्तम गुण न कळे। तो या जनास काये कळे।**
**उत्तम गुण देखतां निवळे। जगदांतर ॥ १८ ॥**

**जगदांतर निवळत गेलें। जगदांतरीं सख्य जालें।**
**मग जाणावें वोळले। विश्व जन ॥ १९ ॥**

याप्रमाणें त्या काळीं श्रीसमर्थांचे कष्ट पाहून सारा महाराष्ट्रदेश त्यांच्या भजनीं लागला होता.

**झिजल्यावांचुनी कीर्ति कैंची। मान्यता नव्हे कीं फुकाची ॥ १९-३-२४ ॥**

झिजल्यावांचून मनुष्य लोकमान्य होत नाहीं. झिजण्यांत उदंड कष्ट होतील, पण ते केले पाहिजेत—नव्हे—त्यांत च सुख मानलें पाहिजे.

कष्ट केल्यावांचून कोणती च लहान मोठी गोष्ट होत नाहीं, पोट भरत नाहीं, समुदाय होत नाहीं, लोक जवळ येत नाहींत, देव ऋणी होत नाहीं, राज्य मिळत नाहीं, कांहीं च होत नाहीं. इहलोकींचें कर्तव्य पार पाडावयाचें असो किंवा परलोकाची प्राप्ति करून घ्यावयाची असो,

**कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं।**
**केल्याविण होत नाहीं। साध्य जनीं ॥ १८-७-३ ॥**

**येहलोक अथवा परलोक। दोहींकडे सारिखा चि विवेक ॥ ६ ॥**

या सरळ आणि न्यायाच्या गोष्टी आहेत, त्या वारंवार सांगावयास नकोत.

**जेहीं उदंड कष्ट केले। ते भाग्य भोगून ठेले।**

हें आपण जगांत सर्वत्र सर्व काळीं पाहतों. तरी पण, श्रीसमर्थ म्हणतात, जे करंटे असतात ते नुसते बडबडत च राहतात—

**येर ते बोलत चि राहिले। करंटे जन ॥ १६ ॥**

यासाठीं,

## ( ११ ) सांडा अवघे करंटपण

एकाद्याची पाठ थोपटावयाची असल्यास धूर्त तार्किक विचक्षण हे शब्द श्रीसमर्थांच्या मुखांतून एकत्र बाहेर पडत, तद्वत् एकाद्याविषयीं असमाधान

किंवा तिरस्कार व्यक्त करावयाचा झाल्यास पापी, चांडाळ, करंटा यांपैकीं एकाद्या शब्दानें त्याची संभावना व्हावयाची !

सुंदर, सोन्यासारखा, अमोलिक, अव्यंग नरदेह प्राप्त झाला असतां जे तो वायां दवडतात, ते करंटे होत. ईश्वरपद प्राप्त करून घेण्याची ज्या देहांत शक्यता, तो देह बाष्कळपणांत व्यर्थ दवडणारा, तो करंटा होय. करंटा म्हणजे भाग्यहीन, वैभवहीन, अवगुणांचें केवळ कोठार. जगांत एक मनुष्य संपन्न असतो, तर दुसरा दरिद्री असतो, एकादें राष्ट्र प्रबळ असतें तर दुसरें दुर्बळ असतें, एक स्वतंत्र असतें तर दुसरें परतंत्र असतें, असें कां ? याचें श्रीसमर्थांचें उत्तर सरळ आहे—

**हें सकळ गुणापासीं गती । सगुण भाग्यश्री भोगिती ।**
**अवगुणास दरिद्रप्राप्ती । येदर्थी संदेह नाहीं ॥ ९–४–४ ॥**
**विद्येवीण करंटा वसे । विद्या तो भाग्यवंत ॥ ७ ॥**

पुढच्या दहाव्या ओवींत करंट्याची, जणूं, संपूर्ण व्याख्या च दिली आहे.

**विद्या नाहीं बुद्धि नाहीं । विवेक नाहीं साक्षेप नाहीं ।**
**कुशळता नाहीं व्याप नाहीं । म्हणौन प्राणी करंटा ॥ १० ॥**

या अवगुणांचा च विस्तार केलेला १९×३ त आढळतो. वैभवाची अपेक्षा करणाऱ्या कोणत्या हि व्यक्तीनें, समाजानें, राष्ट्रानें ते अवगुण समजून घेऊन आपल्या अंगीं जडलेलें करंटपण झाडून टाकलें पाहिजे. तसें आपण न करूं तर करंट्याचे करंटे च राहूं.

**समजले आणि वर्तले । ते चि भाग्यपुरुष जाले ।**
**यावेगळे उरले । ते करंटे पुरुष ॥ १४–६–२५ ॥**

अवगुण समजून आल्यावर आणि पटल्यावर त्यांचा त्याग न करणाऱ्याच्या हि वरची एक कडी असते. माझे अवगुण म्हणून जे तुम्ही म्हणता, ते अवगुण नाहींत च, ते गुण च आहेत, असा अभिमान बाळगणारा प्राणी असूं शकतो ! असा दुरभिमान वाटूं लागला म्हणजे कपाळीं करंटपणाचा शिक्का कायमचा च बसला म्हणून समजावें.

**सकळ अवगुणांमधें अवगुण । आपले अवगुण वाटती गुण ।**
**मोठें पाप करंटपण । चुकेना कीं ॥ १९-८-८ ॥**

अशा स्थितींत मग मनांत येतें, देवानें च करंटे निर्माण करून ठेविले कीं काय, न कळे !

**उत्तमांसी उत्तम माने । कनिष्ठास तें न माने ।**
**म्हणौन करंटे देवानें । करून ठेविले ॥ १३-१०-२१ ॥**

जीवाला किती लावून घेऊन श्रीसमर्थांनीं हे उद्गार काढलेले दिसतात ! अवगुणांचा त्याग करा रे, असें कळवळून सांगतांना श्रीसमर्थांना पाहिलें, म्हणजे या राष्ट्रगुरूचें हृदय समाजाच्या कल्याणासाठीं किती तळमळत असलें पाहिजे, याची कल्पना होऊन एकाद्यास भक्तिप्रेमानें गहिंवर यावा, हें स्वाभाविक आहे.

या सर्व अवगुणांचें म्हणजे च करंटपणाचें उगमस्थान केवळ आळस होय.

**आळस उदास नागवणा । आळस प्रेतनबुडवणा ।**
**आळसें करंटपणाच्या खुणा । प्रगट होती ॥ ११-३-१२ ॥**

## ( १२ ) म्हणौन आळस नसावा

आळस आणि दुश्चित्तपण या दुर्गुणांची जोडी असते. ती मूर्खाला हटकून पछाडते. करंट्याला आळस आवडतो.

**येथें जेणें आळस केला । तो सर्वस्वें बुडाला ॥ २०-५-२७ ॥**

सर्वस्वें म्हणजे सर्व बाबतींत. त्याचा प्रपंच हि धड होत नाहीं आणि परमार्थाविषयीं तर बोलावयास च नको.

ही सामान्य शिकवण आहे, पण चहुंकडे आपण काय पाहात असतों ? या दोषांच्या पायीं किती तरी बुद्धिवंतांची बुद्धि वाया जात असते ! पटण्याला कठीण नसतां हि जी शिकवण पाळली जात नाहीं, तिला सामान्य तरी कसें म्हणावें ? आठव्या दशकाच्या सहाव्या समासांत मुख्य प्रश्न बाजूस सारून या दुर्गुणांच्या योगानें शहाणीं माणसें हि

आपला सर्वस्वीं कसा घात करून घेत असतात, याचें विवेचन श्रीसमर्थांनीं विस्तारानें केलें आहे, तें पाहावें. आधीं मनुष्य दुश्चित्त असतो. त्या दुश्चित्तपणांतून च आळस उद्भवतो. आळसानंतर साहजिक च त्याच्यावर निद्रेचा अंमल बसतो, आणि निद्रा संपली तरी अशा माणसाचें दुश्चित्तपणाचें जें मूळचें स्वरूप तें च पुनरपि प्रकट होतें. मिळून दुश्चित्तपण, आळस, निद्रा, असें रहाटगाडगें सुरू होतें व त्यांतून त्या माणसाची केव्हां च सुटका न होतां, तो न कळत जसा जन्माला येतो तसा न कळत वाढतो आणि तसा च न कळत चालता होतो. सारा जन्म जातो, पण तो शुद्धीवर केव्हां च आलेला नसतो! काय हें जीवन! असल्या जीवनाला श्रीसमर्थसंप्रदायांत कोठून थारा मिळणार? समुदाय करून सामुदायिक हित साधणें हें ज्या संप्रदायाचें ध्येय त्या संप्रदायांत आळसाला स्थान कोठून मिळणार?

**आळसें आळस केला। तरी मग कारबार चि बुडाला।**
**अंतरहेत चुकत गेला। समुदायाचा॥** १९-९-७॥

ही सामान्य शिकवण, पण ती हि अनेकदां सांगावी लागली आहे.

**जितुकें होईल तितुक्याला। आळस करूं नये॥** १९-१०-१८॥
**येत्नीं आळसाचें दर्शन। होऊं च नये॥** १८-३-१२॥

राजकारणांत तर आळस करणें म्हणजे राष्ट्राचा घात च करणें होय.

**चाळणेचा आळस केला। तरी अवचिता पडेल घाला।**
**ते वेळे सावरायाला। अवकाश कैचा॥** १२-१-१५॥

ग्रन्थराजाच्या श्रवणमननिदिध्यासानें

**आळसी ते चि साक्षपी होती॥**

अशी एक फलश्रुति सांगितली आहे. ती प्रत्ययाला आली पाहिजे. यासाठीं

## (१३) अत्यंत साक्षपी व्हावें

**अत्यंत साक्षपी व्हावें। न व्हावें आळसी कदा।**
**घ्यावा या देहाचा लाहो। जायाचे हे म्हणोनिया॥**

साक्षेप आणि यत्न हे दोन्ही शब्द श्रीसमर्थवाङ्मयांत पुष्कळदां एका च अर्थी योजिलेले दिसतात, तथापि कांहीं ठिकाणीं त्यांच्यांत सूक्ष्म अर्थभेद केलेला दिसतो. उदाहरणार्थ १२×१०×८ त येत्न साक्षेपें जोडावा । असें म्हटलें आहे. येथें दोहोंत स्पष्ट भेद मानला आहे. यत्न या अर्थी साक्षेप शब्द पुष्कळदां योजिलेला असला, तरी साक्षेप म्हणजे निर्धार, निश्चय, निग्रह आणि यत्न हि.

प्रयत्नाविषयीं ठिकठिकाणीं श्रीसमर्थांनीं जें प्रतिपादन केलेलें आहे तें सर्व विचारांत घेतां, मला श्रीसमर्थांचा एक सिद्धान्त असा दिसतो कीं, प्रयत्न करून साध्य न होणारी जगांत कोणती च वस्तु नाहीं. कोणाच्याशा शब्दकोशांत अशक्य हा शब्द नव्हता, असें म्हणण्यांत येतें. मला तें श्रीसमर्थांपुरतें खरें वाटतें. जें मनांत आणावें तें झालें च पाहिजे, असा त्यांचा सिद्धान्त होता. कोणती हि स्थिति प्राप्त करून घेण्याचा मनुष्यानें किंवा समाजानें संकल्प केला कीं, ती स्थिति प्राप्त झाली च पाहिजे, असें ते मानीत. इच्छा आणि संकल्प, या ते शक्ति मानीत. त्यांना अपयश ठाऊक नव्हतें. त्यांच्या इच्छेंत एवढें सामर्थ्य आलें होतें, हें खरें आहे.

**येत्न केल्या कार्य साधतें ॥ १७–७–३० ॥**

हा त्यांचा सिद्धान्त आहे. त्याला त्यांनीं कोठें अपवाद सांगितला नाहीं. प्रयत्नानें न होणारें सुद्धां होतें, झालें पाहिजे, असें ते मानीत.

**नव्हे तें चि करावें कार्य । दीर्घ प्रेत्नें ॥ ११–५–११ ॥**

नव्हे म्हणजे न होणारें.

असें जर आहे, तर जगांत पुष्कळदां प्रयत्न करून हि पदरीं अपयश येतें, तें कां ? श्रीसमर्थांच्या मतें त्याला कारणें दोन च संभवतात : एक तर, योग्य तो प्रयत्न होत नसावा, किंवा दुसरें, कार्याच्या मानानें जितका प्रयत्न व्हावयास पाहिजे असेल तितका होत नसेल. प्रारब्ध हें खोटें कारण, तें श्रीसमर्थ मानीत नाहींत. योग्य प्रयत्न याला श्रीसमर्थांचा शब्द अचुक प्रयत्न असा आहे.

**अचुक येत्न करवेना । म्हणौन केलें तें सजेना ।**
**आपला अवगुण जाणवेना । कांहीं केल्या ॥ १२–२–६ ॥**

हें एक कारण, आणि दुसरें, कार्याच्या मानानें प्रयत्न जेव्हां अपुरा पडतो, तेव्हां अपयश येतें.

**अंतरीं नाहीं सावधानता । येत्न ठाकेना पुरता ।**
**सुखसंतोषाची वार्ता । तेथें कैंची ॥ १२–२–७ ॥**

आणि असें झालें म्हणजे आपणाकडे बोल न घेतां

**प्रारब्धावरी घालिती ॥ १२–२–५ ॥**

अशी सामान्यपणें लोकप्रवृत्ति आढळते. तात्पर्य, जें कार्य साधावयाचें असेल तें साधण्याला अचूक आणि आवश्यक तितका पुरता प्रयत्न हवा. साधावयाचें असावें राज्य आणि त्यासाठीं उद्योग आरंभिला असावा शाई करण्याचा किंवा त्या च तऱ्हेचा दुसरा एखादा. शाई तयार करणें किंवा इतर लहानसहान उद्योग करणें वाईट कोण म्हणेल, पण त्या उद्योगाचा आणि राज्य मिळविण्याचा संबंध काय ? तो उद्योग करून शाई तयार होईल किंवा दुसरें कांहीं होईल, पण राज्य मिळणार नाहीं. राज्य मिळविण्याला शाईच्या उद्योगाचा दाखला श्रीसमर्थांनीं च दिलेला आहे.

**थोर व्यापार ठाकेना जनीं । म्हणोनि केली रखतवानी ।**
**राजसंपदा तयाचेनी । प्राप्त कैंची ॥ २०–१–१० ॥**

रखतवानी म्हणजे शाईचा व्यापार. तो करून कोठें राज्य मिळणार आहे ? कार्य आणि कारण, साध्य आणि साधन यांच्यांत सर्वस्वीं मेळ पाहिजे. तसा मेळ असला म्हणजे कोणतें हि कार्य असाध्य असत नाहीं, मग तें कार्य प्रपंचाचें असो, किंवा परमार्थाचें असो. कार्याचें जसें स्वरूप असेल तशीं साधनें योजिलीं पाहिजेत. त्यांत कष्ट असतील, कष्ट होतील, पण कष्टावांचून फळ हि नाहीं.

**आधीं कष्ट मग फळ । कष्ट चि नाहीं तें निर्फळ ।**
**साक्षेपें विण केवळ । वृथापुष्ट ॥ ११–१०–२० ॥**

प्रपंचांत कष्ट करावे, सुखानें जेवावें.

**साक्षेप करितां कष्टती । परंतु पुढें सुरवाडती ।**
**खाती जेविती सुखी होती । येत्नें करूनी ॥ ११–३–११ ॥**

परमार्थासाठीं कष्ट करावे आणि मोक्ष मिळवावा.

**सावध साक्षपी आणि दक्ष । तयास तत्काळ चि मोक्ष ॥ ८-६-४४ ॥**

प्रयत्नावांचून प्रपंच होत नाहीं आणि परमार्थ साधत नाहीं. तसें च कोणती हि गोष्ट साध्य करावयाची तर प्रयत्न अचुक आणि पुरता पाहिजे, हें हि ठरलें. पण नुसतें एवढें मोघम सांगण्यानें मंद शिष्याचें समाधान न होऊन, प्रयत्न कोणता करूं, हा त्याचा प्रश्न शिल्लक राहिला च. श्रीसमर्थांनीं कोणाची च उपेक्षा केली नाहीं, पण त्यांतल्या त्यांत भाविक आणि साबडे भक्त त्यांना जास्त प्रिय असत. अशांच्या समाधानासाठीं अगदीं सकाळीं उठण्यापासून आणि दिशेकडे जाण्यापासून ११×३ व १२×९ या दोन समासांत या प्रश्नाचें श्रीसमर्थांनीं उत्तर देऊन ठेवलें आहे, ते समास पाहावे. त्यांतील दिनचर्येचा कांहीं भाग सर्वांना सारखा लागू असला तरी तो उपदेश मुख्यतः त्यांच्या भाविक भोळ्या शिष्यांना आहे, महंतांना किंवा राजकारणी पुरुषांना नाहीं.

जाणायाचें सांगतां न ये । हें सूत्र लक्षांत ठेवून प्रज्ञावंत महंतशिष्यांच्या प्रयत्नाचें ११×६ त श्रीसमर्थांनीं मोघम दिग्दर्शन केलें आहे. तो हि समास अवश्य अवलोकनांत यावा.

राजकारणांत प्रयत्न कोणता करावा, याची शिकवण, अप्रत्यक्ष आणि गर्भित अशी, सर्वत्र विखुरलेली आहे, पण प्रत्यक्ष आणि उघड अशी ११×५ व १९×९ या दोन समासांत आली आहे.

११×५ हा समास राजकारणाचा असला तरी त्यांतील तिसऱ्या ओवीच्या आधारानें तो समास श्रीसमर्थसंप्रदायाच्या एकंदर लक्षणांचा च समास होय, असें मी मानीत आणि प्रतिपादित आलों आहें.

**अनन्य राहे समुदाव । इतर जनास उपजे भाव ।**
**ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ११-५-३ ॥**

या ओवीचा सरळ अर्थ हा च होतो कीं, जे आधीं च आमचे आहेत ते आमचे कायमचे व्हावेत, त्यांची निष्ठा दृढ व्हावी व जे आमच्यांत अजून आले नाहींत, जे बाहेर च घुटमळत आहेत व बाहेर राहून च पाहात आहेत, त्यांना आमच्यांत येऊन मिसळण्याची बुद्धि व्हावी, असा

दुहेरी हेतु मनांत आणून आम्हीं पुढील उपाय सुचवीत आहोंत, असें श्रीसमर्थ म्हणत आहेत. अशी प्रस्तावना करून ज्या गोष्टी श्रीसमर्थांनीं सांगितल्या आहेत, तीं श्रीसमर्थसंप्रदायाचीं लक्षणें समजावयाचीं नाहींत तर काय समजावयाचीं ?

नंतर त्या प्रख्यात ओवीपासून लक्षणें सांगण्यास श्रीसमर्थांनीं आरंभ केला आहे.

**मुख्य हरिकथानिरूपण । दुसरें तें राजकारण ।**
**तिसरें तें सावधपण । सर्व विषईं ॥ ४ ॥**

**चौथा अत्यंत साक्षेप । फेडावे नाना आक्षेप ।**
**अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥ ५ ॥**

येथें एक, दोन, तीन, चार असा उल्लेख केलेला असल्यामुळें व श्रीमत् आचार्यांची चतुःसूत्री, श्रीमत् लोकमान्यांची चतुःसूत्री अशा कांहीं चतुःसूत्री जगविख्यात असल्यामुळें, या चार गोष्टींस श्रीसमर्थांची चतुःसूत्री म्हणण्याचा प्रघात कोणी आदरानें पाडला असला तरी तो अकारण दिशाभूल करणारा आहे. ही खरोखर चतुःसूत्री नाहीं. पुढें पांच, सहा, सात, आठ असे अंक घातले नाहींत, इतकें च, पण चारानंतर बाबी सांगण्याच्या संपल्या असें नव्हे. सूत्री म्हणावयाचें च असल्यास हिला **श्रीसमर्थांची चत्वारिंशत्सूत्री** म्हणावें. तींत बरोबर चाळीस सूत्रें भरतात. श्रीसमर्थभक्तांना हा समास मुखोद्गत असावा व त्याचें चिंतन घडावें.

या हि पेक्षां १९×९ त प्रयत्नवादाची आणि चातुर्याची पराकाष्ठा केली आहे. त्यांतील शिकवण हि सांप्रदायिकांना च आहे. त्यांचे सर्व च सांप्रदायिक राजकारणांत भाग घेत असें नव्हे. अधिकारपरत्वें कामें सांगितलेलीं असत. जे शिष्य राजकारण करण्याला योग्य असत आणि राजकारणाची ज्यांना हौस असे, अशांना च ते राजकारणाची परवानगी देत व अशांसाठीं च १९×९ तील शिकवण आहे. श्रीसमर्थहृदयाचा ठाव घ्यावयाचा तर ती शिकवण आपण साद्यंत पाहिली पाहिजे आणि तिचें चिंतन केलें पाहिजे. श्रीसमर्थ शिकवितात :

(१) जो कोणी आमचा शिष्य, ज्ञानी आणि निस्पृह आहे आणि ज्याला समुदाय करण्याचा हव्यास आहे, त्यानें अखंड एकांत सेवावा.

एकांतांत अनेक मार्ग सुचतात आणि कोण कसा, कोण कसा, याची बरोबर कल्पना होते. आपलें दिवाळें निघूं नये म्हणून सावकारास हिशोबाच्या कामांत जशी दक्षता बाळगावी लागते, त्याच प्रमाणें राजकारणी पुरुषानें अखंड चाळणा केली पाहिजे. तसें तो न करील तर खरा कोण आणि खोटा कोण, कोणावर भरंवसा टाकावा किंवा टाकूं नये, हें त्यास समजणार च नाहीं.

( २ ) दुसऱ्याचा खोटेपणा आपल्या आधींच लक्षांत आला म्हणजे त्याचें खोटेंपण आपोआपच खुंटतें.

( ३ ) एका च ठिकाणीं फार दिवस राहिल्यानें अति परिचय होतो व अति परिचयाचें पर्यवसान अवज्ञेंत होतें. यासाठीं सारखें एका च ठिकाणीं राहूं नये.

( ४ ) आळस करूं नये. आळसानें काम नासतें, घात होतो. आपल्या अनुयायांच्या अंतरंगाकडे सारखें लक्ष असावें.

( ५ ) अनुयायांना हि रिकामपण सांपडूं देऊं नये. त्यांच्या मागें सारखीं कामें लावून दिलेलीं असावीं. लबाड्या आणि खोड्या करण्याला त्यांना सवड च मिळूं देऊं नये.

( ६ ) चोराच्या हातीं च भांडाराच्या किल्ल्या द्याव्या, घसरूं लागला तर त्यास शुद्धीवर आणावें आणि याप्रमाणें हळु हळु त्याला चोराचा साव करून सोडावें.

( ७ ) यांत आम्हीं कांहीं नवीन सांगत आहोंत, असें नव्हे. कोणाला हि कष्टी न होऊं देतां, सर्वांना राजकारणामध्यें गोवून घ्यावें.

( ८ ) आपला संशय न येईल अशा रीतीनें नष्टाला नष्टाकडून च ताळ्यावर आणावें व बडबड्याचें तोंड बडबड्याकडूनच बंद पाडावें.

( ९ ) भांडखोरपणाचा दोष आपणावर न येऊं देतां, कांट्यानें कांटा काढावा त्याप्रमाणें भांडखोराला भांडखोराकडून च उडवावा.

(१०) एकादी मसलत षट्कर्णी झाली म्हणजे ती स्वाभाविक बिघडते. कोणास न कळतां कार्य केलें तर तें तत्काळ साधतें.

( ११ ) आपले जे सेवक असतील त्यांच्या कानावर आपल्या गोष्टी जाऊन त्यांना आपल्याविषयीं प्रेम वाटावें, जवळ आल्यानें तें प्रेम दृढ व्हावें व सलगीनें त्यांचें आणि आपलें सेव्यसेवकपणाचें नातें कायम व्हावें.

( १२ ) आज करावयाचें काम उद्यांवर टाकूं नये. असला ढिलेपणा मुळीं च नसावा. जें करावयाचें तें तत्काळ करावें. तें एकदां मागें पडलें कीं, कायमचें च मागें पडतें.

( १३ ) जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला । जो आपण चि कष्टत गेला । तो चि भला ॥

( १४ ) सर्वांच्या च कानावर सर्व कांहीं गोष्टी जाऊं लागल्या, म्हणजे समजावें, यांतलें कांहीं च होणें नाहीं. असें होऊं देऊं नये.

( १५ ) मुख्य सूत्र आपल्या हातीं ठेवून इतरांकडून कामें घ्यावीं. सुष्ट, दुष्ट, सर्वांना च राजकारणामध्यें राबवावें, ज्याचा जितका उपयोग तेवढा करून घ्यावा.

(१६) दुर्जन झाले म्हणून काय, राजकारण आडून पडूं द्यावें ? त्या सर्व बोलक्यांना, पहिलवानांना, भांडखोरांना वठणीवर आणून कामास लावावें.

( १७ ) गांवोगांवीं गांवगुंड असतात, त्यांचें वर्म ओळखून त्यांना अगदीं जेरीस आणावें पण अजिबात नाहींसें करूं नये, अखेरीस सांवरून च धरून कामास लावावें.

( १८ ) लोक दुष्ट आहेत, म्हणून काय राजकारण सोडून द्यावयाचें असतें ? तसें केलें तर उलट आपली च बाजू लंगडी पडून आपण च उघडे पडूं.

( १९ ) तंबु ताणून धरणारे दोर जितके मजबूत तितकी जशी तंबूला बळकटी जास्त, त्याप्रमाणें आपला समुदाय खूप प्रचंड असावा, अशी महत्त्वाकांक्षा असेल तर आपला अनुयायी वर्ग हि खंबीर असला पाहिजे व आपण हि स्वतः मठपतीच्या च तोऱ्यांत न राहतां सर्वत्र नजर पुरविली पाहिजे.

( २० ) दुर्जन नसतात कोठें ? पण आपण त्यांना ओळखतों हें त्यांना कळूं देऊं नये, इतकें च नव्हे, तर उलट आपण त्यांना सज्जन समजतों,

असा च त्यांचा ग्रह होऊं द्यावा. तूं दुर्जन आहेस असें एकाद्यास म्हटलें म्हणजे तें भांडणाला आमंत्रण दिल्यासारखें च होणार. त्या वाटेस च जाऊं नये.

(२१) गर्नामाच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुर्फुरिती भुजा । ऐसा पाहिजे कीं राजा । कैपक्षी परमार्थी ॥ २५ ॥ तयास देखतां दुर्जन धाके । बैसवी प्रचीतीचे तडाखे । बंडपापांडाचे वाखे । सहज चि होती ॥ २६ ॥

(२२) हीं कामें सोपीं नाहींत, फार सावधगिरीनें आणि हुषारीनें केलीं पाहिजेत. हें राजकारण आहे, तें शिस्तीनें झालें पाहिजे, त्यांत ढिलेपणा मुळीं च नसावा.

(२३) सर्व गोष्टी करवाव्या, पण आपण मात्र लोकांच्या नजरेस न पडावें. लोक आपल्या गोष्टी मोठ्या कौतुकानें बोलत राहावे ! आपली वाणी इतकी गोड, मोहक, भारदस्त असावी कीं, तिनें सर्वांचीं मनें आकर्षून घ्यावीं.

(२४) जगांत हुंबे आहेत, टोणपे आहेत, लौंद आहेत; धट असतात, उद्धट असतात, खटनट असतात; या सर्वांच्या तोंडाला कोणी लागावें ? त्यांची त्यांच्या सारख्यांशीं च गांठ घालून द्यावी, म्हणजे बरें, एरव्हीं ते वठणीवर येणें शक्य नव्हे. जशास तसा भेटला म्हणजे च रंग चढतो आणि निकाल लागतो. हें मारें घडवावें, पण हें कोण घडवून आणतो, त्याचा पत्ता नसावा !

**इतुकें होतें परी धनी कोठें । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥**

तो धनी, तो महापुरुष, तो सूत्रचालक कोठें तरी खनाळांत सर्वत्रांची चिंता करीत बसलेला असतो.

## (१४) अखंड सावधान असावें

श्रीसमर्थांच्या चरित्राला आरंभ सावधानतपासून झाला म्हटलें तरी चालेल. त्यांच्या सर्व शिकवणींत ही सावधानता अनुस्यूत भरलेली आहे. सर्वविषयीं सावधपण, हें संप्रदायाच्या लक्षणांपैकीं तिसरें लक्षण होय. श्रीशंभुरायाला श्रीसमर्थांनीं उपदेशपर पत्र पाठविल्याचें प्रसिद्ध आहे, त्यांत

**अखंड सावधान असावें । दुश्चित्त कदापि नसावें ।**

ही सूचना प्रथम केलेली आहे. अशा गुणाचें महत्त्व किती सांगावें. प्रपंच-परमार्थांत त्याची सारखी च आवश्यकता आहे, राजकारणांत विशेष च. त्या काळीं श्रीशिवरायाला जें राजकारण करावयाचें होतें, त्याचा विचार मनांत येऊन

**म्लेंच्छ दुर्जन उदंड । बहुतां दिसाचें माजलें बंड ।**
**याकारणें अखंड । सावधान असावें ॥ १८-६-१२ ॥**

अशी च सूचना श्रीसमर्थांनीं केली आहे. कोणत्या हि काळीं सावधानता हवी च, कठीण काळीं विशेष च.

जन्मास येऊन जें साधावयाचें असेल तें साधण्याविषयीं नेहमीं च सावध राहिलें पाहिजे, कारण देह केव्हां पडेल याचा काय नेम आहे ?

**नाहीं देह्याचा भरंवसा । केव्हां सरेल वयसा ।**
**प्रसंग पडेल कैसा । कोण जाणे ॥ १९-६-२५ ॥**

**याकारणें सावधान असावें । जितुकें होईल तितुकें करावें ।**
**भगवत्कीर्तीनें भरावें । भूमंडळ ॥ २६ ॥**

सावधानतेचा पर्यायशब्द दीर्घसूचना आहे. सावध किती असावें असें विचाराल, तर पुढें काय होणार आहे, याचें आज अनुमान करतां आलें पाहिजे व त्या प्रसंगीं कसें वागावयाचें याची तरतूद करून ठेवतां आली पाहिजे.

**म्हणौन असावी दीर्घसूचना । अखंड करावी चाळणा ।**
**पुढील होणार अनुमाना । आणून सोडावें ॥ १२-१-१२ ॥**

## ( १५ ) अखंड येकांत सेवावा

**ज्ञानी आणि उदास । समुदायाचा हव्यास ।**
**तेणें अखंड सावकाश । येकांत सेवावा ॥ १९-९-१ ॥**

असा सकृद्दर्शनीं विसंगत वाटणारा श्रीसमर्थांचा उपदेश आहे. समुदाय करण्याचा हव्यास असणारानें एकांत सेवावा, एकांतांत समुदाय कोठला ?

**अखंड येकांत सेवावा । अभ्यास चि करीत जावा ।**
**काळ सार्थक चि करावा । जनासहित ॥ ११-१०-१७ ॥**

एकांत सेवावा, एकांतांत अभ्यास करावा, स्फूर्ति मिळवावी, विचारांची ठाम बैठक व्हावी आणि नंतर लोकांत येऊन आयुष्याचें सार्थक करावें ! यांत विसंगतपणा कांहीं नसून एकांताचा गुण केवढा मोठा आहे तो दर्शविला आहे. आपल्या सर्वांना हा सामान्य अनुभव आहे कीं, एकादी वस्तु सांपडत नसली तर क्षणभर स्तब्ध होऊन आपण विचार करतों, म्हणजे ती वस्तु आपण च कोठें ठेवलेली असते, त्याचें स्मरण होतें. हें स्तब्ध होऊन बसणें म्हणजेच एकांत सेवणें होय. मनाच्या सर्व वृत्ति एकत्रित करून एका च गोष्टीचें चिंतन करणें याचें नांव एकांत. याप्रमाणें, लोक भोंवतालीं असून हि, किंवा इतर भयंकर गडबड चालली असून हि, आपण एकांताचा अनुभव घेऊं शकूं.

प्रपंचांत काय आणि परमार्थांत काय, या एकांताचें महत्त्व फार आहे. आपल्या लक्षांत त्याचा गुण येत नाहीं, पण कोणी हि अनुभव घेतलेला मनुष्य सांगूं शकेल कीं, माणसाच्या हातून दुसरीं कोणतीं हि साधनें न झालीं, तरी तो जर नियमितपणें प्रत्यहीं कांहीं काळ एकांतांत बसून नुसतें आत्मनिरीक्षण करील, उपास्याचें चिंतन करील, ध्येयाचा विचार करील, तरी दिवसानुदिवस त्याची प्रगति होत जाईल, त्याची समाधानवृत्ति बळावत जाईल, आनंद वाढत जाईल !

आणि साधनें फलप्रद व्हावीं, अशी इच्छा असेल तर, तीं खरोखर एकांतांत च केलीं पाहिजेत. त्यांचा कधीं बाजार मांडूं नये. तसा त्यांचा बाजार मांडण्यांत मग हेतु च निराळा असला पाहिजे व तो निराळा हेतु कदाचित् साध्य हि होत असेल, पण ईश्वराची कृपा, सद्गुरूचा साक्षात्कार असला कांहीं पारलौकिक हेतु असेल तर, बाजार मांडून कालत्रयीं तो सफल होणार नाहीं. खरें म्हणजे मानसपूजा, ध्यान, जप इत्यादि नित्याचीं आत्मिक साधनें एकांतांत च घडलीं पाहिजेत.

विवेक हि एकांतीं च करावा, तर च विवेक सुचेल.

**येकांतीं विवेक ठाईं पडे । येकांतीं येत्न सांपडे ।**
**येकांतीं तर्क वावडे । ब्रह्मांडगोळीं ॥ १८-१०-४८ ॥**

एकांतांत विचार केला तर च तो अचुक सुचतो. एकांतांत विचार केल्यास अंधार नाहींसा होतो, पुढचा पुढचा मार्ग दिसूं लागतो, कोडीं उलगडत जातात.

एकांत आणि विवेक हे महत्त्वाचे श्रीसांप्रदायिक शब्द आहेत. येकांताचा स्थूल अर्थ एकाग्रचित्त आणि सूक्ष्म अर्थ म्हटला तर ब्रह्माशीं एकरूप होणें असा होऊं शकेल. या सूक्ष्म अर्थाचा अनुभव योगी आणि सिद्ध पुरुष हे च घेऊं शकतील. या अर्थानें हा शब्द ५–२–१०, ७–४–५२, १४–१–२४ इत्यादि ठिकाणीं आलेला आढळतो. पण सामान्यपणें एकांत म्हणजे मनाच्या सर्व वृत्ति दूर होऊन चित्ताची एकाग्रता होणें.

आणि विवेक करणें म्हणजे हृदयांत वास करणारा जो अंतरात्मा, त्याच्या संगतींत काळ कंठणें, त्याच्याशीं बोलत राहणें, त्याचें बोलणें ऐकत राहणें. एकांतांत विवेक करावा, याचा अर्थ

**अंतरात्म्यासरिसें फिरावें । कांहीं तरी ॥ १८–१०–४९ ॥**

असा येकांत ज्याला मानवतो व विवेक करतां येतो, त्याला अतर्क्य किंवा अगम्य कांहीं राहत नाहीं.

**विवेकामधें सांपडेना । ऐसें तों कांहीं च असेना ।**
**येकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ॥ १९–६–२८ ॥**

**अखंड तजवीजा चाळणा जेथें । पाहातां काये उणें तेथें ।**
**येकांतेविण प्राणीयातें । बुद्धि कैंची ॥ २९ ॥**

**येकांतीं विवेक करावा । आत्माराम वोळखावा ।**
**येथून तेथवरी गोवा । कांहीं च नाहीं ॥ ३० ॥**

एका च ध्येयाचे, विचाराचे, मार्गाचे, अनुभवाचे असे अनेक जण एकत्र जमून विचारविनिमय करीत बसतील, तरी तो येकांत च म्हणावा, किंबहुना तो येकांताहून हि येकांत समजावा ! असे एका च उपासनेचे अनेक जण एकत्र जमण्यानें विवेकाला विशेष च चालना मिळण्याचा संभव असतो. हा च भावार्थ मनांत आणून श्रीसमर्थ म्हणतात :

**मिळतां प्रत्ययाचे संत। येकांतापरीस येकांत।**
**केली पाहिजे सावचीत। नाना चर्चा ॥ २०-७-२४ ॥**

तूर्त आपण व्यक्तिशः आपल्यापुरता श्रीसमर्थांची पुढील आज्ञा पाळण्याचा निश्चय करूं या,

**शिष्या एकांतीं बैसावें। स्वरूपीं विश्रांतीस जावें ॥ ५-६-४८ ॥**

आणि स्वरूपीं म्हणजे श्रीसमर्थस्वरूपीं असा अर्थ मानून चालूं. ग्रन्थराज दासबोध म्हणजे च श्रीसमर्थस्वरूप होय. तेव्हां ग्रन्थराजाला हृदयाशीं धरून त्याच्याशीं एकांतांत हितगुज करण्यांत प्रत्यहीं प्रत्येकानें कांहीं काळ नियमानें कंठीत जावा आणि

**प्रचित येईल तो घ्यावा। अर्थ मनीं ॥ १८-३-२० ॥**

## ( १६ ) प्रचीति

प्रचीति म्हणजे प्रतीति, प्रत्यय, अनुभव यावर श्रीसमर्थांचा फार भर. जणूं, बाहु उभारून ते सर्वांना बजावीत आहेत, प्रत्ययावांचून कांहीं मानूं नका, नुसत्या अनुमानावर जाऊं नका, घात करून घ्याल ! प्रतीति तीन प्रकारच्या आहेत : शास्त्रप्रतीति, गुरुप्रतीति व आत्मप्रतीति.

**वेदांत सिद्धांत धादांत। याची पाहावी प्रचित ॥ १४-९-१७ ॥**
**वेदांत सिद्धांत धादांत। प्रचित प्रमाण नेमस्त ॥ १५-९-३४ ॥**

वेदान्त, सिद्धान्त आणि धादान्त म्हणजे अनुक्रमें शास्त्रप्रतीति, गुरुप्रतीति आणि आत्मप्रतीति. या तिहींचें ऐक्य झालें पाहिजे.

येक गुरु येक देव। कोठें तरी भाव ठेवला पाहिजे. पण ती निवड करतांना शंभर वेळां विचार करावा. जगांत आपण पाहातों च ना ? पोहणारा च गटंगळ्या खातो, तो दुसऱ्यास काय तारणार ? गुरु म्हणून वावरणारे च संशयग्रस्त असतात, ते इतरांचे संशय काय फेडणार ? स्वतः आंधळा, दुसऱ्यास निवडण्यास काय मदत करणार ? प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान ज्यास झालें तो च तेवढा डोळस. बाकी सारे आंधळे, ते दुसऱ्यास वाट काय दाखविणार ?

श्रीसमर्थांच्या वेळीं हि प्रत्ययज्ञानाची वाण पडली होती, तेथें नंतरच्या काळाविषयीं बोलावयास च नको. १५×२ त तत्कालीन समाजस्थितीचें श्रीसमर्थांनीं जें चित्र रेखाटलें आहे, त्यांत प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान कोणी पाहात नाहींत असे त्यांनीं दुःखोद्गार काढल्याचें आपण मागें पाहिलें च आहे.

**प्रखर वैराग्य उदासीन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान ।**
**स्नान संध्या भगवद्भजन । पुण्यमार्ग ॥ १२-४-१८ ॥**

तो पुण्यमार्ग जेथें सुटला, जेथें

**वैराग्य मुळींहून नाहीं । ज्ञान प्रत्ययाचें नाहीं ।**
**शुचि आचार तो हि नाहीं । भजन कैंचें ॥ १२-७-१२ ॥**

**ऐसे प्रकारीचे जन । आपणास म्हणती सज्जन ।**

असले हे आचारविचारहीन पाखंडी सज्जन इतरांस उगमापर्यंत कसें नेऊन पोचविणार ?

अशा परिस्थितींत वारंवार सांगण्याचा मला कंटाळा येणार नाहीं, अशा धोक्याच्या काळांत आत्महितासाठीं तळमळणारांनीं ग्रन्थराज दासबोध म्हणजे च श्रीसमर्थ होत, असें मानून त्यास शरण जावें. तो प्रत्ययाचा ग्रन्थ आहे. त्याला मुख्य आधार आत्मप्रचीतीचा आहे. त्याच्या श्रवणाची जी फलश्रुति पहिल्या दशकाच्या पहिल्या च समासांत सांगण्यांत आली आहे तिचा प्रत्यय घेऊन पाहावा.

**ग्रन्थाचें करावें स्तवन । स्तवनाचें काय प्रयोजन ।**
**येथें प्रत्ययास कारण । प्रत्ययो पाहावा ॥ २०-१०-३३ ॥**

श्रीसमर्थ अर्धवट कधीं बोलले नाहींत.

**प्रवृत्ती अथवा निवृत्ती । प्रचीतीविण अवघी भ्रांती ।**
**गळंग्यामधील जगज्जोती । चेतेल कोठें ॥ १९-२-५ ॥**

गळंग्यामध्यें पडलेला अग्नि जसा धुमसतो पण चेतत नाहीं, तद्वत प्रत्ययावांचून, नुसत्या अनुमानधपक्यानें केलेल्या व्यवहारांत, राजकारणांत, प्रपंचपरमार्थांत कधीं यश येणार नाहीं. दहाव्याच्या आठव्या समासांत

निर्भीड बोलण्याची श्रीसमर्थांनीं पराकाष्ठा केली आहे. संशय, अनुमान, अज्ञान यांनीं कधीं कोणाचें हित झालें नाहीं किंवा कोणास परमार्थ कळला नाहीं.

**पापाची खंडणा जाली । जन्मयातना चुकली ।**
**ऐसी स्वयें प्रचित आली । म्हणिजे बरें ॥ १०-८-२१ ॥**

**परमेश्वरास वोळखिलें । आपण कोणसें कळलें ।**
**आत्मनिवेद्न जालें । म्हणिजे बरें ॥ २२ ॥**

**ब्रह्मांड कोणें केलें । कासयाचें उभारलें ।**
**मुख्य कर्त्यास वोळखिलें । म्हणिजे बरें ॥ २३ ॥**

**येथें अनुमान राहिला । तरी परमार्थ केला तो वायां गेला ।**
**प्राणी संशई बुडाला । प्रचीतीविण ॥ २४ ॥**

**हें परमार्थाचें वर्म । लटिकें बोले तो अधम ।**
**लटिकें मानी तो अधमोधम । येथार्थ जाणावा ॥ २५ ॥**

**येथें बोलण्याची जाली सीमा । नेणतां न कळे परमात्मा ॥**
**असत्य नाहीं सर्वोत्तमा । तूं जाणसी ॥ २६ ॥**

**माझे उपासनेचा बडिवार । ज्ञान सांगावें साचार ।**
**मिथ्या बोलतां उत्तर । प्रभूस लागे ॥ २७ ॥**

श्रीरामाला साक्षी ठेवून श्रीसमर्थ सांगतात, निःसंदेह प्रत्ययज्ञान हें च परमार्थाचें मुख्य वर्म होय. अनुमानाचें आणि संशयाचें सारें करणें निरर्थक होय. ( ५-१०-१० ते २७ पाहणें. )

**( १ ) जितुकें अनुमानाचें बोलणें । तितुकें वमनप्राये त्यागणें ।**
**निश्चयात्मक तें चि बोलणें । प्रत्ययाचें ॥ ९ ५/३९ ॥**

**( २ ) प्रचित पाहेल तें शाहाणें ।**
**येर वेडे दैन्यवाणे । प्रचीतीविण ॥ १० ६/१ ॥**

**( ३ ) म्हणोनी अनुमानाचें कार्य । भल्यानीं कदापि करूं नये ।**
**उपाय पाहातां अपाये । नेमस्त घडे ॥ १० ६/९ ॥**

**( ४ ) तैसें प्रचीतीविण ज्ञान । तेथें नाहीं समाधान ।**
**करून बहुतांचा अनुमान । अन्हीत जालें ॥ १० ६/१६ ॥**

**(५) प्रत्ययाविण सिणावें। तें चि पाप ॥ १०$\frac{१\,०}{५\,३}$ ॥**

**(६) प्रचीतीविण जें ज्ञान। तो अवघा चि अनुमान।**
**तेथें कैंचें परत्रसाधन। प्राणीयासी ॥ १४$\frac{७}{१८}$ ॥**

**(७) जें प्रचीतीस आलें खरें। तें चि घ्यावें अत्यादरें।**
**अनुभवेंविण जें उत्तरें। तें फलकटें जाणावीं ॥ १८$\frac{५}{२१}$ ॥**

**(८) प्रचीतीविण जें केलें। तें तें अवघें वेर्थ गेलें॥**
**प्राणी कष्टकष्टों चि मेलें। कर्मकचाटें ॥ १८$\frac{६}{२०}$ ॥**

दास म्हणे वारंवार। किती सांगों ॥ ते किती हि सांगून गेले, तरी आमचें दैन्य, पाप आणि कर्म कांहीं सुटावयाचें नाहीं! ज्ञानाच्या गोष्टी बोलणारांनीं, स्वतःला यत्किंचित् हि अनुभव नसतां दुसऱ्यास ज्ञानदान करणारांनीं हि यापासून बोध घ्यावा! स्वतः बुडलेले असून ज्ञानाचा आभास उत्पन्न करून दुसऱ्यास भ्रमांत पाडावें, हें केवढें पाप आहे, याचा विचार करावा.

**प्रचीतीविण ज्ञान सांगणें। या नांव भ्रम ॥ १०$\frac{६}{३२}$ ॥**

त्या भ्रमांत स्वतः पडण्याचें आणि इतरांस पाडण्याचें खोटें कर्म कोणी करूं नये. अध्यात्मासारख्या महत्त्वाच्या विषयांत

**उगें च बोलणें अनुमानाचें। अनुमानाचें कोण्या कामाचें।**
**येथें सगट विचाराचें। काम नाहीं ॥ २०–७–२९ ॥**

सगट विचार म्हणजे गोंधळ, हें हि खरें आणि तें हि खरें अशी अनिश्चयात्मक भाषा.

**सगट विचार तो अविचार। कित्तेक म्हणती येकंकार।**
**येकंकार भ्रष्टाकार। करूं नये ॥ ३० ॥**

समाजांत जसा येकंकार भ्रष्टाकार नसावा, तसा तो विचारांतहि नसावा.

कार्यकर्ता महंत अनुभवाचा पाहिजे. दुसऱ्यास तारावयास निघालेला मनुष्य स्वतः तरलेला पाहिजे. समुदाय करण्यास प्रवृत्त होणारा स्वतः सिद्ध पाहिजे. परमार्थांतला अनुभव कसा असतो, तो ऐका :

ऐक अनुभवाचें लक्षण । अनुभव म्हणिजे अनन्य जाण ।
ऐक अनन्याचें लक्षण । ऐसें असे ॥ २९ ॥

अनन्य म्हणिजे अन्य नसे । आत्मनिवेदन जैसें ।
संगभंगें असत चि असे । आत्मा आत्मपणें ॥ ३० ॥

आत्म्यास नाहीं आत्मपण । हें चि निःसंगाचें लक्षण ।
हें वाच्यांशें बोलिलें जाण । कळावया कारणें ॥ ३१ ॥

येरवीं लक्ष्यांश तो वाच्यांशें । सांगिजेल हें घडे कैसें ।
वाक्यविवरण अपैसें । कळों लागे ॥ ३२ ॥

करावें तत्वविवरण । शोधावें ब्रह्म निर्गुण ।
पाहावें आपणास आपण । म्हणिजे कळे ॥ ३३ ॥

हें न बोलतां च विवरिजे । विवरोन विरोन राहिजे ।
मग अबोलणें चि साजे । महापुरुषीं ॥ ३४ ॥

शब्द चि निशब्द होती । श्रुति नेति नेति म्हणती ।
हें तों आलें आत्मप्रचितीं । प्रत्यक्ष आतां ॥ ३५ ॥

प्रचित आलियां अनुमान । हा तों प्रत्यक्ष दुराभिमान ।
तरी आतां मी अज्ञान । मज कांहीं च न कळे ॥ ३६ ॥

मी लटिका माझें बोलणें लटिकें । मी लटिका माझें चालणें लटिकें ।
मी माझें अवघें चि लटिकें । कल्पनिक ॥ ३७ ॥

मज मुळीं च नाहीं ठाव । माझें बोलणें अवघें चि वाव ।
हा प्रकृतीचा स्वभाव । प्रकृती लटिकी ॥ ३८ ॥

प्रकृति आणि पुरुष । या दोहींस जेथें निरास ।
तेथें मीपण विशेष । हें केवि घडे ॥ ३९ ॥

जेथें सर्व हि अशेष जालें । तेथें विशेष कैंचें आलें ।
मी मौनी म्हणतां भंगलें । मौन्य जैसें ॥ ४० ॥

आतां मौन्य न भंगावें । करून कांहींच न करावें ।
असोन निशेष नसावें । विवेकबळें ॥ ४१ ॥

१७×३ या समासाची पहिली च ओवी वाचतांना माझ्या डोळ्यापुढें तत्कालीन एक चित्र उभें राहतें. शिष्यगणानें वेष्टिलेले व मध्यभागीं विराजमान झालेले श्रीसमर्थ त्या समासांत मला दिसतात.

राष्ट्रगुरु श्रीसमर्थांचा असा परिपाठ दिसतो कीं, सकाळ, सायंकाळ, फावेल तेव्हां शिष्यमंडळीपुढें बसून एकाद्या ग्रन्थाधारें अध्यात्माचें निरूपण करावयाचें. अशा प्रसंगीं क्वचित् राजकारणाच्या, व्यवहाराच्या, आत्म-चरित्राच्या हि गोष्टी निघत असतील. श्रीसमर्थांची आज्ञा झाली म्हणजे शिष्यमंडळी आपआपल्या पोथ्या घेऊन गोळा होत असत व पोथ्या पुढें ठेवून बसत असत. एकदां याप्रमाणें सर्व मंडळी बसून श्रीसमर्थ येण्याची वाट पाहात होती. तिकडून श्रीसमर्थ येताहेत, असें पाहतां च मंडळी आपआपल्या पोथ्या सोडूं लागली. श्रीसमर्थ आले आणि शिष्यांना पोथ्या सोडतांना पाहून आसनावर बसतां बसतां च त्यांना म्हणाले, थांबा, इतक्यांत पोथ्या सोडूं नका, मी काय सांगतों तें आधीं नीट लक्ष लावून ऐका, मग पोथ्या सोडून पडताळा पाहा :

**थांबा थांबा ऐका ऐका । आधीं च ग्रन्थ सोडूं नका ।**
**सांगितलें तें ऐका । सावधपणें ॥ १७–३–१ ॥**

ग्रन्थ सोडणें म्हणजे काय, याचा अर्थ हल्लींच्या काळीं कदाचित् सर्वांच्या एकदम लक्षांत येणार नाहीं. ग्रन्थ सोडणें म्हणजे अभ्यासक्रम संपला, परीक्षा झाली, आतां ग्रन्थाचें दर्शन हि नको, असा अर्थ नव्हे. पूर्वीं पोथ्यापुस्तकें बासनांत, वर गोफ गुंडाळून ठेवीत असत (१९–१–२० पाहा.) त्याप्रमाणें या प्रसंगीं मंडळी गोफ उलगडावयास लागली असतां राष्ट्रगुरूनें थांबण्यास सांगितलें आणि काय सांगितलें ?

हें पाहा, सामान्य व्यवहार करतांना किंवा व्यवहारांतील महत्त्वाच्या आणि नाजुक गोष्टी करतांना आपणांस किती तरी सावधगिरी बाळगावी लागते. मग व्यवहारांतील त्या अत्यंत महत्त्वाच्या बाबीपेक्षां कोटीगुणें ज्या अध्यात्माचें महत्त्व, त्याचें निरूपण चाललें असतां आपलें चित्त किती एकाग्र असावयास पाहिजे, याचा विचार करा. मी सांगतों तें ऐका, त्याचें चिंतन करा, त्याचा निदिध्यास घ्या, तुम्हांला साक्षात्कार झाल्यावांचून राहणार नाहीं.

हें माझें उधारीचें बोलणें आहे, असें समजूं नका. हा रोखीचा व्यवहार आहे. हा रोखठोक अनुभव आहे.

**श्रवणमननाचा विचार । निजध्यासें साक्षात्कार ।**
**रोकडा मोक्षाचा उधार । बोलों चि नये ॥ ३ ॥**

प्रत्यय घेऊन पाहा. श्रीरामकृष्णादिकांचीं चरित्रें ऐकण्यांत पुण्य असेल, पण त्याचें फळ तत्काळ हातीं येत नाहीं,

**तैसें नव्हे अध्यात्मसार । हा प्रचीतीचा विचार ।**
**कळतां अनुमानाचा संव्हार । होत जातो ॥ १० ॥**

पाहा, बाकी साऱ्या गोष्टी झाल्या आणि गेल्या, अवतार झाले आणि गेले, होतील आणि जातील, पण युगायुगांचे ठायीं जो अंतरात्मा तिन्ही लोकांस चालवितो, तो एकटा च कायम आहे. त्याचें ज्ञान आपण करून घेऊं तर आपण खरे विवेकी. पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, गुणमाया, मूळमाया या चढत्या खांजणीभांजणीपैकीं पृथ्वी, आप, तेज आणि कदाचित् वायु यांचें ज्ञान होणें सुलभ आहे, त्यांच्या वरच्या ज्या पायऱ्या त्या समजणें कठीण आहे, पण

**वायोपासून पैलिकडे । जो कोणी विवेकें पवाडे ।**
**जवळी च आत्मा सांपडे । तया पुरुषासी ॥ १७ ॥**

हें ज्ञान होण्याचें मुख्य साधन विवेक, विचार. मी सांगतों तें ऐका व तुमचा तुम्ही च विचार करा.

**विचारें ऊर्ध्व चढती । तयासी च उर्ध्वगती ।**
**येरां सकळां अधोगती । पदार्थज्ञानें ॥ २१ ॥**

पदार्थ आतां असतील, क्षणानें नसतील, ते क्षणभंगुर होत. एक एक पायरी वर चढत जा.

**मूळमायेचे सेवटीं । हरिसंकल्प मुळीं उठी ।**

तो अंतरात्मा, तो मागें सांगितला च आहे, त्याची उपासना घडली पाहिजे,

**उपासनायोगें मिठी । तेथें घातली पाहिजे ॥ २५ ॥**

तेथें उपासना संपते.

**मग त्यापैलिकडे जाण । निखळ ब्रह्म निर्गुण ॥ २६ ॥**

त्याचें ज्ञान होण्याला पिंडब्रह्मांडाचा संहार तरी झाला पाहिजे, किंवा हें विवेकानें जाणलें पाहिजे !

इतकें बोलून श्रीसमर्थ म्हणाले, आतां सुखानें आपआपले ग्रन्थ सोडा आणि पाहा.

ज्यांनीं असले प्रसंग कैक अनुभविले आणि प्रत्यक्ष श्रीसमर्थांच्या मुखांतून तत्त्वज्ञानाच्या, राजकारणाच्या आणि क्वचित् आत्मचरित्राच्या गोष्टी ऐकल्या ते कल्याणउद्धवदिवाकरादि शिष्य किती भाग्यवान् म्हणावयाचे !

तात्पर्य, समुदायाचा हव्यास बाळगणारा प्रत्ययज्ञानी पाहिजे. प्रपंच-परमार्थांत कोणती हि गोष्ट केवळ अनुमानानें करूं नये, अनुभवावांचून सारें कर्म फोल होय. समजलें, उमजलें, आणि तदनुसार वर्तलें पाहिजे. एकदम साधणार नाहीं, यासाठीं

**म्हणे दास सायास त्याचे करावे ।**
**जनीं जाणता पाय त्याचे धरावे ॥**

## ( १७ ) म्हणोन सद्गुरु करावा । सत्संग शोधून धरावा ।

प्रत्ययाचा मनुष्य भेटणें दुरापास्त आणि स्वत:ला प्रत्यय येणें त्याहून दुरापास्त. प्रत्ययावांचून परमार्थाचा उपदेश करणारे मात्र बहुत असतात. ते स्वतः तरलेले नसतात आणि इतरांस अज्ञानांत ठेवण्यास कारणीभूत होत असतात. अशांच्या नादीं लागून पुष्कळ लोक आपलें अनहित करून घेत असतात.

**लोकांचें बोलीं जो लागला । तो अनुमानें च बुडाला ।**
**याकारणें प्रत्ययाला । पाहिलें च पाहावें ॥ १५–४–३१ ॥**

हें च पुन्हां अशा च शब्दांत सांगितलें आहे.

**बहुतांचे बोलीं लागलें । तें प्राणी अनुमानीं बुडालें ।**
**मुख्य निश्चये चुकलें । प्रत्ययाचा ॥ १५–६–१० ॥**

ज्ञानाचा आविर्भाव आणून दुसऱ्यांस भुरळ पाडणारे फार.

**उगीच करी गथागोवी । तो लोकांस कैसें उगवी ॥ १७-४-१४ ॥**

**भ्रमास म्हणे परब्रह्म । परब्रह्मास म्हणे भ्रम ।**
**ज्ञातेपणाचा संभ्रम । बोलोन दावी ॥ १५ ॥**

**घाली शास्त्रांची दडपण । प्रचीतीविण निरूपण ।**
**पुसो जातां उगाच सीण । अत्यंत मानी ॥ १६ ॥**

प्रचीति आलेले आणि प्रचीतीनें बोलणारे दुर्लभ असतात. मुळीं च नसतील असें कसें म्हणतां येईल, पण दुर्मिळ असतात. ते हुडकून काढावे लागतात. पुष्कळ धुंडावे तेव्हां एकादा आढळावयाचा. जेवढे स्वतःस बुवा, साधु किंवा महाराज म्हणवून घेतात, तेवढे सर्व कां त्या नांवांना पात्र असतात ? नव्हे.

**उदंड हुडकावे संत । सांपडे प्रचीतीचा महंत ॥ २०-३-२७ ॥**

स्वतःचें अज्ञान झांकण्यासाठीं कोणी मौन धारण केलेलें असतें, ज्ञानी पुरुषाच्या चेहऱ्यावरील गांभीर्याचें कोणी अनुकरण करितात, असंबद्ध बोलणें हें च साधुत्वाचें लक्षण मानून कोणी कांहीं तरी बरळत असतात. अशीं नाना तऱ्हेचीं सोंगें ढोंगें पाहावयास मिळतात, पण त्यांतच एकादा खरा हि असावयाचा, तो हुडकून काढावा लागतो. अशांच्या सहवासांत कांहीं काळ घालविला म्हणजे त्यांची तेव्हांच परीक्षा होते. त्यांत ज्ञाता आढळला म्हणजे त्याची संगति धरावी. अशी संगति लाभण्याला पदरीं पुष्कळ पुण्याई असावी लागते.

**प्रत्ययज्ञाता सावधान । त्याचें ऐकावें निरूपण ।**
**आत्मसाक्षात्काराची खूण । तत्काळ बाणे ॥ १७-४-३० ॥**

ही सावधगिरी परमार्थांत तशी प्रपंचांत हि घेतली पाहिजे. प्रपंचांत जाणत्यांना पुसावें आणि परमार्थांत सद्गुरूला शरण जावें.

**इहलोक साधायाकारणें । जाणत्याची संगती धरणें ।**
आणि **परलोक साधायाकारणें । सद्गुरु पाहिजे ॥ १२-३-२ ॥**

जाणत्याशीं आपण कसें वागावें, त्याच्यापाशीं काय काय शिकावें याचें सविस्तर विवरण १८ × २ त वाचावयास मिळतें. निरनिराळ्या विषयांतील जाणत्यांपाशीं त्यांच्या त्यांच्या गुणांचा अभ्यास करावा. या सर्वांत

**जाणत्याचे स्फूर्तीचे तरंग । अभ्यासावे ॥ १८–२–१२ ॥**

या श्रीसमर्थांच्या आज्ञेचें मला फार कौतुक वाटलें. जाणत्याच्या अंतरंगांतील तरंग हि अभ्यासावे, अशी श्रीसमर्थांची आज्ञा आहे. तो च उद्योग आपण आज तीनशें वर्षांनीं, अर्थात् आपल्या अल्प बुद्धीप्रमाणें, आरंभिला आहे !

**जाणता येक अंतरात्मा ॥ १८–२–२३ ॥**

तो च परमेश्वर आणि ते च श्रीसमर्थ. त्यांनीं आतांपर्यंत कृपा केली, तशी ती शेवटपर्यंत करावी, अशी प्रार्थना आहे.

## ( १८ ) निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥

श्रीसमर्थांचे शिष्य दोन प्रकारचे असत: एक संसारी आणि दुसरे निस्पृह. निस्पृह बहुधा ब्रह्मचारी असत. त्यांची सारी शिकवण या दोन्ही प्रकारच्या शिष्यांना आहे, पण तींत हि त्यांचा विशेष कटाक्ष निस्पृहावर आहे. समुदाय करण्याची विशेष जबाबदारी त्यांच्यावर च असे. ११ × १०, १४ × १ व १५ × २ हे तीन समास केवळ निस्पृहांस उद्देशून आहेत. इतर हि कांहीं असतील. या तिन्ही समासांतील शिकवण ते प्रचीतीनें देत आहेत. या तीन समासांत श्रीसमर्थांचें अंतरंग स्पष्ट दिसतें. हे तीन समास वाचीत असतां आपण श्रीसमर्थहृदयांत प्रवेश करीत आहोंत, असें भासतें. या तीन समासांत आपण त्यांचें आत्मचरित्र वाचीत आहोंत, असें च वाटतें. श्रीसमर्थजीवन कशा प्रकारचें होतें, याची कल्पना या तीन समासांवरून बरोबर होण्यासारखी आहे. असें मानण्याला मला आधार इतका च कीं, या तिन्ही समासांतील शिकवण आपल्या प्रत्ययाची आहे, असें त्यांनीं दोन समासांत स्पष्ट म्हटलें आहे व तिसऱ्यांत ध्वनित केलें आहे.

**हें प्रचीतीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें ॥**

हें ११ × १० तील त्यांचें वचन सुप्रसिद्ध च आहे.

**साधें बोलणें सप्रचीत । तैसे माझें ॥**

अशी प्रस्तावना करून च १४ × १ ला त्यांनीं आरंभ केला आहे व १५ × २ त

**प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । कोण पाहे ॥**

असा खेद व्यक्त करून स्वतःचें प्रत्ययज्ञान ध्वनित केलें आहे.

तात्पर्य, या तिन्ही समासांत श्रीसमर्थचरित्र आहे व त्यांतील शिकवण निस्पृहांना आहे, याविषयीं शंका राहात नाहीं. या तिन्ही समासांतील शिकवणीचा पाया तीन गोष्टींत आहे; (१) निस्पृहानें सर्व कांहीं करून स्वतः अलिप्त राहावें, (२) भ्रमण करावें, (३) भिक्षेवर राहावें.

(१) निस्पृहानें येकदेशी नसावें, अंतरात्मा ज्याप्रमाणें बहुधा होऊन भोगितो। नाना सुखें ॥ ११-१०-१ ॥ त्याप्रमाणें निस्पृहानें असावें, सर्व सार शोधून घ्यावें, परंतु स्वतः

**पाहों जातां न संपडावें। येकायेकी ॥ ११-१०-४ ॥**

अशी च सूचना १४×१ त हि आहे.

**निस्पृहें अवघें चि करावें। परी आपण तेथें न संपडावें।**
**परस्परें उभारावें। भक्तिमार्गासी ॥ १४-१-५९ ॥**

तात्पर्य, ब्रह्मांडाचा व्याप करून हि निस्पृहानें अलिप्त असावें.

(२) त्यानें एका जागीं राहूं नये, परिभ्रमण करावें. १४×१×६, १९, २९

**उपाधीपासुनी सुटला। तो निस्पृहपणें वळावला।**
**जिकडे अनकूळ तिकडे चालिला। सावकास ॥१९-१०-२४ ॥**

हा च बोध

**निस्पृह आणि नित्य नूतन ॥ १५-१-३२ ॥**

यांत ध्वनित केला आहे आणि

(३) तिसरी गोष्ट म्हणजे पोटासाठीं त्यानें प्रत्यहीं भिक्षा करावी. १४×१×८, ५६. कृपा करून १४×२ हा समास हि या च वेळीं पाहा. ही भिक्षा निस्पृहाला सांगितली आहे. तो चरितार्थाचा धंदा नव्हे. सांप्रदायिक वेष धारण करून बायकापोरांचा प्रपंच चालविण्यासाठीं भिक्षा मागणारे संप्रदायाला कमीपणा आणतात.

**सुखरूप भिक्षा मागणें। ऐसी निस्पृहतेचीं लक्षणें।**
**मृद वाग्विळास करणें। परम सौख्यकारी ॥ १४-२-२१ ॥**

आणि याप्रमाणें भिक्षा करीत परिभ्रमण करावयाचें तें तरी लोकांची परीक्षा करण्याची संधी मिळावी म्हणून.

पण आतां कार्य कांहीं उरलें नाहीं, श्रीसमर्थांप्रमाणें हातांत वेताची छडी घेऊन विचारणारा कोणी उरला नाहीं, स्वतःवर कांहीं जबाबदारी आहे, याची जाणीव राहिली नाहीं आणि पोटासाठीं भिक्षा मात्र राहिली आहे.

ज्याला समुदाय करून कांहीं कार्य करावयाचें असेल, त्याच्या ठिकाणीं निस्पृहता अवश्य पाहिजे. निस्पृहतेशिवाय कोणी लोकमान्य होऊं शकत नाहीं.

**स्वतः निस्पृह असेना। त्याचें बोलणें चि मानेना ॥ १९–६–३ ॥**

कोणता तरी एकादा गुण उच्च कोटीला पोंचला पाहिजे, तर च लोकप्रियता आणि लोकमान्यता हीं प्राप्त होतात.

**उत्कट भक्ति उत्कट ज्ञान। उत्कट चातुर्य उत्कट भजन।**
**उत्कट योग अनुष्ठान। ठाईं ठाईं ॥ १९–६–२२ ॥**
**उत्कट निस्पृहता धरिली। त्याची कीर्ति दिगांतीं फांकली।**
**उत्कट भक्तीनें निवाली। जनमंडळी ॥ २३ ॥**
**कांहीं येक उत्कटें विण। कीर्ति कदापि नव्हे जाण ॥**

निस्पृह शिष्यांना शिकवण देण्यावर श्रीसमर्थांचा मोठा कटाक्ष असे, असें वर म्हटलें, त्याबरोबर हें हि सांगितलें पाहिजे कीं, निस्पृह शिष्यावर त्यांची फार करडी नजर असे. निस्पृह शिष्याला अपराधाची क्षमा नसे.

एक प्रसंग आठवतो तो सांगतों. त्यांत आपणास श्रीसमर्थ आणि श्रीकल्याण या दोघांचें हि दर्शन घडतें. श्रीरामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील नववा भाग – श्रीसंप्रदायांचीं कागदपत्रें – यांतील लेखांक ५० यांत हा प्रसंग स्वतः श्रीकल्याणांनीं सांगितला आहे.

एकदां श्रीसमर्थ शिवतरच्या घळींत असतां श्रीशिवछत्रपति यांस शरीरव्यथा बहुत कठीण झाली आहे असें ऐकून त्यांनीं श्रीकल्याणस्वामीस आज्ञा केली कीं, तुझें नांवच कल्याण आहे, तेव्हां कल्याणार्थ प्रसाद घेऊन राजे यांजकडे त्वां जावें. त्याप्रमाणें प्रसाद घेऊन कल्याणस्वामी गेले. साताऱ्यास वाड्याच्या बाहेर दरवाजापाशीं थांबले. त्या च समयास छत्रपतींना स्वप्नसाक्षात्कार

झाला कीं, श्रीसमर्थांकडून कल्याण गोसावी कल्याणार्थ प्रसाद घेऊन आले आहेत. जागृत होऊन खरें कीं काय हें पाहण्यासाठीं छत्रपतींनीं दरवाजापाशीं सेवक पाठविला, तों कल्याणस्वामी दरवाजावर बसलेले त्यास आढळले. सेवकाबरोबर कल्याणस्वामी राजदर्शनास आंत गेले. पलंगावरून उठून उभे राहून, पुढें येऊन, वंदनपूर्वक प्रसाद घेऊन छत्रपति त्रिवार म्हणाले कीं, श्रीसमर्थांचा प्रसाद कल्याणगोसावियाबरोबर आला, आतां कल्याण आहे. श्रीसमर्थांची आणखी काय आज्ञा आहे म्हणून छत्रपतींनीं विचारलें आणि कांहीं आज्ञासंकेत होता तो कल्याणांनीं निवेदन केला, पण त्याबरोबर आपल्या स्वतःचा कांहीं कार्यभाग होता तो हि कल्याणांनीं उरकून घेतला. कल्याण श्रीसमर्थांकडे परत फिरले. ते वेळीं श्रीसमर्थ "सिवथर प्रांतीं नवलवाडीयाचा कोंड तेथे जाभलीच्या चउथरीयावर संतोपरूप बसले होते." तेथील माती कपाळास लावावी म्हणून ती जागा धुंडून काढून पाहण्यास आम्ही मागें गेलों होतों व त्या जागेचें महत्त्व, तेथील एकादोघांनीं विचारल्यावरून त्यांस सांगितलें होतें. अगदीं अलिकडे त्या जागीं तत्रस्थांनीं स्वयंस्फूर्तीनें श्रीसमर्थांच्या मूर्तीची स्थापना केल्याचें कळलें आहे, असो. श्रीसमर्थांना नमन करून छत्रपतींचा भावार्थ, चमत्कार कौतुक वगैरे निवेदन करून आपण आपलें हि कोणतें कार्य करून घेतलें तें कल्याणांनीं सांगितलें. त्यावर श्रीसमर्थ कल्याणांस म्हणाले "... तुम्ही निस्पृह हे प्रयोजन तुम्हास बोलिले नाही........ आर्जववृत्तीनें मागणे निस्पृहाचा धर्म नव्हे...."

असो, ११×१० हा समास आपण मागें च संपूर्ण सादर केला आहे व १५×२ चा उल्लेख पूर्वी अनेकदां करण्यांत आला आहे. येथें आतां १४×१ त श्रीसमर्थांनीं निस्पृहाचा जो धर्म निवेदन केला आहे, जीं लक्षणें सांगितलीं आहेत, ज्या आज्ञा केल्या आहेत, त्या सविस्तर द्याव्या असें मनांत येतें. त्यांत आपणांस श्रीसमर्थांचें दर्शन घडेल, त्यांच्या हृदयाची ओळख पटेल व तेणेंकरून आपणा सर्वांचें त्यांच्या चरणीं चित्त जडेल, असा विश्वास वाटतो.

(१) तुम्ही निस्पृहतेनें वागा अशी तुमच्यावर कोणाची सक्ती नाहीं, पण एकवार **निस्पृहता** अंगिकारली म्हणजे ती सोडूं नये, आणि सोडली तर मग ओळखीच्या लोकांना तोंड दाखवूं नये.

(२) **द्रव्य दारा** पाहों नये। आळकेपणें ॥
(३) पुसतां हि देऊं नये। **वोळखी** आपली ॥
(४) प्रसंग पाहून वागावें, **दुराग्रह** करूं नये
(५) **भोगीं** मन असों नये।
(६) देहदुःखें **त्रासों** नये।
(७) **जीवाची पर्वा** करूं नये।
(८) **विरक्ति** गळों देऊं नये।
(९) समयीं **धीर** सांडूं नये।
(१०) **करुणाकीर्तन** सोडूं नये। **अंतर्ध्यान** मोडूं नये।
**प्रेमतंतु** तोडूं नये। सगुणमूर्तीचा ॥
(११) पोटीं **चिंता** धरूं नये।
(१२) **कष्ट** करण्याचा खेद मानूं नये
(१३) कोणी **अपमान** केला किंवा **धिःकार** केला तरी कार्यावर नजर ठेवून मनाला लावून घेऊं नये
(१४) कोणी **लाजविलें** किंवा **खिजविलें** तरी पर्वा नसावी
(१५) शुद्ध उपासना विमल ज्ञान। वीतराग आणि ब्राह्मण्यरक्षण। गुरुपरंपरेचें लक्षण। शुद्ध मार्ग ॥ असा हा पंचलक्षणात्मक **शुद्ध मार्ग** सोडूं नये
(१६) **दुर्जन** आणि **चांडाळ** यांच्याशीं संबंध येऊं देऊं नये
(१७) तपीळपण म्हणजे **संताप** येऊं देऊं नये. **रागाच्या** किंवा **क्रोधाच्या** भरांत समजून उमजून भलत्या च गोष्टी करूं नये
(१८) आपलें **धोरण** निश्चित असावें, त्यापासून आपणास कोणी हि सहज च्युत करावें, असें नसावें. आपली **भूमिका** ठाम असावी. कोणी भांडविलें, हांसविलें, बोलविलें, चालविलें तर आपली भूमिका सुटूं नये
(१९) भ्रमण करावयाचें आहे, तर एकच एक **वेष** नसावा
(२०) कोणासी फार **सलगी** करूं नये

(२१) **नित्यनेम** सांडूं नये, पण सारखें भ्रमण करावयाचें असल्यामुळें फार नेम लावून घेऊं हि नये

(२२) **परतंत्र** होऊं नये । कांहीं केल्या ॥

(२३) वारंवार दुसऱ्याची अपेक्षा करून आपलें **स्वातंत्र्य** गमावून बसूं नये

(२४) कोणत्या हि **उपाधींत** गुरफटून जाऊं नये, कोठें हि आसक्त होऊन राहूं नये, केव्हां हि आंग झाडून मोकळे होतां यावें

(२५) **स्वरूपानुसंधान** सुटूं नये. येकांत मोडूं देऊं नये । स्वरूपस्थितीचा ॥

(२६) **अनर्गळता** म्हणजे स्वेच्छाचार करूं नये

(२७) आपलें कर्म, उपासना, ज्ञान, वैराग्य, साधन, भजन इत्यादि **परंपरेनें** करावयाच्या गोष्टी कदाकाळीं म्हणजे केव्हां हि सोडूं नये

(२८) आपल्या घमेंडींत कोणाशीं हि **अतिवाद** करूं नये. कोठें **वाद** घालूं नये

(२९) जो आपलें **मानीत नाहीं** त्यास सांगत बसूं नये

(३०) साधे राहावें, अभिमान जडूं देऊं नये, आपण मोठे आहोंत अशी आपली कल्पना च करून घेऊं नये व कांहीं **मान** इच्छूं नये । कोठेंतरी ॥

(३१) आपला **परमार्थ** काय वाऱ्यावर पडला आहे ? अधिकारावांचून कोणास सांगूं नये, दाटून **उपदेश** देऊं नये

(३२) **वैराग्य** प्रखर असावें

(३३) **अभ्यास** दांडगा असावा

(३४) कोणाशीं हि **निष्ठुर** होऊं नये

(३५) शिष्यांना कठिण **आज्ञा** करूं नये व त्यांच्यापाशीं फार मागूं हि नये

(३६) **केल्यावीण** सांगों नये

(३७) **इंद्रियस्मरण** करूं नये

(३८) **शाक्तमार्गें** भरों नये । मुक्तपणें भरीं ॥ ३७ ॥

(३९) **काम हलकें** असलें तरी तें करण्यास लाजूं नये

(४०) **वैभव** प्राप्त झालें तरी उन्मत्त होऊं नये, आपल्या मोठेपणाच्या घमेंडींत **न्यायनीति** सोडूं नये व अप्रमाण वर्तों नये

(४१) स्वतःस **कळल्यावांचून** दुसऱ्यास सांगूं नये, नुसत्या **अनुमानानें** निश्चय करूं नये, दुसरा कोणी आपणांस सांगूं लागला तर दुःख करणें हा मूर्खपणा होईल

(४२) सदा **सावध** असावें, दृष्टि **व्यापक** असावी, निसुगपणाचें म्हणजे **आळसाचें** केव्हां सुख मानूं नये

(४३) दुसऱ्या कोणाविषयीं आपण **विकल्प** म्हणजे संशय धरूं नये व आपणाविषयीं दुसऱ्यास विकल्प पडूं देऊं नये

(४४) केवळ आपल्या स्वतःपुरती कोणास **स्वार्थआज्ञा** करूं नये

(४५) प्रसंगावांचून **बोलूं** नये, संबंधावांचून **गाऊं** नये, **विचारा-**वांचून राहूं नये, **अविचार** करूं नये

(४६) **परोपकार** सांडूं नये, **परपीडा** करूं नये

(४७) **महंतपण** न सोडतां **नेणतेपण** स्वतःकडे घ्यावें

(४८) द्रव्यासाठीं हिंडों नये । **कीर्तन** करीत ॥
मोलें कीर्तन करूं नये । कोठें तरी ॥

(४९) **संशयात्मक** बोलूं नये, पण अगदीं ठांसून हि बोलूं नये व स्वतःला समजल्यावांचून दुसऱ्याला समजून सांगण्यासाठीं केव्हां हि **ग्रन्थ** हातीं धरूं नये

(५०) स्वतःला ठाऊक असतां दुसऱ्याला विचारूं नये, त्यांत **अहंकार** दिसून येतो, तो दिसूं नये

(५१) सांगेन असें **अभिवचन** हि कोणास देऊं नये

(५२) ज्ञानानें **फुगूं** नये, वादांत कोणाची **छळणा** करूं नये, वाद घालूं च नये

(५३) **स्वार्थबुद्धि** नसावी

(५४) कोणाच्या **कारभारांत** पडूं नये, राजद्वारीं तर **कार्यकर्ते** होऊं च नये

(५५) कोणास **भर्वसा** देऊं नये

(५६) जड भिक्षा मागूं नये, भिक्षेसाठीं आपली परंपरा सांगूं नये, वारानें अन्न खाऊं नये, आपली **भिक्षा** सोडूं नये.

(५७) कोणाच्या **सोयरीकींत** पडूं नये, मध्यस्ती करूं नये, प्रपंचाची उपाधी आपल्यामागें लावून घेऊं नये, जेथें प्रपंचाचें विशेष प्रस्थ असतें तेथें आपण जाऊं नये

(५८) बाष्कळ अन्न म्हणजे कुठलें हि कसलें हि कोणी हि कशाचें हि शिजविलेलें अन्न खाऊं नये. यासाठीं पाहुण्यासरिसें घेऊं नये। **आमंत्रणें** कदा ॥

(५९) श्राद्ध पक्ष सटी सामासें। शांती फळशोभन बारसें।
भोग राहाण बहुवसें। नवस व्रतें उद्यापनें॥
तेथें निस्पृहें जाऊं नये। त्याचें अन्न खाऊं नये।
**येळिलवाणें** करूं नये। आपणासी॥
येळिलवाणें म्हणजे ओशाळे

(६०) **लग्नमुहूर्तीं** जाऊं नये

(६१) **पोटासाठीं** गाऊं नये

(६२) कोणतेंच पुण्यकर्म **मोलानें** करूं नये. कीर्तन, गाणें, पूजा, यात्रा मोल घेऊन घडूं नये, इतकें च काय, पण आपण कोणाच्या उपयोगीं पडलों म्हणून त्यानें इनाम देण्यास काढला तरी तो घेऊं नये

(६३) आपलें मुख्य कर्तव्य परिभ्रमण असल्यामुळें निस्पृहानें **मठपति** होऊन बसूं नये

(६४) जीवांत जीव आहे तोंवर **उपासनेंत अंतर** पडूं देऊं नये

(६५) तसेंच दुश्चित्तपणामुळें किंवा मूर्खपणामुळें **भजनमार्गांत** हि खंड पडूं देऊं नये

(६६) **अति: सर्वत्र वर्जयेत्.** उपाधी, सगुणभक्ति, वणवण, कष्ट, बोलणें, भोजन, निद्रा, नेम, जनसंगति, आरण्यवास, देहाचे चोचले, संग, कर्मठपण, लौकिक, प्रीति, संशय, साधनें, विषयभोग, देहलोभ, अनुभव, आत्मस्थितिप्रतिपादन, उन्मनावस्था, अलक्ष, जाणीव, ज्ञातेपण, तर्क, दृश्यस्मरण, चर्चा, भेद, धर्माचरण, बोलणें, लिहिणें, वाचणें, या कोणत्या च गोष्टी केल्यावांचून राहतां येत नाहीं, पण त्या परमावधीला हि नेऊन भागत नाहीं. तात्पर्य, कार्याकारण सर्व कांहीं करावें

(६७) निस्पृहें–**वक्तृत्व** सांडूं नये, आशंका घेतां भांडों नये, श्रोतयांचा मानूं नये । वीट कदा ॥

अशी ही श्रीसमर्थांची निस्पृहांना शिकवण आहे. ती किती व्यापक, दीर्घसूचनेची आणि कल्याणाची आहे, याचा विचार करावा. या शिकवणीची फलश्रुति शेवटच्या ओवींत श्रीसमर्थ सांगतात–

**हे सिकवण धरितां चित्तीं । सकळ सुखें वोळगती ।**
**आंगीं बाणे महंती । अकस्मात ॥ १४–१–८० ॥**

अशा शिक्षेखालीं तयार झालेले हजारों शिष्य आणि त्या शिष्यांचे शिष्य राष्ट्रांत संचार करीत असतील, तेव्हां लोकजागृतीचें त्यांनीं केवढें कार्य केलें असेल, याची कल्पना करा. वर आकाशांत चंद्र आणि तारे आणि खालीं भूतलावर श्रीसमर्थ आणि त्यांचे शिष्य, यांची गणती कोण करूं शकेल ?

## ( १० ) श्रीसमर्थांनीं केलेल्या कांहीं आज्ञा

### आज्ञाशतक

आपण पाहिलें आहे कीं, अंतरात्म्याच्या उपासनेंतून च श्रीसमर्थांचें समाज-राज-कारण उद्भवलें, त्या समाजराजकारणाला समुदायाची आवश्यकता भासली, आणि कांहीं विशिष्ट गुण अंगीं असल्यावांचून समुदाय करण्याची पात्रता येत नाहीं. त्यांपैकीं कांहीं ठळक गुणांचा विचार झाला. त्या गुणांना पोषक होतील अशा श्रीसमर्थांच्या कांहीं

आज्ञा आतां आपण पाहूं. असें करतांना पुनरुक्ति होण्याचा संभव फार आहे. पण पुनरुक्ति झाली म्हणून काय बिघडणार आहे? एकदां ऐकल्यावर ताळ्यावर येण्याचा आमचा स्वभाव असता, तर आम्हांस श्रीसमर्थांनीं ८×६ मध्यें पाषाणाहून हि कमी कां लेखलें असतें? तरी पुनरुक्ति होईल त्याबद्दल क्षमा असावी.

(१) **हरिकथानिरूपण** करावें, ११–५, ११–६, १२–९, १२–१०, १३–१०

(२) **राजकारण** करावें, ११–५, ११–६, १८–६, १९–४, १९–९

(३) लोकांच्या **शंका**, कुशंका फेडाव्या, ११–५.

(४) लहान मोठ्या अपराधांची **क्षमा** करावी, ११–५, १२–१०–८, कदापि रागास न जावें। क्षमा रूपें॥ १२–१०–१०॥

(५) दुसऱ्याचें **अंतर** म्हणजे मनोगत जाणावें ११–५

(६) पण आपल्या **अंतरंगाचा ठाव** दुसऱ्यांस लागूं देऊं नये. ११–१०

(७) सदा रामदासी **उदासीन** व्हावा, कोठें लिप्त होऊं नये. ११-५, उदास वृत्तीस मानवे जन १२-९-२६

(८) **नीतिन्यायाला** सोडून वागूं नये १३-३-१, ११-५, ११-६, १२-९-१६, १३-१०-२२, १४-१-३९, १९-४-१४ वगैरे

(९) आपल्या उपदेशानें **लोकांचीं मनें** आपल्या कार्याकडे वेधून घ्यावीं ११-५

(१०) **प्रपंच** यथाशक्ति करावा, त्यांत गुरफटलें जाऊं नये, प्रपंचांतील बरे वाईट प्रसंग ओळखून वागावें ११-५, १२-१, १९-१०-२७ ते ३०

सावधपणें करीत जावा। संसार आपला॥ १२-१०-१२

(११) प्रपंचांतील संकटें **धैर्यानें** सोसावीं ११-५ निस्पृहानें तर कठीण धीरत्व सोडूं नये। कांहीं केल्या॥ १४-१-३५॥

(१२) **उपाधी** विस्ताराव्या, पण त्यांत सांपडूं नये, किंवा सुख मानून गुरफटलें जाऊं नये, अलग राहावें ११-५, १४-१-२४, १९-८-२८, १९–१० २० ते २४

(१३) आधीं च आपणांकडे **नीचत्व**, मूर्खपण, नेणतपण घ्यावें, लीनता धरून जावें। जेथ तेथें ॥ ११–५, १४–१–४५, १५–६–२३

(१४) दुसऱ्याचे **दोष** कळाले तरी झांकावे, अवगुण अखंड न बोलावे ११–५

(१५) **दुर्जन** ओळखावे, पण त्यांच्यावर हि परोपकार करून त्यांस शरमिंदे करावे ११–५ सज्जनापरीस आळवावें। महत्त्व देउनी ॥ १९–९–२३

(१६) **हट्ट** धरून बसूं नये, ध्येय मुख्य–उपाय गौण, हा नाहीं तो उपाय करून पाहावा, तऱ्हें भरों च नये ११–५

(१७) **प्रयत्न** दीर्घ असावा, यत्न उदंड चि करावा, सहसा न होण्यासारखीं अवघड कार्यें हि दीर्घ प्रयत्नानें साधावीं ११–५–११, १२-१०-११

—अचुक असावा १२–२–६

—पुरता असावा १२–९–७

(१८) **फड** नासूं देऊं नये, नासण्याचे प्रसंग येतील पण ते सांवरावे ११–५. आपल्या समुदायांत केव्हां कशानें बिघाड होईल, याचा नियम नसतो. पुष्कळदां असें होईल कीं, आपली बाजु खरी असून हि तिचा फार आग्रह धरला तर वितुष्टपणा उत्पन्न होण्याचा संभव असतो. सर्वांशीं च भांडत सुटण्यांत मतलब नसतो. तात्पर्य, प्रसंग पाहून वर्तावें

**प्रसंग जाणावा नेटका। बहुतांशीं जाड्य घेऊं नका।**
**खरें असतां चि नासका। फड होतो॥ १९–२–११॥**

(१९) **अतिवाद** कोणाशीं हि करूं नये, वाद विकोपाला जाऊं देऊं नये ११–५

(२०) दुसऱ्याचें **अभीष्ट** जाणावें ११–५

(२१) लोकांचे बोल **सोसावे,** कष्ट सोसावे ११–५
—आपलें महत्त्व मात्र गमावूं नये १२ – १० – १८

(२२) दुसऱ्याचें दुःख जाणावें, दुसऱ्याचें **सुखदुःख** तें च आपलें सुखदुःख मानावें ११ – ५

**म्हणोन दुसऱ्यास सुखी करावें । तेणें आपण सुखी व्हावें ॥ १४-६-२३ ॥**

(२३) **पाठांतर** अपार असावें ११ – ५ – १५

(श्री) नाना जिनसपाठांतरें ।
निवती सकळांचीं अंतरें ॥ १५$_{३}^{१}$३, १५$_{२७}^{६}$

(रा) राखे सकळांचें अंतर । उदंड करी पाठांतर ॥ १९-४-७ ॥

(म) प्रबंदाचीं पाठांतरें । उत्तरासी संगीत उत्तरें ।
नेमक बोलतां अंतरें । निववी सकळांचीं ॥ १९-१०-६ ॥

(२४) **विचार** अखंड संनिध असावा, विचार केल्यावांचून पाऊल टाकूं नये, कीं तोंडावाटें शब्द काढूं नये ११-५

(२५) **शांति** स्वतः राखावी व दुसऱ्याकडून राखवावी ११-५
**उदंड धिःकारून बोलती । तरी चळों नेदावी शांति ।**
**दुर्जनास मिळोन जाती । धन्य ते साधु ॥१२-१०-१६ ॥**

(२६) कोणास **अपाय** करूं नये, पण
**करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखऊं नये ।**
**परस्परें चि प्रत्यये । प्रचीतीस आणावा ॥ ११–५–१७ ॥**

(२७) **परपीडे**वरी नसावें अंतःकरण ११ – ५, १४ – १ – ४४

(२८) लोकांची नेहमीं **परीक्षा** करीत असावें, कोण कसा, कोण कसा हें ठाऊक असावें, अधिकारपरत्वें त्यांच्या कडून कामें घ्यावीं ११ – ५, ११-१०-२३, १२-१-१८ ते २०, १२-१०-९

—भिक्षामिसें लहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥ १५–६–२४ ॥

—शोध घेतां आळसों नये ॥ १९–२–१२ ॥

—ठाईं ठाईं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा ।
प्राणीमात्र बोलवावा । आप्तपणें ॥ १९ – २ – १७ ॥

(२९) **परोपकार** करण्याला नेहमीं तत्पर असावें ११-५, १२-१०-८, १४-१-४४, १९-४-२ वगैरे

(३०) विचार-उच्चार-आचार यांत **मेळ** असावा, जसें बोलावें तसें चालावें, जसें चालावें तसें बोलावें आणि स्वतः क्रिया करून इतरांकडून करवावी ११-५, १२-९-२३, १२-१०-३९, १९-४-८

परंतु बोलण्याचालण्यांत मेळ नसला तर तो हीन विवेक होय १२-७-३

(३१) **हिरवट,** कचरट, अशा लोकांशीं संबंध ठेवूं नये ११-५

(३२) **अभिलाप** नसावा कीर्तीचा, वैभवाचा किंवा कशाचा च ११-५, १४-१-२४

(३३) **लिहिणें–वाचणें** प्रत्येकास यावें, सुंदर अक्षर असणें, चपळ शुद्ध वाचतां येणें हें सदैवपणाचें एक लक्षण होय, परोपकार करण्याचें तें एक साधन समजावें ११-६-१, १५-६-२७, १९-१, १९-४-३, १९-६-१६

मला वाटत नाहीं, लेखनक्रियेविषयीं तत्कालीन अन्य कोणा संतकवीनें इतकें अगत्य दाखविलें असेल. श्रीसमर्थांना लेखनाची आवश्यकता स्वाभाविक भासली. त्यांनीं सर्व भरतखंडभर हजारों मठ स्थापन केले होते आणि तेथें लेखनक्रिया अखंड चाले. त्या सर्व मठांतून श्रीसमर्थवाङ्मय तर संपूर्ण असे च व जो नवीन मठपति होई तो पुन्हा तें वाङ्मय लिहून काढी च, पण तत्तत्पूर्वकालीन होऊन गेलेल्या इतर हि ग्रन्थकारांच्या ग्रन्थांच्या प्रती असत. या सर्व मठांतून लेखनाची ही प्रथा शंभर वर्षांपूर्वींपर्यंत चालत होती.

(३४) पुढें काय होणार त्याची **अटकळ** आज व्हावी, इतकी बुद्धि प्रखर असावी ११-६-६

(३५) **महंत** बुद्धिवंत, जाणता असावा, हरएक प्रसंगीं - संकटांत - कसें वागावें हें त्यास सुचलें पाहिजे, परंतु ज्यांस हें साधणार नाहीं त्यांनीं महंती करूं नये, महंती करून घाण करूं नये ! ११-६, ११-१०, १२-९, १४-१, १९-७, १९-८

(३६) **चाळणा** अखंड करावी ११-१०

(३७) नित्य नूतन **हिंडावें**, परिभ्रमण करावें, ओळखीच्या लोकांत च सारखें राहूं नये. ११-१०, १४-१, १५-१, १५-६, १९-७ १९-८, १९-९, १९-१०.

(३८) लोकांच्या **कसोटीस** उतरावें—तरी मग जाणावें साधलें। महत्कृत्य ॥ ११-१०-१६ ॥

(३९) नुसता **येकांत** हें एक फार मोठें साधन आहे, येकांत सेवावा ११-१०-१७, १८-३-२०, १८-१०-४७ ते ५०, १९-६-२८ ते ३०, १९-९-१, २ सत्य आहे, दुसरें कांहीं घडलें नाहीं, नुसते एकांतांत विचारमग्न होऊन कांहीं काळ बसण्याचें साधलें तरी पुष्कळ आहे.

(४०) **अभ्यास** सारखा करावा, केव्हां च सोडूं नये ११–१०

(४१) **उत्तम गुण** स्वतः घ्यावे व लोकांना सांगावे ११–१०

(४२) समुदाय उदंड करावा, परी **गुप्तरूपें** ११–१०

(४३) **उपासनेस** लावावें जग ११-१०-१९, १७-३-२५, १९-१०-८ देह आहे तोंवर उपासनेंत अंतर पडूं देऊं नये १४-१-६०

(४४) **विश्वास** कोणाचा हि एकदम धरूं नये ११-१०-२३

(४५) आपला **मगज** राखून कार्यकर्त्यानें काम करावें, ११-१०-२३, मगज म्हणजे बोज, प्रतिष्ठा, महत्त्व.

(४६) **दुश्चित्त** कदापि नसावें १२-९-८

(४७) **आळस** नसावा ११-३-१० ते १३, १२-९-८, १२-१०-११, १८-७-४

—निस्पृहानें तर दृष्टीसमोर आणूं नये १४-१-६०

—राजकारणी पुरुषानें आळस केला,
तरी मग कारबार चि बुडाला ॥ १९-९-७ ॥

(४८) **दिनचर्या** कशी असावी ११-३, १२-९

(४९) **प्रत्यय** घ्यावा – अकरादां सांगतात

—प्रचीतीवीण जें बोलणें। तें अवघें चि कंटाळवाणें॥ ९-५-१५॥

—प्रचीतीवीण ज्ञान सांगणें। या नांव भ्रम॥ १०-६-३२॥

—प्रचित पाहेल तें शाहाणें॥ १०-८-१॥

—प्रचित नस्तां अवघा शोक हो॥ १०-१०-६८॥

—प्रत्ययेंविण बोलावें। तें चि पाप॥ १२-९-१५॥

—वेदशास्त्रें पुराणें। प्रत्ययें घ्यावीं॥ १३-३-१७॥

—प्रचीतीवीण जें ज्ञान। तो अवघा चि अनुमान॥ १४-७-१८॥

—उदंडाचें उदंड ऐकावें। परी तें प्रत्ययें पाहावें॥ १५-६-११॥

—प्रचीतीविण जें केलें। तें तें अवघें वेर्थ गेलें॥ १८-८-२०॥

—प्रचीतीविण अवघी भ्रांती॥ १९-२-५॥

—प्रपंच अथवा परमार्थ। प्रचीतीवीण अवघें वेर्थ॥ २०-३-२८॥

(५०) **रामकथा** ब्रह्मांड भेदून। पैलाड न्यावी॥ १२-९-२६॥
रामकथेच्या प्रभावावर श्रीसमर्थांचा केवढा हा विश्वास!

(५१) प्रयत्नाला **अकलेची** जोड पाहिजे॥ १२-९-२८,२९

(५२) **आधीं** आपण उत्तम गुण घ्यावे, ज्ञान संपादन करावें आणि **मग** इतरांस सांगावें

—वर्तल्याविण बोलावे। ते शब्द मिथ्या॥ १२-१०-३॥

—क्रियेविण शब्दज्ञान। तें चि श्वानाचें वमन॥ १२-१०-३०॥

(५३) स्नानसंध्यादि **आचार** सोडूं नये॥ १२-४-१८, १२-१०-४, १३-१०-१६, १४-१-७

**आचार उपासना सोडिती। ते भ्रष्ट अभक्त दिसती।**
**जळो तयांची महंती। कोण पुसे॥ ५-२-५६॥**

**आधीं राखावा आचार। मग पाहावा विचार।**
**आचारविचारें पैलपार। पाविजेतो॥ १७-१०-२५॥**

(५४) येकाग्र करावें **जपध्यान** १२-१०-४ सामुदायिक किंवा चवाठ्यावर जप करण्यास श्रीसमर्थांनीं कोठें सांगितलें असल्याचें माझ्या आढळांत नाहीं. उलट तसा प्रतिबंध केलेला आहे.

(५५) **बोलावें** कसें? (१) जे दुसऱ्यास दुःख करी। ते अपवित्र वैखरी ॥ १२-१०-२५ ॥ व (२) जगामध्यें जगमित्र। जिव्हेपासीं आहे सूत्र ॥ १९-२-१९ ॥ हे दोन सिद्धान्त लक्षांत ठेवून नेमकें, मृदु, प्रसंग जाणोन, नम्र बोलावें; कठिण, उद्धट, कळल्यावांचून, प्रसंगावांचून, संशयात्मक बोलूं नये १२-१०, १४-१, १४-२, १५-६-२३, १९-४-१३

(५६) **शब्दमत्सर** न करावा। कोणी येकाचा ॥ कोणाचें वर्म काढूं नये १२-१०-११

(५७) **ज्ञानोत्तर** कसें वागावें? याविषयीं श्रीसमर्थांनीं फार उत्कृष्ट नियम घालून दिला आहे—

**प्रकृतीसारिखें चालावें। परी अंतरीं शाश्वत वोळखावें।**
**सत्य होऊन वर्तावें। लोकां ऐसें ॥ ११-२-४० ॥**

(५८) **मरणाचें स्मरण** असावें. आपणांस मरावयाचें आहे याचें स्मरण मनुष्य अखंड ठेवील, तर त्याच्या हातून सहसा वाईट कर्म होणार नाहीं. १२-२-२६, १२-१०-१३

(५९) **भेद** ईश्वरनिर्मित आहे, हें जाणून च वागलें पाहिजे. मुळीं देह त्रिगुणाचा। सत्त्वरजतमाचा ॥ असा भेद ईश्वरनिर्मित असल्यामुळें कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत मनुष्यामनुष्यांत भेद हा राहणार च आणि जगाच्या अंतापर्यंत वादाचें हें मूळ कायम राहून समाजासमाजांत आणि राष्ट्राराष्ट्रांत कलह माजत राहणार. ब्रह्मज्ञानी पुरुषांत मात्र भेदाला आणि कलहाला वाव मिळत नाहीं. याचें कारण उघड आहे. ब्रह्मज्ञान्याची दृष्टि उर्ध्वमुख असते, इतरांची अधोमुख असते, ब्रह्मांत भेद नाहीं, मायेंत भेद आहे.

**सकळ करणें ईश्वराला। म्हणोनी भेद निर्माण केला।**
**उर्ध्वमुख होतां भेदाला। ठाव कैचा ॥ २०-८-१६ ॥**

**सृष्टिकर्णी अगत्य भेद । संव्हारें सहज चि अभेद ।**
**भेद अभेद हा संवाद । मायागुणें ॥ १७ ॥**

१३-१०-८ ते २१, १७-४-२७, १७-१०-२० ते ३० या विचारसरणीनें पाहतां व्यवहारांत वागणारांनीं भेद मानून च सलोख्याचा मार्ग काढला पाहिजे. तसें न करतां ते तंडत च राहतील, तर कोणास च समाधान प्राप्त होणार नाहीं. समाधानाचा मार्ग त्या सवाईत श्रीसमर्थांनीं दाखवून ठेवला आहे.

**भेटो कोणी येक नर धेड माहार चांभार**
**त्याचें राखावें अंतर याचें नांव भजन ।**
**दुःख नेदावें कोणाला उंच नीच जरी जाला**
**अंतरात्मा वोळखिला तो चि जाणा सज्जन ॥**

( ६० ) वस्त्रानें शरीर **शृंगारण्यापेक्षां** चातुर्यानें शृंगारणें जास्त श्रेयस्कर होय. १४-६-१९, १५-१-३१, १८-६-१, २

( ६१ ) **भाग्य** कशानें प्राप्त होतें ?

**समजले आणि वर्तले । ते चि भाग्यपुरुष जाले ।**
**यावेगळे उरले । ते करंटे पुरुष ॥ १४-६-२५ ॥**

जो न्याय व्यक्तीला लागतो, तो च समाजाला आणि राष्ट्राला.

( ६२ ) **बाष्कळ** अन्न खाऊं नये ॥ १४-१-५२, बाष्कळामध्यें बैसों नये ॥ १९-२-९, भ्रष्ट लोकीं बैसों नये १९-२-१२

( ६३ ) **उद्धट** माणसाच्या तोंडाला लागूं नये. १९-२-९

( ६४ ) केव्हां हि स्वतःकडे **नेणतेपण** घ्यावें, शहाणपणानें फुगूं नये, मृदु भाषण असावें १९-२-१०

( ६५ ) सर्वांना **सारखे** लेखावे. १९-२-१८

( ६६ ) **नेमस्तपणाचा** केव्हां हि विसर पडूं देऊं नये. नेमस्तपणा म्हणजे नियमबद्धता, निश्चितपणा, सूत्रबद्धता. १९-४-७

( ६७ ) अमर्याद **ज्ञानलालसा** असावी १९-४-१२

( ६८ ) स्वगुणाविषयीं **आत्मविश्वास** इतका दांडगा असावा कीं, कोणीं निंदिलें वा धिःकारिलें तरी शांति ढळूं नये १९-४-२५

(६९) एकाद्याच्या इच्छेविरुद्ध आपण होऊन त्यास उपदेश देणें किंवा कोणाच्या मध्यस्थीनें **शिष्य मिळविणें** ही किती निंद्य गोष्ट आहे! त्यांत महत्त्व आणि नि:स्पृहपणा कोठें राहिला! १९-६-४ इतकें च काय, पण ओळखीच्या लोकांत सुद्धां आपलें प्रचारकार्य करूं नये. १९-६-६. लालुचींत पडूं नये.

(७०) **उत्कटता** ही यशाची किल्ली आहे. हा गुण दुर्मिळ झाला आहे. उथळपणा वाढला आहे. कोणती च गोष्ट मनाला लागेनाशी झाली आहे. भावना तीव्र राहिल्या नाहींत. हें निर्जीवतेचें लक्षण होय. याच्या उलट, उत्कट भव्य तें चि घ्यावें। मळमळीत अवघें चि टाकावें॥१९-६-१५॥

(७१) कोणापाशीं कांहीं **मागूं नये.** कोणाच्या मागें कसला हि तगादा लावूं नये. निष्कांचन वासना असावी. कार्यें करीत असतां हि आत्मस्वरूपीं रत होऊन असावें. आनंद भोगावा. श्रीसमर्थांची तर अशी प्रतिज्ञा च होती :

**आमची प्रतिज्ञा ऐसी। कांहीं न मागावें शिष्यासी।**

मागणें एक च, तुमच्या च कल्याणासाठीं

**आपणामागें जगदीशासी। भजत जावें ॥ १२-१०-३४ ॥**

पहा १९-६-११, १९-७-११

(७२) **दूरदृष्टि** असावी, सहसा चुकूं नये. राजकारणांत काय किंवा इतर प्रापंचिक व्यवहारांत काय, अभिमानामुळें, अज्ञानामुळें, अदूरदृष्टीमुळें, बावळटपणामुळें किंवा अशा च अन्य कारणामुळें मनुष्याच्या हातून चुक्या घडतात आणि फजिती होते. दूरदृष्टीनें अशा चुक्या टाळाव्या. १९-८-११ ते १८

(७३) **आयुष्य कसें कंठावें,** याचा एक सुंदर नियम श्रीसमर्थांनीं घालून दिला आहे. एकसारखी दगदग, धांवपळ, चळवळ, व्याप, उद्योग उपयोगाचा नाहीं किंवा हें सर्व सोडून देऊन नुसतें ध्यानस्थ बसून हि भागावयाचें नाहीं. तर, लोकांत राहून व्यापआटोप हि करावा व एकांतांत बसून समाधान हि प्राप्त करून घ्यावें.

**कांहीं गलबला कांहीं निवळ। ऐसा कंठित जावा काळ।**
**जेणेंकरितां विश्रांतीवेळ। आपणासी फावे॥ १९-८-२९॥**

(७४) **शास्त्राधारावांचून** कांहीं बोलूं, चालूं नये. खरें खोटें निवडण्याला शास्त्राधाराची कसोटी लावावी. १९-१०-३

(७५) आपल्या अनुयायांच्या मनांत कांहीं **कृत्रिम** आलें तर तें आपल्या लक्षांत आधीं च यावें, म्हणजे त्यांचें कृत्रिम आपोआप खुंटतें. १९-९-५. वास्तविक त्यांच्या मागें इतकीं कामें लावून द्यावीं कीं, कृत्रिम करण्यास त्यांस अवसर च मिळूं नये. १९-९-८

(७६) **जैशास तैसा बरा** हा न्याय व्यवहारांत आणि राजकारणांत त्रिकालाबाधित आहे. दुष्टाला दुष्ट जसा बरा, तसा च सुष्टाला सुष्ट बरा. २४६ व्या करुणाष्टकांत याचीं श्रीसमर्थांनीं पुष्कळ उदाहरणें दिलीं आहेत. ग्रन्थराजांत हि राजकारणाच्या दोन्ही समासांत तो च सिद्धान्त त्यांनीं प्रतिपादिला आहे. सुष्टाला सुष्ट भेटला म्हणजे त्याचा आनंद दुणावतो व दुष्टाला दुष्ट भेटला म्हणजे, आपणाहून कोणी वरचढ आहे हें त्यांस कळून येऊन त्याचा दुष्टपणा जागच्या जागीं जिरतो. इतकें सर्व करून हि स्वतःस अलिप्त च राखावें. १९-९-११, १२, २९ ते ३१

(७७) एकादें महत्त्वाचें कार्य घडवून आणावयाचें असेल तर तें सहसा **षट्कर्णी** होऊं देऊं नये. त्या कार्याशीं जेवढ्यांचा जेवढा संबंध तेवढ्यांना तेवढें च कळलेलें असावें. ज्यांचा संबंध नाहीं अशांच्या कानांवर तें गेल्यास अनेक विघ्नें उत्पन्न होण्याचा संभव असतो. सामान्य व्यवहारांत लहानसहान गोष्टींत नेहमीं हा अनुभव येतो, मग राजकारणा-विषयीं बोलावयासच नको. १९-९-१३, १७

(७८) काम करण्यांत **ढिलेपणा,** हलगर्जीपणा नसावा. आजचें काम उद्यावर टाकूं नये. १९-९-१५. राजकारणांत तर अति दक्षता पाहिजे, दिरंगाई मुळीं च खपावयाची नाहीं. १९-९-२७.

(७९) स्वतः कष्ट करावे, सहसा दुसऱ्यावर विसंबून राहूं नये. याचें नांव **स्वावलंबन.** परावलंबी नसावें. ती ओवी आचरणांत किती जणांनीं आणली असेल तें सांगतां येणार नाहीं, पण पाठ मात्र आतां सर्वांना झाली आहे —

**जो दुसऱ्यावरी विश्वासला। त्याचा कार्यभाग बुडाला।**
**जो आपण चि कष्टत गेला। तो चि भला ॥ १९-९-१६ ॥**

( ८० ) **पाषांडावर** श्रीसमर्थांचा फार कटाक्ष, पाषांडाची व्याख्या ५-१-१७ त आली आहे:

**जें जनावेगळें केलें। तें वेदें अव्हेरिलें।**
**म्हणोनि तयासि नाम ठेविलें। पाषांडमत ॥**

पंचसमासींत हि सुंदर व्याख्या आली आहे. कांहीं क्रिया न करतां, अनुभव न घेतां, नुसतें शब्दज्ञान झालें म्हणजे मनुष्यांत पाषांडाचा संचार होण्याचा फार संभव असतो. नुसता शब्दज्ञानी आपल्या तोऱ्यांत च संशयाखालीं मरत असतो. यांत काय आहे त्यांत काय आहे, स्नानांत काय आहे संध्येंत काय आहे, आचारांत काय आहे विचारांत काय आहे, सोवळ्यांत काय आहे ओवळ्यांत काय आहे, जानव्यांत काय आहे शेंडींत काय आहे, नामस्मरणानें काय होणार जपानुष्ठानानें काय होणार, असे नुसते अनेक संशय उभे करून केवळ शब्दज्ञानी मनुष्य पाषांडी बनत जातो. यासाठीं श्रीसमर्थांनीं क्रम लावून दिला आहे, त्या मार्गानें आपण जावें. नित्य नेम, साधन, अभ्यास, सत्कर्म, उपासना, वैराग्य, निदिध्यास, सद्गुरुकृपा, ज्ञान, मोक्ष असे हे त्या मार्गावरील टप्पे आहेत. त्या मार्गानें जाऊन च

**नीतिन्यायें वाट रोधावी। पाषांडाची ॥ १५-१-३० ॥**

( ८१ ) **वेद,** शास्त्रें, संत, महंत, यांच्या **आज्ञा** पाळल्या तर च समाधान प्राप्त होणार आहे. २-४-१०, ११-३-३०

( ८२ ) **सगुणाची** उपेक्षा करूं नये. वाचून आणि ऐकून वाटूं लागतें कीं, आपण ज्ञानी झालों, आपणांस सगुणोपासनेची काय जरुरी आहे. पण तें वाटणें भ्रामक होय. तें केवळ शब्दज्ञान असतें. वृत्ति तद्रूप झालेली नसते. म्हणून सगुणाची उपासना केव्हां हि सोडूं नये.

**निर्गुणीं ज्ञान जालें। म्हणोन सगुण अलक्ष केलें।**
**तरी तें ज्ञातें नागवलें। दोहिंकडे ॥ १०-७-१६ ॥**

**नाहीं भक्ति नाहीं ज्ञान। मधें च पैसावला अभिमान।**
**म्हणोनियां जपध्यान। सांडूं च नये ॥ १७ ॥**

**सांडील सगुणभजनासी। तरी तो ज्ञाता परी अपेसी।**
**म्हणौनियां सगुणभजनासी। सांडूं चि नये॥ १८॥**

( ८३ ) **भजन निष्काम** असावें. सर्व च फळें ज्या देवाच्या चरणांपाशीं, त्या चरणांची उपेक्षा करून एकाद्या क्षुल्लक फळाची अपेक्षा करणें, हें कोठलें शहाणपण? १०-७-१९ ते २५

**फळभगवंता कोणीकडे। महदांतर॥**

( ८४ ) आयुष्य म्हणजे काळ. तो काळ व्यर्थ दवडणें म्हणजे **आत्महत्या** च करणें होय. काय करतां, म्हणून एखाद्या रिकामटेकड्याला विचारल्यास तो इंग्रजींत जें उत्तर देतो त्याचा मराठींत अर्थ, मी आत्महत्या करीत आहें, असा होतो. अशी आत्महत्या कोणीं करूं नये व दुर्मिळ काळ व्यर्थ दवडूं नये. सोपी गोष्ट पण आपण किती जण आणि कितीदां तिचें उल्लंघन करीत असतो. एक क्षण रिकामा जाऊं न देणें हें भाग्याचें लक्षण होय. ११-३-२४ ते २६

**दुल्लभ शरीरीं दुल्लभ आयुष्य। याचा करूं नये नास।**
**दास म्हणे सावकास। विवेक पाहावा॥ १८-३-१॥**

( ८५ ) **उद्विग्नता** वाटावी, असे प्रसंग प्रपंचांत फार येतात. सुखदु:खाचे प्रसंग मिळून च प्रपंच बनलेला असतो. त्यांतलें एक हवें आणि दुसरें नको, असें म्हणून चालणार नाहीं. सुखापेक्षां दु:खाचे प्रसंग फार. अशा वेळीं उद्विग्नता वाटणें स्वाभाविक होय. ती उद्विग्नता जिंकण्याचा सुलभ उपाय श्रीसमर्थांनीं सांगितला आहे.

**आहे तितुकें देवाचें। ऐसें वर्तणें निश्चयाचें।**
**मूळ तुटे उद्वेगाचें। येणें रीतीं॥ ११-३-२८॥**

( ८६ ) परोपकारासाठीं **कवित्व करावें,** प्रबंध लिहावे, भाषणें करावीं. पण आधीं देव प्रसन्न करून घ्यावा आणि मग लिहावें, बोलावें, सांगावें. १४-३-३ ते ६

( ८७ ) **गृहस्थाश्रम** उत्तम खरा, पण तो यथासांग झाला तर. स्वधर्माचरण आणि भूतदया यांवर गृहस्थाश्रम उभारला गेला तर च तो भूषणावह होतो. १४-७-१ ते ५

(८८) सर्व साधनांतलें पहिलें साधन **अनुताप** हें होय. अनुतापानें सर्व पापें दग्ध होतात, पाऊल सन्मार्गावर पडतें, देव प्रसन्न होतो. १२-७-१४, १४-३-५, ४८, १६-१-१२

(८९) जन्मास येऊन देव आपलासा करून घेतला नाहीं, तर जन्म वाया गेला, असें समजावें. प्रपंच करावा पण उदासपणें. खरी तळमळ **भगवत्प्राप्तीची** लागावी. १२-८-२९ ते ३४, १३-७-२३ ते २८, २०-५-२५ ते २९

(९०) सर्वत्र परमेश्वर भरला आहे, हें एरव्हीं कळणार नाहीं. **उपासना** प्रकट झाली पाहिजे १६-१०-२७ ते ३१

(९१) ती उपासना एरव्हीं प्रकट होणार नाहीं. जगदांतरीं भरलेल्या देवाचें **ध्यान** घडलें पाहिजे.

**जगदांतरीं अनुसंधान । बरें पाहाणें हें चि ध्यान ।**
**ध्यान आणि तें ज्ञान । येकरूप ॥ २०-४-१२ ॥**

(९२) तें ध्यान घडलें नाहीं, **अंतर्निष्ठा** जडली नाहीं, तर नुसता बाह्याकार आणि लोकाचार यांचा कांहीं उपयोग नाहीं.

**बाह्याकार केला अधीक । परी तो अवघा लोकिक ।**
**येथें पाहिजे मुख्य येक । अंतरनिष्ठा ॥ ९-१०-८ ॥**

**लोकिक बरा संपादिला । परी अंतरीं सावध नाहीं जाला ।**
**मुख्य देवास चुकला । तो आत्मघातकी ॥ ९ ॥**

(९३) परमार्थाचें मूळ म्हणजे पंचीकरण व **महावाक्य** यांचें विवरण होय. त्या महावाक्याचा विचार करावा, त्यात प्रवेश करावा, तें प्रत्ययाला आणावें. ११-३-२९, १४-४-१०, ११-९-१९, १२-३-५, २६, १५-१०-१५, १८-५-३३

(९४) श्रीशिवसमर्थां सारख्या महापुरुषांनीं धर्माची चिंता केली आणि **धर्मस्थापना** केली. ते परमेश्वराचे च अंश होते.

**जे सत्कीर्तीचे पुरुष । ते परमेश्वराचे अंश ।**
**धर्मस्थापनेचा हव्यास । तेथें चि वसे ॥ १७-१-२९ ॥**

ती च चिंता श्रीशिवसमर्थांचे म्हणविणारांनीं आपआपल्या शक्तीप्रमाणें आज हि करावी. म्हणजे केव्हां तरी परमेश्वराला दया येईल आणि अवतार घ्यावा लागेल ! १०-४-४१, ४२

(९५) श्रीसांप्रदायिकांनीं **पुण्यमार्ग** केव्हां हि सोडतां कामा नये. पुण्यमार्गाची व्याख्या श्रीसमर्थांनीं केली आहे.

**प्रखर वैराग्य उदासीन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान ।**
**स्नानसंध्या भगवद्भजन । पुण्यमार्ग ॥ १२-४-१८ ॥**

या च मार्गानें आपले थोर पूर्वज गेले, साधुसंत गेले आणि म्हणून च आज आपण त्यांचे गुणानुवाद गात आहोंत. १०-७-११, १२

(९६) श्रवण-मनन-निदिध्यास यांच्या पाठोपाठ **साक्षात्कार** आहे म्हणून निश्चित समजा. श्रवणाचें मनन करावें आणि मननानें जो प्रत्यय येईल त्याचा निदिध्यास घ्यावा म्हणजे साक्षात्कार रोकडा ठेवलेला असतो. १०-९-३०, ११-१-४१, १७-३-३ वगैरे.

(९७) **अहंता** किंवा **गर्व** यांचा मनाला स्पर्श होऊं देऊं नये. अहंतेचा स्पर्श म्हणजे परमार्थाचें खग्रास ग्रहण च. अंतरात्म्यापुढें गर्व कोणी कसचा करावा ? १५-८-२७ ते ४०

(९८) रूप, लावण्य, यांसारखे जे उपजत गुण असतात, ते बदलणें, नाहींसे होणें किंवा प्राप्त करून घेणें, अशक्य आहे, पण आतांपर्यंत ज्या गुणांचा आपण विचार केला आहे, ते सारे **आगंतुक गुण** आहेत, म्हणजे ते प्रयत्नानें साध्य होणारे आहेत, तेव्हां ते गुण आपल्या अंगीं आणण्याचा प्रत्येकानें प्रयत्न केला पाहिजे.

**रूप लावण्य अभ्यासितां न ये । सहज गुणास न चले उपाये ।**
**कांहीं तरी धरावी सोये । अगांतुक गुणाची ॥**

या ओवीनें दुसऱ्या दशकाच्या आठव्या समासाचा शेवट केला आहे, पण चौदाव्याच्या सहाव्या समासाचा आरंभ त्या ओवीपासून च करून तिचें विवेचन त्या समासांत केलें आहे.

(९९) या बऱ्याचशा आज्ञा महंतांना आहेत. प्रत्येक जण महंत होऊं च शकेल असें नाहीं. **महंती** कांहीं फुकाची नाहीं. ज्याला साधणार नाहीं, त्यानें त्या भानगडींत पडूं नये, त्यानें आपल्या एकट्या जीवाचें काय करून घ्यावयाचें असेल तें करून घ्यावें. पण एकदां महंतीला आरंभ केला म्हणजे शिस्तीचा यत्किंचित् भंग होतां कामा नये. महंती केली नाहीं तर दोष नाहीं, पण करून घाण केली, संप्रदायाला दूषण आणलें, म्हणजे तें मोठें पाप होय. स्वतःस महंत म्हणवून अशी घाण करणारे संप्रदायाचे शत्रु होत! त्यांना जबाब विचारणारा आज भूतलावर कोणी नसला, तरी केव्हां च आणि कोठें च जबाब द्यावा लागणार नाहीं असें त्यांनीं समजूं नये. १९-७-१५ ते १७, १९-८-१९ ते २३

(१००) या सर्व आज्ञा आणि शिकवणी **कोणासाठीं** आहेत? प्रपंच साधावयाचा असो किंवा परमार्थ साधावयाचा असो, तो तारुण्यांत च साधला पाहिजे, निदान त्यास आरंभ तरी तरुणपणीं च केला पाहिजे. श्रीसमर्थांचा मामला धकाधकीचा होता. त्याला सशक्त च माणसें पाहिजे होतीं.

**धकाधकीचा मामला। कैसा घडे अशक्ताला।**
**नाना बुद्धि शक्ताला। म्हणोनि शिकवाव्या॥** १९-१०-२२॥

तसें च मागें उल्लेखिलेल्या आज्ञापत्रांत आपण पाहिलें, श्रीसमर्थांना जीं मुलें हवीं होतीं तीं तीक्ष्ण बुद्धीचीं आणि खोल अंतःकरणाचीं पाहिजे होतीं. तात्पर्य, वृद्धांचा व तरुणांपैकीं हि मठ्ठ मुलांचा त्यांना कांहीं उपयोग नव्हता. त्यांच्या प्रपंचाला आणि परमार्थाला शरीरानें आणि मनानें खंबीर अशीं च माणसें पाहिजे होतीं. त्यांचा संप्रदाय तरुणांसाठीं होता. संप्रदायांत येऊन वृद्ध व्हावें, पण वृद्धपणीं च संप्रदायांत प्रथम येऊं म्हणाल तर त्यांना अशांचा कांहीं उपयोग नव्हता!

श्रीसमर्थांच्या अशा हजारों आज्ञा आहेत, पण त्या सर्वांचा या एका आज्ञाशतकांत समावेश करतां येईल. **राष्ट्रगुरु** ही पदवी त्यांना च शोभते, हें सिद्ध करण्याला हें आज्ञाशतक व त्याच्या च पाठीशीं असलेली समाजराजकारणपर शिकवण हीं पुरेशीं आहेत, असें मला वाटतें.

## ( ११ ) ग्रन्थराजाची अपूर्वता

चाळीस वर्षें होत आलीं ! डोमगांव येथील मठांत असलेल्या श्रीकल्याणस्वामींच्या हातच्या प्रतीवरून या ग्रन्थाचें संपादन करीत असतां मला त्याची जी अपूर्वता वाटली, ती पुढें सारखी दृढ च होत गेली. त्या वेळीं ग्रन्थराजाच्या पहिल्या आवृत्तीला जोडलेल्या प्रस्तावनेच्या शेवटीं ज्या शब्दांत त्याची अपूर्वता प्रकट केली, त्यांतील प्रत्येक शब्द आज हि खरा ठरत आहे व अखंड कायम राहणार आहे. म्हणून सुमारें चाळीस वर्षां मागचे ते च शब्द आज जसेच्या तसे वाचकांच्या सेवेशीं सादर करितों.

“ सर्वतोपरि निकृष्ट स्थितीला पोंचलेल्या समाजाला ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची दिशा स्पष्ट रीतीनें आखून देऊन, शाश्वत सुखाची जोड करून देणें, हें च या ग्रंथाचें प्रयोजन होय. ऐहिक आणि पारमार्थिक कर्तव्याची संगति या ग्रंथांत जशी घालून देण्यांत आली आहे, तशी दुसऱ्या कोणत्या हि ग्रंथांत क्वचित च असेल. स्वतःचें घरदार, धंदा, स्वतःचीं बायकामुलें, यांच्या संबंधानें आपलें जें कर्तव्य आहे तेवढें च काय तें ऐहिक कर्तव्य, असें समजावयाचें नाहीं. प्रपंच म्हणजे हा वर दिलेला स्वतःचा प्रपंच अधिक राष्ट्राचा प्रपंच. स्वतःचा प्रपंच प्राणिमात्र करीत आहेत. स्वबांधवांचा प्रपंच करण्यांत च मनुष्याची श्रेष्ठता आहे. हा बोध म्हणजे च महाराष्ट्रधर्माचें शिक्षण होय. अलीकडच्या भाषेंत याला च स्वदेशाभिमान म्हणतात. असलें शिक्षण देणारा प्राकृतांत तरी एवढा च ग्रंथ आहे. हा च या ग्रंथाचा विशेष. इतर पारमार्थिक ग्रंथांप्रमाणें यांत अध्यात्मनिरूपण असून शिवाय इतर ग्रंथांतून जें नाहीं तें यांत आहे. हा च या ग्रंथांत आणि इतर ग्रंथांत फरक होय. ग्रंथ लिहिण्याचा श्रीसमर्थांचा हा जो विशिष्ट हेतु, तो त्या कालापुरता कसा सिद्धीस गेला, हें महाराष्ट्रवाचकांस तरी कोणी सांगावयास नको आहे. ह्या ग्रंथाचा उपयोग चिरंतन आहे. धर्माला ग्लानि आली म्हणजे परमेश्वर जसा अवतार घेतो, त्याप्रमाणें समाजाला केव्हां हि तत्कालीन स्थितीप्रमाणें निकृष्टावस्था प्राप्त झाली म्हणजे हा ग्रंथ मार्गदर्शक होणार आहे. जें कार्य एकवार या ग्रंथानें महाराष्ट्राच्या हातून घडविलें तें च कार्य करण्याची पात्रता या ग्रंथाच्या

आश्रयानें केव्हां हि महाराष्ट्राला येणार आहे. म्हणून महाराष्ट्राला या ग्रंथाचा निदिध्यास लागावा अशी माझी इच्छा आहे. असा हा अपूर्व ग्रंथ आहे. असा दुसरा कोणता ग्रंथ आहे कीं, जो लहान मोठे, संसारी, परमार्थी, राजकारणी, व्यावहारिक, अशा सर्व प्रकारच्या लोकांना सारखा उपयुक्त आहे ? सहा वर्षांच्या मुलापासून तों साठ वर्षांच्या वृद्धापर्यंत सर्वांना याच्यांत बोध आहे. श्रीसमर्थांचा बोध, त्यांची कृति व त्यांचें चरित्र इत्यादिकांचें अध्ययन करणें, मनन करणें व तदनुरूप, अत्यल्पांशानें कां होईना, वर्तन ठेवण्याचा प्रयत्न करणें यांत च महाराष्ट्राचा तरणोपाय आहे. ''

ग्रन्थराज दासबोध समजण्याला अगदीं सोपा आहे, असें नव्हे. पण या ग्रन्थाची एक अपूर्वता अशी पाहिली कीं, तो चांगलासा समजो न समजो, तो कानांना गोड लागतो आणि प्रेमानें वाचावासा वाटतो. ही गोडी त्याच्या ठिकाणीं कोठून आली ? मला तीन कारणें प्रमुख वाटतात : (१) हा प्रत्ययाचा ग्रन्थ आहे. कोणी हि वक्ता प्रत्ययानें बोलूं लागला, म्हणजे त्याच्या बोलण्याचा श्रोत्यांच्या मनावर तत्काळ परिणाम होतो. (२) या ग्रन्थांत श्रीसमर्थांच्या अंतरंगांतील खुणा प्रतिबिंबित झालेल्या असल्यामुळें तो वाचतांना वाचकांस स्वाभाविक गुदगुल्या होतात. (३) श्रीसमर्थांच्या उपासनेचें स्वरूप विश्वव्यापक असल्यामुळें त्या उपासनेंत च धर्मकारण, समाजकारण, राजकारण इत्यादि लोककल्याणाच्या सर्व अंगांचा समावेश झालेला आहे. ग्रन्थांत उपासनेचें दूध असून त्या दुधांत समाजराजकारणाची साखर पडली आहे ! आधीं च दूध गोड, तशांत त्यांत साखर घातलेली, त्यामुळें दुधाला गोडी अधिक च आली आहे. दूध गोड असलें, तरी कित्येकांना नुसतें दूध नको असतें. त्यांत थोडी साखर घातली म्हणजे ते पितात. त्यायोगें त्यांच्या पोटांत साखर हि जाते आणि दूध हि जातें. म्हणजे त्यांना प्रपंच आणि परमार्थ अशीं दोन्ही घडतात. असा हा दोन्ही लोक साधून देणारा ग्रन्थ, महाराष्ट्र-वाङ्मयांत अपूर्व होय.

----

# असें वाटतें !



तणें वाटे मुखीं रामदास गावे । जिव्हे रामदास उच्चारावे ।
निजकरीं रामदास पूजावे । अनंतां उपचारीं ॥ स्वा. दि. १ ॥

नेत्रीं रामदास पाहावे । कानीं रामदासचरित्र ऐकावें ।
रामदासपदींचें जिघ्रावें । निर्माल्य घ्राणें ॥ २ ॥

वोष्ठीं रामदासपदीं चुंबन । पदांगुष्ठ चोखावे चुरचुरून ।
रामदासांपुढें करावें नर्तन । निजपदीं सहजस्थितीं ॥ ३ ॥

मस्तकीं रामदास वंदावे । हृदयीं रामदास आळिंगावे ।
कडकडूनि सर्वांगेंसीं भेटावें । रामदासीं सहजस्थितीं ॥ ४ ॥

निजहृदयीं रामदास सांठवावे । स्कंधीं रामदास बैसवावे ।
पाठीसीं रामदास घालावे । वाम सव्य सहजस्थितीं ॥ ५ ॥

# पदपदांतरें

प्रस्तावना, ( १ ) गाण्याचें अंग, ( २ ) हिंदुस्थानी भाषेंतील पदें, ( ३ ) रामभेटीची तळमळ, ( ४ ) भेट कोणी करविली, ( ५ ) भेट झाली – कृतार्थ झाले, ( ६ ) त्या रामाचें ध्यान, ( ७ ) केवढा आधार – कोण हा विश्वास, ( ८ ) दांडगा निश्चय, ( ९ ) विश्वास आणि भक्तिभाव, ( १० ) कसें साधावें, ( ११ ) यत्नें करून वैराग्य करावें, ( १२ ) उरलें काय, ( १३ ) पहिला धडा नामस्मरणाचा, ( १४ ) कोण्ही येके हा करावा अभ्यास रे, ( १५ ) कोणतें फळ मिळतें, ( १६ ) परिणति ज्ञानप्राप्तींत, ( १७ ) श्रीसमर्थांचे सज्जन, ( १८ ) तत्कालीन देशस्थिति, ( १९ ) विचित्र प्रसंग, ( २० ) क्षेत्रांचे उल्लेख, ( २१ ) पुरश्चरण कशाचें केलें, ( २२ ) विठ्ठल राम झाले, ( २३ ) श्रीसमर्थांची आवड, ( २४ ) श्रीसमर्थांची निस्पृहता, ( २५ ) कृतज्ञतेचे उद्गार, तात्पर्य.

## प्रस्तावना

**मन मुरे । सद्गुरुपादपंकजीं । मन मुरे**

सत्कार्योत्तेजक सभेकडून प्रकाशित झालेल्या श्रीरामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील पंचविसावा भाग श्रीसमर्थकृत पदपदांतरांचा आहे. तीं त्यांचीं पदें सुमारें सातआठशें भरतील. त्यांत कवि, रसिक किंवा रसिकराय, भक्त किंवा भगत, राघवदास, रविकुळटिळकदास, दासजन, फकिर, रामको च्येरा, महंत, बंदा, बंदे कमीन, सेवकजन, सेवक, रामउपासक, अशीं श्रीसमर्थांनीं आणखी चौदा नांवें धारण केलेलीं आढळतात. हीं पदें त्रिकांडात्मक आहेत. श्रीसमर्थांच्या सर्व काव्यांत कर्म, उपासना आणि ज्ञान आणि त्यांचीं विविध रूपें पाहावयास मिळतात, तशीं तीं या पदपदांतरांत हि आहेत. त्यांच्या कवितेचा मला एक विशेष असा दिसतो कीं, या प्रत्येक कांडाचे ऐहिक आणि पारलौकिक असे दोन भाग त्यांनीं पाडलेले असतात कीं काय, न कळे. ऐहिक अभ्युदय आणि पारलौकिक निःश्रेयस हीं दोन्हीं प्राप्त करून घेण्यांत कर्म, उपासना आणि ज्ञान हीं असतात च, असें म्हणावें लागतें. मी कांहीं तरी लिहून जात आहें, तें बरोबर आहे कां चुकीचें आहे, हें सर्वज्ञ वाचकांनीं

पाहावयाचें असतें. मी मात्र ऐहिक आणि पारत्रिक त्रिकांडात्मक शिक्षण या पदांत काय आढळतें, ती पाहण्याच्या दृष्टीनें हीं पदें अवलोकिलीं आहेत. शिवाय श्रीसमर्थवाङ्मयाकडे पाहण्याची माझी जन्माची दृष्टि मला सोडून केव्हां च दूर होत नाहीं. अशा अनेक विचारांनीं या पदार्णवांत बुड्या मारून माझ्या हातीं जीं मौक्तिकें आलीं तीं मी माझ्या समानधर्मी मित्रांना प्रेमानें सादर करितों.

## ( १ ) गाण्याचें अंग

कोणा हि चरित्रकारानें जरी म्हटलेलें असो वा नसो, हीं पदें वाचून मला स्वच्छ दिसतें कीं, श्रीसमर्थांना गाण्याचें अंग अप्रतिम असावें. राष्ट्रगुरु ही ज्यांची भूमिका,

**छंदप्रबंदें बहुविध छंदें । कीर्तनघमडि करावी ॥ गि. २५४ ॥**

हा ज्यांचा छंद, त्यांना परमेश्वरानें गायनी कलेंत प्रविण करावें, हें ईश्वरी संकेताला धरून च होय. या पदपदांतरांत अनेक ठिकाणीं त्यांनीं अहेरी, केदारा, पावक, रामाश्री, धनाश्री, मारु, काफी, आसावरी, जयजयवंती, वेराळी, कल्याण, कानडा, श्री, सारंग, देसी, हुसेनी, कामोद, गौडी इत्यादि राग दिले आहेत, इतकें च नव्हे, तर कांहीं पदांत च रागांचीं वर्णनें केलीं आहेत ( उदा. २१८, २७० ). तशीं वर्णनें, गायनकलेचें पूर्ण ज्ञान असल्यावांचून कोणास करतां येतील, असें वाटत नाहीं. पां[illegible] पंचवीस पदांत तर त्यांनीं गायनी कलेची महती वर्णिली आहे. [illegible] दोन पदांत, गावें कसें, हें च त्यांनीं सांगितलें आहे. ( उ. २०७ ) उत्तरार्धांतील ७ व्या पदांत, हें आपण प्रचीतीनें सांगत आहोंत, असें म्हटलें आहे व २८९ व्या पदांत तर, आपण संगीत गाणें जाणतों, असें त्यांनीं स्पष्ट च म्हटलें आहे.

**दास म्हणे रे आवडी माझी । जाणती संगीत गाणं रे ॥**

तेव्हां शंकेला जागा उरत नाहीं. मला शंका नाहीं, श्रीसमर्थांना गाण्याचें अंग अप्रतिम होतें. त्यांचा आवाज हि गोड आणि खडा होता [illegible] कीर्तनास उभे ठाकत असतील, तेव्हां हजारों श्रोते तल्लीन [illegible] असले पाहिजेत! तीर्थाटण संपवून वयाच्या छत्तिसाव्या [illegible]

दर्शनास जाण्यापूर्वी पैठणास वाळवंटांत श्रीसमर्थांनीं जें कीर्तन केलें व कीर्तनसमाप्तीनंतर एका वृद्धानें त्यांना जी आज्ञा केली, तो सारा प्रसंग मनश्चक्षूपुढें आणून वाचक श्रीसमर्थांना पाहूं शकतील !

## ( २ ) हिंदुस्थानी भाषेंतील पदें

त्या काळीं राष्ट्रपुरुषाला हिंदुस्थानी भाषा अवगत असणें अगत्याचें होतें. त्या भाषेंत पदें करण्या इतपत श्रीसमर्थांना त्या भाषेचें ज्ञान होतें. महाराष्ट्राबाहेर ते जेव्हां संचार करीत, विशेषतः उत्तर हिंदुस्थानांत जेव्हां ते जात, तेव्हां त्यांचीं कीर्तनें आणि प्रवचनें हिंदुस्थानी भाषेंत हि होत असावींत, असें मला वाटतें. त्या भाषेंतील त्यांचीं पांच पंचवीस पदें उपलब्ध आहेत. त्यांच्या श्रोतृवर्गांत जसे हिंदु असत, तसे मुसलमान हि बहुधा असत; 'गिरिधरलिखित १९४ व्या पदांत ' कहते किताब कुराना ' असें त्यांनीं म्हटलें आहे, त्यावरून कुराण हि त्यांच्या वाचण्यांत होतें व हिंदुमुसलमानांच्या मिश्र समाजापुढें बोलतांना ते कुराणाचा हि आधार सांगत, हें उघड दिसतें. गिरिधरलिखित पुढील पदें वाचून मला तर असें दिसतें कीं केवळ मुसलमान समाजापुढें हि उभे ठाकून कीर्तनद्वारा ते त्यांना बोध करीत.

### १ ( गि. २३८ )

**रे भाई गैबि मर्द सो न्यारे। सोहि आल्लामियाके प्यारे रे भाई ॥ध्रु०॥**

**देहरा तुटेगा मसिद तुटेगी। तुटेगा सब है सो।**
**तुटता नहि फुटता नहि। सो गैबि कैसा है रे भाई ॥ १ ॥**

**हिंदुमुसलमान महजब चले। येक सुभिजन हारा।**
**साहेब आलमकु चलावे सो। अलमथी हे न्यारा रे ॥ २ ॥**

**आवल येक अखैर येक। दोऊं नहि रे भाई।**
**हम बि ज्यायगे तुम बि जायगे। हक सो येक ईलाहि ॥ ३ ॥**

### २ ( गि. २३९ )

**येक जीमीन येक हि पानि। येक आतश असमान।**
**येकमेहु आलम चलाता। येक चंद सुभान ॥ १ ॥**

भाई काहेकु लडतें। लडतें सो पडतें भाई॥ ध्रु०॥

गैबि सोई हक ईलाई। पंच भूत भूतखाना।
आज्यब महजब इसमे है रे। यो तो सब कुफराना॥ २॥

बंदा कमिन हक बोलता। सुन हो खातिर ल्यावो।
अल्लाबिन येक जरा नहि रे। गैबि बाटसु ज्यावो रे॥ ३॥

मला तितकें हिंदुस्थानी समजत हि नाहीं. हीं त्यांचीं सारीं हिंदुस्थानी पदें निवडून काढून एकत्र वाचलीं, तर मला सुचलीं नाहींत अशीं कित्येक अनुमानें एकादा तज्ज्ञ त्यांतून काढूं शकेल.

## ( ३ ) रामभेटीची तळमळ

श्रीसमर्थहृदयाला लागलेल्या रामभेटीच्या तळमळींचीं पदें पुष्कळ च आहेत. तशी तळमळ आपणांस हि लागावी, म्हणून या क्षणीं मला जीं दोन पदें विशेष आवडतात, तीं येथें उतरून घेतों. ते जेथें 'रे रामा', 'रे राघवा' म्हणत आहेत, तेथें आपण 'रे गुरुदेवा', 'रे समर्था' म्हणूं आणि श्रीसमर्थांना आळवूं.

### १ ( गि. १४२ )

संसारसासुरां तुवां बोळविलें।
येथें बहुत दिवस कां टाकिलें रे रामा।
रात्रिदिवस तुझी वाट पाहे।
मज अत्यंत संसारें गांजिलें रे रामा॥ १॥

अंतर जाणोनि यावें झडकरी।
तुझ्या वियोगें न कंठे क्षणभरी रे रामा।
तुजवांचुनि अंतीं कोण आहे।
ऐसी अवस्था लागली अभ्यंतरीं रे रामा॥ ध्रु०॥

या लोकिकापासुनि मज सोडवावें।
जरि तूं न येसि तरि म्यां काय करावें रे रामा।
नाहीं कोण्ही च माझे जिवलग।
येथें कोणाच्या आधारें कंठावें रे रामा॥ २॥

लग्नसमारंभांतून निसटणें सुलभ वाटलें म्हणून निसटलों

सुलभ जाणुनि धांव घातली रे।
या लौकिकाची लाज म्यां टाकिली रे रामा।
आलों टाकुनि सर्व अभिमान।
तुझ्या पांई माझी वृत्ति गुंतली रे रामा॥ ३॥

आणि आतां तुझ्यासाठीं वनांत भटकतों आहें

येकला येकट जालों रानभरीं।
तुजकारणें उदास सर्वांपरी रे रामा।
चित्त चंचळ जाहले राहवेना।
भांबावलों हिंडतों वनांतरीं रे रामा॥ ४॥

रामी रामदास तेणें आस केली।
ते तां आपण होउनि पुरविली रे रामा।
दुःख संसारीचें फार जालें।
येथें आम्हां संकटीं धांव घालीं रे रामा॥ ५॥

२ (उत्तरार्ध २४२)

स्वामी तुझिया वियोगें। घटिका जातसे युगें।
धांव तूं लागवेगें। राघवा रे॥ ध्रु०॥

बहु दीस जाले भेटी। धीर न धरे पोटीं।
चिंता वाटते मोठी। रे राघवा॥ १॥

तप्त जाली काया। तुज रे भेटावया।
येईं तूं प्राणसखया। रे राघवा॥ २॥

नेम होता केला। तो हि टळोन गेला।
काय अन्याय जाला। रे राघवा॥ ३॥

नको उदासीन। पाईं गुंतलें मन।
णें पराधेन। रे राघवा॥ ४॥

र जाणावें। दासां सांभाळावें।
निष्ठुर न व्हावें। रे राघवा॥ ५॥

जणूं कोणी अयोध्येस जाण्यास निघाले असतां त्याच्या बरोबर श्रीसमर्थ श्रीरामाला निरोप पाठवीत आहेत कीं, रामाला सांगा, आपण पूर्वीं जांबेस, टांकळीस व इतर ठिकाणीं भेट दिली आहे, पण हल्लीं मी चाफळास आपल्या दर्शनाची वाट पाहात आहें! त्याला माझा एवढा नुसता निरोप सांगा, माझ्या हृदयांत काय आहे तें त्याला सर्व ठाऊक आहे! अयोध्येला त्या जाणाऱ्याला रामाचें घर कदाचित् सांपडणार नाहीं, असें मनांत आणून त्याला श्रीसमर्थ घर ओळखण्याची खूण सांगत आहेत कीं, त्या घराच्या देवडीवर हनुमंत सेवक बसलेला असतो! या भक्तिप्रेमाची कल्पना सुद्धां मजसारख्याला करवत नाहीं! श्रीसमर्थहृदय असें प्रेममय होतें!

## ३ (पूर्वार्ध ९३)

**रूप रामरायाचें देखिलें वो।**
**त्याचे चरणीं मानस माझें रंगलें वो।**
**चित्त विव्हळ रामें वेधिलें वो ॥ १ ॥**

**ये जीवींचा जिव्हाळा आत्मा रामराव।**
**जाणतो सकळ माझा अंतर्भाव।**
**त्यासी तुम्ही येक वेळ भेटवा वो ॥ ध्रु० ॥**

**कोवसा असतां माझ्या सीरावरी।**
**संसारीं गांजिलें येहीं दुराचारीं।**
**आतां मज कंठवेना क्षणभरी ॥ २ ॥**

**शरयुतीरीं स्वामी माझा नांदताहे।**
**हनुमंत सेवक त्याचे घरीं आहे।**
**निरोप सांगा रामदास वाट पाहे ॥ ३ ॥**

वाचकांना या तळमळीची कल्पना होते कां? मला होत नाहीं! कोठून आणावें हें इतकें भक्तिप्रेम! इतकी तळमळ लागल्यावर राम धांवून येण्याला क्षणाचा तरी विलंब लावतील काय? वरील तिसरें कडवें सांगतांना श्रीसमर्थांचे डोळे पाण्यानें भरून आले असतील!

## ( ४ ) भेट कोणी करविली

सोडविल्या देवफौजा । आला वैकुंठीचा राजा ।
संव्हारिले रजनीचर । देव भक्ताच्या काजा ॥ गि. ११६/१ ॥

दास मी समर्थाचा । मज कोणी जाणेना ।
मुळीची कुळदेव्या हे । तिणें रक्षिलें मना ॥ ध्रु० ॥

अजिंक ते संव्हारिले । भूमिभार फेडिला ।
ऐसा हा समर्थाला । जिणें वर दिधला ॥ २ ॥

ते सोय धरूनियां । गेलों तुळजेच्या ठायां ।
तिणें मज आश्वासिलें । भेटविलें रामराया ॥ ३ ॥

' मज कोणी जाणेना ' अशा काळांतील म्हणजे आरंभींच्या काळांतील हें पद दिसतें. तुळजापूरच्या देवीनें रामाला वर दिला होता, हें ऐकून श्रीसमर्थ तुळजापुरास गेले असतां देवीनें श्रीसमर्थांस रामरायाची भेट करविली.

## ( ५ ) भेट झाली, कृतार्थ झाले

फावलें रे हरिसुख फावलें रे ॥ ध्रु० पू. ४२ ॥

राया दशरथा नृपासी । माते कौसल्ये जननीसी ।
नगरवासियां लोकांसी । सुख फावलें रे ॥ १ ॥

जें सुख फावलें त्रिंबका । जें सुख फावलें वाल्मीका ।
तें रामदास रंका । सुख फावलें रे ॥ २ ॥

आणि मग

दास उदास फिरे विवरे । चित्त निवालें रे ॥ गि. १६२/३ ॥

## ( ६ ) त्या रामाचें ध्यान

ण हें श्रीसमर्थांच्या रामाचें वैशिष्ट्य होय. स्वाभाविक
ा आणि दुष्टांचा संहार हें च ज्यांच्या अवतारकार्याचें
सज्ज असणार, हें उघड आहे. ठकाराचें ठाण । करीं

चापबाण ।। हें च आपलें ब्रह्मज्ञान होय, असें त्यांनीं म्हटल्याचें आपण मागें च एका अभंगांत पाहिलें आहे.

**तेथें माझें तन मन धन ॥ ध्रु० गि. ६२ ॥**
**परम सुंदर रूप मनोहर । करीं धरुनि धनुर्बाण ॥ १ ॥**
**राम लक्ष्मण जनकतनया । वाम भागीं शोभताहे ॥ २ ॥**
**पीत पीतांबर कासिला कासे । शोभतसे दिव्य ठाण ॥ ३ ॥**
**भीम भयानक सन्मुख मारुति । कर जोडुनि वाट पाहे ॥ ४ ॥**

त्यांच्या हृदयांत रामाचें जें ठाण बिंबलें होतें त्यांत रामाच्या हातीं धनुष्यबाण कायमचें होतें. उपास्याच्या स्वरूपावरून उपासकाच्या हृदयाची परीक्षा करणें योग्य होत असेल तर, श्रीरामाचें हें ध्यान पाहून श्रीसमर्थहृदयाची कल्पना करतां येते.

## ( ७ ) केवढा आधार ! कोण हा विश्वास !

श्रीसमर्थांना श्रीरामाचा केवढा आधार वाटे व त्यावर त्यांचा किती अढळ विश्वास असे, हें दर्शविणारीं त्यांचीं किती तरी पदें आहेत. त्यापासून बोध घेण्यास आपणांस एकाद दुसरें पद पुरें व्हावें. हे त्यांचे सारे बोल स्वानुभवाचे असतात. आपल्या प्रत्ययाला आलेल्या गोष्टी ते सांगत असतां त्यांवर विश्वास टाकून त्या च मार्गानें आपण न जाऊं तर आपण आत्मघातकी ठरूं.

### त्यांचा प्रत्यय — गि. १३२

**रंकाचे राजे होती । ऐसें पूर्ण बिंबलें ।**
**रंक हें रक्षुनियां । परिपूर्ण चि केलें ॥ १ ॥**

**ब्रीद हें साच केलें । भक्त रक्षिला कैसा ।**
**वैभव देउनियां । पुरविल्या भडसा ॥ ध्रु० ॥**

**अंतर्निष्ठ भक्त होतां । होतो मोठा तमासा ।**
**भक्तांसी विसंबेना । क्षणभरी अमासा ॥ २ ॥**

**रामदास म्हणे माझें। प्रचीतीचें बोलणें।**
**हें वाक्य मिथ्या होतां। येतें समर्था उणें ॥ ३ ॥**

आणखी त्यांनीं काय आणि कसें सांगितलें म्हणजे आपण मानूं! त्यांनीं प्रत्यक्ष येऊन हें सांगितलें तरी आपण मानूं किंवा नाहीं, कोण जाणे! श्रीसमर्थ मागें एका अभंगांत हि म्हणून गेले आहेत कीं, आपला हा प्रत्यय असतां, जो कोणी विचारीचना त्याला आपण तरी काय करणार? कशाच्या योगानें आमचीं डोकीं इतकीं जड झालीं असावींत, कळत नाहीं, कीं त्यांत श्रीसमर्थांसारखे आपला अनुभव सांगत असतां हि प्रकाश पडूं नये! माझें मला च मी हें दुःखानें बोलत आहें. जी गोष्ट श्रीसमर्थांना पूर्ण बिंबली, जिची त्यांना प्रचीति आली, ती च ते या पदांत सांगत आहेत. ती च प्रचीति आज हि कोणास येऊं शकेल! 'अंतर्निष्ठ भक्त होणें' एवढी एक च शर्त आहे. विचार करावा, कांहीं बोध घ्यावा, नाहीं पेक्षां नुसतें उगी च कां वाचावें! या ठिकाणीं 'वाचावें' आणि 'वांचावें' पैकीं कोणता हि शब्द योजिला तरी चालेल.

## रामाचा केवढा आधार—पूर्वार्ध २८

**आम्हां ये प्रपंचीं कोण्ही नाहीं सखा।**
**येका रघुनायका वांचुनीयां ॥ १ ॥**

**विद्या वैभव धन मज कृपणाचें।**
**जीवन जिवाचें आत्मारामु ॥ २ ॥**

**आकाश अवचितें वरी कोसळेल।**
**मज तेथें राखेल आत्मारामु ॥ ३ ॥**

**आपंगिलें मज श्रीरामसमर्थें।**
**ब्रह्मांड पालथें घालूं शके ॥ ४ ॥**

**वक्रदृष्टीं पाहातां भगेल त्याचा थोंट।**
**काळाचें हि पोट फाडूं शके ॥ ५ ॥**

**रामदास म्हणे मी शरणागत त्याचा।**
**आधार सकळांचा मुक्त केला ॥ ६ ॥**

## रामावर कोण हा विश्वास—पू. २६

**गजईंद्र सावजें धरिलासे पानेडीं। रामें तेथें उडी टाकीयेली ॥ १ ॥**
**प्रल्हाद गांजिला तया कोण सोडी। रामें तेथें उडी टाकीयेली ॥ २ ॥**
**तेतिस कोटी देव पडिले बांदोडीं। रामें तेथें उडी टाकीयेली ॥ ३ ॥**
**क्षत्रियें पीडिलीं ब्राह्मणें बापुडीं। रामें तेथें उडी टाकीयेली ॥ ४ ॥**
**दासां पाईं पडिली देहेबुद्धिबेडी। रामें तेथें उडी टाकीयेली ॥ ५ ॥**

आणि खरोखर च सवा मणाची बेडी पायांत पडण्याची वेळ आली असतां रामें तेथें उडी टाकीयेली ! या सर्व उदाहरणांवरून आणि स्वतःच्या अनुभवावरून श्रीसमर्थ आपणांस आश्वासन देत आहेत :

**रामदास म्हणे कां करिसी वणंवणं। रामें भक्त कोण उपेक्षीले ॥ ६ ॥**

## (८) दांडगा निश्चय

श्रीसमर्थांचा हा विश्वास आणि अनुभव हीं पाहिलीं म्हणजे त्यांच्या पुढील निश्चयाची उपपत्ति बरोबर लागते !

**जठरीं लागो क्षुधा होत नाना आपदा।**
**भक्तिप्रेम कदां न सोडी सत्य ॥ पू. २९–१ ॥**

**शब्द न फुटे तरी चिंतीन अंतरीं।**
**भक्तिप्रेम परी न सोडी सत्य ॥ २ ॥**

**दाहूं वडवानळ अथवा दंशू काळ।**
**भक्तिप्रेम प्रबळ न सोडी सत्य ॥ ३ ॥**

**नानापरी आघात चिरकाळ होत।**
**नामीं प्रेमामृत न सोडी सत्य ॥ ४ ॥**

**आतां चि हा देहो राहो अथवा जावो।**
**रामीं प्रेमभाव न सोडी सत्य ॥ ५ ॥**

**म्हणे रामीरामदास वरी पडो आकाश।**
**राघवाची कास न सोडी सत्य ॥ ६ ॥**

## (९) विश्वास आणि भक्तिभाव

हा अनुभव आपल्याला कसा यावा ? अखेरीस निश्चळीं लीन होऊन जावें, हें जन्माचें ध्येय असेल तर सद्गुरुवचनावर विश्वास टाकून भक्तिभावापासून आरंभ केला पाहिजे व क्रमाक्रमानें आंगचे सर्व दोष झाडून साधनमार्गांतील एक एक टप्पा ओलांडीत शेवटचें स्थान गांठलें पाहिजे. विश्वास नाहीं, भाव नाहीं आणि घर सोडलें, देश विदेश हिंडला, तीर्थयात्रा केल्या, शास्त्रें अवलोकिलीं, युक्तिप्रयुक्तीनें वक्तृत्व करतां आलें, तर अहंकार मात्र अंगीं जडेल, पण देवाची भेट होणार नाहीं ! दृढ विश्वास आणि निस्सीम भक्तिभाव पाहिजेत.

### विश्वास — गि. २५२

**येका विश्वासावांचुनि । पाविजे देव कैसेनि ॥ ध्रु० ॥**

**सकळ सांडूनि उदासिन । हिंडे देश विदेश ।**
**गिरि कपाटें तीर्थयात्रा । तुटेना भवपाश ॥ १ ॥**

**वेदशास्त्र पाहिलें रे । जालि स्फूर्ति अपार ।**
**स्फूर्तिरूपें अहंकार । तुटेना संसार ॥ २ ॥**

**नाना युक्तिलाघवें रे । बोलति देह विदेह ।**
**दास म्हणे हें सकळिक माईक । फिटेना संदेह ॥ ३ ॥**

तात्पर्य, विश्वास पाहिजे आणि त्याबरोबर च खरा भाव पाहिजे. ढोंगानें आपण जगाला फसवूं पण देवाला फसवूं शकणार नाहीं.

**कारण पाहिजे भाव । भावें चि पाविजे देव ।**
**देवासी लाघव । कामा नये रे ॥** गि. ४० ॥

### भक्तिभाव — गि. ५३

**भक्तिभावें पावन होती लोक रे । भक्तिभावें पाविजे परलोक रे ।**
**भक्तिभावें हा सर्व हि विवेक रे । भक्तिभावें सांपडे देव येक रे ॥ ध्रु० ॥**

**भक्तिविणें आधार कोठें नाहीं रे । भक्ति भावें करावी लवलाही रे ।**
**नवविधा भजन बरें पाहीं रे । विभक्त नको भक्त होउनि राहीं रे ॥ १ ॥**

**अखंड ध्यानें राहावें समाधानें रे । नाहीं तरी श्रवणमननें रे ।**
**अर्थांतरें मुळिच्या अनुसंधानें रे । अनन्यभावें त्या आत्मनिवेदनें रे ॥ २ ॥**

**सांडा सांडा परता देहभेद रे । देहभेदें होतसे नाना खेद रे ।**
**अंतरंगें सांपडे अभेद रे । मुळीं नाहीं निश्चळीं भेदाभेद रे ॥ ३ ॥**

**दास म्हणे भजन येका भावें रे । तन मन भक्तीस लावावें रे ।**
**संतसंगें देवासी सर्व वावें रे । देवीं भक्तीं निश्चळीं लीन व्हावें रें ॥ ४ ॥**

हे च विचार क्रमश: ग्रन्थराजाच्या उत्तरार्धांत आपण पाहिले.

## ( १० ) कसें साधावें

दोष टाळावे, साधनें करावीं, वैराग्य बाणून घ्यावें, नुसत्या पुस्तकी ज्ञानावर अवलंबून राहूं नये, सद्गुरूस शरण रिघावें, त्यांना रिझवावें, त्यांची कृपा संपादन करावी, प्रचीति घ्यावी, कृतार्थ व्हावें, तद्रूपांत लीन व्हावें, विरघळून जावें.

दोन मोठे दोष, ते आधीं टाळावे.

### एक — आळस — पूर्वार्ध १७५

**आळस खोटा रे बापा आळस खोटा रे ॥ ध्रु० ॥**
**धुष्टपुष्ट धाटामोटा । व्यर्थ चि ताठा रे बापा ॥ १ ॥**

**आळस मोठा तो चि करंटा । जाईल कोणा वाटा ॥ २ ॥**
**दास म्हणे रे येत्न उचटा । वैभव सर्व लुटा रे ॥ ३ ॥**

आणि दुसरा मोठा दोष लोकेषणेचा. तिन्ही ईषणांत लोकेषणा अति भयंकर, दुर्दम आहे. तिचा ज्याच्यावर पगडा बसतो त्याला ती रसातळास नेऊन पोंचविते. परमार्थमार्गांत तर तिचें मोठें च विघ्न समजावें. शहाण्याशहाण्यांची बुद्धि हरण करून घेऊन त्यांचा ती नाश करते.

दुसरा – लोकेषणा – उत्तरार्ध ९३

**सकळ जन मानमदिरा भुलवी ॥ ध्रु० ॥**

**जग तृण मानी ऐसा तो विरळा । लोकेषणा उगवी ॥ १ ॥**

**लोकिक सांडुनी जाणें चि लागे । कवी जनां शिकवी ॥ २ ॥**

## ( ११ ) यत्नेंकरून वैराग्य करावें

सुचित्त असावें, नित्यानित्यविवेक करावा, सारासारविचार पाहावा, तो अंतरीं बिंबवावा, विषयांचा खेद वाटावा, म्हणजे श्रीरामास करुणा येते आणि अंगीं वैराग्य बाणतें. वैराग्यापुढें ज्ञान हि फिकें पडतें, असें श्रीसमर्थांचें म्हणणें आहे. स्फुट पदांपैकीं दुसरें पद —

**कानकोंडया सुखाकारणें मनें लुलु केलीं ।**
**तेणें देहा सुख नव्हे चि हळहळ जाहाली ॥ १ ॥**

**कृपासिंधु रघुनायका अव्हेरूं नको ।**
**शरण रविकुळटिळका । दास दीन मी रंक ॥ ध्रु० ॥**

**तुझे भेटी रामा रे तुझा मार्ग चुकलों ।**
**विषयकांटे रुतले तेणें खेद पावलों ॥ २ ॥**

इतकें झाल्यावर

**ऐसा दगदला देखोनी रामा करुणा आली ।**
**तंव वैराग्यहनुमंतें पुढें उडी घातली ॥ ३ ॥**

**हा हनुमंत जयाचा कोवसा धन्य तयाचें जिणें ।**
**तयालागीं ज्ञान बापुडें लाजिरवाणें ॥ ४ ॥**

## ( १२ ) उरलें काय ?

एक च उरलें. केवळ पुस्तकज्ञानानें भागत नाहीं, म्हणून सद्गुरूस शरण जावें, ते सांगतील तो अभ्यास करावा, विचार करावा आणि प्रत्यय पाहावा.

**पुस्तकज्ञानें होत चि नाहीं । प्रत्यय नीट पाहावा ।**
**दास म्हणे समजेल विचारें । तेणें तुटेल गोवा ॥ गि. २५४–३ ॥**

हा च सिद्धान्त ग्रन्थराजांत हि आला आहे व सर्व स्वानुभवी संतामहंतांनीं प्रतिपादिला आहे.

**सद्गुरु सेवी रे मना । चुकती जन्ममृत्य संसारयातना ॥ ध्रु० ॥**
**सज्जनसंगती धरा । धरुनि बरें तत्त्वज्ञान विवरा ॥ गि. १४–१ ॥**
**सद्गुरुवेगळी गति । कदापि नव्हे भले सज्जन जाणती ॥ २ ॥**
**पिंडब्रह्मांडरचना । सद्गुरुविणें कांहीं च उमजेना ॥ ३ ॥**
**दास म्हणे रे कवि । सज्जनसंग जन्ममृत्य चुकवी ॥ ४ ॥**

## ( १३ ) पहिला धडा नामस्मरणाचा

श्रीसमर्थ पहिला धडा घालून देतात तो नामस्मरणाचा. तो धडा नुसता समजल्यानें भागत नाहीं. तसें आचरण आमरण केलें पाहिजे. नुसतें शब्दज्ञान झाल्यानें प्रत्यय येत नसतो.

**अंतरीं नाहीं धालें । शब्दज्ञान बोलिलें ।**
**दिवाळें निघालें । आपेंआप रे ॥ गि. २३–२ ॥**

क्रिया केली पाहिजे.

**रंग रामीं रे मना रंग रामीं रे**
**रामरंग तो चि अभंग व्यर्थ कामीं रे ॥ ध्रु० पृ. १७७ ॥**
**रामापाईं गुंत उपाईं । कां पडसी अपाईं ॥ १ ॥**
**रामु आमुचा जीव जीवाचा । ठाव विश्रांतीचा ॥ २ ॥**
**कीर्ति ज्याची वर्णितां चि मुक्ती फुकाची रे ॥ ३ ॥**
**कोळी कबीर दास अपार तारीले साचार ॥ ४ ॥**
**नाम जपावें अनन्यभावें । रामदास व्हावें रे ॥ ५ ॥**

नामजपाची महती गाणारीं अशीं कैक पदें आहेत.

**सांडुनि रामाची सोय । बोलतां सीण चि होय ।**
**वाउगें आयुष्य । जाय जाय रे ॥ ध्रु० गि. १६ ॥**

घडि घडि पळ पळ । आयुष्य विघडी काळ ।
वाचा हे बरळ । सांवरावी रे ॥ १ ॥

काया वाचा आणी मनें । राम चि उपासनें ।
वाउगीं वचनें । वायांविण रे ॥ २ ॥

रामदास म्हणे येका । रामेंविण बोलों नका ।
आणीक बोलतां शोका । मूळ रे ॥ ३ ॥

एका पदांत तर त्यांनीं आपणांवर विश्वास टाकून कोणी तरी हा अभ्यास च करून पाहावा, त्यांचें फळ प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं, असें निश्चयपूर्वक सांगितलें आहे. त्या पदांतील 'अभ्यास' या शब्दाचें मला मोठें कौतुक वाटलें. राष्ट्रगुरु पहिला सोपा धडा घालून देतात आणि त्याचा अभ्यास करावा म्हणतात. ही त्यांची आज्ञा आपण ऐकणार नाहीं आणि मुळींच अभ्यास करणार नाहीं, तर आम्ही परीक्षेंत उत्तीर्ण होऊन त्यांच्या कृपेला कसे पात्र होऊं ?

## (१४) कोण्ही येकें हा करावा अभ्यास रे

श्रीसमर्थ म्हणतात, तुम्ही इतर पुष्कळ अभ्यास करता, प्रयत्न हि करता, स्वतःच्या वैभवासाठीं किंवा इतरांच्या कल्याणासाठीं सकाम अनुष्ठानें करता, त्या सर्व करण्याचें तुम्हांस काय फळ मिळत असेल तें तुमचें तुम्हांस ठाऊक ! आतां आम्ही आमच्या प्रचीतीचा एक अभ्यास सांगतों तो करून पाहा. फळ पावाल हें आम्हीं निश्चयानें सांगतों, विश्वास ठेवा. गिरिधर ९०

नामामध्यें उत्तम रामनाम रे । रामनामें तुटतो भवभ्रम रे ।
नासे तम सदा सुखसंभ्रम रे । मोक्षपंथा जावया अनुक्रम रे ॥ ध्रु० ॥

वीष घेतां शंकरा श्रम जाला रे । बहुविध उपाय तेणें केला रे ।
केला परि सर्व हि वेर्थ गेला रे । रामनामें प्रचीतीनें निवाला रे ॥ १ ॥

वाल्हा कोळी पातकी भूमंडळीं रे । अपसव्य नामानें लावी टाळी रे ।
तत्काळ चि पातकां जाली होळी रे । रामकथा विख्यात तिही ताळीं रे २॥

शुकासाठीं कुंटणी रामवाणी रे । उदंड चि महिमा तो पुराणीं रे ।
रामनाम उत्तम पुण्यखाणी रे । अंतकाळीं चुकवी ताणाताणी रे ॥ ३ ॥

**रामदास तो सांगतो उदास रे । रात्रिदिवस धरावा निजध्यास रे ।**
**कोण्ही येकें हा करावा अभ्यास रे । फळद्रूप होताहे विश्वास रे ॥ ४ ॥**

## (१५) कोणतें फळ मिळतें ?

नामीं रंगलेल्या जीवाची कशी अवस्था होते, तिचीं लक्षणें निरनिराळ्या पदांत विखुरलेलीं आढळतात. जीव कासावीस होतो, मन उतावीळ होतें, हृदय प्रेमानें भरून येतें, भांबावलेल्या चित्तवृत्ति शांत होतात, सतरा ठिकाणीं पांगलेली दृष्टि एका च ठिकाणीं स्थिर होते, ती अंतर्मुख होते, अहंकार गळतो, संदेह मावळतो, देहबुद्धि झडते, मीपण हारपतें, भेद नाहींसा होतो, चंचळ लयाला जाऊन केवळ निश्चळ उरतें, तद्रूपता प्राप्त होते. इत्यादि फलप्राप्ति होते. तस्मात्

**गावें रे नाम गावें रे ॥ ध्रु० ॥ पूर्वार्ध ३९**
**त्रैलोकीं हें पावन आहे । जीवीं धरावें भावें रे ॥ १ ॥**
**दोषदहन हें गहन पुराणीं । सुचीत व्हावें रे ॥ २ ॥**
**दास म्हणे हें सार फुकाचें । नलगे यावें जावें रें ॥ ३ ॥**

## (१६) परिणति ज्ञानप्राप्तींत होते

आणि हें ज्ञान म्हणजे थोतांड नव्हे. लोकांच्या अज्ञानामुळें श्रीसमर्थांच्या वेळीं हि भक्तिमार्गांत अनेक बंडें उद्भवलीं होतीं, असें दिसतें. त्यांच्यावर श्रीसमर्थांनीं फार कोरडे ओढले होते. भलते च चमत्कार दाखवून ज्ञानाच्या बाबतींत लोकांची दिशाभूल होते, ती योग्य नव्हे, असें त्यांना वाटे. ज्ञान सांगणें तर तें यथार्थ सांगावें, नाहीं पेक्षां परमेश्वराच्या घरीं तो मोठा अपराध गणला जाईल, असें त्यांनीं निक्षून सांगितलें आहे. या त्यांच्या न्यायनिष्ठुर मनोवृत्तीचें प्रत्यंतर ‘ बहुधा गोसावी ’ या त्यांच्या लघु काव्यांत चांगलें पाहावयास मिळतें. तें आपण मागेंच पाहिलें आहे. त्या च नमुन्याचें पुढील गिरिधरलिखित ८३ वें पद आहे.

**येके नदीचे पोटीं । शाळिग्रामाच्या कोटी ।**
**महिमा उदंड सेवटीं । वास होतो वैकुंठी ॥ १ ॥**

ऐसे महिमे अपार । कोण जाणतो पार ।
कैसा तरी उध्धार । सुटोत बापुडे नर ॥ ध्रु० ॥

नर्मदेचे गणेश । वाळवंटीं उदास ।
करणें नलगे सायास । त्याचा महिमा विशेष ॥ २ ॥

काश्मिर देश तो येक । तेथें उदंड स्फटिक ।
त्याचे देव अनेक । पूजितां होतें सार्थक ॥ ३ ॥

येकां स्वापदशिंगें । कितेक पूजिती लिंगें ।
देवां मानलीं चांगें । पुण्य तयाच्या योगें ॥ ४ ॥

रानडुकराचे केश । त्याचा महिमा विशेष ।
उद्धर्चनें मूर्तीस । पाप राहेना लेश ॥ ५ ॥

हरिणावाघाचीं मढीं । त्याचीं घ्यावीं कातडीं ।
पुण्य येतें तांतडी । होते देवाची जोडी ॥ ६ ॥

सोमयाग करिती । तेथें मांसें भक्षिती ।
तेणें होतसे गती । महिमा उदंड सांगती ॥ ७ ॥

दाढ्या डोया बोडाव्या । हातीं खापऱ्या घ्याव्या ।
उदंड बोंबा माराव्या । पूर्वज पावती पदव्या ॥ ८ ॥

ज्ञानेंविणें तो पशु । जेथें तेथें विश्वासु ।
केला वयाचा नाशु । ठाईं न पडे जगदीशु ॥ ९ ॥

लोक ऐसा चि वेडा । उगा चि मारितो झडा ।
काय करिल बापुडा । संग सांपडला कुडा ॥ १० ॥

अघोर मंत्राचीं ढालें । येक करिती कवटालें ।
चाटें पोरें बटवालें । पाप उदंड केलें ॥ ११ ॥

येक पूजिती देवतें । जनासी घालिती भूतें ।
येक राखती प्रेतें । तेणें द्रव्य साधतें ॥ १२ ॥

भले अवघें चि सांडा । आधीं देवाला धुंडा ।
आशा ममता उलंडा । ज्ञानें काळाला दंडा ॥ १३ ॥

**देव ध्यानीं भाविजे । ज्ञानें मोक्ष पाविजे ।**
**जन्म सार्थक कीजे । कानकोंडें न कीजे ॥ १४ ॥**

**दास म्हणे उदास । धरा देवाची कास ।**
**भक्तिमार्ग विशेष । तेणें पावे जगदीश ॥ १५ ॥**

या वाणींत कठोरता आहे, तसा च कळवळा हि आहे. श्रीसमर्थांच्या शाळेंत अज्ञानाला किंवा भोळेपणाला थारा नाहीं. साधुत्वाची त्यांची कल्पना वेगळी होती. सर्वव्यापी अंतरात्म्याचे ते उपासक असल्यामुळें, ते संत, साधु, सज्जन कोणाला मानीत हें पुढील, पूर्वार्धांतील १५८ व्या पदावरून चांगलें समजतें.

## ( १७ ) श्रीसमर्थांचे सज्जन

**सकळ अंतर जाणे मीपणें हुंबरों नेणे ।**
**ऐसियावरूनि प्राणें । सांडणें करा ॥ १ ॥**

**सखिये वो आहेती उदंड वेडे ऐसे ते सज्जन थोडे ।**
**तयांची संगती जोडे । परम भाग्यें ॥ ध्रु० ॥**

**साहाती बोलणें उणें । न पुसतां सांगणें ।**
**सम चि देखणें उणें । अधीक नाहीं ॥ २ ॥**

**अभिमान नावडे । धांवती दीनांकडे ।**
**तयांचे जे उकरडे । माहाल त्यांचे ॥ ३ ॥**

**आपपर नाहीं ज्यांसी । पुसती सांगती त्यासी ।**
**आईकतां चि भाविकांसी । पालट होये ॥ ४ ॥**

**रामीरामदास वास पाहातो रात्रीदीस ।**
**ऐसियांचा सौरस देईं राघवा ॥ ५ ॥**

अशांना श्रीसमर्थ सज्जन समजत. पराचें अंतर जाणणारे, सर्वत्र समदृष्टीनें पाहणारे, दीनांचा कैवार घेणारे, त्यांच्या मदतीला धांवून जाणारे, त्यांच्या झोंपड्या राजमहालापेक्षां हि सुखकारक मानणारे, असल्या निरभिमानी सज्जनांच्या शोधांत श्रीसमर्थ असत. सज्जनाविषयींचे श्रीसमर्थांचे हे विचार

पाहिले म्हणजे स्वत: श्रीसमर्थांचें अंतरंग कसें होतें, त्यांना आवड कशाची होती व समाजराजकारणाकडे त्यांच्या मनाचा इतका ओढा कां होता, याची आपणांस बरोबर कल्पना होते. त्यांच्या काळीं हि असले सज्जन दुर्मिळ च होते. ते केव्हां हि दुर्मिळ च असणार. अशा सज्जनांच्या दर्शनाची उत्कंठा श्रीसमर्थांना लागली होती.

**शाहाणे शोधितां नसे। दुष्काळ पडिला असे।**
**तया धुंडितसे। मन माझें रे ॥ ध्रु० गि. ३० ॥**

**आहेती थोर थोर। परि नाहीं चतुर।**
**तेथें निरंतर। मन माझें रे ॥ १ ॥**

**भेदिक शाहाणे जनीं। सगुण समाधानी।**
**धन्य ते जननी। कुळखाणी रे ॥ २ ॥**

**रामी रामदासी मन। जाहालें उदासीन।**
**ऐसे ते सज्जन। पाहावया रे ॥ ३ ॥**

श्रीसमर्थांचे नेहमीचे आवडते शब्द — धूर्त, तार्किक, विचक्षण. त्या ऐवजीं या पदांत चतुर, भेदिक, शाहाणे, हे शब्द योजिलेले दिसतात.

श्रीसमर्थ शोधांत होते, सज्जनांच्या, उतावील झाले होते त्यांना पाहावयास, त्याप्रमाणें त्यांना सज्जनांचें दर्शन घडलें कां नाहीं, आम्हांस ठाऊक झालें नाहीं, पण आम्ही मात्र स्वतःस भाग्यवान् समजतों कीं, या दोन पदांत–त्यांतल्या त्यांत–पहिल्या पदांत आम्हांस श्रीसमर्थहृदय पाहावयास मिळत आहे. श्रीसमर्थहृदय कसें होतें म्हणून आम्हांस कोणी विचारल्यास त्यास आम्ही वरील पहिलें पद व त्यांत हि तिसरें कडवें, आम्हांस गातां येत नाहीं तरी, पुन्हां पुन्हां म्हणून दाखवूं!

आणखी थोडा वेळ तरी आपण या पदपदांतरांत च श्रीसमर्थांना पाहात राहूं.

## ( १८ ) तत्कालीन देशस्थिति

अत्यंत हलाखीची झाली होती. जीवित, वित्त आणि अब्रू यांपैकीं कशाची च शाश्वती उरली नव्हती. लोकांची अन्नान्नदशा झाली होती.

दिल्ली, आग्रा, लाहुर, अजमीर, अहमदाबाद, बऱ्हाणपुर, इत्यादि ठिकाणच्या राजवाड्यांतून संपत्तीचा धूर निघत असला तरी सर्व देशभर दैन्य पसरलें होतें. तें दैन्य पाहून आणि पूर्व वैभवाचें स्मरण होऊन श्रीसमर्थ कष्टी होत. जगावें, कां मरावें, कां अंगाला राख फांसून जावें कोठें तरी निघून, अशी त्यांच्या मनाला उद्विग्नता प्राप्त झाली होती. त्या उद्विग्नतेची कल्पना पुढील तीन पदांवरून चांगली होते.

## ( १ ) उत्तरार्ध ३२९

अन्न व्हावें आपणासी। अन्न व्हावें अस्त्रीयेसी।
अन्न व्हावें लेंकुरांसी।
कष्टी करूनि मेळवावें। कां जोगी होउनि जावें॥ १॥

द्रव्य पाहिजे वस्त्राला। द्रव्य पाहिजे खर्चाला।
द्रव्य पाहिजे लग्नाला।
कष्टी करूनि मेळवावें। कां जोगी होउनि जावें॥ २॥

जें पाहिजे आपणांसी। जें पाहिजे प्रपंचासी।
उदंड लागतें घरासी।
कष्टी करूनि मेळवावें। कां जोगी होउनि जावें॥ ३॥

रामीरामदास म्हणे। पूर्वी होतें श्लाघ्यवाणें।
पाहातां जड जालें जिणें।
कष्टी करून मेळवावें। कां जोगी होउनि जावें॥ ४॥

## ( २ ) गिरिधरलिखित २७५

तुझे जन कैसे गा जिती। दुर्जन गांजिती॥ ध्रु०॥
उपजविले पोट लाविलें। मोठी होते फजिती॥ १॥
नेट धरितां मेट पडिलें। अन्नालागीं झुरती॥ २॥
कलकलाटें कष्टती पोटें। थोर जाल्या विपत्ती॥ ३॥
कष्टती लोक बहुत शोक। मरण दे म्हणती॥ ४॥
कोणा सांगणें लाजिरवाणें। दास म्हणे श्रीपती॥ ५॥

## ( ३ ) उत्तरार्ध २४५

खंडळ मंडळ सर्व भूमंडळ।
लोक पडिले विकळ। तूं कृपाळ ॥ १ ॥
अन्न चि मिळेना चिंता लागली जना।
धांव तूं जगजीवना। रे पावना ॥ २ ॥
ऐसा विषम काळ जाली तळमळ।
लोक पडिले विकळ। तूं कृपाळ ॥ ३ ॥
कोण्ही नाहीं जनासी। सांगावें कोणापाशीं।
जाल्या दुखरासी रे ॥ ४ ॥
दास म्हणे रे जना भजन मानेना।
आतां कोण्ही च पावेना। रे धांवेना ॥ ५ ॥

हीं तिन्हीं पदें वाचून, त्यांतल्या त्यांत, तिसऱ्या पदांतील ‘ कोण्ही नाहीं जनासी। सांगावें कोणापाशीं।’ हीं चरणें पाहून माझ्या मनांत असें येतें, अजून श्रीछत्रपति शिवराय यांचा उदय झाला नसावा. अति विपन्न दशा आली होती आणि तींतून सोडविणारा कोणी दिसत नव्हता. श्रीसमर्थांच्या म्हणण्याला प्रत्यंतराची आवश्यकता मी कधीं मानली नाहीं. तथापि श्रीसमर्थांच्या अवतारकार्याची उपपत्ति लावतांना, पहिल्या खंडांत, तत्कालीन प्रवाश्यांनीं आणि इतिहासकारांनीं केलेलीं जीं देशस्थितीचीं वर्णनें दिलीं आहेत, त्यांच्यापुढें श्रीसमर्थांचीं अस्मानीसुल्तानी प्रकरणें हि मोघम वाटतात, इतकीं अंगावर शहारे आणणारीं तीं वर्णनें आहेत. अस्मानीसुल्तानी प्रकरणांपैकीं एक प्रकरण पदपदांतरांत आलें आहे, त्यांतील कांहीं कडवीं या ठिकाणीं अवश्य सादर केलीं पाहिजेत. असा काळ एकवार या देशानें आणि आपल्या पूर्वजांनीं पाहिला !

## गिरिधरलिखित पद ६ वें

जन बुडाले बुडाले पोटेंविण गेले।
बहुत कष्टले कष्टले कितियेक मेले।
विसा लोकांत लोकांत येक चि राहिले।
तेणें उद्दंड उद्दंड दुःख चि साहिले ॥ १ ॥

कांहीं मिळेना मिळेना मिळेना खायाला ।
ठाव नाहिं रे नाहिं रे नाहिं रे जायाला ।
हाउस कैंचि रे कैंचि रे कैंचि रे गायाला ।
कोठें जावें रे जावें रे जावें मागायाला ॥ ३ ॥

धान्य माहाग माहाग तैसें हि मिळेना ।
कैसें होईल होईल होईल कळेना ।
काय होणार होणार होणार टळेना ।
पुण्य गेलें रे गेलें रे कांहीं च फळेना ॥ ४ ॥

उदंड चाकरी चाकरी मिळेना भाकरी ।
लोक निलंड निलंड काढूनि नेती पोरी ।
न्याय बुडाला बुडाला जाहाली सिरजोरी ।
पैक्या कारणें कारणें होते मारामारी ॥ ५ ॥

येक पळाले पळाले दूरी देशा गेले ।
बहुत कष्टले कष्टले तेथें नागवले ।
फिरोनि आले रे आले रे घरिचे लोक मेले ।
कोठें उपाय दिसेना कसावीस जाले ॥ ६ ॥

कोणी वांचला वांचला मध्यें चि मारिला ।
येतो येकाकी येकाकी अकस्मात घाला ॥ ७ ॥

नदी भरतां भरतां घालुनिया घेती ।
विख घेउनि घेउनि उदंड मरती ।
अग्नि लाउनि लाउनि जळोनिया जाती ।
मोठी फजिती फजिती सांगावी ती किती ॥ ९ ॥

दास म्हणे रे भगवंता किति पाहसी सत्त्व ।
काय वांचुनि वांचुनि नुपरतें जीवित्व ।
किती धरावें धरावें धरावें ममत्व ।
जालीं शरीरें शरीरें शरीरें निसत्त्व ॥ १२ ॥

## ( १९ ) विचित्र प्रसंग

अशा त्या संकटकाळांत आणि एरव्हीं हि, विशेषत: उत्तरेकडे संचार करीत असतां श्रीसमर्थांवर काय काय प्रसंग ओढवले असतील, याची कल्पना च करावी. करुणाष्टकाच्या ११६ व्या अष्टकांत, आपण

**न जावें चि तेथें चि लागेल जावें।**
**न खावें चि जें तें चि लागेल खावें।**
**वदावें चि ना तें चि लागे वदावें।**
**स्वभावें चि निर्माण केलें चि देवें ॥**

हा श्लोक पाहिला, तर पूर्वार्धांतील ८४ व्या पदांत

**खांव नये तें चि खावें। जांव नये तेथें जावें।**
**मागों नये त्या मागावें। समविषमकाळीं ॥**

असा उल्लेख आहे. या दोन ठिकाणच्या सारख्या उल्लेखांवरून असले विचित्र प्रसंग श्रीसमर्थांवर अनेक आले असावेत व ध्येयावर दृष्टि ठेवून ते सर्व बरे वाईट प्रसंग त्यांनीं सहन केले असावेत.

## ( २० ) क्षेत्रांचे उल्लेख

दोन तीन पदांत कांहीं क्षेत्रांचीं नांवें आलीं आहेत. अर्थात् त्या सर्व क्षेत्रस्थानांना श्रीसमर्थांनीं भेट दिली असली पाहिजे. व्यंकटेशाची आरती आहे ती तिरुपतीच्या बालाजीची आहे. उत्तरार्धांतील २५० व्या पदांत श्रीरंग वर्णिला आहे. ३२७ व्या पदांत अनेक क्षेत्रें आलीं आहेत. तें पद :

**सकळ तीर्थासी आधार। तो विचार सारासार ॥ ध्रु० ॥**
**अयोध्या मथुरा माया काशी कांती द्वारावती ॥ १ ॥**
**तुळजापुर पंढरपुर। नर्सीपुर कोल्हापुर ॥ २ ॥**
**नागनाथ वैजनाथ। जगन्नाथ त्रिमलनाथ ॥ ३ ॥**
**मोरेश्वर भुलेश्वर। औंढ संभूचें शिखर ॥ ४ ॥**
**नासीक त्रिंबक भीमाशंकर। माभळेश्वर हरेश्वर ॥ ५ ॥**
**पाहिलें पैंबर जेजुरी। सोनारी ते जोगेश्वरी ॥ ६ ॥**

**रंगनाथ रामेश्वर । नाना स्थळींचे ईश्वर ॥ ७ ॥**
**परमेश्वरी परमेश्वर । भूमंडळीं हरिहर ॥ ८ ॥**
**उत्तरमानस दक्षिणमानस । करितां होती कासावीस ॥ ९ ॥**
**रामीरामदास म्हणे । अधीक महिमा कोटीगुणें ॥ १० ॥**

## ( २१ ) श्रीसमर्थांनीं पुरश्चरण कशाचें केलें ?

श्रीसमर्थांनीं पुरश्चरण कशाचें केलें, गायत्री मंत्राचें कां त्रयोदशाक्षरी मंत्राचें, असा प्रश्न आहे. मला वाटतें त्यांनीं पुरश्चरण केलें असावें गायत्री मंत्राचें व त्रयोदशाक्षरी मंत्र एरव्हीं अखंड जपला असावा. या माझ्या वाटण्याला एका पदांत, दूरचा कां होईना, पण किंचित् आधार मिळतो.

**वंश रघुनाथजीचा । प्रगट प्रताप जयाचा ॥ ध्रु० गि. ११० ॥**
**पुण्यपरायण धार्मिक राजे । काय वदावे वाचा ॥ १ ॥**
**सत्त्वधीर माहावीर बळाचे । बोघ चि थोर नीतीचा ॥ २ ॥**
**दास म्हणे मज ध्यास तयाचा । खडतर सूर्यतपाचा ॥ ३ ॥**

याप्रमाणें श्रीसमर्थांनीं खडतर तप केलें !

## ( २२ ) विट्ठल राम झाले !

अशी श्रीसमर्थचरित्रांत कथा आहे. तिला पदपदांतरांत हि किंचित् आधार सांपडतो. पूर्वार्धांतील पद ८९ वें, त्यांत श्रीरामभक्त आणि श्रीकृष्णभक्त यांचा जो संवाद आहे, त्याचा शेवट करतांना श्रीसमर्थ म्हणतात :

**तुम्ही आम्ही रामदास येक चि रे ।**
**देव येक चि हा नाना वेश धरी रे गोवळा ।**
**लटिकें म्हणसी तरी तुझा देवो माझा होउनी ।**
**मज हृदंई धरी रे गोवळा ॥ पू ८९ ॥**

## ( २३ ) श्रीसमर्थांची आवड

अयोध्या आणि चाफळ या दोन्ही ठिकाणीं वानर फार आहेत. त्यांच्याकडे कौतुकानें पाहात राहण्याची श्रीसमर्थांना फार आवड असे. याचें

कारण काय, तें त्यांनीं च सांगितलें आहे, तें एक कारण तर खरें च, पण शिवाय मला असें भासतें कीं, सृष्टींत सर्वत्र जी परमेश्वरी लीला चालू आहे, तिजकडे श्रीसमर्थ कौतुकानें पाहात आणि चिंतन करीत. ज्या पदाकडे पाहून मी हें लिहीत आहें, तें पद च याला प्रमाण होय. तें पद म्हणजे स्वभावोक्ति अलंकाराचें उत्कृष्ट उदाहरण होय.

**हुलें कपाळ ज्यांचें घुलें पाहाणें त्यांचें ।**
**फुटाणें आणि चण्याचें । आरत बहु ॥ धु० पू० १२६ ॥**

**वांकुल्या दाविती कुंसी कांडोळिती ।**
**उड्डाणें घेतां लोंबती । लांगुळें लांबें ॥ १ ॥**

**मउ किरकोळें बोटें । लांबे नखें तिखटें ।**
**खोउनी फोडिती पोटें । निशाचरांचीं ॥ २ ॥**

**संकोचित बैसणें पाला वरपोनी खाणें ।**
**तांतडी चावितां तेणें । हनुवटी हाले ॥ ३ ॥**

**कुळ हनुमंताचें मोठें किराण त्यांचें ।**
**भुभुकारें जयाचें । कीलकीलाटें ॥ ४ ॥**

**आतां वाटतें जावें त्यांचे सांगाती व्हावें ।**
**डोळे भरूनी पाहावें । सर्वांग त्यांचें ॥ ५ ॥**

**ऐकोनी हांसाल परी नये तयांची सरी ।**
**विचार जयांसी करी । स्वामी माझा ॥ ६ ॥**

**असंख्य मिळाला मेळा रामा भोंवता पाळा ।**
**पालथें या भूगोळा । घालूं शकती ॥ ७ ॥**

**ऐसी करणी त्यांची व्यर्थ जिणीं आमुचीं ।**
**पाला खाउनी रामाची । शुश्रुषा केली ॥ ८ ॥**

**ऐसे ते रामदास सर्वस्वें उदास ।**
**रामीं जयांचा विश्वास बाणोनि गेला ॥ ९ ॥**

किती स्वाभाविक हें वर्णन आहे ! पहिल्या चार कडव्यांतील वर्णन किती सूक्ष्म आहे. पांचव्या कडव्यांत, वानरांच्या संगतीची जी आतुरता प्रकट

झाली आहे, ती किती अपूर्व आहे! त्यांचें त्यांना च वाटलें हि कीं, ही आपली आतुरता पाहून कोणी कदाचित् हंसतील, तर त्या हंसण्याचें निराकरण व्हावें म्हणून आपल्या आतुरतेचें कारण सांगतात कीं, कोण या वानरांचें भाग्य कीं, माझे स्वामी त्यांच्याशीं विचारविनिमय करीत! रामावर विश्वास टाकून निष्काम बुद्धीनें त्याची सेवा करणारे वानर कोणीकडे आणि कोणीकडे आपण, असें श्रीसमर्थांनीं म्हणावें, यांत श्रीसमर्थहृदयांतील प्रेमभाव हृदय खोलून बाहेर पडत आहे!

## ( २४ ) श्रीसमर्थांची निस्पृहता

बारा वर्षें पुरश्चरण आणि बारा वर्षें तीर्थयात्रा मिळून चोवीस वर्षें परमेश्वरप्राप्तीसाठीं खर्चीं घालून आणि परमेश्वर आपला कैवारी करून घेऊन मग छत्तीस वर्षें श्रीसमर्थांनीं राष्ट्राचा व्याप केला : सारा देश पायानें तुडविला, ठिकठिकाणीं मठ स्थापून हजारों शिष्य सर्वत्र पसरविले, क्षणभर विश्रांति घेतली नाहीं, अत्यन्त कष्ट केले! आणि इतकें सारें करून स्वतः पुन्हां निस्पृह राहिले. तप, व्याप आणि त्याग, अशा नरजन्मसफलतेच्या तीन पायऱ्या श्रीसमर्थांच्या चरित्रानें राष्ट्राला शिकविल्या आहेत. कित्येक जण, मनांत किंतु ठेवून किंवा मनांतल्या मनांत आपल्या मनाजोगतें उत्तर देऊन हि बाहेर असा एक प्रश्न विचारीत असतात कीं, श्रीसमर्थ पूर्ण निस्पृह होते तर त्यांनीं एवढा व्याप केला च कां? ते च तुकाराममहाराज पाहा, त्यांच्यापुढें श्रीशिवरायानें ठेवलेलें ताट त्यांनीं झिडकारिलें च कीं नाहीं? नाहीं कोण म्हणेल? तुकाराममहाराजांची योग्यता कोण कमी लेखील? असा कोण पतित असूं शकेल कीं, जो त्यांच्या चरणीं नम्र होणार नाहीं? शंकिताच्या प्रश्नाचें उत्तर इतकें च कीं, उभयतांच्या अवताराचीं कार्यें भिन्न भिन्न होतीं. तीन पायऱ्यांपैकीं दुसऱ्या पायरीकडे तुकाराममहाराजांनीं पाहिलें च नाहीं आणि दुसऱ्या पायरीवर उभे राहून छत्तीस वर्षें राष्ट्राला आत्मकल्याणाचा मार्ग दाखवून, सर्व सत्पुरुषांच्या हक्काची जी तिसरी पायरी ती हि श्रीसमर्थांनीं सोडली नाहीं! ते रामाला म्हणतात, रामा, दोन तपें देह झिजवून आपले चरण जोडले, पुढें तीन तपें आपल्या आज्ञेवरून व राष्ट्राचें दैन्य मला पाहवलें नाहीं

म्हणून राष्ट्राच्या कल्याणाकरितां उदंड व्याप केला, संप्रदाय वाढविला, समुदाय मिळविला, त्यायोगें सर्वत्र प्रतिष्ठा झाली, लोकमान्यता पावलों, सर्व कांहीं झालें, पण देवा, मला स्वतःला यांपैकीं कशाची हि जरूरी नाहीं, हा सारा व्याप आपला आपण संभाळा आणि माझी आपली मूळची निस्पृहता माझी मला परत द्या, इतकें च आपल्या चरणापाशीं माझें मागणें आहे.

**माझी निस्पृहता गेली तुझ्या पाईं। ते माझी मज देईं देवराया ॥ गि १५०/१ ॥**
**नलगे संप्रदाव मज नलगे समुदाव। माझा अंतर्भाव उच्चाटला ॥ २ ॥**
**नलगे प्रतिष्ठा नलगे गौरव। नलगे हावभाव मान्यतेचा ॥ ३ ॥**
**रामदास म्हणे दंभें शब्दज्ञानें। वाया अभिमान कासयासी ॥ ४ ॥**

## (२५) कृतज्ञतेचे उद्गार

उत्तरार्धांतील ८२ वें पद म्हणजे, जणूं वयाच्या ७२ व्या वर्षीं श्रीसमर्थांनीं आपल्या एकंदर आयुष्याचें थोडक्यांत केलेलें सिंहावलोकन च होय. तें पद त्यांनीं रामाला उद्देशून केलें आहे. त्यांत अर्थात् त्यांच्या हृदयांतील कृतज्ञताबुद्धि प्रकट झाली आहे.

**जन्मदुःख सांगतां नये। सांगों मी काये।**
**दुरी करोनी अपाये। केला उपाये ॥ १ ॥**
**शरण तुज रघुवीरा गुणगंभीरा।**
**धन्य रे दातारा। कृपाळु खरा ॥ २ ॥**
**बाळपणापासुनी वेडें। तुज सांकडें।**
**सांगावें कवणापुढें। जालें येवढें ॥ ३ ॥**
**जिवींचें मनींचें पुर्विलें। गोमटें केलें।**
**सर्व साहोनियां नेलें। नाहीं पाहिलें ॥ ४ ॥**
**देवा तूं त्रैलोक्यनाथ। तूं रे अनाथ।**
**मज करूनि सनाथ। केलें समर्थ ॥ ५ ॥**
**दास म्हणे तुझ्या अन्नाचा। वाढलों साचा।**
**मज हा संसार कैंचा। सर्व देवाचा ॥ ६ ॥**

श्रीसमर्थ रामाला म्हणत आहेत, रामा सारा जन्म आठवतो, सारीं दुःखें आठवतात, सांगतां येत नाहींत, काय सांगूं, सर्व अपायकारक

प्रसंगांचें निवारण करून आपण माझें कल्याण केलें, आपले उपकार किती आठवूं, आपण कृपा केली, मी लहानपणापासून वेडा होतों, पण तुम्ही अंगिकार करून मजकडून इतक्या गोष्टी घडविल्या, त्या कोणाला सांगूं, जें जें मी मनांत आणलें तें तें आपण पुरविलें, माझें कल्याण केलें, माझे गुणदोष पाहिले नाहींत, अपराध सहन केलेत, आपण त्रैलोक्यनाथ आहां, मी अनाथ असतां मजला सनाथ करून समर्थ केलेंत,

**समर्थानें समर्थ करावें। तरी च समर्थ म्हणवावें।**
**त्रैलोक्यास पडिलें ठावें। सामर्थ्य ज्याचें॥**

ही माझी प्रार्थना आपण ऐकली, कृतार्थ झालों, आपले उपकार कसे फेडूं, मी सर्वस्वीं आपला आहें, आपल्या अन्नावर वाढलों आहें, हा जो सारा पसारा माझा म्हणून दिसतो, तो माझा नसून आपला आहे!

## तात्पर्य

मला या प्रत्येक पदांत श्रीसमर्थहृदय च प्रकट होत होतें. सातआठशें पदांतून मी अवघीं पांचपंचवीस निवडलीं व तीं पंचवीस विभागांत वाचकांस सादर केलीं. मला विश्वास आहे कीं बाकीचीं सारीं पदें या पंचवीस विभागांत बसवितां येतील! ही माझी निवड सर्वांनीं मानावी, असें माझें थोडें च म्हणणें आहे! प्रत्येकानें आपली निवड करावी. फार काय सांगूं, या खेपेस हीं पदपदांतरें वाचीत असतां जीं पांच पंचवीस माझ्या डोळ्यांत भरलीं, तीं च उद्यां वाचावयास बसलों असतां भरतील, दुसरीं भरणार नाहींत, असें मी हि म्हणूं शकत नाहीं. कारण या सर्व च पदांत मला श्रीसमर्थहृदयांतील तरंग उमटलेले दिसत आहेत! तसे ते वाचकांस हि दिसतील!

या पदांची गोडी काय सांगावी! ज्याला ईश्वरानें गाण्याचें अंग दिलें असेल, अशा एकाद्या गायनकलेंतील तज्ज्ञानें त्या ईश्वरदत्त गुणाचा दुसरीकडे उपयोग न करतां, हीं पदें गाण्याकडे केला व आपल्या मधुर आणि खड्या आवाजांत हीं पदें गात महाराष्ट्रांतील गांवोगांवीं त्यानें संचार केला, तर त्यास जनतेचीं मनें या पदांतील विचारांकडे आकर्षून घेऊन महाराष्ट्राची आणि श्रीसमर्थांची अपूर्व सेवा केल्याचें पुण्य लाभेल!

---

# अवांतर आणि प्रासंगिक प्रकरणें

हीं खरोखर च अनंत आहेत. तीं सत्कार्योत्तेजक सभेकडून अजून प्रकाशित झालेलीं नाहींत व त्यांपैकीं जीं थोडीं इतरांकडून प्रकाशित झालेलीं आहेत, त्यांचें प्रकाशन समाधानकारक नाहीं. या सर्व प्रकरणांच्या शुद्ध आणि संपूर्ण प्रकाशनाची वेळ केव्हां येणार आहे, सांगतां येत नाहीं. त्यासाठीं पुन्हां एकदां श्री वाग्देवतामंदिरांतील बहुतेक बाडें धांडोळिलीं पाहिजेत.

**अखंड सावधान**, अल्पस्वल्प संसारधर्म, अस्मानीसुल्तानी, अक्षरपदसंज्ञा, आरत्या, आलेख जागो, ईश्वरविवाह, ऐका इटाचा प्रसंग, ऐका प्रपंचविचार, कारखाना, कालिका माता, काशी कांती कोल्हापुर, कुळकर्णकथा, कृतनिर्वाह, कृपाळुपणाची मूस, कोणाचा भरंवसा, गजेंद्रमोक्ष, गुरुगीता, चतुर्थयोग, जनकाच्या ओव्या, जनचिंता, जनस्थानगोदातटीं, **जळ स्थळ काष्ठ पाषाण**, डफगाणीं, तत्त्वपद्संक्षेप, तत्त्वबोध, तीर्थावळी, दिवटा, देहात्मयोग, नमो मंगलमूर्ती, नाममहिमा, निपट कपट नाहीं, **निश्चयाचा महामेरु, परंतु येकवचनी देव येक**, पंचपदी, पंचाध्यायी म्हणजे च दासगीता, पंचाननाचा षडाननु, पंचीकरण, परचक्रनिरूपण, पांगुळ, पाहाटगाणीं, प्रसंग निघाला स्वभावें, स्फुट समास, बुद्धिवाद, भयनाशनी, भवानीस्तुति, भीमरूपी, भूपाळ्या, भोंवता डोंगराचा फेर, महंतलीला, महंतीचें सुख, माभळभट, मारुतीचा जन्मकाळ, मारुतीस्तोत्र, मुसलमानी श्लोकाष्टकें, मूळमाया षड्गुणेश्वरु, यथायोग्य घालावें वय, यादी इमारती कारणें, यात्रा चाफळची, येका शब्दें, राजकारण, राजधर्म, राजनीतिशिकवण, रामचंद्र बैसले सिंहासनीं, रामगीता, रामदास फोडी हांका, राम दासाचा सारथी, रामवरदायिनी, लघु सुंदरकांड, लंका घेतली हो, लोक काय बोलत, वासिष्ठसार, विदेशीं येकला आहे, विवेक जालिया देवाचा योग, शिवराव देवराव, शिवस्वरोदय, षड्रिपुनामयोग, सकळ गुणांचा निधी, सकळ तीर्थांची फलश्रुति, सकळ तीर्थांचें माहेर, सकळ तीर्थांचें सार, संतनामावळी, **संसारसांकडीसाठीं**, सरवदा,

सुचित करूनि अंतःकरण, सुंदर रामाबाई, सुरत खंबायत लाहुर, सूर्यवंशावळी, **स्वप्नसाक्षात्कार**, स्वरोदय, हनुमंतस्तोत्र, हनुमंताचीं पंचरत्नें, हनुमंतानें ख्याती केली, हनुमंता रामदूता, क्षात्रधर्म, ज्ञानबोध, इत्यादि अनेक लहान मोठीं प्रकरणें, शेंकडों अभंग, पदें वगैरे, अजून प्रकाशित व्हावयाचीं आहेत. तीं प्रकाशित झाल्यावर च त्यांच्या विषयीं साकल्यानें बोलतां येईल व त्यांत आपणांस श्रीसमर्थांना पाहतां येईल. तथापि तोंपर्यंत थांबलें च पाहिजे, असें मात्र नव्हे.

माझा नाइलाज आहे, पण मला असें वाटूं लागलें आहे कीं, श्रीसमर्थांच्या मुखांतून निघणाऱ्या प्रत्येक शब्दांत, त्यांचें अंतःकरण आहे आणि प्रत्येक वाक्यांत त्यांचें चरित्र आहे. कोणतें हि प्रकरण घेतलें तरी त्यांच्या हृदयाची साक्ष पटल्यावांचून राहत नाहीं. आम्हां प्रपंची जनांना अगदीं सामान्य उपदेश करण्याचा प्रसंग असला, तरी त्यांत आमच्या कल्याणाविषयीं त्यांना वाटणारा कळवळा प्रत्ययास येतो च येतो. सामान्य विषय असला तरी त्याचें पर्यवसान एकाद्या महत्तत्त्वाच्या प्रतिपादनांत करण्याची श्रीसमर्थांची हातोटी प्रसिद्ध आहे. मनांत येतें कीं, या अवांतर आणि प्रासंगिक कवितेंतील प्रथम एकादें असलें सामान्य प्रकरण देऊन मग त्यांचा स्वप्नसाक्षात्कार पाहावा, महंतांना, श्रीशिवराजाला, श्रीशंभुराजाला त्यांनीं केलेला उपदेश ऐकावा, श्रीशिवराजाविषयीं त्यांच्या भावना काय होत्या त्यांचा विचार करावा आणि नंतर **श्रीसमर्थहृदय-मंदिरावर कळसाप्रमाणें शोभणारें** तें एकमेव गद्य पत्र हातीं घ्यावें.

( १ ) सामान्य प्रकरण म्हणून जें मनांत आणलें आहे, तें इतकें सामान्य आहे कीं, त्याचा अनुभव प्रत्येकाला आलेला असतो. संसारांत मनुष्याला मोठी भीति स्वतःच्या मरणाची वाटत असते व मोठें दुःख एकाद्या जिवलगाच्या मरणाचें होत असतें. जी गोष्ट अपरिहार्य आहे, तिची भीति अगर दुःख वास्तविक वाटूं नये. पण जगाकडे पाहावें तर हा सामान्य नियम दिसतो कीं, या भीतींतून आणि दुःखांतून सहसा कोणी सुटलेला नसतो. असा हा सर्वसामान्य नियम पाहून श्रीसमर्थ जो उपदेश करीत आहेत तो किती अमोल आहे, याचा विचार प्रत्येकानें करावा. बाडांक ४८३ तील हें एक अप्रकाशित प्रकरण आहे.

संसारसांकडीसाठीं । देवाला भार घालणें ।
होणार होइना कां रे । जाणार जाइना सुखें ॥ १ ॥

ऐसे चि जन्म होताती । आले गेले पुन्हःपुन्हा ।
आपुलें काय आहे रे । पाहे रे सावधा बरें ॥ २ ॥

कर्मरेखा सुटेना कीं । येकाकी होतसे कसें ।
नाहीं कीं आपुले हातीं । कांहीं केल्या कळेचिना ॥ ३ ॥

संसारजाति हे ऐसी । तडातोडी च होतसे ।
म्हणोनी जन्म हा खोटा । मायाजाळें भ्रमों नये ॥ ४ ॥

स्वप्नीचें देखिलें गेलें । त्यासाठीं दुःख कायसें ।
इच्छा हे सर्व देवाची । करील तें सुखें करूं ॥ ५ ॥

मृत्याभेणें पळों जातां । कोण्ही हि रक्षिता नसे ।
मृत्यानें मारिले सर्वै । मृत्य कोण्हा सुटेचिना ॥ १० ॥

येतां तें येकलें येतें । जातां तें येकलें दिसे ।
मध्यें च लागली माया । तें हि तुटोनि जातसे ॥ १६ ॥

विचार पाहिल्याविण । हांसती खेळती जनीं ।
संसारसोहळा मोठा । झांकाताका च होतसे ॥ १७ ॥

दुःख ते सोसिती सर्वै । साभिमानें हळुहळु ।
लोकीक लागला मोठा । लोकलाज सुटेचिना ॥ २० ॥

सेवटीं लाज हि जाते । दैन्यवाणें मढें पडे ।
झांकिती येकमेकांचें । मायाजाळें रडोनियां ॥ २१ ॥

तोडितां तुटते माया । सत्संग धरणें बरा ॥ २३ ॥

अनन्य होय देवासी । देव भक्त चि येकला ।
आत्मनिवेदनी भक्ति । अनन्य भक्त तो बरा ॥ २५ ॥

तात्पर्य करावें दास्य देवाचें । तेणें विश्रांति होतसे ।
देव तो आदिअंतीं रे । सांभाळ करितो सदा ॥ २६ ॥

( २ ) श्रीसमर्थांच्या स्वप्नसाक्षात्काराचे श्लोक वाचकांस [illegible] आहेत.
हें प्रकरण हि नवीन आणि अपूर्व आहे. कोणत्या हि श्रीसमर्थांच्या ग्रंथांत

हा स्वप्नसाक्षात्काराचा प्रसंग वर्णिलेला नाहीं. श्रीसमर्थांनीं स्वतः च दहा श्लोकांत तो सांगितला आहे.

**उदासीन स्वामी न व्हावें दयाळा ।**
**स्नेहाळु मनांतील साक्षी कृपाळा ।**
**मला आजि वोसंडिता दुःख वाटे ।**
**अवस्ता बहू वाटतां कंठ दाटे ।**

याप्रमाणें पहिल्या सात श्लोकांत श्रीरामाची करुणा भाकली आहे. आठव्यांत हि करुणा च भाकितात :

**दयाळा दया शीघ्र आधीं करावी ।**
**करुणार्णवा बूडतां धांव घ्यावी ।**
**बहूसाल निर्बूजलों मोहजाळें ।**
**त्वरें धांवणी सीघ्र कीजे कृपाळें ॥ ८ ॥**

श्रीरामाला दया आली !

**अनाथा दिनाची समर्थासि चिंता ।**
**त्वरें वोळला राम आनंददाता ।**
**अकस्मात स्वप्नीं समाधान केलें ।**
**समर्थें दिनालागिं आनंदवीलें ॥ ९ ॥**

याप्रमाणें श्रीसमर्थ प्रत्ययानें सांगत आहेत !

**दिनाचा सदा सर्वदा भार वाही ।**
**न पाहे मनीं अल्प अन्याय कांहीं ।**
**क्षमा सर्व केलें मला येश दिल्हें ।**
**म्हणे दास हें प्रत्यया सद्य आलें ॥ १० ॥**

( ३ ) जळ थळ काष्ठ पाषाण । या चरणानें आरंभिलेल्या प्रकरणांत महंतांना कांहीं महत्त्वाच्या सूचना आहेत. ३८४ बाडांकांत तें प्रकरण आहे. ज्याला महंत व्हावयाचें असेल त्यानें कोठें राहावें, कसें असावें, काय करावें वगैरे सूचना महत्त्वाच्या आहेत च, पण शेवटची अति महत्त्वाची सूचना अशी आहे कीं, कोणी हि अर्धवट स्थितींत आपला साधनमार्ग सोडून जगापुढें येऊं नये. स्वतः पूर्ण व्हावें, कृतार्थ व्हावें,

सिद्ध व्हावें आणि मग जगांत प्रकट व्हावें, म्हणजे लोकांचें लक्ष आपल्याकडे, आपल्या कृतीकडे आणि सांगण्याकडे आपोआप श्रद्धापूर्वक लागतें. महंती सुखाची नसे, कष्टाची असे, पण कल्याणकारक असे. श्रीसमर्थ जसें स्वतः वागले, तसें च त्यांनीं इतरांस सांगितलें. या सहा ओव्यांत कोणास हि श्रीसमर्थांचें दर्शन घडेल.

**दरे दर्कुटें पर्वत । वाहाळ अडचणी संकोचित ।**
**तेथें राहातां उचीत । महंतासी ॥ ६ ॥**

**आधीं मठ चि करावा । मग भीम प्रतिष्ठावा ।**
**वेश जपोनी योजावा । विक्राळरूपी ॥ ७ ॥**

**विक्राळ आणि सुंदर । कर्कश आणि मनोहर ।**
**सुप्रसन्न आणि उदार । दीर्घरूपी ॥ ८ ॥**

**नेमस्तपणें असावें । जप ध्यान करीत जावें ।**
**सिद्ध होय तों न भेटावें । कोणीयेकासी ॥ ९ ॥**

**येकायेकी अकस्मात । प्रगट करावा अद्भुत ।**
**तेणें चमत्कारे चीत्त । बहुत जनाचें ॥ १० ॥**

**मर्यादा धरावी धरवावी । पूजा करावी करवावी ।**
**दास म्हणे येणें पदवी । पाविजेते ॥ ११ ॥**

( ४ ) ईश्वरी संकेतानुसार शालिवाहनाच्या सोळाव्या शतकांत धर्मसंस्थापनेसाठीं जी नरनारायणाची जोडी अवतरली होती, तींत ज्या नरानें नारायणाच्या हृदयांत अढळ स्थान मिळविलें होतें, त्या नराला नारायणाकडून जें पत्र गेल्याचें प्रसिद्ध आहे, तें पत्र पाहिल्यावांचून श्रीसमर्थहृदयग्रन्थ पुरा होऊं शकत नाहीं ! त्या पत्राचें अनुसंधान आणि ऐतिहासिक महत्त्व यांचा विचार पहिल्या खंडांत झाला च आहे. श्रीसमर्थ आणि श्रीशिवराय म्हणजे याज्ञवल्क्य आणि जनक, कृष्ण आणि अर्जुन, किंवा विशेष अनुरूप म्हणजे वसिष्ठ आणि राम यांची जोडी होय. धर्मसंस्थापना हें च या उभय अवतारांचें हृदयस्थ कार्य होतें. युगायुगाचे ठायीं संकटकाळीं ही जोडी अवतार धारण करून येते, असें, हीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे वाटतें. राष्ट्रांतील दुःखित सज्जनांनीं दीर्घ आणि उष्ण श्वास टाकून फक्त पूर्व तयारी करावयाची असते ! श्रीशिवरायाविषयीं श्रीसमर्थहृदयांत

किती प्रेम होतें तें या पत्रानें व्यक्त होत आहे. बाडांक ३५, ८६ वगैरे बाडांत तें पत्र आहे. त्यास लिखित म्हटलें आहे. लिखित म्हणजे पत्र.

**निश्चयाचा महामेरू। बहुत जनासी आधारु।**
**अखंड स्थितीचा निर्धारु। श्रीमंत योग ॥ १ ॥**

**परोपकाराचिया रासी। उदंड घडती जयासी।**
**तयाच्या गुणमहत्वासी। तुळणा कैंची ॥ २ ॥**

**नरपति हयपति गजपति। गडपति भूपति जळपति।**
**पुरंदर आणि आदिशक्ति। पृष्ठीभागीं ॥ ३ ॥**

**यशवंत कीर्तिवंत। सामर्थ्यवंत वरदवंत।**
**पुण्यवंत नीतिवंत। जाणता राजा ॥ ४ ॥**

**आचारसीळ विचारसीळ। दानसीळ धर्मसीळ।**
**सर्वज्ञपणें सुसीळ। सकळां ठाईं ॥ ५ ॥**

**धीर उदार आणि सुंदर। शूर क्रियेसी तत्पर।**
**सावधपणें नृपवर। तुछ केले ॥ ६ ॥**

**तीर्थें क्षेत्रें तें मोडिलीं। ब्राह्मणें स्थानभ्रष्ट जालीं।**
**सकळ पृथ्वी आंदोळली। धर्म गेला ॥ ७ ॥**

**देव धर्म गो ब्राह्मण। करावया संरक्षण।**
**हृदयस्थ जाला नारायण। प्रेरणा केली ॥ ८ ॥**

**शूर पंडित पुराणिक। कवेश्वर वैदिक याज्ञिक।**
**धूर्त तार्किक सभानायक। तुमचा ठाईं ॥ ९ ॥**

**या भूमंडळाचा ठाईं। धर्म रक्षी ऐसा नाहीं।**
**मऱ्हाष्टधर्म राहिला कांहीं। तुम्हांकरितां ॥ १० ॥**

**आणीक हि धर्मकृत्यें चालती। आश्रित होउनी कितेक असती।**
**धन्य धन्य तुमची कीर्ति। विश्वीं विस्तारली ॥ ११ ॥**

**कितेक दुष्ट संव्हारिला। कितेकांसी धाक सुटला।**
**कितेकांसी आश्रयो जाला। शिवकल्याण राजा ॥ १२ ॥**

**तुमचे देसीं वास्तव्य केलें । परंतु वर्तमान नाहीं घेतलें ।**
**रुणानुबंधें विस्मरण जालें । काये नेणों ॥ १३ ॥**

**सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ती । सांगणें काय तयांप्रती ।**
**धर्मस्थापनेची कीर्ति । सांभाळिली पाहिजे ॥ १४ ॥**

**राजकारण उदंड दाटलें । तेणें चीत विभागलें ।**
**प्रसंग नस्तां लिहिलें । क्षमा केलें पाहिजे ॥ १५ ॥**

(५) याहून हि, श्रीशिवरायाविषयीं श्रीसमर्थांना वाटणारें वात्सल्य श्रीशंभुराजांना गेलेल्या पत्रांत जास्त प्रकट झालेलें आहे. तें पत्र ३८४ बाडांकांत असून वर मथळ्याचे जागीं 'पत्र संभुराजा' असें म्हटलेलें आहे. त्या पत्रांत तर, आईबापांनीं आपल्या मुलाच्या नुसत्या बोलण्या-चालण्याचें जसें कौतुक करावें, तसें श्रीसमर्थांनीं श्रीशिवरायाच्या बोलण्या-चालण्याचें कौतुक केलें आहे. कोण हें प्रेम ! हे दोघे हि महापुरुष एक च. शिवरायाच्या हृदयांत श्रीसमर्थ आणि श्रीसमर्थांच्या हृदयांत श्रीशिवराय ! तेव्हां यांपैकीं, महाराष्ट्रीय कोणाला जवळ करणार आणि कोणाला दूर सारणार ? ही जोडी कोण फोडूं शकेल ? तसें करण्याचा जे प्रयत्न करतील ते आत्मनाश करून घेतील. आपणांस श्रीसमर्थहृदय पाहावयाचें आहे ना ? पाहा तें या पत्रांत ! हें हि पत्र इतरत्र प्रकाशित असलें तरी श्रीसमर्थहृदयांत त्यास अवश्य स्थान मिळालें पाहिजे.

**अखंड सावधान असावें । दुश्चित कदापि नसावें ।**
**तजवीजा करीत बैसावें । येकांत स्थळीं ॥ १ ॥**

**कांहीं उग्रस्थिति सांडावी । कांहीं सौम्यता धरावी ।**
**चिंता लागावी परावी । अंतर्यामीं ॥ २ ॥**

**मागील अपराध क्षमावे । कारबारी हातीं धरावे ।**
**सुखी करूनि धाडावे । कामावरी ॥ ३ ॥**

**पाटांतील तुंब निघेना । तरी मग पाणी च चालेना ।**
**तैसें जनाच्या मना । कळलें पाहिजे ॥ ४ ॥**

**जनाचा प्रवाहो चालिला । म्हणिजे कार्यभाग आटोपला ।**
**जन ठाईं ठाईं तुंबला । म्हणिजे खोटें ॥ ५ ॥**

श्रेष्ठीं जें जें मेळविलें । त्यासाठीं भांडत बैसले ।
तरी मग जाणावें फावले । गनीमासी ॥ ६ ॥

ऐसें सहसा करूं नये । दोघां भांडण तिसऱ्या जय ।
धीर धरूनि महत्कार्य । समजोन करावें ॥ ७ ॥

आरंभी च पडिली धास्ती । म्हणिजे कार्यभाग होय नास्ती ।
याकारणें समस्ती । बुधी शोधावी ॥ ८ ॥

राजी राखतां जग । मग कार्याची लगबग ।
ऐसें जाणोनि सांग । समाधानें करावी ॥ ९ ॥

सकळ लोक येक करावे । गनीम लाटून काढावे ।
येणें करितां कीर्ति धांवे । दिगांतरीं ॥ १० ॥

आधीं गाजवावे तडाखे । तरी मग भूमंडळी धाके ।
ऐसें न होतां धके । राज्यासी होती ॥ ११ ॥

समय प्रसंग वोळखावा । राग निपट न संडावा ।
आला तरी कळों नेदावा । जनामध्यें ॥ १२ ॥

राज्यामध्यें सकळ लोक । सलगी देउनी करावे शोक ।
लोकाच्या मनामध्यें धाक । उपजों चि नये ॥ १३ ॥

बहुत लोक मेळवावे । लोक विचारें भरावे ।
कष्ट करूनि घसरावे । म्लेचराजे ॥ १४ ॥

आहे तितुकें जतन करावें । पुढें आणीक मेळवावें ।
मऱ्हाष्टराज्य चि करावें । जिकडे तिकडे ॥ १५ ॥

लोकी हि हीमती धरावी । शर्तीची तरवार करावी ।
चढती वाढती पदवी । पावाल येणें ॥ १६ ॥

शिवराजासी आठवावें । जीवित्व तृणसमान करावें ।
येहलोकपरलोकीं तरावें । कीर्तिरूपें ॥ १७ ॥

शिवराजाचें आठवावें रूप । शिवराजाचा आठवावा साक्षेप ।
शिवराजाचा आठवावा प्रताप । भूमंडळीं ॥ १८ ॥

**शिवराजाचें कैसें बोलणें। शिवराजाचें कैसें चालणें।**
**शिवराजाची सलगी देणें। कैसी आहे ॥ १९॥**
**सकळ सुखाचा त्याग। करूनि साधिजे तो योग।**
**राज्य साधावया लगबग। तैसी करावी ॥ २०॥**
**त्याहून करावें विशेष। तरी च म्हणावें पुरुष।**
**याउपरी आतां विशेष। काय ल्याहावें ॥ २१ ॥**

(६) याहिपेक्षां, श्रीसमर्थ श्रीशिवरायाकडे, श्रीरामावताराच्या च दृष्टीनें पाहात होते कीं काय, न कळे, अशी एका प्रकरणावरून माझी फारा दिवसांपासून कल्पना झाली आहे! ती मी यापूर्वीं अनेकदां अनेक ठिकाणीं प्रवचनांत व क्वचित् लेखनांत हि प्रकट केलेली आहे, पण कोठें हि कोणी अमान्यता दर्शविली नव्हती. कल्पना विचित्र दिसते, पण तशी ती नाहीं. मी तर ही कल्पना आत्मनिवेदनभक्तीचें एक उत्कृष्ट प्रत्यक्ष उदाहरण च समजतों. श्रीसमर्थांना अनुग्रह रामाचा आणि श्रीशिवराय जर रामाचे अवतार तर, राम हे श्रीसमर्थांचे गुरु होते, तसे शिष्य हि होते कीं काय? या प्रश्नाचें उत्तर श्रीसमर्थांच्या च शब्दांत दिलेलें बरें.

**अहं ब्रह्मास्मि माहांवाक्य। येथीचा अर्थ अतर्क्य।**
**तो हि सांगतो ऐक्य। गुरुशिष्य जेथें ॥ ५-६-४४ ॥**

ब्रह्मसाक्षात्कारानंतर गुरु आणि शिष्य एकरूप होतात. राम ते च रामदास आणि रामदास ते च शिवराय. म्हणून राम आणि शिवराय एक च. ही च आत्मनिवेदनभक्ति होय.

**राम तो कोण तो जाणा। दास तो कोण तो कसा।**
**भक्ती निवेदनी कैसी। ऐसें हें जाण साधका ॥ स्फु. प्र. १८/२१ ॥**

श्रीशिवरायाविषयीं श्रीसमर्थांची अशी भावना होती, असें मला पुढील प्रकरणावरून वाटतें. तें प्रकरण अनेक दृष्टींनीं विचार करण्यासारखें आहे. तें ६४, ८६, १०४, १५८, ३८४, इत्यादि अनेक बाडांत आढळतें. त्याला आरंभ ' परंतु ' शब्दापासून च झाला आहे. कांहीं चर्चा निघाली असावी, असें वाटतें, आणि श्रीसमर्थ एकदम म्हणाले असावे, परंतु—

**परंतु येकवचनी देव येक। जेणें मोडिले देव अनेक।**
**सेवाहीन मी सेवक। त्याचा म्हणवी ॥ १ ॥**

समर्थें आंगिकार केला। नाना संकटीं रक्षिला।
त्याचिया अन्नें पिंड वाढविला। जन्मवरी ॥ २ ॥

मारुतीसारिखे सेवक। तेथें मी मानवी रंक।
नवल सामर्थ्याचें कौतुक। काये सांगों ॥ ३ ॥

समर्थ आणि दीनानाथ। वैभवें समर्थाहून समर्थ।
जेणें माझे मनोरथ। पूर्ण केले ॥ ४ ॥

जें जें मनें अभिळाषिलें। तें तें सर्व हि पुरविलें।
मज दीनास वाढविले। मर्यादेवेगळे ॥ ५ ॥

समर्थानें समर्थ करावें। तरी च समर्थ म्हणवावें।
त्रैलोक्यास पडिलें ठावें। सामर्थ्य ज्याचें ॥ ६ ॥

अजिंक्य रजनीचर मातले। देव कारागृहीं घातले।
म्हणोनि वैकुंठीहूनि पातले। देव सोडवावया ॥ ७ ॥

देवमात्र जाजावला। म्हणोनि कैपक्षी पावला।
भुवनकंटक निर्दाळिला। देशमुख शत्रु ॥ ८ ॥

जिहीं त्रैलोक्य जिंकिलें। त्यास मर्कटाहातीं मारविलें।
भुवनत्रय आनंदविलें। दाशरथीनें ॥ ९ ॥

देवाचे बंद सोडविले। देव स्वस्थानीं स्थापिले।
प्राणीमात्र आनंदविले। रामराजें ॥ १० ॥

बिभीषणास दिधली लंका। सुरवराची फिटली शंका।
समर्थें रामदास रंका। नवाजिले ॥ ११ ॥

सुंदर मूर्ति सुंदर गुण। सुंदर कीर्ति सुंदर लक्षण।
सुंदर मठीं देव आपण। वास केला ॥ १२ ॥

गिरीकंदरीं सुंदर वन। सुंदर वाहाती जीवन।
त्यामधें सुंदर भुवन। रघुनाथाचें ॥ १३ ॥

सुंदर पाहोन वास केला। दास संनिध ठेविला।
अवघा प्रांत चि पावन केला। कृपाळुपणें ॥ १४ ॥

बावी पोखरणी झरे। टाकीं विशाळ सुंदरें।
ठाईं ठाईं मनोहरें। स्थळें निर्मिलीं। ॥ १५ ॥

**कडे कपाटें दरे दर्कुटें। पाहों जातां भय चि वाटे।**
**ऐसे स्थळीं वैभव दाटे। देणें रघुनाथाचें॥ १६॥**

**अंतरनिष्ठ अखंडध्यानी। संनिध रामवरदायनी।**
**विश्वमाता त्रैलोक्यजननी। मूळमाया॥ १७॥**

प्रकरणाच्या पहिल्या सहा ओव्यांत, रामानें आपला अंगिकार कसा केला, अनेक संकटांतून कसें सोडविलें, आपण जी जी इच्छा केली ती ती पूर्ण करून जगांत आपलें महत्त्व कसें वाढविलें, इत्यादि स्वत:विषयींच्या च गोष्टी श्रीसमर्थ सांगत आहेत. पुढें बाराव्या ओवीपासून शेवटच्या सतराव्या ओवीपर्यंत सुंदर मठाचें म्हणजे शिवतरच्या घळीचें आणि त्या भागांतील सृष्टिवैभवाचें वर्णन आहे. मग प्रश्न असा, मध्यें च ७ ते ११ ओव्यांत रामायण कोठचें आलें आहे? पहिल्या सहा ओव्या पुन्हा वाचून पाहा आणि पुढच्या च सातव्या ओवींत काय यावें म्हणून अपेक्षा करतां? पहिल्या पांच ओव्यांत श्रीसमर्थ स्वत:विषयीं बोलत आहेत, हें पाहून व "रामा, तुम्ही समर्थ आहांत, पण मला समर्थ कराल तर च तुम्ही खरे समर्थ, मला किती समर्थ कराल? तर इतके समर्थ करा कीं, माझें सामर्थ्य त्रैलोक्यास माहित झालें पाहिजे" हा सहाव्या ओवीचा भावार्थ मनांत येऊन असें वाटूं लागतें कीं, आतां पुढें सातव्या ओवीपासून श्रीसमर्थ आपल्या सामर्थ्याविषयीं कांहीं सांगतील, अशी अपेक्षा करावी तों रामायणकालीन कथाभाग मध्यें च आलेला दिसतो. तो तरी पूर्ण पांच ओव्यांत आला आहे, असें हि नाहीं. अकराव्या ओवीचा अर्धा भाग विभीषणाच्या वांट्याला गेला असून अर्ध्याभागांत

**समर्थें रामदास रंका। नवाजिलें॥**

पुन्हां आहे च. बिभीषणाला लंका दिली आणि श्रीसमर्थांना नवाजिलें, या दोन्ही गोष्टी एका च काळांत घडल्या होत्या काय कीं, त्यांचा उच्चार एकत्र करण्यांत यावा! मग काय, या मधल्या साडेचार ओव्यांत त्रेतायुगांतील राम-कथेचा संबंध आहे, कां श्रीसमर्थांच्या देखत श्रीशिवराय मर्दानी मावळ्यांच्या हातून जें रामायण प्रत्यक्ष घडवीत होते, त्याचा संबंध आहे?

कांहीं असो, इतकें खरें कीं, प्रकरण किंचित गूढ आहे. त्यांत श्रीसमर्थहृदयापासून निघालेले कृतज्ञतेचे उद्गार आहेत!

## स्वामी !



स्वामी ! तुझिया पदद्वयाचा संयोग ।
तेथें समर्पोनि राहो माझें सर्वांग ।
तुझें अनन्य भजन महा योग ।
ऐसी धारणा देईं ॥

श्रीसमर्थांनीं

स्वहस्ताक्षरें लिहिलेलें

एकमेव गद्य पत्र



श्रीरामसमर्थ

उत्तमगुणाळंकृत रघुनाथभक्तिप
रायेण परोपकार राजमान्य राजश्री
रघुनाथभट गोसांवी यांसी स्नेहपू
र्वक सूचना तुमचा निरोप घेउनु
हेलवाकीहून स्वार जालों ते सुखरू
प चाफलास पावलों संकल्पाची
समारादना हि जाली पुढें शरीराचा
उपचार हि हळु हळु होतो तुम
चें मन मजवरी बहुत आंहे ते तुम

चे आवडीच्या गुणे कल्याण हो
ईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें
आपणे ते कर्कष सीतलाईमधें
बहुत चि श्रम पावलों तो माझा
सकळ श्रम घेउनु मज निरोप
दिधला तो उपकार देव जाणे
येविसी चीत चमत्कारलें ते प
त्री किती ह्मणौनु लेहावे माझें अ
रिष्ट तुह्मी घेउन मज उष्ण देशा
सी पाठविले हा उपकार श्रीरघु
नाथजीस जाला मज रघुनाथजी
वेगळें कोण्ही जिवलग नाही
आपण जाला समाचार रघुनाथजी
स विदित केला याउपरी माझे
ठाई तुह्मी आहा रघुनाथकृपे

च्या प्रत्यये तुह्मास आलियावरी
प्रचीतीसीं कलों येईल बहुत का
काये लेहावें वेदमूर्ती दिवाकर
भट गोसांवी तेथे आलियावरी
तुह्मी माझा समाचार घेयासी ये
प्रांतीस आले पाहिजे स्नेह बहु
त असों दीजे हा पत्रार्थ हें इतु
के म्या आवडीच्या कलवळ्याने
लिहिले आहे मने मन साक्ष असेल परं
तु तुह्मास उपचारसा वाटोन रजीस
होल तरी न होणे जैसा दिवाकरभट तै
से तुह्मी हा इत्यर्थ आहे बरें कललें
पाहिजे तुमचा आमचा येकात प्रसं
ग जालियावरी मग ऐसे लिहिता न ये ह्म
णौनि ये संधीमध्ये प्रसग फावला पु

ढें फावेना ह्मणौनि लावे करून लिहि
लें वरकड इतर भाव मनामधे असेल
तरी रघुनाथ साक्ष असे तुह्मी रजीस
न होणे आणि जे आहे ते लिहिलें याम
धे मिथ्या स्तुती नाही तुह्मी सर्वज्ञ
आहा तुमचे जे काही आहे ते सकल मा
झें चि आहे म्या मज माझ्या मनास
येईल तैसे लिहिलें येथे तुमचे काये
गेलें काही चिंता न कीजे तुह्मी आ
मचे चि आहा तुह्मी आह्मी सकल दे
वाचे आहों शरीरभेदावरी न जाणे
अंतरस्थिति पाहिल्या उपरी
कलो येईल



सत्कार्योत्तेजक सभा गुंफीत असलेल्या श्री रामदास आणि रामदासी ग्रन्थमालेंतील नववा भाग – श्रीसंप्रदायाचीं कागदपत्रें – त्यांत हें पत्र प्रथम शके १८३७ च्या श्रीरामनवमीस प्रकाशित झालें. तें पत्र व त्या भागांतील इतर सारीं पत्रें श्रीसमर्थवाग्देव तामंदिरांत पाहावयास मिळतात.

हें पत्र कोणीं आणि केव्हां लिहिलें तें कळण्याला पत्रांत कांहीं च साधन नाहीं व त्या च भागांत प्रकाशित झालेलें लेखांक ५२ चें पत्र उपलब्ध न होतें तर हें पत्र कोणीं आणि केव्हां लिहिलें हें आजपर्यंत हि आपणांस निश्चितपणें कळलें नसतें. पत्रांतील उद्गार श्रीसमर्थांशिवाय दुसरा कोण काढूं शकेल, हें पत्र त्यांचें च असावें, असें आपल्या मनांत किती हि आलें असतें, तरी हें पत्र श्रीसमर्थांचें च, असें निर्विवादपणें आपणांस म्हणतां आलें नसतें व निःशंकपणें तसें कोणीं मानलें नसतें. पण त्या ५२ व्या लेखांकानें आतां हें पत्र कोणीं आणि केव्हां लिहिलें एवढ्या च गोष्टी सिद्ध झाल्या, असें नसून तें पत्र ज्यांनीं लिहिलें त्यांनीं तें दुसऱ्याकडून लिहविलें नसून स्वहस्ताक्षरें लिहिलें, हें हि दिसून आलें आहे. लेखांक ५२ चें पत्र श्रीसमर्थशिष्य विठ्ठल गोसावी यांनीं शके १६०४ च्या सुमारास श्रीसमर्थांचे उपाध्ये दिवाकर गोसावी यांना लिहिलेलें आहे. त्यांत विठ्ठल गोसावी म्हणतात :

"××××× उपरी आनंदसंवछरी श्री समर्थ हेलवाकीचे घळयेस होते च्यातुर्मास तेथे कृमिले सीतलाइ बहुत झाली म्हणून उष्ण देशासी चाफलाकडे आले हेलवाकींचे घळयेस कित्येक कार्ये सीध होणे होते म्हणून वेदमूर्ती रघुनाथभट नवहस्त पंडितराये श्री उपाध्ये व पुराणीक श्री नी त्यांस कृपापूर्वक हे वृती करून पूर्वी च दिली होती त्यासी ते स्थल सीध करावयासी ठेविले आपण चाफलास आले नवसाची समाराधना श्री चे द्वारी केली शूद्राचे भोजन सीगणवाडीस केले दुसरे दिवसी पंडितरायासी कितेक समाधानाची उतरे जैसा दिवाकर गोसावी तैसे च तुम्ही म्हणून गौरवयुक्त स्वहस्ताक्षरे पत्र लिहीले आणी शाहापुरास जावयास अश्वारूढ होऊन स्वार झाले ×××××"

आतां पुनरपि तें पत्र वाचा आणि पाहा कांहीं शंका उरते का, विठ्ठल-गोसावियानें ज्या पत्राचा उल्लेख केला आहे, तें च हें श्रीसमर्थांनीं स्वहस्ताक्षरें

लिहिलेलें पत्र होय ! शंका एक च उरते, हें पत्र श्रीसमर्थांचें आहे, हें मान्य आहे, पण त्यांनीं स्वहस्ताक्षरें लिहिलेलें जें पत्र तें च हें कशावरून, ही त्याची कशावरून नक्कल नसेल ? ही शंका मला आवडते, ती मी हि घेतों. श्रीसमर्थ स्वत: बहुधा लिहीत नसत, अशी आपली कल्पना होती, तेव्हां वाटे कीं, श्रीसमर्थांच्या हातच्या दोन ओळी जरी मिळतील, तरी तें आपलें केवढें भाग्य ! पण आतां कळून आलें कीं, ते स्वत: केव्हां च लिहीत नसत, असें नव्हे, तर महत्त्वाच्या प्रसंगीं किंवा एकाद्याचा गौरव करावयाचा असेल तेव्हां ते स्वत: लिहीत. तेव्हां आतां आशा करावीशी वाटते कीं, अशीं त्यांचीं आणखी हि कित्येक पत्रें उपलब्ध व्हावीं, म्हणजे वरील शंकेचें निवारण होईल ! ब्राह्मणाला किती हि द्या, तो नेहमीं असंतुष्टच राहणार ! दोन ओळींवर संतोष मानणार होता, त्याला बरोबर बावन ओळींचें पत्र दिलें, तों हा आणखी मागतो च आहे. महाराज, आम्ही दुसऱ्या कोणापाशीं हट्ट करावा ! हें पत्र आपल्या च हातचें आहे, ही माझी खात्री झाली आहे, पण महाराष्ट्रांतील चिकित्सक जनतेची खात्री पटविण्यासाठीं अशीं आणखी कांहीं पत्रें मिळवून दिलीं पाहिजेत.

विठ्ठल गोसावी यांचे आम्हांवर उपकार आहेत. त्यांच्या पत्रावरून आम्हांस बोध झाला कीं, आनंदनाम संवत्सराच्या चातुर्मासानंतर म्हणजे बहुधा मार्गशीर्ष-पौषांत हें पत्र श्रीसमर्थांनीं लिहिलें आणि तें स्वहस्ताक्षरें लिहिलें. हा आनंद संवत्सर कोणता ? श्रीसमर्थांच्या आयुष्यांत तो दोनदां आला होता, एकदां १५३६ त, तेव्हां श्रीसमर्थ अवघ्या सहा वर्षांचे होते व दुसऱ्यांदां १५९६ त, तेव्हां ते सहासष्ट वर्षांचे होते. तेव्हां हें पत्र या दुसऱ्या आनंदसंवत्सरांतील होय. आणि तो आपल्या नांवाप्रमाणें खरोखर च महाराष्ट्राच्या आनंदाचा संवत्सर होता. त्या संवत्सराच्या ज्येष्ठ शुद्ध १३ स श्रीछत्रपति श्रीशिवराय यांना रायगडीं राज्याभिषेक झाला.

१५९६ च्या आषाढ शुद्ध ११ पासून कार्तिक शुद्ध ११ पर्यंत श्रीसमर्थ हेळवाकच्या घळींत राहिले होते. तेथें ते कर्कश सीतलाईमध्यें बहुत चि श्रम पावले ! त्या घळींत आम्ही ऐन उन्हाळ्यांत चैत्र वद्य १० स होतों, तरी जर धाबळी पांघरून निजल्यावर हि

थंडी वाजण्याची राहिली नाहीं, तर चातुर्मासांत तेथें किती सीतलाई असेल, तिची कल्पना करवत नाहीं. तेथें कित्येक कार्यें सिद्ध व्हावयाचीं होतीं, तीं कोणतीं हें समजण्यास कल्पनेचा च आश्रय केला पाहिजे, दुसरा मार्ग नाहीं. ही हेळवाकची घळ जरा बाजूला असून अवघड जागीं असल्यामुळें ती फारशी कोणाच्या पाहण्यांत येत नाहीं.

कऱ्हाडाहून चिपळुणास जाणारा, कोयना नदीच्या कांठाकांठानें जो रस्ता आहे, त्या रस्त्यावर पाटणच्या पलीकडे कुंभारली घाटाच्या तोंडाशीं हेळवाक म्हणून लहानसें गांव आहे. हेळवाकपर्यंत कोयना नदी सारखी उत्तरेकडून दक्षिणेकडे येते व हेळवाकपासून ती पूर्ववाहिनी झाली आहे. हेळवाकच्या दक्षिणेस एक दोन लहान डोंगरांच्या पलीकडे कोंढवळें नांवाचें खेडें आहे; तेथून पुढें सज्जनगडापेक्षां हि जरा उंच डोंगर चढून गेल्यावर एक लहानशी धनगरवाडी लागते, तेथून पुढें अरण्य आहे. ह्या अरण्यांत अस्वलांची वस्ति फार आहे व क्वचित् वाघ हि आहेत. तेव्हां त्यांतून जातांना अस्वलांची बहुधा व नशिबीं असल्यास वाघाची भेट होण्याचा फार संभव असल्यामुळें, निःशस्त्र एकट्यादुकट्यानें जाण्याचें अकारण धाडस न करतां कोंढवळ्याचीं कांहीं माणसें बरोबर घेऊन पुढें जाणें इष्ट असतें. मार्गांत सदरहु पशूंची गांठ पडल्यास त्यांचा समाचार घेण्यास, नेहमींच्या सरावामुळें, त्या लोकांना अवघड वाटत नाहीं व आपणांस हि अनायासें घळीचा मार्ग दाखविला जातो. सुमारें अर्धा कोस अरण्यांतून गेल्यावर एका डोंगराच्या दरींत वळतां च ती भव्य पण आल्हाददायक पवित्र घळ एकदम दृष्टीपुढें येते. १५९६ चा सबंध चातुर्मास श्रीसमर्थांनीं तेथें क्रमिला, पण आतां मात्र हिंस्र पशूंवांचून दुसऱ्या कोणाला त्या घळीचा उपयोग राहिला नाहीं. तेव्हांपासून आतांपर्यंत त्या घळीची दुसऱ्या कोणीं पर्वा न केल्यामुळें घळींत हातभर उंच मातीचा थर सांचला आहे.

घळीचें तोंड दक्षिणेस आहे. समोरच्या बाजूनें घळ तीन चार पुरुष उंचीवर असून घळींत जाण्याला मार्ग दोन्ही बाजूंना आहे. घळींतील दोन्ही बाजूंच्या कपारी सोडून घळीची लांबी पूर्वपश्चिम बरोबर ९.८ हात आहे व दक्षिणोत्तर रुंदी कोठें १५ हात तर कोठें ३० हात आहे. मातीचा थर बाजूस सारला तर घळीची उंची चारपांच हात येईल. घळीच्या पुढच्या

बाजूस तीन हात रुंदीची भिंत होती, असें दिसतें. मध्यें भिंती घालून घळींत एकंदर पांच दालनें केलेलीं होतीं. पांच हि दालनांत जीं कांहीं अवशिष्ट चिन्हें दिसत आहेत, त्यावरून मी अशी कल्पना केली आहे कीं, अगदीं मधल्या दालनांत देवतार्चन असावें व त्याच्या डाव्या बाजूचे पहिले दालनांत श्रीसमर्थ व पलीकडच्या दालनांत आल्यागेल्यास शिवाजी राजे राहात असावेत व देवतार्चनाच्या उजव्या बाजूचीं दोन्ही दालनें रघुनाथ, दिवाकर, कल्याणादि शिष्यमंडळीकडे असावींत. श्रीशिवछत्रपतींच्या दालनापुढें जो डोंगराचा भाग आहे, तेथें घोड्यांची पागा होती म्हणून आज हि सांगतात! घळींत बसून समोर पाहिलें म्हणजे चित्ताला प्रसन्न करणारा, मनाला शांतविणारा, सद्गुरुस्वरूप प्रकट करणारा, स्वर्गतुल्य, अति रम्य देखावा दृष्टीस पडतो. तळापासून घळ तीन चार पुरुष उंचीवर आहे म्हणून इतक्यांत च सांगितलें आहे व घळीच्या वर आणखी सुमारें दहा पुरुष उंचीचा सारखा डोंगर आहे. त्या डोंगरावरून बरोबर घळीपुढें सबंध देवतार्चनाच्या दालनाच्या लांबीभर सारखें निर्मळ पाणी पडतें. जणूं स्वर्गांतून गंगेचें च अवतरण होत आहे! त्या पाण्याच्या झोताखालीं उभें राहून वा बसून मनसोक्त स्नान करावें, संध्यावंदनादि कर्में करून श्रीसद्गुरुचरण-प्रतापचिंतनांत खुशाल काळ कंठावा! आपलें आपण च उठूं तेव्हां उठूं, तेथें दुसरा कोणी ऊठ म्हणणार नाहीं, किती सांगावी त्या घळीची रमणीयता, मजजवळ शब्द कोठें आहेत!

अशी ही रम्य घळ, तिची रचना व योजना, हीं पाहिलीं म्हणजे शक १५६६ पासून १५९६ पर्यंतच्या काळांत त्या महापुरुषानें कोणता व्याप केला असला पाहिजे, याची कल्पना होते. या तीस वर्षांच्या अवधींतील श्रीसमर्थांच्या चरित्राचें स्वरूप जाणावयाची ज्याला इच्छा होईल, त्यानें एकवार श्रीसमर्थांच्या या व इतर घळींचें दर्शन घ्यावें. त्या घळी च आज आपल्याशीं बोलतील व श्रीसमर्थहृदय प्रकट करून दाखवितील!

चाफळास गेल्यावर कांहीं दिवसांनीं त्यांनीं प्रस्तुतचें पत्र लिहिलें. तें मोडी लिपींत आहे. मथळ्यावरील 'श्रीरामसमर्थ' वगळून पत्राच्या एकंदर ५२ ओळी आहेत, पैकीं ३६ ओळी कागदाच्या एका बाजूस असून बाकीच्या १६ ओळी पाठीमागच्या बाजूस आहेत. पत्र पाठपोट लिहावयाचें

असलें म्हणजे कागद उलटतांना खालची बाजू वर करण्याच्या पूर्वपद्धती-प्रमाणें मागील मजकूर लिहिलेला आहे. अस्सल पत्राच्या जितक्या ओळी आहेत व प्रत्येक ओळींत जितके शब्द आहेत, तितक्या च ओळींत व तितक्या च शब्दांत तें वर छापलें आहे. २६ व्या ओळीच्या शेवटीं 'का' आला असून पुन्हा पुढच्या ओळीच्या आरंभीं तो पडला आहे, तसा तो मुळांत च आहे. कागद अत्यन्त जीर्ण झाला असून कांहीं ठिकाणीं फाटल्यामुळें थोडीं अक्षरें फाटण्यांत गेलीं आहेत, पण तीं लावण्यास मुळीं च पंचाईत पडत नाहीं. ९ व्या ओळींतील शेवटचा 'म', १० व्या ओळींतील शेवटचीं अक्षरें 'ण हो', २४ व्या ओळींतील 'कृपे' व ४८ व्या ओळींतील 'म्ही आ' हीं अक्षरें फाटण्यांत गेलीं आहेत. नित्यदर्शनासाठीं पत्रांतील शेवटच्या नऊ ओळींची प्रतिमा किंचित् लहान आकारांत येथें देत आहें. पत्राची रुंदी त्या प्रतिमेची आहे त्यापेक्षां किंचित् जास्त आहे व लांबी रुंदीच्या पांचपट आहे. संबंध अस्सल पत्राचें दर्शन श्रीसमर्थवाग्देवता-मंदिरांत कोणास हि घेतां येईल.

असें या पत्राचें बाह्य स्वरूप आहे. आतां आपण त्याच्या अंतःस्वरूपांत शिरून श्रीसमर्थहृदय पाहतां येईल तितकें पाहूं.

असा कोणता प्रसंग होता कीं, श्रीसमर्थांनीं रघुनाथभटांचा एवढा गौरव करावा, तो कळण्याला मार्ग नाहीं. नुसत्या सीतलाईचें च अरिष्ट म्हणावें, तर रघुनाथभटांनीं तरी त्या घळींत जाऊन राहण्याची काय आवश्यकता होती? कांहीं तरी विशेष प्रसंग असल्यावांचून रघुनाथभटांच्या येण्यानें श्रीसमर्थांना इतके उपकार वाटले नसते व त्यांचें चित्त चमत्कारलें नसतें. रघुनाथभट तेथें आल्यावरच श्रीसमर्थांनीं घळ सोडली. नंतर रघुनाथभटांना सोडविण्यास हि दिवाकरभट जाणार च होते. म्हणजे प्रसंग असा दिसतो कीं, कोणा तरी विश्वासु शिष्यानें तेथील जबाबदारी पतकरल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. काय प्रसंग होता तो देव जाणे!

या पत्रांतील प्रत्येक वाक्य श्रीसमर्थांनीं 'आवडीच्या कळवळ्यानें लिहिले' असल्यामुळें, मी म्हणतों, प्रत्येक वाक्याच्या रूपानें श्रीसमर्थ-हृदय च बाहेर पडलें आहे.

" तुमचें मन मजवरी बहुत आहे ते तुमचे आवडीच्या
गुणे कल्याण होईल ऐसें नेमस्त चिन्ह दिसतें "

हा रघुनाथभटांच्या निमित्तानें महाराष्ट्रास श्रीसमर्थांचा आशीर्वाद आहे, असें मी समजतों. या आशीर्वादांत महाराष्ट्राला आपल्या कल्याणाचा मार्ग दिसावा व त्या मार्गानें जाऊन महाराष्ट्रानें आपलें कल्याण साधावें, अशी माझी प्रार्थना आहे.

" माझें अरिष्ट तुम्ही घेउन मज उष्ण देशासी पाठविलें
हा उपकार श्रीरघुनाथजीस जाला "

हे मजवर उपकार झाले, असें आपण म्हटलें असतें. परंतु श्रीसमर्थ म्हणतात, आपलें अरिष्ट रघुनाथभटांनीं आपणांवर घेतलें हे त्यांचे रामावर उपकार झाले ! ते कसे, याचें उत्तर पुढच्या च वाक्यांत आहे

" मज रघुनाथजीवेगळें कोण्ही जिवलग नाही "

रघुनाथ ते च समर्थ आणि समर्थ ते च रघुनाथ ! दोघे एकरूप होते. म्हणून श्रीसमर्थांवर केलेले उपकार रघुनाथजीवर केल्यासारखे च होते.

" आपण जाला समाचार रघुनाथजीस विदित केला "

म्हणजे कोणाला विदित केला ? प्रत्यक्ष रामाला ! !

" हें इतुकें म्या आवडीच्या कळवळ्यानें लिहिलें आहे
मनें मन साक्ष असेल "

दुसरी साक्ष नको च कोणाची ! आपली त्यांना व त्यांची आपल्याला साक्ष पटली पाहिजे. तर च देव आणि भक्त, गुरु आणि शिष्य, असें खरें नातें जोडलें जातें. दोन्हीं हृदयें एक झालीं पाहिजेत !

" वरकड इतर भाव मनामधे असेल तरी रघुनाथ साक्ष
असे "

यांत श्रीसमर्थ आपलें हृदय खुलें करून दाखवीत आहेत, कीं त्यांत दुसरा भाव नाहीं !

आणि शेवटच्या नऊ ओळींत तर बरोबर नऊ च वाक्यें आहेत. तीं वाक्यें नसून श्रीसमर्थहृदयांतील प्रेमसागराला आलेल्या भरतीच्या त्या लाटा उसळल्या आहेत ! त्यांची च प्रतिकृति दर्शनार्थ सोबत जोडली आहे.

# श्रीसमर्थहृदयांतील प्रेमाच्या नऊ लाटा

जे आहे ते लिहिलें यामधें मिथ्या स्तुती नाहीं

तुम्ही सर्वज्ञ आहा

तुमचे जे काही आहे ते सकल माझें चि आहे

म्या मज माझ्या मनास येईल तैसे लिहिलें
येथे तुमचें काये गेलें

काही चिंता न कीजे

तुम्ही आमचे चि आहा

तुम्ही आम्ही सकल देवाचे आहों

शरीरभेदावरी न जाणे

अंतरस्थिति पाहिल्या उपरी कलो येईल

मागाहून येणारी लाट पुढें गेलेल्या लाटेला ग्रासून आपण पुढें होत आहे. मागची लाट पुढच्या लाटेला मागें टाकीत आहे. दुसरीनें पहिलीला, तिसरीनें दुसरीला, या क्रमानें आठव्या लाटेनें सातवीला मागें टाकलें आणि शेवटची नववी लाट – **अंतरस्थिति पाहिल्या उपरी कलो येईल** – पूर्वींच्या सर्व लाटांना मागें टाकून तुमच्या आमच्या अंगावरून जात आहे! तींत आपणांस स्नान घडत आहे! ती लाट, हा च या ग्रन्थाचा विषय आहे. अंतरस्थिति म्हणजे हृदयांतील तरंग, अंतरंगाच्या खुणा. श्रीसमर्थ म्हणत आहेत, "**माझ्या हृदयांत पहा म्हणजे तुम्हांस कळेल.**" हे हृदयस्थ नारायणा, सद्गुरु समर्था, तीं च तळमळ या जीवाला लागून त्यानें येथवर अल्पसा प्रयत्न केला! तो आज शेवटास जात आहे, ही आपली कृपा होय! ग्रन्थाचा शेवट म्हणून प्रकरण लिहिण्यापूर्वी आपल्या च शब्दांत आम्ही आपली प्रार्थना करतों. त्या प्रार्थनेवरून हि श्रीसमर्थ-हृदयांतील तळमळ, तत्कालीन कठीण प्रसंग आणि त्या प्रसंगाला निमित्त कोण, यांचा बोध होणार आहे.

# श्रीसमर्थांचें प्रार्थनागीत

कल्याण करी देवराया । जनहित विवरी ॥ ध्रु० ॥

तळमळ तळमळ होत चि आहे ।
हे जन हातिं धरी ॥ १ ॥

अपराधी जन चुकत चि गेले ।
तुझा तूं चि सांवरी ॥ २ ॥

कठीण त्यावरि कठीण जालें ।
आतां न दिसे उरी ॥ ३ ॥

कोठें जावें काय करावें ।
आरंभिली बोहरी ॥ ४ ॥

दास म्हणे आम्ही केलें पावलों ।
दयेसि नाहीं सरी ॥ ५ ॥

कल्याण करी देवराया । जनहित विवरी ॥ ध्रु० ॥

॥ श्रीरामसमर्थ ॥



# ग्रन्थाचा शेवट

[ श्रीसमर्थहृदयमंदिर – प्रत्यय – वाटाड्या – विशाल हृदय – साक्ष– वाङ्मयमूर्तीची पेटी – श्रीसमर्थांचा शिक्कामोर्तब – हृद्गत – प्रार्थना ]

श्रीसमर्थहृदयाचा ठाव लागावा म्हणून आपण श्रीसमर्थवाङ्मयोदधींत बुड्या मारण्यास सुरुवात केली. त्या वाङ्मयोदधीच्या तळाशीं श्रीसमर्थ-हृदयमंदिर आहे, अशी कल्पना केल्यास, श्रीसमर्थांनीं कृपा केली आणि एक एका प्रकरणांत मंदिराचा एक एक भाग दाखवीत शेवटच्या [९]व्या प्रकरणांत त्या एकमेव गद्य पत्राच्या रूपांत श्रीसमर्थहृदयमंदिराच्या कळसाचें त्यांनीं आपणांस दर्शन घडविलें, असें म्हणतां येईल ! हृदय-मंदिराचें शिखर दृष्टीस पडलें व कवितासमुद्राचें परतीर आपणांस गाठतां आलें, यामुळें मनाला समाधान वाटणें साहजिक आहे. आतां जरा अंतरावर उभे राहून सबंध मंदिरावर – पायापासून शिखरापर्यंत – एकवार एकदम नजर फेकूं, नेत्रांचें पारणें फेडूं, आपलें हृद्गत श्रीसमर्थचरणीं निवेदन करूं आणि मोकळे होऊं !

ग्रन्थाचा मंगलारंभ जसा श्रीसमर्थांच्या ओवीनें केला, तसा शेवट हि त्यांच्या च ओवीनें करीत आहें. ग्रन्थारंभीं ग्रन्थाची अकरा प्रकारची फलश्रुति सांगितली आहे, तीपैकीं वाचकांस, अकराचे अकरा प्रकार बाजूस राहोत, पण एका हि प्रकारच्या फलश्रुतीचा प्रत्यय आला नाहीं, तर ग्रन्थाची किती हि स्तुति केली तरी तिचा काय उपयोग ? बरें, अनुभव आला, कोणाला कोणत्या कोणाला कोणत्या फलश्रुतीचा अनुभव येत गेला, तर स्तुति करण्याचें कारण च उरत नाहीं. वाचकांस येणारा अनुभव ही च ग्रन्थाची स्तुति होय.

शिवाय, या ग्रन्थांत माझें असें काय आहे ? ग्रन्थारंभीं कल्पना केल्याप्रमाणें, या ग्रन्थांतील तीन चतुर्थांश भाग तर श्रीसमर्थांचा च आहे. त्यांत मीं फक्त वाटाड्याचें काम केलें आहे. मागील प्रकरणांतील हेळवाकची घळ दाखविण्यास कोंढवळ्याचे जे वाटाडे आम्हीं बरोबर

घेतले होते, त्यांच्यापेक्षां माझी निराळी अशी कामगिरी कोणती? त्यांना घळ माहित होती, ती त्यांच्या पाहण्यांत आधींची होती, ती त्यांनीं आम्हांस दाखविली आणि श्रीसमर्थवाङ्मयांतील त्यांच्या अंतरंगाच्या खुणा माझ्या पाहण्यांत आधीं आल्या होत्या, त्या मी दाखवीत गेलों, यांत आम्हां दोघांच्या कामगिरींत फरक कोठें आहे? दोघांच्या हि कामगिरीचें स्वरूप सारखें च होय. श्रीशिवछत्रपति श्रीसमर्थांच्या दर्शनास आले असतां एका वाटाड्यानें त्यांना वाट दाखवीत शिंगणवाडीच्या रानांत श्रीसमर्थ बसले होते तेथें नेलें आणि त्यांची भेट करून दिली. त्या उभयतांच्या भेटींत जो सुखसंवाद झाला असेल त्यांतील एक हि शब्द त्याच्या कानांवर गेला असेल, नसेल! त्याला फक्त श्रीसमर्थ कोठें बसले होते तें माहित होतें व त्यांची आणि राजांची गांठ घालून द्यावयाची, एवढेंच त्याचें काम होतें. या ग्रन्थांत माझें हि तेवढेंच काम होतें. श्रीसमर्थ-वाङ्मयांतील मला माहित असलेल्या श्रीसमर्थहृदयाच्या खुणा वाचकांच्या नजरेस आणून द्यावयाच्या! वाङ्मय श्रीसमर्थांचें, त्याचे भोक्ते वाचक आणि वाचकांना प्रत्यय यावयाचा आहे तो श्रीसमर्थांच्या अंतरंगाचा, माझ्या लिहिण्याचा नव्हे. मठामठांतील संग्रह मिळवून त्याचें प्रकाशनाचें काम, श्रीसमर्थांच्या दरबारांतील हमाल म्हणून आजवर केलें आणि आज, त्यांच्या दरबारांतील वाटाड्याच्या कामावर नेमणूक झाल्यामुळें श्रीसमर्थ-हृदयाच्या खुणा दाखविण्याचें काम वांट्याला आल्यानें तें करीत आहें. श्रीसमर्थदरबारांतील हमाल आणि वाटाड्या म्हणवून घेण्याचें परम भाग्य मला लाभलें, ही मी श्रीसमर्थांची कृपा समजतों.

वाचकांना विचारावेंसें वाटतें, श्रीसमर्थांचा कवितासमुद्र तुम्ही उल्लंघून आलांत, मार्गांत ठिकठिकाणीं श्रीसमर्थहृदयाच्या अनेक खुणा पाहिल्यात, त्यावरून श्रीसमर्थहृदय किती विशाल असलें पाहिजे, याची तुम्हांस कल्पना आली ना? मला तर त्यांच्या हृदयांत सारें ब्रह्मांड सामावलेलें दिसत आहे. हें त्यांच्या उपासनेचें फळ होय. अखिल विश्वाला गवसणी घालण्याची ज्यांची उपासना, त्यांच्या हृदयानें साऱ्या ब्रह्मांडाला कवळावें, हें सहज च होय. जनतेशीं तन्मयता पावलेलें, जगदंतरीं मिसळून गेलेलें तें हृदय! ज्या प्रार्थनेनें मागील प्रकरणाचा आपण शेवट केला ती प्रार्थना च कां पाहा

ना? तींत जनतेपासून निराळें असें त्यांचें स्वतःचें अस्तित्व कोठें दिसतें का? सारी तळमळ जगाच्या कल्याणासाठीं! जगाचें कल्याण हें च त्यांचें ध्येय होतें व तें च त्यांचें रामापाशीं मागणें होतें.

त्यांच्या हृदयाच्या विशालत्वाची साक्ष त्यांचें एकंदर चरित्र च देत आहे. त्यांचे यच्चयावत् ग्रन्थ आणि त्या ग्रन्थांतील तत्त्वज्ञान आणि शिकवण हीं च, त्यांनीं केवढा प्रचंड व्याप केला असला पाहिजे याची अखंड साक्ष देत राहतील. त्यांनीं स्थापिलेले चिरंजीव मारुती, त्यांचे सर्व देशभर पसरलेले मठ, त्यांची आजपर्यंत चालत आलेली शिष्यपरंपरा, खुद्द जांब, चाफळ, सज्जनगड वगैरे स्थानें, हीं त्यांच्या सर्वांगीण व्यापाचीं चालतीं बोलतीं स्मारकें होत. फार काय पण श्रीसमर्थवाग्देवतामंदिरांत मठामठांतील एकत्रित केलेला हस्तलिखित बाडांचा, प्रचंड तसा च बहुमोल, संग्रह जो पाहील त्यास त्यावरून त्या महापुरुषाच्या हालचालीची आणि सामर्थ्याची यथार्थ कल्पना होईल. श्रीमत् आद्य शंकराचार्यांनंतर इतका प्रभावशाली प्रचारक दुसरा कोणी झाला च नाहीं. त्यांना जाऊन अडीचशें वर्षांहून जास्त वर्षें होऊन गेलीं, तरी त्यांच्या व्यापाचीं अवशिष्ट चिन्हें आज हि भरतखंडभर पसरलेलीं दृष्टीस पडत आहेत. महाराष्ट्रांतील विद्वानांच्या, देशभक्तांच्या, धर्मरक्षकांच्या, आबालवृद्ध स्त्रीपुरुषांच्या मनावर त्यांनीं आपल्या चारित्र्याची जी कायमची छाप बसविली आहे, ती च त्यांच्या व्यापक आणि विशाल हृदयाची निदर्शक अशी प्रमुख खूण होय. मला तर असें वाटतें, महाराष्ट्रांतील बुद्धिमान सच्छील माणसें मनावर घेतील तर जुन्या मठांचा जीर्णोद्धार करून त्यांना व्यवस्थित वळण लावतील, नवीन मठ स्थापन करतील, इतकें च नव्हे, तर श्रीसमर्थांच्या तत्त्वज्ञानाचा प्रसार सर्वत्र करूं शकतील. असा ईश्वरी पुरुष ज्या भूमींत जन्माला येतो, ती पुण्यभूमि होय. तो आपल्या अवतारानें आपल्या समाजाला, धर्माला आणि राष्ट्राला अमरत्व प्राप्त करून देत असतो.

श्रीसमर्थहृदयाची ओळख पटविण्याचें मुख्य साधन म्हणजे त्यांचे ग्रन्थ होत. त्या त्यांच्या संपूर्ण ग्रन्थांची यादी या ग्रन्थाच्या आरंभीं दिली आहे. ती देतांना ग्रन्थांचें स्वरूप व संभाव्य रचनाकाल हीं विचारांत घेऊन

[ १ ] ते [ ९ ] असा मी त्यांचा क्रम लावला व त्या च क्रमांत एक एक ग्रन्थ घेऊन त्याचें विवेचन करीत गेलों, जेथें जेथें त्यांच्या अंतरंगाच्या खुणा आढळत गेल्या, तेथें तेथें थोडा वेळ जास्त रमत गेलों आणि अशा रीतीनें त्यांच्या हृदयाचें विशालत्व अवलोकीत आणि अनुभवीत या ग्रन्थाचा आज शेवट गांठला. माझी कल्पना अशी आहे कीं, केव्हां तरी **श्रीसमर्थवाङ्मयमूर्तीची एक पेटी** च तयार करावी व तींत त्या नऊ ग्रन्थांचा समावेश करून पेटीच्या एका कोपऱ्यांत या **श्रीसमर्थहृदय** ग्रन्थाला जागा द्यावी. श्रीसमर्थहृदय ग्रन्थ वाचतांना श्रीसमर्थांची संपूर्ण वाङ्मयमूर्ति सांन्निध असणें अत्यंत आवश्यक आहे. अशी ती श्रीसमर्थ-वाङ्मयमूर्तीची पेटी महाराष्ट्रांत घरोघरीं प्रतिष्ठित व्हावी. आज श्रीसमर्थ हे आपल्या वाङ्मयाच्या स्वरूपांत च आपल्यामध्यें आहेत. ज्या घरीं या वाङ्मयमूर्तीची प्राणप्रतिष्ठा होईल त्या घरीं श्रीसमर्थ नांदतील.

माझें बोलणें संपलें. महाराज, या हृदयग्रन्थास आपला आशीर्वाद असावा. कोठें ती थोर मंडळी आणि कोठें मी ! कल्याण, उद्धव, वेणाबाई, अंबाबाई, दिनकर, भीम, दिवाकर, देवदास, अनंत, मेरु, गिरिधर, केशवस्वामी, रंगनाथस्वामी, उद्धवचिद्धन इत्यादिकांना आपली प्रत्यक्ष संगति लाभली होती. त्यांनीं किती तरी प्रेमानें आणि आदरानें आपल्याविषयीं गौरवाचे उद्गार काढले आहेत ! नंतरच्या हि परंपरेंतील असंख्य स्त्रीपुरुषांनीं व शिवदिनकेसरी, महिपति, मोरोपंत यांच्यासारख्या बाहेरच्यांनीं हि आपलीं अनेक स्तुतिस्तोत्रें गायिलीं आहेत ! या सर्वांच्या पुढें मी एक हीन दीन रंक भिकारी आहें ! पण सद्गुरुस्वरूप वर्णन करण्याला कोणाला हि प्रतिबंध थोडा च असतो ? " आपल्या भावासारिखा मनीं । देव आठवावा ध्यानीं । तैसा सद्गुरु हा स्तवनीं । " स्तवावा, ही च आपली अनुज्ञा मानून मी माझ्या भावाप्रमाणें आपलें हृदय रेखाटलें आहे. मी बोलून चालून अल्पमति. मला जसें कळलें, स्फुरलें, सत्यसें भासलें तसें मी लिहीत गेलों. ग्रन्थ पुरा झाला अथवा त्याचें हें शेवटचें संस्करण होय, असें मी मानीत नाहीं. त्यांत कांहीं चुकीचीं विधानें केलीं गेलीं असतील, तीं आपण शुद्ध करावीं, कांहीं गळालीं असतील तीं घालून, आपल्या इच्छेस येईल तेव्हां ग्रन्थ पुरा करून त्यावर आपला शिक्कामोर्तब व्हावा, अशी

आपल्या चरणीं प्रार्थना आहे. तोंवर त्यावर अनेक संस्कार होत राहावे व महाराष्ट्रवाचकांच्या प्रेमास तो अधिकाधिक पात्र होत जावा, असा त्यास आपला कृपाशीर्वाद असावा !

श्रीसमर्थांचें अवतारकार्य अनुपम आहे, त्यांची उपासना अलौकिक आहे, त्यांच्या तत्त्वज्ञानाचा पाया कोणी अमान्य करूं शकणार नाहीं, त्यांची शिकवण ब्रह्मांडाला गवसणी घालणारी आहे, त्यांचें कर्तृत्व अचाट आहे ! एका काळीं रावापासून रंकापर्यंत सारा महाराष्ट्र त्यांच्या चरणीं लीन होऊन त्यांचा अनुयायी बनून वैभवाच्या शिखरावर आरूढला होता. तें च वैभव पुनरपि प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर त्यानें पुन्हा त्या च चरणांचा आश्रय केला पाहिजे, असा माझा अढळ विश्वास असल्यामुळें मीं हा उद्योग आरंभिला. दिवसानुदिवस महाराष्ट्राचें चित्त श्रीसमर्थचरणांकडे अधिकाधिक लागत जावें व पुनरपि आतां एकवार महाराष्ट्राच्या भाग्याचा दिवस जो उजाडावा तो कालत्रयीं पुन्हा मावळूं च नये, अशी प्रार्थना करीत माझा देह आणि हा श्रीसमर्थहृदयग्रन्थ श्रीसमर्थचरणीं अर्पण करितों !

**इति श्रीसमर्थहृदयग्रंथ । जेथ नांदती स्वामी समर्थ ।**
**श्रीगुरुचरणी अर्पूनि कृतार्थ । आजि जालों जी ॥**

श्रीसमर्थमंदिर – जांब
१८६४ श्रीरामसमर्थनवमी } शंकर श्रीकृष्ण देव

॥ श्रीरामसमर्थ ॥

# प्रार्थना

महाराज पुन्हा कधीं येणार
राष्ट्रोद्धार करणार॥ ध्रु० ॥

शिवकल्याणा संगें घेउनि
भूतलिं अवतरणार ॥ १ ॥

भक्तजनांच्या दैन्या पाहुनि
हृदया द्रव फुटणार ॥ २ ॥

घटिका पळ हि युगसम भासत
'थांब' किती वदणार ॥ ३ ॥

धर्मग्लानी पूर्ण जाहली
अंत किती बघणार ॥ ४ ॥

धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार ।
जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ १ ॥

हीं तव वचनें दासबोधिंचीं
सत्य कधीं होणार ॥ ५ ॥

कळवळोनी सद्गुरुराणा
सत्वर गति येणार ॥ ६ ॥

त्या येण्याची वाट पाहत
प्राण कंठिं उरणार ॥ ७ ॥

महाराज पुन्हा कधीं येणार
विश्वोद्धार करणार ॥ ध्रु० ॥

